# प्रस्तावना

श्री. देशपांडे यांनीं मोठ्या मेहनतीनें आणि हौशीनें मराठी काव्यवाङ्मयाचें मंथन करून काढलेल्या नव्या नवनीताला माझ्याकडून प्रस्तावना मागितली. आणि मराठी भाषेच्या आसक्तीमुळे मीं त्यांची मागणी कबूल केली. दिवसभर कार्यक्रमानें भरलेल्या अखंड पद्यात्रेंत अशा कामासाठीं निवांत वेळ काढणें कठीण, ही माहीत असलेली गोष्ट पुन्हा माहीत झाली. पण दिलेला शब्द मींच जर मोडला असता तर मला मिळालेलीं असंख्य दानपत्रें गमावण्याची पाळी येणार. त्यामुळें चार शब्द लिहून सुटका करून घेणें एवढाच उपाय उरला.

तीन खंडांतून आदिपासून आतांपर्यंतच्या एकशेंसाठहून अधिक कवींचे चविष्ट उतारे या एका पुस्तकांत संग्रहिले आहेत एवढ्या काळांत निदान हजार तरी कवि झाले असतील. अशा स्थितींत कुणाच्या आवडीचा कोणी कवि सुटला असल्यास तक्रार करणें नियमबाह्य ठरवावें लागेल. एरवीं स्वानुभवदिनकराचे कर्ते दिनकर, योगवासिष्ठाचे टीकाकार रंगनाथ, प्रसिद्ध वेदांती कवि हंसराज, आधुनिकांपैकीं साने गुरुजी, सेनापति बापट इत्यादि अनेक नांवें नसल्याची तक्रार मींच केली असती. पण ती मीं न करण्याचें ठरविलें आहे.

कोणत्या कवीला किती जागा द्यावी हाहि रुचिभेदाचा विषय होऊं शकेल. ज्यांनीं जास्त पृष्ठें पटकाविलीं आहेत, अशा सहा कवींचीं नांवें अशीं आहेत :

| | पृष्ठें |
|---|---|
| १ रामदास | ३८ |
| २ ज्ञानदेव | २३½ |
| ३ तुकाराम | २२ |
| ४ एकनाथ | १६ |
| ५ मुक्तेश्वर | १६ |
| ६ कात्दरे | १४ |

असे हे नंबर आहेत. रामदासांनीं विविध प्रकारची उदंड कविता लिहिली असली तरी तुकाराम आणि एकनाथ यांच्या बेरजेइतकी जागा त्याना दिली हें कदाचित् त्यांनाच आवडणार नाहीं. आणि काटदऱ्यांच्या बाबतींत, त्यांचा काव्यगुण लक्षांत घेऊनहि, अधिक काटकसरीची गरज होती, असें कोणीहि म्हणेल. सहस्रावधी कविता-लिहिणाऱ्या वामन मोरोपंतांसारख्या महाकवींची सात सात पृष्ठांत निव्हे लागली आहे. पण रसिकतेचें सर्वमान्य शास्त्र अजून तयार झालें नसल्यामुळें अशा बाबतींत यदृच्छालाभसंतोष राखावाच लागतो.

ज्या कवींच्या कवितेंतून वेचा घेतला आहे, त्यांनाहि न्याय मिळालाच आहे अशी ग्वाही देणें कठीण जाईल. उदाहरणार्थ मोरोपंतांनीं एकदों आठ रामायणें लिहिलीं त्यांचा पत्ताच या संग्रहांत नाहीं. एखादा लहानसा उतारा घेतां आला असता. वामनाची यथार्थदीपिका मराठी भाषेचें अभिमानाचें स्थान असूं शकतें. अठरा हजार ओव्यांतून पांच दहा ओव्या तरी घ्यावयास हव्या होत्या. तुकारामाच्या अभंगांची समाधानकारक निवड तुकारामच करूं शकेल. तथापि 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती' असा लाख मोलाचा अभंग गाळून चालणार नाहीं. महिपतींची ख्याति संतचरित्रलेखक या नात्यानें, पण त्यांचा एक उतारा घेतला आहे तो कृष्णलीलापर. तो उतारा चांगला असला तरी त्यांत महिपतींचा विशेष प्रगट होत नाहीं. ज्ञानदेवांच्या नावावर योगवासिष्ठाचे दोन उतारे दिले आहेत त योगवासिष्ठ धुळेकरांनीं ज्ञानदेवांचें म्हणून प्रकाशित केलें आहे. पण ज्ञानेश्वरी लिहिणाऱ्या ज्ञानदेवाचें तें नाहीं. माझें तर निश्चित मत आहे कीं, ज्ञानदेवांनीं गीतेशिवाय कोणत्याहि ग्रंथावर भाष्य लिहिलें नाहीं. 'म्हणोनि मज कांहीं, समर्थेनीं आतां विषय नाहीं,' असें त्यांनींच म्हटलेलें आहे. अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, आणि अनुभवोद्गाररूप अभंग ही त्यांची स्वतंत्र रचना म्हणून योगवासिष्ठाचे हे उतारे घ्यावयाचे तर 'ज्ञानदेव द्वितीय' म्हणून घ्यावयास पाहिजेत. तसेंच कान्होबा आणि बहिणाबाई यांचा उतारा तुकारामांत अंतर्गत केला आहे. तो घ्यायचा तर अलग घ्यावयास पाहिजे. असें हें अनेकविध असमाधान यांत राहून गेलें असलें

तरी, एकाच ग्रंथांत आठशें वर्षांचा सबंध प्रवाह एकत्र पाहावयास मिळतो, हें कांहीं लहान समाधान नाहीं. एवढ्या मोठ्या समाधानांत अनेक असमाधानें लोपून जाण्यासारखीं आहेत.

'नवें नवनीत' वाचून वाचकांच्या लक्षांत येईल कीं मराठी काव्याची लांबीरुंदी वाढत आहे. ज्ञानदेव, तुकाराम आदि महापुरुषांनीं मराठी काव्याला खोली दिली आहे. आणि आजतागायत त्यांच्या काव्याचें पठण, मनन आम्ही महाराष्ट्रीय करीतच आलों आहोंत. त्यामुळें त्यांनीं दिलेली खोली गमावून बसण्याचें आम्हांला भयच नाहीं. त्या खोलीबरोबर, अर्थात् ती खोली कायम राखून, लांबीरुंदी वाढत गेली तर मराठी काव्य विश्वव्यापक सहानुभूति प्रगट करूं शकेल अशी आशा करतां येते. काळाची चाळणी चाललेलीच असते. त्यामुळें विसरण्यासारखें विसरलेंच जाणार आहे. पण दीर्घ काळांत विसरलें गेलें तरी चालू काळांत कां होईना, चार दोन हृदयांना रिझविण्याचें भाग्य ज्या कवितेला लाभेल तीहि सार्थक झाली असेंच मानावें लागेल. व्यापक सहानुभूति हेंच कवीचें भांडवल आहे. आणि तें जितक्या अधिक प्रमाणांत ज्याला उपलब्ध झालें तितका तो कवि आणि त्याची कविता कृतार्थ होईल. 'नवें नवनीत' पाहतां अशी कृतार्थता मराठी काव्याला लाभण्याची शक्यता दिसून येते ही आनंदाची गोष्ट आहे.

कविहृदय कसें असावें या बाबतींत ज्ञानदेवाचा एक अभंग मला फार मोलाचा वाटतो. तो अभंग आणि त्याचें जें चिंतन मीं 'ज्ञानदेवाचीं भजनें' या माझ्या पुस्तकांत प्रगट केलें आहे तें देऊन ग्रंथकार्याला दिलेल्या वचनांतून मी माझी सुटका करून घेत आहें.

विश्वाचें आर्त माझे मनीं प्रकाशलें।
अवघेचि जालें देह ब्रह्म ॥
आवडीचे वालभ माझेनी कोंदाटलें।
नवल देखिलें नभाकार गे माये ॥
रखुमादेवीवरु सहज नीटु जाला।
हृदयीं निटावला ब्रह्माकारें ॥

सर्वांच्या हृदयांतील आर्तता, सर्वांचें दुःख माझ्या हृदयांत उमटत असतें. हें सर्व विश्व माझेंच शरीर आहे, आणि तेंहि पुन्हा ब्रह्ममय आहे, असें मी अनुभवतों. सर्वांना आवडणारें प्रेम मीच होऊन बसलों आहे. *आपला प्रीतिभंग होऊं नये, आपले मनोरथ सुफलित व्हावे,* याविषयीं त्या त्या प्राण्याला जी जी तळमळ वाटते ती ती सर्व मलाच वाटते. मला क्षुद्र म्हणून कांहीं भेटतच नाहीं. जें भेटतें तें आकाशासारखें विशाल आणि महान् भेटतें–मग तो क्षुद्र मानलेला जंतु का असेना! असंख्य आकाशें एकमेकांना भेटून राहिलीं आहेत, असें माझें अद्भुत दर्शन आहे. माझ्यासाठीं जणुं आकाशाची खाणच उघडली आहे ऋजु कुटिल नाना वेष घेऊन परमेश्वर लीला करून राहिला आहे असे म्हणतात. पण माझ्यासाठीं कुटिल किंवा वांकडें कुठेंच नाहीं. जें आहे तें ऋजु नीटच आहे. वरून वरून कामक्रोधादिकांनीं किंवा द्वेष ईर्षा असूया आदिकांनीं, प्रेरित होऊन वागतांना कुणी दिसलें. त्यांच्या त्या विकारांच्या मुळाशीं शुभाकांक्षाच भरली आहे, असें मी त्यांच्या हृदयांत प्रवेश करून पाहून घेतलें आहे. विकारांच्या मुळाशीं असलेली ब्रह्मप्रेरणा—विकारांची ब्रह्माकारता—ओळखल्यामुळें मला सहजच सर्वांविषयीं सहानुभूति वाटते.

पडावः वालम
जिल्हा : महेसाणा ( गुजरात )
२७।१२।५८

# संपादकीय निवेदन

बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट. कविता बरी वाटली की मी ती एका वहीत लिहून ठेवीत असें. येणारे जाणारे लोक जाड सहज चाळीत असत. मराठ्यांचीं संग्रामगीतें रचणारे जळगांवचे प्रसिद्ध कवि तिवारी यांची इब्राहिमखानावरील कविता वाचून अनेकांनीं मान डोलविली व ही कविता कुठल्याहि काव्यसंग्रहांत का नाहीं असा प्रश्न उपस्थित केला. तोच प्रकार नागपूरकडील कवि गोवडे यांच्या कवितांच्या बाबतींत झाला. या कविता प्रसिद्धीस आल्या पाहिजेत असें सर्वांचें मत पडलें.

दुसरी गोष्ट कॉलेजमधील एका विद्यार्थ्याची. तेव्हां रोज लागलेलें नवकाव्य तेवढेंच श्रेष्ठ काव्य असें तो नेहमीं सांगे. त्याला पूर्वीच्या काव्याची अजिबात माहिती नाहीं हें लक्षात आल्यावर जुनें काव्य वाचून काय उपयोग असें तो सांगे. तरी त्याच्याकडून तुकाराम, बालकवि, इत्यादिकांच्या कांहीं कविता वाचून घेतल्या. त्यानंतर त्याचा सगळा वाद थंडावला व मराठी काव्याचें आरंभापासून यथार्थ दर्शन घडविणारा काव्यसंग्रह झाला पाहिजे असा त्यानेंच मुद्दा मांडिला.

यापूर्वीपासूनच माझ्याहि मनात काव्यसंग्रहाची कल्पना घोळत असे व इ. स. १९४० सालीं 'बी' व इतर कांहीं कविवर्यांबरोबर याबद्दल पत्रव्यवहार करून त्यांचीं मतें मीं अजमाविलीं होतीं. एका कवींनीं काळ अनुकूल नाहीं असें मत दिलें. एका कविवर्यांनीं मात्र हें काम किती अडचणीचें आहे त्याची स्पष्ट कल्पना दिली व अभ्यास न करता उतावळेपणानें काव्यसंग्रह करण्यास निघाल्याबद्दल चांगली कानउघाडणी केली. तेव्हां स्वतःचा वेडेपणा लक्षांत येऊन प्रथम नीट अभ्यास करण्याचें मीं ठरविलें. सुरुवातीला सर्व काव्यसंग्रहांचें परीक्षण केलें. या परीक्षणाची चर्चा करण्यापूर्वी कविता या वाङ्मयप्रकाराला काय स्थान आहे तें थोडेसें पाहू.

प्रत्येक समाजामध्यें पुरातन काळापासून वाङ्मय निर्माण होऊन त्यानें मानवी संस्कृतीचें संवर्धन झालें. जसें शरीराला अन्न तसें वाङ्मय मनाचें अन्न होय. वाङ्मयाचा अभ्यास करून विद्वान झालेल्या लोकांना पूर्वी विद्वान सर्वत्र

पूज्यते असा मान होता व राजाचेंहि मस्तक विद्वानापुढें लवे. वाङ्मयाच्या अनेक प्रकारातील काव्य या प्रकाराला विशेष महत्व आहे. वाणींतून स्फुरलेलें वाङ्मय लिपिबद्ध होण्यापूर्वी जेव्हा तें मुखोद्गत करावें लागे तेव्हा परपरेनें तें चालू ठेवण्याचा सोपा मार्ग काव्य हाच होता. काव्यात भावनांचा आविष्कार सहज होतो व तें मनाची पकड त्वरित घेऊ शकतें त्यामुळें मोठ्या लोकाची कीर्ति कवींच्यावर अवलबून असे. रामचद्राच्या कीर्तीचें खरेंच श्रेय वाल्मीकींना आहे. या सामर्थ्यामुळे कवींना पूर्वी फार महत्व होतें. देशातील मोठे लोक व सर्व समाज याना वाङ्मय, कविता, याजविषयीं तेव्हा आस्था असे व विद्वानाना आणि कवींना प्रतिष्ठा मिळणें क्रमप्राप्तच होतें.

आताची स्थिती काय आहे व आधुनिक काळात महत्व कोणत्या गोष्टींना आहे हें निराळें सागण्याची जरूर नाहीं. त्यातच धावपळ व चिंता सर्वांच्या मागें असतात. त्यामुळे भर्तृहरीनें वर्णन केलेला 'साहित्यविहीन' वर्ग वाढून कृष्णदास मुद्गलानीं सागितल्याप्रमाणें 'साहित्यसूर्यमडळ' बुडण्याची भीति उत्पन्न होत आहे. कविताचा उपयोग काय, पैसा मिळविण्याचें सोडून कविता गोळा करणें मूर्खपणाच नाहीं काय, असे प्रश्न अनेक उच्चपदस्थ सुशिक्षित लोकानीं मला विचारले. कविताचा उपयोग काय हें त्याचें वाचन करावयाचेंच नाहीं असे ठरविलेल्या लोकाना कसें सागणार ? चागलें काव्य चित्त लुब्ध करतें व आपण नकळत असें काव्य गुणगुणत बसतों याचा प्रत्येक वाचकाला अनुभव असतो तुकाराम, ज्ञानेश्वराच्यासारखे महाकवि तर त्रासलेल्या मनाला विरगुळा देऊ शकतात. हा कवितेचा फायदा लहान नाहीं. आणि कविताचा उपयोग नाहीं, तर कला, फुलें इत्यादिकाचा तरी काय उपयोग ? पूर्वींच्या काळात वाङ्मयाबद्दल अनास्था नव्हती असें मात्र नाहीं. 'अभिज्ञास तों ग्रासिलें मत्सरानें। धनाढ्य प्रभू व्यापिले दुर्मदानें। शिरीं थोर अज्ञान मूर्खांस ओझें। जिरालें निजागींच पाडित्य माझें ॥' अशी तक्रार भर्तृहरीलाहि करावी लागली. चागल्या वाङ्मयाचीच काय, कुठल्याहि चागल्या गोष्टीची गळचेपी सर्व काळातून होत आलेली आहे. पण सध्याच्या स्थितींत देखील सरकारी बुकडेपोंत नवनीताची अठरावी आवृत्ति विकत घेण्यासाठीं लागलेल्या रागा पाहिल्यावर लोकाना काव्याची आवड उरली नाहीं असें

म्हणणें कुणालाहि कठीण झालें असतें. नवनीताच खास वैशिष्ट्य आहे व असं भाग्य दुसऱ्या काव्यग्रंथाच्या वाट्याला तो चांगला असला तरी येणें शक्य नाहीं हें खरें, परंतु त्याला दुसरी अनेक कारणें आहेत.

' ... महाराष्ट्रकविपरंपरा । खंड न पडला तिला जरा ॥
उणीव रसिकांचीच परी । आज भासते खरोखरी ... ॥ '

हें 'बी' कवींचे वचन तितकेंसे बरोबर वाटत नाहीं या काव्यसंग्रहाच्या निमित्तानें समाजाच्या निरनिराळ्या थरातील शेकडों व्यक्तींच्याबरोबर जी चर्चा झाली, तिच्यावरून खरी उणीव रसिकांची नसून, लोकांच्या हातात चांगलें वाङ्मय व काव्य पोंचविणाऱ्या साधनाची आहे असे वाटलें. चांगल्या वाटलेल्या कविता लिहून ठेवणारे कितीतरी लोक आढळले. एक विशेष गोष्ट म्हणजे बहुतेकांनीं आपण आताचीं मासिकें व वर्तमानपत्रे यातील कविता वाचण्यात वेळ घालवीत नसल्याचें सांगितलें. आर्थिक अडचणी असूनहि कवितांचीं पुस्तकें विकत घेणारे पुष्कळ साधारण स्थितींतले लोक मला माहीत आहत.

मराठी भाषेंतील काव्यसंग्रहाचें परीक्षण करताना जवळजवळ दोनशें काव्य संग्रह पाहण्यास मिळाले. या सर्वांचा मेरुमणि म्हणजे इ. स. १८५४ सालीं प्रसिद्ध झालेलें परशुरामपंत तात्या गोडबोले यांचें नवनीत. हा काव्यसंग्रह एका परकीय राज्यसत्तेच्या आश्रयाखालीं झाला हें विशेष आहे व हा राज्यसत्तेचा पाठिंबा अनाठायीं नव्हता हें नवनीताच्या लोकप्रियतेनें सिद्ध करून दिलें नवनीताच्या काळीं आताइतकें काव्य उपलब्ध नव्हतें व मिळेल त्या मानानें तें छापणें महत्त्वाचें होतें. नवनीतानंतरच्या काळात माधव चंद्रोबा यांचें 'सर्व संग्रह,' वा. दा ओकांचें निर्णयसागरमधील 'काव्यसंग्रह,' वि. ल. भावे यांचें 'महाराष्ट्र कवि' इत्यादि मासिकांनीं असेंच उपलब्ध कविता छापण्याचें कार्य केलें नवनीतानंतर वि कों ओक यांचा फुलांची परडी' ( इ. स. १८९१ ) यासारखा एखादा जुन्या कवितांचा संग्रह आढळतो, पण आता पर्यंत देखील पेशवाईअखेरपावेतोंच्या काळाचा प्रमुख काव्यसंग्रह नवनीतच आहे.

चालू शतकामध्यें पुष्कळ अर्वाचीन काव्यसंग्रह निघाले. कवि चंद्रशेखरांनीं संपादित केलेली 'अर्वाचीन कविता' ( इ.स.१९०३ ), लेले टिळकादिकांची

'अभिनवकाव्यमाला', दि. ग. केळकर व आचार्य अत्रे यांची 'महाराष्ट्र शारदा', रा श्री. जोग व कुसुमाग्रज यांची 'काव्यवाहिनी,' तसेच 'आजची मराठी कविता', इत्यादि अनेक अर्वाचीन कवितासंग्रह आहेत. दुसऱ्या काहीं संग्रहात जुन्या व आधुनिक कविता समाविष्ट केल्या आहेत लक्ष्मणशास्त्री लेले यांचें 'काव्यसादर्य' (इ. स १९०७), व 'पद्यरत्न समुच्चय' (इ स. १९०९), सि. वा पेंडसे यांची 'रसतरंगिणी' (इ स १९१०), कृ गा सिनरे यांचें 'काव्यामोद' (इ. स. १९१४), रानडे व रानोलकर यांची 'महाराष्ट्रसरस्वती' (इ. स १९३५), यशवंताची 'कविपरंपरा' इत्यादि संग्रहात दोन्ही तऱ्हेच्या कविता आहेत. महाराष्ट्रसरस्वतीचें विषयानुसार रचना हें एक वैशिष्ट्य आहे. याशिवाय इंदूर, कोल्हापूर, बेळगाव इत्यादि ठिकाणीं छापलेले प्रादेशिक काव्यसंग्रह, 'उपासिनी' (इ १९३६) सारखे विनोदी काव्यसंग्रह व सुगी (इ. स. १९१२) सारखे जानपदगीतसंग्रह असे विविध प्रकारचे काव्यसंग्रह आहेत

एवढे काव्यसंग्रह असताना नवीन काव्यसंग्रहाची जरूर काय हा प्रश्न साहजिक उपस्थित होता या सर्वांचें निरीक्षण केल्यावर काहीं ठळक गोष्टी नजरेस येतात बरेच काव्यसंग्रह ल्हान कालखंडाचे दर्शक आहेत. हे संग्रह करताना कवितांची निवड विशिष्ट दृष्टिकोन ठेवून केलेली नाहीं जास्तींत जास्त कविता मिळवून नतर त्यांचे संकलन करण्याचा पद्धतशीर यत्न केलेला दिसत नाहीं कोणकोणते ग्रंथ पाहून संग्रह केला हें कळणें कठीण बरेचसे संग्रह शाळा कॉलेजमध्यें अभ्यासक्रमात लावण्याच्या व्यावहारिक हेतूनेंच केल्यामुळें वाङ्मयीन दृष्टि असावी तेवढी राहिली नाहीं तेव्हा केवळ वाङ्मयीन दृष्टि ठेवून व अगदीं प्रथमपासून तों आतापर्यंतच्या काळातील मिळतील तेवढ्या कवितांचें परीक्षण करून तयार झालेल्या काव्यसंग्रहाची उणीव भरून काढावयाचें कार्य शिल्लक आहे असे दिसलें व तें करण्याचा संकल्प निश्चित केला

संकल्प केला खरा, पण काव्यसागराचें अवगाहन किती कठीण आहे तें पदोपदीं कळू लागलें व 'तितीर्षुर्दुस्तरं मोहात् । उडुपेनास्मि सागरम् ॥' हें कालिदासाचें वचन आठवू लागलें सर्व मराठी काव्यग्रंथ एके ठिकाणीं मिळणें अशक्य त्यात हस्तलिखित वाङ्मय गावागावीं विखुरलेलें. त्यामुळें निरनिराळ्या ठिकाणीं फिरणें अवश्य झालें. प्राचीन वाङ्मयाबद्दल विद्वानांना व आधुनिक

काव्याबद्दल कवींना किंवा त्यांच्या वारसांना त्रास देणें भाग पडलें. हें काम म्हणजे पैसे मिळविण्यासाठीं लायब्ररीमधील ग्रंथांचीं पानें फाडून केलेला उद्योग नसून उलट पैसे घालविण्याचा हा उद्योग आहे हें पुष्कळ वेळा समजावून द्यावें लागलें. अजून या कार्यामागें व्यावहारिक हेतू आहे असें एकदोघांना वाटत आहे असें आढळून आलें. कांहीं विद्वानांनीं श्रेयहरणाच्या भीतीनें तर कांहींनीं मोठेपणामुळें जुन्या वाङ्मयासंबंधीं मदत करण्यास टाळाटाळ केली. त्यामुळें कांहीं प्राचीन उतारे घेतां आले नाहींत. महद्‌बेच्या धवळ्यासंबंधांत अडचण उपस्थित झाली. कांहीं कवींनीं व लेखकांनीं उत्तरेंच पाठविलीं नाहींत. कांहींनीं भरपूर द्रव्याशिवाय बोलणें करण्याचेंच नाकारलें. अशा मोठ्या संग्रहांत अनेक निरनिराळ्या तऱ्हेच्या व प्रकृतीच्या लोकांना सांभाळून काम करण्याची कसरत करावी लागते व त्यांत कांहीं कवींच्या कविता घेतां येत नाहींत अशी परिस्थिति उद्भवली नाहीं तरच नवल. कांहीं कविता घेतां येणार नाहींत हें भविष्य सुरुवातीलाच कळून आलें तथापि एकंदरींत सर्व लेखकांनीं, विद्वानांनीं, व त्यांच्या वारसांनीं आपुलकीनें मदत केली व हें काम पुष्कळदा बंद पडून राहत होतें तरी कोणाच्या तरी प्रोत्साहनानें परत सुरू होऊन पूर्ण होऊं शकलें. ज्यांच्या कविता या काव्यसंग्रहांत येणें अगदीं आवश्यक होतें परंतु त्या कविता घेतां आल्या नाहींत असे विशेष कवि म्हणजे तांबे. तांब्यांच्या कविता वर उल्लेखिलेल्या कांहीं गोष्टींमुळे घेतां आल्या नाहींत याबद्दल फार खेद वाटतो. या सर्व ग्रंथाला हात घालण्यास कुठलाहि प्रकाशक तयार होणार नाहीं हें आधींच माहीत असल्यामुळें प्रथमपासूनच त्याबद्दलची तयारी करून ठेवावी लागली. नाहीं तर हा संग्रह तसाच पडून राहिला असता.

सुरुवातीला हा संग्रह इंग्रजी भाषेंतील ' गोल्डन ट्रेझरी ' या काव्यसंग्रहाच्या धर्तीवर करावा अशी कल्पना होती. परंतु त्याच्या रचनेंत अनेकदा निरनिराळ्या वाचकांच्या सूचनानुसार बदल होऊन त्याला सध्याचें स्वरूप आलें. आतां या संग्रहांतील कविता साधारणतः कालानुक्रमानें लाविल्या आहेत. जिथें काळाचा विशेष फरक नाहीं तिथें मात्र जरा फेरफार केलेला आढळेल. उदाहरणार्थ ज्ञानेश्वरादि संतांचें काव्य एकत्र घेतलें आहे तसेंच त्या वेळच्या व नंतरच्या महानुभावी कवींचें काव्यहि एके ठिकाणीं दिसेल. कविता कालानुक्रमानें

घेताना निरनिराळ्या काळातील स्थिती व भाषेचें स्वरूपहि दिसावें असा यत्न केला आहे. अशा तऱ्हेच्या कविता घेतल्यामुळें रामदास व माधव काटदरे यांच्या कविताना जास्त पृष्ठें मिळालीं. अधिक मोठ्या कवीला अधिक पृष्ठें अशा भूमिकेमुळें हें झालें असा कोणी समज करून घेऊ नये. इ. स. १९३० मधील महान् राष्ट्रीय आंदोलन, इ. स. १९४७ मधील वातावरण, या भारताच्या इतिहासातील महत्त्वाच्या गोष्टी. पण त्यांचा आपल्या काव्यसंग्रहात पत्ताच लागत नाहीं. यासंबधीं कविता शक्य तितक्या गोळा करून त्यातील निवडक कविता या संग्रहात समाविष्ट केल्या. हा संग्रह प्रातिनिधिक व्हावा असाहि यत्न शक्य तितका केला. मात्र हा संग्रह लहान कालखंडाचा प्रातिनिधिक होणार नाहीं हें उघड आहे.

संग्रहाचे तीन खंड केले आहेत. प्रथम खंडात आरंभापासून मुक्तेश्वरापर्यंतचा काळ येतो. हा काळ प्राचीन मराठीचा म्हणता येईल. दुसरा खंड मुक्तेश्वरापासून इ. स. १८५७ पर्यंत असून तिसरा खंड इ. स. १८५७–१९४७ हा आहे. तिसरा खंड स्थूल मानानें आधुनिक कवितांचा खंड मानण्यास हरकत दिसत नाहीं तिसरा खंड असा का कल्पिला तें लक्षात येईलच. या कामासाठीं वाचलेल्या जवळ जवळ अर्डीच हजार ग्रथांची सूची केली आहे. अमुक ग्रंथ पाहिला किंवा नाहीं हा संशय या सूचीमुळें उरणार नाहीं या सूचीमधील बहुतेक ग्रंथ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयातील आहेत व त्या संस्थेची या कामात फार मदत झाली. विस्तारभयामुळें ही सूची या ग्रंथात दिली नाहीं. पुढे मागें जमल्यास मराठी काव्याचें पूर्ण समालोचन करून ती सूची त्या ग्रंथास जोडून प्रसिद्ध करण्याचा माझा बेत आहे प्रस्तुत संग्रहास जोडलेल्या कविपरिचयात शक्य तितकी माहिती व मूळ संदर्भ देण्याचा यत्न केला आहे.

काव्यग्रंथाशिवाय मासिकें व वर्तमानपत्र मिळालीं तेवढीं शोधण्यानीं चाळलीं. पुष्कळदा कवि एखादी पण चांगली कविता लिहितो. ती मासिकात किंवा वर्तमानपत्रात प्रसिद्ध यदाकदाचित् झाली, तरी ती तशीच उपेक्षित पडून राहते. मराठींत एखादी दुसरी चांगली कविता लिहिणाऱ्याकडे दुर्लक्ष. अशीकडच्या काळात लक्ष दिलें गेलें नाहीं. उलट भाराभर कविता लिहिणारा तोच मोठा कवि, अशी समजूत आढळते. तुम्हीं अवघ्या चार

कविता लिहिणाराची एक कविता घेतलीत, पण ७।८ काव्यग्रथ लिहिणाराच्या कविता तुम्ही का घेतल्या नाहींत, असा एका लेखकानें मला प्रश्न विचारला. गोल्डन ट्रेझरीसारख्या काव्यग्रथात थोड्या कविता लिहिणाऱ्या कवींच्या पुष्कळ कविता आहेत. मराठी भाषेतील अशा काहीं कवितांची उदाहरणें म्हणजे श्री. कृ. रा. पराजपे यांचें 'अगाई गीत' व व्यकटेश वकीलाच्या 'वरदान' व 'सजीवन' या कविता. वकीलाच्या या दोन्ही कवितांना शिवाय राष्ट्रीय महत्त्व आहे. तरी या कविता उपेक्षित राहिल्या. अशा तऱ्हेच्या मिळाल्या तेवढ्या कविता, मासिकें, वर्तमानपत्रें यांच्या द्वारा पुन्हा लोकांच्यापुढें आणाव्या अशी काहीं वाचकांनीं सूचना केली. वाचलेल्या मासिकांची व वर्तमानपत्रांची सूची करणें कठीण असें आढळल्यावर तो यत्न सोडून दिला.

कुठल्याहि काव्यसग्रहात शक्य तितक्या जास्त चांगल्या कविता येणें हा महत्त्वाचा भाग असतो. आता चांगल्या कविता कुठल्या व त्यांचा चांगलेपणा कोण ठरविणार हा एक वादाचा मुद्दा असतो. त्याबद्दल विचार करू.

'रसयुक्त वाक्य तें काव्य' अशा अर्थाचें एक सस्कृत वचन आहे. काव्यात कुठला तरी रस असावा लागतो. तो अर्थात प्रभावी रस असला तरच भावनांना आवाहन देऊ शकेल. रसाबरोबर प्रसाद हा गुण कवितेंत यावा. एवढ्यानें भागत नाहीं. एखाद्या कवितेंत प्रसाद व रस आहे पण अर्थपूर्णता नाहीं व दुर्बोधता असेल तर ती कविता वाचताना कळण्यास कठीण होऊन लोकप्रिय होणार नाहीं. काहीं वाचकांनीं एका कवितेच्या पहिल्या दोन कडव्या आणली व ही कविता चांगली आहे, ती का घेतली नाहीं असा प्रश्न केला. तेव्हा त्यांना ती कविता सबध वाचावयास दिली व सर्व कवितेचा अर्थ कळतो का, असें विचारलें तेव्हा शेवटीं कविता घेतली नाहीं हें योग्य आहे असें त्यांनीं कबूल केलें प्रसादरसयुक्तता, अर्थपूर्णता, सोपेपणा हे गुण ज्या कवितांच्यात आहेत, त्या कवितांच्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. याशिवाय कुठलेंहि वाङ्मय स्थलकालातीत असेल तर त्याला जास्त चिरकालीनत्व येतें. पुष्कळ गोष्टी, नाटकें, कविता या विशिष्ट काळांतील अशा काहीं घटनांवर आधारलेल्या असतात की त्या घटनांचें महत्त्व गेलें की या वाङ्मयाचें महत्त्व नाहींसें होतें कवितांची निवड करताना ही गोष्टहि लक्षात घेणें आवश्यक

असतें. या दृष्टीनें पहिल्यापासून आतापर्यंतच्या कवितावर नजर फिरविली तर चिरकालीनत्व कुठल्या कविताना येणें शक्य आहे ही गोष्ट कळून येते. मात्र आपला दृष्टिकोनहि मर्यादित असतो, हें विसरून चालणार नाहीं. उद्या समजा विश्वबंधुत्वाचें नातें जगात प्रस्थापित होऊन एक मानवी राज्य स्थापन झालें, तर युद्ध, स्वातंत्र्य, देशाभिमान इत्यादि गोष्टी लोकांना कळणारच नाहींत व त्या वर्गातील कविता इतिहासजमा होतील. पण हा फार पुढचा प्रश्न. आपल्याला भूतकाळ व नजीकचा भविष्यकाळ एवढ्यापुरतेंच पाहावयाचें आहे. एरवीं जगात चिरकालीन काय आहे?

वरील सर्व गुण असलेले प्रभावी काव्य उठलासुटला तो कवि निर्माण करू शकत नाहीं. त्याला तसेंच कविहृदय लागतें. नुसती विद्वत्ता अथवा अभ्यास यानीं काव्य होत नाहीं. बोरकरानीं म्हटलें आहे:

"·· सरस हृदय जर मधुरच नाही कोठुनि मग गाणें।
मोत्याच्या शिंपल्यात होतीं मोत्याचे दाणे ··· ॥"

चांगली कविता निर्माण होण्यास कवीचें हृदय मोत्याच्या शिंपल्यासारखें असलें पाहिजे म्हणजे त्यातून काव्यरूप मोतीं बाहेर पडतें. असे सरस हृदय, भूतमात्राविषयीं सहानुभूति व स्वच्छ आरशासारखें मन हें महाकवींचें वैशिष्ट्य असतें. 'छाया न मूर्च्छति मलोपहतप्रसादे। शुद्धे तु दर्पणतले सुलभावकाशा॥' असें म्हटलें आहे. मन स्वच्छ नसेल तर त्याचें प्रतिबिंब काव्यात निर्मळ उठणारच नाहीं. आधुनिक काळात नाना संदेह, विकृति, मनात वावरत असतात, त्यामुळें आता प्राचीन महाकवीप्रमाणें हे गुण काव्यात येणें फार दुरापास्त. ज्ञानेश्वरी पाहा. कवीचें सरस हृदय, स्वच्छ मन व विश्वव्यापी सहानुभूति याचें यानकाला दर ओवीमध्यें दर्शन घडतें. या सर्व गुणात पांडित्याचा व तत्त्वज्ञानाचा मिलाफ होऊन 'ज्ञानेश्वरी' काव्य या दृष्टीनेंच 'एकमेवाद्वितीयम्' असा ग्रंथ झालेला आहे.

ही सगळी कवितेच्या चांगल्या गुणाबद्दल चर्चा झाली. हे गुण साधारणतः मान्य करण्यास हरकत नसावी. परंतु प्रत्यक्ष त्या गुणाच्या दृष्टीनें निवड करताना मात्र नाना मतें उत्पन्न होतात व याचें एक प्रमुख कारण म्हणजे सर्व दृष्टींनीं विचार न करता एक दोन गुणाच्या दृष्टीनेंच बरेच लोक पाहतात. सर्व गुणाच्या

दृष्टीनें व पूर्वग्रह मनांत बाळगल्याशिवाय समतोलपणानें विचार केला तर कवितांच्या निवडीबद्दल फारसा मतभेद होणार नाहीं. परंतु आतांपर्यंतच्या चर्चेंत असें आढळून आलें कीं कमी शिकलेले लोक दृष्टिकोन समजावून दिले तर त्याप्रमाणें समतोलपणें विचार करूं शकतात, परंतु सुशिक्षित वर्गांत मात्र मतभेद उत्पन्न होतात. कविता कशी आहे यापेक्षां ती कुणी लिहिली इकडेच त्यांचें लक्ष प्रथम जातें. प्राचीन काव्य त्यापैकीं बहुतेकांना माहीतच नसतें. पंचवीस तीस वर्षांपूर्वी कित्येक घरीं लहानसे पुस्तकालय असे. त्यांत काव्याचीं पुस्तकें असत. मागील परंपरा लोकांना ठाऊक असे. परंपरेंत गुरफटून जाऊं नये हें खरें, पण तिचें ज्ञान असणें हेंहि आवश्यक आहे. परंपरा माहीत नसली तर एक वेळ चालेल, पण दृष्टि तरी पूर्वग्रहदूषित नसावी. परंतु सध्या परंपरेचें ज्ञान नाहीं व दृष्टि मात्र पूर्वग्रहदूषित, असा प्रकार आढळून येतो. त्यामुळें 'वाहवा वाहवा चेंडू हा' यासारख्या कविता अत्यंत श्रेष्ठ असें सांगणारे लोक आढळतात. अमुक कवीच्या सर्वच कविता चांगल्या किंवा अमुक कविता वाईट असे मत वाचल्याशिवायच ते सांगतात. अमुक गृहस्थ मोठा पुढारी आहे, त्याची कविता का घेतली नाहीं असा प्रश्न मला एकानें विचारला. तुम्ही माझ्या घरीं एकदा आला होता, आपली ओळख आहे, मग माझी कविता घेतली नाहींत ही गोष्ट मला फार लागली, असें एका कवीनीं मला लिहिलें. मी प्रसिद्ध असून तुम्हांला माझी कविता घेता आली नाहीं, पण अज्ञात मास्तरड्याची कविता मात्र तुम्हीं घेतलीत, हें ठीक नव्हे, असें एका लेखकाकडून ऐकावें लागलें. कच्चा संग्रह केल्यावर या वर्गाला काय म्हणावयाचें आहे याबद्दल मनोरंजक टीका ऐकण्यास मिळाली. एका कवींनीं ज्ञानेश्वर, बहिरभट यांचे फार उतारे का घेतलेत असें विचारलें. एखादा दुसरा उतारा पुरला असता असें त्यांनीं मत व्यक्त केलें. हे गृहस्थ शाळेच्या पुस्तकाप्रमाणें या प्रबंधाकडे पाहत होते व त्यांनीं ज्ञानेश्वरी वाचलीच नव्हती. दुसऱ्या एका गृहस्थानीं प्रत्येक कवीला अमुक पानें नेमून देण्यास हवीं होतीं असें मत व्यक्त केलें. कोणी स्त्रियांच्या अधिक कविता घेणें आवश्यक होतें असें सांगत. ही सर्व मंडळी गेल्या २०। २५ वर्षांच्या काळातच गुरफटत व त्यांना काळ फार

मोठा आहे व त्याकडे त्या दृष्टीनें पाहिले पाहिजे हें सागून पटेच ना. त्यामुळें गेल्या २०।२५ वर्षांतील कवितांचें संपूर्ण प्रतिबिंब या संग्रहात आलें नाहीं व तुमच्या संग्रहावर खूप टीका होईल असें कित्येकांनीं मला सुचविलें. सगळ्यात कहर म्हणजे तीन पदवीधर गृहस्थानीं 'दुरितांचें तिमिर जावो' हें नाटकातले शीर्षक ज्ञानेश्वरीमधील उतान्यावर का घातलें अशी पृच्छा केली. आणखी एकानीं तुम्ही सावरकरानांहि कवि करून टाकलेत अशी पृच्छा अनुक्रमणिका पाहिल्यावर केली. कविता पाहिल्याबरोबर प्रथम कवीचें नाव सांगा हा सर्वांचा आग्रह असे. कवीच्या नावावरूनच तिला ही मंडळी बरीवाईट टरविणार. इंग्रजी वाङ्मयातहि असाच अनुभव आहे. एका वात्रट मुलानें कीट्सच्या एका विशेष प्रसिद्ध नसलेल्या कवितेवर आपलें नाव घालून ती एका मासिकाकडे पाठविली तेव्हा ती एका व्याख्यानासह परत आली. नंतर त्यानें एका भिकार कवितेवर वर्ड्स्वर्थची नव्यानें उपलब्ध झालेली कविता असे लिहून पाठविलें, तेव्हा त्याला एक बक्षिस देऊ केलें गेलें. मलाहि काहीं लोकानीं अशा आपल्याकडील गमतीच्या गोष्टी सागितल्या.

चागल्या कविताना गमक कोणतीं लावावीं हा प्रश्न उरतोच. जुन्या कवितांच्या बाबतींत प्रश्न नाहीं. काळानेंच त्याचें मूल्यमापन केलें आहे. आतापर्यंत मराठी भाषेंत अपरंपार काव्य निर्माण झालें. 'कविता गवताऐसी। उदंड वाढली असे ॥' असें रामदासानीं म्हटलें आहे. या गवतासारख्या कविता केव्हाच लुप्त होतात. तरी त्या त्या काळात अनेक कवींना आपण अजरामर होणार असे वाटतें. आता तर काय प्रसिद्धीयंत्राचें युग! त्यामुळें काहीं कवींना आपण वाल्मीकि झाल्याचा तर कुणाला तुकाराम झाल्याचा भ्रम होतो. पण काळ मोठा वाईट आहे. तो कवितांचें मूल्यमापन सामान्य लोकाकरवींच करवितो. चार लोकांच्या मतानीं किंवा तत्कालीन गाजावाजानें त्यात शेवटीं बिलकूल फरक पडत नाहीं. या गोष्टीचा विचार करून प्रस्तुत काव्यसंग्रहात विशेषतः आधुनिक भागातील कविता घेताना प्रथम समाजाच्या निरनिराळ्या थरातील १०।१२ लोकाना नेहमीं प्रत्येक कविता दाखवून जवळ ज्वळ २५० आधुनिक कवींच्या निवडक कविता गोळा करून ठेवल्या व रोज चर्चा करून त्यातून निवडीत निवडीत आताच्या कविता आल्या. त्या शेवटीं प्रयाचा

फारसा विस्तार होऊ न देता या संग्रहात सामावल्या हें मात्र विशेष. काहीं लोकाना वरील गुण व निवडण्याची पद्धतहि आवडणार नाहीं. सामान्य लोक अडाणी असतात, त्याना काय कळतें, असें त्याचें म्हणणें. दुर्बोध, प्रसादरहित व अर्थशून्य काव्य तेवढेंच उत्तम असें कोणीं म्हटलें तर त्याला इलाज नाहीं. मात्र अशा कविताचे ढीग फार मोठे असल्यामुळे त्याचा संग्रह करणें कठीण जाईल.

ज्या कविता समाजातील सर्व थराच्या लोकाना आवडू शकतात त्या खरोखरी मोठ्या. तुकारामाचें काव्य ज्याला माहीत नाहीं असा मराठी माणूस विरळा. मोरोपंत, वामन पंडित, सुशिक्षित वर्गात जास्त माहीत. याचें एक कारण त्याच्या काव्यातली सामान्य वाचकाला अडविणारी दुर्बोधता. मोरोपंतवामनपंडिताचे चहाते, त्याना पानें कमीं मिळालीं म्हणून तक्रार करतात, परंतु सर्व साधारण लोकाना त्याचें काव्य समजण्यास कठीण जातें, हें आढळून आल्यामुळेंच त्याचे उतारे थोडे घेतले. लक्ष्मीबाई टिळकाची 'मी तुझी मावशी तुला न्यावया आलें' ही कविता पाहा. ही कविता लहानापासून मोठ्यापर्यंत सर्वांना आवडू शकते. आमची छोटी निली ही कविता म्हणत नेहमीं प्रेमानें मावशीकडे धावताना दिसते, यातच त्या कवितेच्या मोठेपणाचें सार आहे. 'घनःश्याम सुंदरा श्रीधरा' ही भूपाळी ऐकल्यावर भाविकपणा नसलेल्याहि महाराष्ट्रीय माणसाचें चित्त मोहित होतें असा गुण तिच्यात आहे. सावरकराच्या 'ने मजसी ने परत मातृभूमीला' या कवितेंत हृदयातली सारी तळमळ ओतली आहे. या कविता आणखी शेंपन्नास वर्षे सहज आपलें स्थान टिकवतील. अशा भाग्यवान कविता फार थोड्या. ज्या कविताचा वर्तमानपत्रें मासिकें यातून बोलबाला झाला त्याची या कविताबरोबर तुलना केल्यास त्याचें खरें स्थान कळण्यास उशीर लागणार नाहीं. एक निराशतेनें भरलेली कविता का घेतली नाहीं असा मला प्रश्न केला गेला. त्या कवितेंत विफलतेच्या भावनेबरोबर सिगारेटचा सुकुमार धूरहि निघाला होता. अशा कवितात तळमळ नसून मळमळ व्यक्त झालेली दिसते. काहीं वर्गात क्रांतीच्या नावानें आरोळ्या ठोकल्या कीं मोठी कविता झाली असा समज आहे. कधीं जन्मात खेडेगाव पाहिलें नाहीं, मुंबईमधील दारिद्र्यानें भरलेलीं हृदयेंहि माहीत नाहींत, असे कवि सोफासेटवर बसून

सर्वांगीणता आणण्याचा यत्न केला. संग्रहाचें नाव 'नवें नवनीत' हेंहि वाचकांनींच सुचविलें. प्रत्येक कवीच्या सर्व काव्यगुणाचें दर्शन व्हावें अशी एक सूचना आली. ती व्यवहार्य नाहीं, इतकेच नव्हे तर संग्रहातील कविते वरून कवीच्या सर्व काव्यगुणाबद्दल अनुमान काढलें तर तें चुकीचें ठरेल. संग्रहात कवींचा काळ कसा धरला आहे अशी एक पृच्छा आली. कवि साधारणपणें ज्या काळात प्रसिद्ध होते किंवा त्याच्या कविता ज्या काळात विशेष प्रसिद्धि पावल्या तो त्याचा काळ मानलेला आहे. उदाहरणार्थ सावरकराच्या कविता इ. स. १९१० च्या काळात आढळतील. इ. स. १९४७ नंतर प्रसिद्धी पावलेले कवि इ. स. १९४७ नंतरच्या काळातले मानल्यामुळें त्याचा सध्या या संग्रहात समावेश केला नाहीं. तथापि पुढेमागें हा भाग तयार करण्याचा विचार आहे. या काव्याबद्दल अवघें एकच पत्र आलें. इ स. १९४७ सालीं हा संग्रह आटोपण्याचें मुख्य कारण असें कीं त्यापुढील काळ फारच अलीकडचा होतो व या काळातील काव्याचें मूल्यमापन होण्यास अजून काहीं काळ लोटला पाहिजे. पूर्वइतिहास ध्यानात आणल्यावर हें मूल्यमापन करणें कठीण नाहीं, पण काळ तें नंतर आपोआपच करील

या संग्रहासंबधीं काहीं गोष्टी स्पष्ट करणें जरूर आहे. हा संग्रह नुसत्या धार्मिक कवितांचा अथवा तत्त्वज्ञानाच्या कवितांचा संग्रह नव्हे. जुन्या कवितांचे अभिमानी फक्त जुन्या काव्यांची स्तुति करतात तर काहीं जण आधुनिक काव्य नेवढेच श्रेष्ठ असें सांगतात. हा संग्रह काव्य जुनें असो वा नवें असो, वर निर्देशित केलेला दृष्टिकोन समोर ठेवून मग काव्याची निवड करून केलेला आहे. कवितेला चांगली चाल आहे, किंवा ती कुणी चांगली गाइली, एवढ्यानें ती चांगली कविता होत नाहीं गेल्या २०।२५ वर्षांत गाणी लिहिणाराना कवि म्हणण्यात आलें आहे म्हणून या गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो. वैयक्तिक अभिरुचींत फरक पडतो व त्यामुळें निरनिराळ्या प्रकृतीच्या लोकाना निरनिराळ्या तऱ्हेच्या कविता आवडतात. संग्रहकाराला मात्र अनेक दृष्टींनीं पाहता आलें पाहिजे व शिवाय त्यानें तुलनात्मक दृष्टि बाळगणें जरूर असतें. एका अर्थाच्या किंवा एका विषयावर अनेक कविता असल्या तर त्यांची तुलना करून कविता निवडावी लागते. संग्रहात न आलेल्या कविता चांगल्या नाहींत

असा त्याचा बिलकूल अर्थ नाहीं. सुरवातीच्या कांहीं वर्षांत माझ्या हातून देखील सापेक्ष व तुलनात्मक दृष्टि पुरेशी न ठेवल्यामुळें जुन्या काव्याचें वाचन अपुरें झालें व आधुनिक काव्याचा प्रचंड गठ्ठा तयार झाला. ही चूक दुरुस्त करण्यांत फार काळ गेला.

काव्याचे लोकगीतें, स्त्रीगीतें, लहान मुलांच्या कविता असे अनेक वर्ग करता येतील. या सर्व वर्गांचें परीक्षण वरील दृष्टिकोनातूनच केलें. एरवीं या वर्गांचे खास निराळे संग्रह कुणीतरी करणें अवश्य आहे.

कांहीं वर्षांपूर्वी एका संस्थेनें हिंदी व बंगाली काव्यसंग्रह तयार करून घेतले होते. त्यांपैकीं बंगाली संग्रह पाहण्यास मिळाला व तो त्रोटक वाटला. अन्य भाषातील संग्रहाबद्दल वाचकांनीं माहिती पाठवल्यास ती उपयोगी पडेल.

या संग्रहात अनेक अप्रकाशित ग्रंथातून उतारे घेतले आहेत. हे उतारे घेण्यांत अप्रकाशित वाङ्मयाकडे लक्ष जावें असा एक उद्देश आहे. मराठींत अप्रकाशित वाङ्मयाचें फार मोठें भाडार आहे परतु त्याकडे जावें तितकें लक्ष जात नाहीं. त्यामुळें पुष्कळसे नष्ट होण्याचा सभव आहे. औंध येथील सरकारी ग्रंथालय, धुळें येथील राजवाडे संशोधन मंदिर व सत्कार्योत्तेजक सभा, तंजावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथालय, ऋद्धिपूर येथील गोपीराज महाराजाचा संग्रह, अनेक मठ, खासगी संग्रह इत्यादिकातून अगणित ग्रथसंपत्ति पडून आहे. या हस्त-लिखिताची सूचिहि नाहीं व त्याच्या प्रकाशनासाठीं संघटित प्रयत्नहि नाहीं. मद्राससारख्या अन्यभाषिक प्रातात तजावर येथील हस्तलिखितांतून जवळ जवळ पन्नास तरी मराठी ग्रथ सरकारी मदतीनें प्रसिद्ध झाले. मुंबई राज्यांत मात्र असे काहीं दिसत नाहीं. या सर्व प्रकाराचें कारण तरी काय, असा एका वाचकानें प्रश्न विचारला. त्याचें उत्तर पत्रातून देता येणे कठीण असल्यामुळें त्याची कारणपरपरा प्रत्यक्ष भेटींतच समजावून सागावी लागली. या प्रचंड कार्याच्या एखाद्या कोपऱ्याला हात लावता आला तर पाहावें असे फार वाटतें.

प्रस्तुत पुस्तकाचा टाइप बारीक असल्याबद्दल कांहीं तक्रारी आल्या. मोठा टाइप वापरण्याची कल्पना कागदाच्या टचाईमुळे व महागाईमुळे सोडून द्यावी लागली. शिवाय असा टाइप वापरल्यानें ग्रथाची किंमत वाढली असती. खर्चाच्या मानानें ती जरूर तितकीच जरी ठेवली आहे तरी सामान्य लोकाना

तेवढीहि परवडण्याजोगी नाहीं. कवींनाहि मानधन अल्प दिलें गेलें. सद्य. स्थितींत याबद्दल जास्त काही करता येत नाहीं, याबद्दल खेद वाटतो.

या काव्यसंग्रहाच्या कल्पनेंत प्रकाशक फार पूर्वीपासून भागीदार होते व त्यांनीं संपादकीय कामात विशेष मदत केली. पुष्कळ वर्षें वाचन व कच्चें संकलन मी करून ठेवीत होतों, परंतु ग्रंथप्रकाशन करणें शक्य व व्यवहार्य आहे का नाहीं व हल्लीच्या काळात असल्या उद्योगाचा उपयोग काय, असे वाटून प्रकाशनाच्या दृष्टीनें ग्रंथ तयार करण्यास सुरुवातच होईना. अशा संदेहाच्या वेळीं एका रसायनशास्त्रज्ञ मित्रानीं आधीं काम पुरें करा व त्याचा उपयोग आहे का नाही तें मागाहून आपोआप ठरेल असें बजावलें व तदनुसार दुसऱ्याच दिवशीं कामाला सुरुवात झाली. त्यानंतर अनेक लहानथोर व्यक्तींच्या बरोबर पत्रव्यवहार केला. या पत्रव्यवहाराची संख्या दीड हजाराच्या घरात जाईल. काहीं थोर व्यक्तींच्या व उच्चपदस्थ लोकांच्या भेटीचा लाभ झाला. काहीं मोठ्या लोकांच्या भेटी होऊंच शकल्या नाहींत. भारताचे उपाध्यक्ष डॉ. राधाकृष्णन्, मध्यप्रदेशाचे राज्यपाल श्री ह. वि. पाटसकर, पंजाबचे राज्यपाल काकासाहेब गाडगीळ, नागपूरचे श्री. भवानीशंकर नियोगी, इत्यादि मंडळींनीं आशीर्वाद पाठवून या कार्याला उत्तेजन दिलें. काकासाहेबानीं तर माझ्यासारख्या एका अपरिचित माणसाच्या साध्या सूचनेवरून अमृतसर येथें महानुभाव महंत गोपीराज महाराजांची भेट घेतली व त्यांच्याशीं प्रेमानें बोलणें केलें. तेव्हा गोपीराज महाराजानीं एका साधुपुरुषाचें दर्शन झाल्याचें कळविलें. भारतीय वेदमहर्षि पंडित सातवळेकरांचे एक कार्यकर्ते नेहमीं हें पुस्तक कुठपर्यंत आलें आहे तें पाहून जात असत. पंडितजी व आचार्य विनोबाजी भावे यांनीं मोठें प्रोत्साहन दिलें व त्यामुळेंच अनेक अडचणींतून जाताना काही वाटलें नाही. कवींनीं व त्यांच्या वारसांनीं सर्व साहाय्य दिलें. विशेषतः सुप्रसिद्ध कवि माधव केशव काटदरे ऊर्फ कवि माधव याना या प्रयत्नाबद्दल फार उत्साह होता, पण हें काम शेवटास गेलेलें पाहण्यास आज ते हयात नाहींत हें दुर्दैव होय. विद्वानांच्या-कडून भरपूर मदत मिळाली सर्व विद्वानांचीं नावें कविपरिचयाखालीं छापलीत दिलीं आहेत. व तीं विस्तारभयास्तव येथें पुन्हा देत नाहीं. काहीं मासिकांच्या व वृत्तपत्रांच्या संपादकानीं पुस्तकाबद्दल माहिती छापून मदत केली. सन्मति

मासिकाचे संपादक श्री भिसीकर यानीं तर जैन वाङ्मयाची माहिती पुरवून साहाय्य केलें वाङ्मयसंस्कृतीसारख्या गोष्टीशीं व्यवसायाचे संबंध फारसे चागले नसल्यामुळें शेवटीं शेवटीं नाना अडचणी उपस्थित झाल्या, त्यातून निरनिराळ्या लोकानीं मदत केल्यामुळेंच पार पडता आलें अशा मोठ्या ग्रंथाची प्रेस कॉपी करण्यात एक भारतीय आरमारातील अधिकारी, कॉलेज मधील काहीं विद्यार्थी, एक विद्यार्थिनी, एक रामदासतुकारामवाङ्मयाचे चाहते, अनेक सरकारी नोकर अशा निरनिराळ्या क्षेत्रातील व्यक्तींनीं हौसेनें मदत केली विमा मुद्रक आणि प्रकाशक या संस्थेचे संचालक श्री शि गो भावे व विमामुद्रणालयातील कार्यकर्ते यानीं पुस्तक छापण्याचें काम आपुलकीनें केलें काव्यसंग्रहाचं श्रेय या सर्वांना आहे व त्याचे कितीहि आभार मानले तरी ते पुरे होणार नाहींत संपादकानें भारवाही हमालाचें काम केलें इतकेंच मात्र हा भार वाङ्मयाचा होता हा भार वाहताना अनेक वर्षें अविश्रांत धडपड करावी लागली खरी पण अनेक अविस्मरणीय ओळखी झाल्या व चर्चा करताना आणि मराठी भाषतील महान काव्यग्रंथ वाचताना तिच्या उज्वल स्वरूपाच्या दर्शनात वर्षामागून वर्षे केव्हा निघून गला तें कळलें देखील नाहीं आता या मोठमोठ्या मराठी काव्यग्रथाची तोंडओळख तरी करून देण्याच काम या संग्रहानें केलें तर सव श्रमाचें सार्थक झालें असें वाटेल ग्रंथामध्यें काहीं अपरिहार्य दोष आहेत व काहीं दोष संपादकीय न्यूनतेमुळ आले असतील त्याबद्दल वाचकानीं क्षमा करावी व संपूर्ण मराठी काव्याचा अभ्यास केलेल्या अधिकारी व्यक्तींनीं तीं न्यूनें दाखवून मार्गदर्शन करावें, एवढीच विनंति

रुक्मिणी निवास, पहिली गल्ली
हिंदु कालनी, दादर, मुंबई १४
गीताजयंति, मार्गशीर्ष ११, शक १८८०
ता २१ डिसेंबर १९५८

ज श्रा देशपांडे

# अनुक्रमणिका

## प्रथम खंड : आरंभापासून मुक्तेश्वरापर्यंत

कवि — पृष्ठ

## द्वितीय खंड : मुक्तेश्वरापासून इ. स. १८५७ पर्यंत



## तृतीय खंड : इ. स. १८५७ ते १९४७

## सोमेश्वर चालुक्य

### दशावतारवर्णन

जेणे रसातलउणु
मत्स्यरूपे वेद् आणियले मनुशिवक वाणियले
तो ससारसायरतारणु मोहं तो राघो नारायणु ॥
कूर्मिनागिमन्दरमेवचदेमचेशालां नु ।
सुररिगममृतसाधिसि कोटदेवनेपगीगे वरजो सूवररूपे
पाथालु वैसिदाण तु हरियक्ष्छपु चमाचापिदाढ गोविंद
धरणि उद्धरियम् ।
सौ देउ मन्दर दुहोच्छ उपर्चेडेनि श्रीनारसिंहदै
(त्य) हिरण्यकशिपुरोसु गोइ ।
वश्चिवंपे नादैचुट्टं मनवलर्वेडिका
निचंडमयु वामनु भूफलके त्रिदैत्सुबलठिहिलिनि
भूमिं त्रिपुरहदेत्निवल्ककसुधौ मेररमदुकारन् ।
जे ब्रह्मणेर कुले उपजीय्या कात्तवीया जेणे
बाहु फरसे खांडिया परसुरामु देउ तो महामंगल करउ ।
नन्दगोकुलम् जायो कन्हु जो गोपीजने पडिहे लीटे नयणे
जोविया महणाधर आविनाह्मणि हकारिया
कन्हौ मरडासौ अहोंणा चिंतिया देउ ।
बुद्धरूपें जो दाणवसुरवंचणि वेददूपणवोल्हडणि माया मोहिया
तो देउ माझि पासाउ करु ॥

\+ \+ \+

जो गोपीजने गाइजे बहु परि रूपे निहाँ
गोमयसैकः शेशानले सुलधुराराजनभाव वंकसे ॥

— मानसोल्लास (सुमारें इ. स. ११२९), अध्याय १६, विंशति ४ मधून

# मुकुंदराज

## विवेकसिंधूचीं शब्दरत्ने

### १

यैस सिष्यें विनवील । तेथ प्रबोधें सपलें । श्री मुकुंदु बोले । राजयागी ॥१॥ प्रणव पचइति । ते विवरली ससृति । महावाक्ये उपदेश ग्रथातिं उत्तरार्धी ॥२॥ शकरोक्तीवरा । मिया बोलिली हे वैखरा । म्हणौनी धरावी चतुरीं । शास्त्र बुद्धि ॥३॥ आहो युक्तियेचेनि प्रसगें । शास्त्रातें म्हणती उग । तरि माझिये बोलु वाउग । काये होयील पा ॥४॥ जैसें आपुलियेनि पवित्रपणें । लक्ष्मीयेसि आणिल उणें । म्हणौनि मस्तकीं नारायेण । तुळसी बन्दिली ॥५॥ विवेकसिंधु भीतरीं । जो मुमुक्ष अवगाहन करा । तेयासि सेरी श्रीहरा । भेटे साक्षात्कारें ॥६॥ विवेकसिंधुची शब्दरत्नें । जरि कठीं धरिजेतीं प्रेमें । तरा जनकाचियेनि महीमानें । श्लाघ्येता होये ॥७॥ लवणसमुद्रीचि मुक्तें । भूषण वीरु होतीं समस्तें । परिभूपतियासि मुक्तत्वतें । विवकसिधूचि कीं ॥८॥ आहो विवेकसिधुचे पूवार्ध । क्षीरसिधुपासाव आगाध । जथ निगुणु निजबोधु । भेटे विष्णुस्वरुप ॥९॥ मज स्वासोमेपाचाहि श्रमु । तेथ कायेसा ग्रथाचा उदेमु । परि फळला मनोधर्मु । सदैवाचा ॥१०॥ नृसिहाचा वल्लाळु । तयेचा कुमरु जेतपाळु । तेण करविला हा रोळु । ग्रथरचनेचा ॥११॥ भगीरथाचेनि नैव योग । विश्व सुखातल गग । तैसे जैतपाळाचेनि प्रसगें । जग सुखिये हाये ॥१२॥ मिया आपुली वाणा । पवित्र केली यही वचनीं । प्रीति पावो पिनाकपाणी । म्हणे मुकुन्दराजु ॥१३॥

— विवकसिधु (इ स ११८८), प्रकरण सातवें, पूवाधसमाप्ति, ओव्या १४७–१५७

२

माझीये मतीचा विस्तारु। तो अति मद तरु। राम महिमा अपारु। मज केवीं वर्णवे ॥१॥ मिया सार्घातली गुरुसतती। आयिक्ता होये पाप निष्कृति। म्हणौनि श्रद्धापूर्वक चित्ति। स्मरावी हे ॥ २ ॥ सर्व बाह्य तम निरशे। परी अतरींचें न प्रकाशे। तें अज्ञानतम आपैस। फिटे गुरु प्रसादें ॥ ३ ॥ न पडे वेदशास्त्राचा पागु। अभ्यासावा नलगे अष्टांगयोगु। जरी पाविजे राजयोगु। श्रीगुरुप्रसादें ॥ ४ ॥ तपातीर्थांचे डागोरे। आणिक श्रुतीस्मृतींचे कामारे। तयाचें न उतरे अज्ञान कावरें। येके ज्ञानें-वीण ॥ ५ ॥ निर्वाळले याचा भक्तु चागु। जन्हि आचरैल नेटका कर्मयोगु। परी न करीता ज्ञानाचा पागु। मुटीका कैची ॥ ६ ॥ भक्तचक्रचूडामणि। उद्धव देवु येकचि त्रीभूवनी। तोहि अपरोक्ष ज्ञान देवोनि। सोडवील कृष्ण राजें ॥ ७ ॥ तैम भल्तें तप तपीजे। अथवा आवडतो जपु जपीजे। परी ज्ञानेंविण न सुटीजे। ज्ञानबहिर्मुखी ॥ ८ ॥ म्हणौनि उपजलेंनि संसारी जीवें। स्वधर्मे ईश्वरातें आराधावें। तेणें चित्तशुद्धिद्वारा पावावें। ज्ञान अप रोक्ष ॥ ९ ॥ भवपाश तोडीतं शस्त्र। ज्ञानचि ईश्वराचें विचित्र। परी जीवाचें कैसें कर्मसूत्र। जे अनावडीचि तेथ ॥ १० ॥ तें स्वानुभवज्ञान। न पवीजे श्रीगुरुविण। म्हणौनि तेथींचें महिमान। तें अगाध असे ॥ ११ ॥ असो हें नोमडा बोली। काहीं येक गुरुस्तुति केली। ते प्रीति पावली। श्रीगुरुपर पद ॥ १२ ॥ मज चतुरदेशी न जोडे। म्हणौनि बोलीले बोबडे। जैसें उसु का वाकोडें। महा रसाळ ॥ १३ ॥ श्रृंगारादिक नवरस। तेहि जेथ अतिनिरस। तं परब्रह्म येक रस। आणावें योगिराजें ॥ १४ ॥ हो का कस्तुरी काळी। ते परिमळें आगळी। तैसे आरुष बोल परी नव्हाळी। भेटे परम-सुखाची ॥ १५ ॥ सद्य ज्ञानोत्पत्ति ऐसी प्रतीज्ञा। तरी न करावी येथविषईं अवज्ञा। जेथ ग्रथार्थे श्रवणमात्रें सर्वज्ञा। होईजे म्हणौनिया ॥ १६ ॥ रसिक-मुद्रा बोलीजैल। तरी ग्रथविस्तारु होईल। आणि परमार्थु न कळैल। मति-तार्क्षेविण ॥ १७ ॥ इये ग्रथींचें हेचि चातुर्य। जें रोकडें स्वानुभवसौंदर्य। म्हणौनि सेवीतु मुनिवर्य। विवेकसिंधु हा ॥ १८ ॥ जेथ नाहीं शास्त्रीं

प्रनीति। नेणति तर्कमुद्रेची स्थिती। तेयालागीं मन्हाटीया युक्ति। केली ग्रंथ रचना ॥ १९ ॥ उपार्जनेचा शीणु नेणे बाळु। तयाचिये मुखीं मिष्टान्नकवळु। मुये जननी कृपाळु। अपत्यविषईं ॥ २० ॥ तैसें उपनिषदाचें निर्मथन। करौनि केला ग्रंथ निर्माण। ते सिद्धचि स्वीकरीतु शिष्टजन। जे सिद्ध भोक्ते ॥ २१ ॥ वेदशास्त्राचा मतितार्थु। मियां बोलीला ह्य परमार्थु। येणें वसवीजो हृदयपथु। श्रोतेयाचा ॥ २२ ॥ येया संप्रदायाचा अभिमानी। स्वयें श्रीशूळपाणी। प्रीति पीवो इहीं वचनीं। सर्वेश्वरु तो ॥ २३ ॥ संपलें ग्रंथाचें उत्तरार्ध। जें निजबोधाचें प्रमेय विशुद्ध। म्हणे राजयोगी प्रसिद्ध। मुकुंदराजु ॥ २४ ॥

— विवेकसिंधु, प्रकरण अठरावें, ग्रंथसमाप्ति, ओव्या ११४–१३७

## गोरक्षनाथ

[ सुमारे इ. स. १२०० ]

### १

### अमरनाथ संवाद : आत्मज्ञान

वृक्षाची पानें झडति : आणि मागौति नीगति : परि तेंचि म्हणु, नयेति कीं : दिवेया पासोनि, निघालिया काजळी : त्याच्या पोटीं काई, आगिनी पाणि असे : मग निगालीये, नदीं उदकें अनित्यें : परि प्रवाही नित्यें, जाणावीं कीं ॥ तैसा दृश्यु प्रपंचु, पदार्थु अनित्यु : परि त्या प्रवाहो नित्यु, जाणावा :। केळीचा गाभा उकलिता, काइ लाभु असे : आणि फळपानिचें, निकें पिकलें : पिकतयाचा अँटोचि पाहता वरवा दिसे, स्वप्नीचें सुख, स्वप्नीची वरतें :. मग निर्धारिता तेथ काही असे : तैं संसारिचे सुख, दिसे, : निकें ॥ सेपीं मुरस नव्हे ऐसें शब्दें जाणावें। आकाशकुसुमीं जरि परिमळु भेटे। नातरि

नाथलिये, वाझेचे लेकरु, त्रिभुवन भोगी [1] ससेचेया सींगे [2] तिघटे हे बोलणेंचि लटिकें तैसा दृश्यु प्रपचु असत्यचि लटिका असे ॥ मृगजळ जळीं नाही परि मृगासि जलभ्रमु असे। कुसुममाळेचा नाथिला, भागिया आभासे शुक्तिचा ठाई, रजतबुद्धी लटिकी तैसा दृश्यु प्रपचु लटिकाची परि दिसता असे हा ससारु दु:खरूप ऐसा त्याची ज्ञप्ता आपुली, ओळखी नाहीं हे आकार पचधा म्हणत, गेउन तिए गोडीचिए, मनि साडौनि काई तिपए, हानी असे हा उट बाहुडा दिसे परि त्याच्या मनु गाडिचीए मोए न सडित बाहुडपणीं परि, रसी नाहीं [3] कीं हे कस्तुरा काळी दिसे परि तिचिया परिमळाचे, सौरभ्यत्व, आगळे कीं। एवढीये सृष्टीचे, अढाल जेयाचेनि चाळे त्यातें ओळखे तो या ससारा आतु, सुपदु खी लिंपेना : जैसें पद्मिणीचें पत्र, उदकाभीतरीं असौनि अलिप्त, तया जन्माच आणि कर्मभक्तीचें फळ त कीं जे आत्मज्ञान जाणिजे । (७) श्री गोरक्षनाथ विरचिते अमरनाथ (सवाद) आत्मज्ञान कथति विचारे (११)

## २

### पद

पाषाणाचीं देउळे पाषाणाचा देवो । पाषाणाची पाउळी तेथ न फिटे सदेहो ॥
कैसे बोलों पडिलो देवो कवणे ठाई । निजलिंग न्याहाळिता आम्ही तुम्ही नाहीं ॥
गगचे उदकें स्नान पें कीजे। बाहिर पाखाळिता भीतर केंवि भिजे ॥
सजिवे तोडुनि निर्जिवें पुजिती। कर्में करुनि प्राणी कैंचि उद्गती ॥

१ नाना गगनीचिया माळा । वांझेच्या जालेया गळा ॥ अमृतानुभव ७।८२
२ का मांजरे जैसा खावे । ससी विषाणाचे ॥ अमृतानुभव ७।८१
३ जिये पेरि दिसती उसीं । तिय लाभती की रसी ॥ अमृतानुभव ९।१७
आणि बाहुडेनि बोलसि । बगाडे उजूचि जैसी ।
की पुढी वळण उसी । गोडी जेवीं ॥ ज्ञानेश्वरी १८।८४२

येहिविधि हे जग पडियेलें धादा । आत्मलिंग कोइ न बुझती अंधा ॥
चरपटि गोरखरायें सद्गुरुवाणी आम्ही । निजलिंग न्याहाळुनि ससारा दिल्हे पाणी ॥

## ज्ञानेश्वर

[ इ स. १२७०-१२९६ ]

### १

### व्यासोक्तीचा महिमा

नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगती । आविष्कारौनि महामती व्यासाचिये ॥ १ ॥ म्हणौनि महाकाव्यां राओ । ग्रंथु गुरुतेचा ठाओ । एथौनि रसां जाला आवो । रसाळपणाचा ॥२॥ तेविंचि आइका आणिक ही एक । एथौनि शब्दश्री सच्छास्त्रिक । आणिक महाबोधीं कोवळिक । दुणावली ॥३॥ एथ चातुर्य सिहाणें जालें । प्रेम रुचीसि आलें । आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ४ ॥ माधुर्या मधुरता । शृंगारिं सुरेखता । रूढपण उचिता । दीसे भल ॥ ५ ॥ एथ कलाविदपण कला । पुण्यासि प्रतापु आगळा । म्हणौनि जनमेजयाचे अवलील । दोष गेले ॥ ६ ॥ आणि पाहता नावेक । रंगीं सुरंगतेची आगळिक । गुणां सुगुणपणाचें बीक । बहुवस एथ ॥ ७ ॥ भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें । तैसें व्यासमती कवळिलें । सकळ मिरवे ॥ ८ ॥ का सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ ९ ॥ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागराचि होइजे । तैसें व्यासोक्तितेजें । धवळलें सकळ ॥ १० ॥ कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रकटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ ११ ॥ ना तरी उद्यानीं माधवी घडे । तें वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि अपाडें । जैसा पर्वी ॥ १२ ॥ नाना घनीभूत सुवर्ण । जैसें निहाळिता साधारण । मग

अल्हारा नरवेपण । निवाडु दावी ॥ १३ ॥ तसे व्यासोक्ति अल्हारले । आवडत नरवेपण पातल । तें आणौनिचि काई आश्रइल । इतिहासीं ॥ १४ ॥ नाना पुरतिये प्रतिष्ठेलागि । सानीव धरूनी आगीं । पुराण आख्यानरूपं जगीं । भारता आलीं ॥ १५ ॥ म्हणौनि भारतीं नाहीं । त न्हवेचि लोकीं तिहीं । एणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ १६ ॥ ऐसी सुरस जगीं कथा । जे जन्मभूमि परमार्था । मुनि साधे नृपनाथा । जनमेजया ॥ १७ ॥ ज अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम । परम मगलधाम । अवधारिजो ॥१८॥ आता भारतकमलपरागु । गीताख्यु प्रसगु । जो सवादला श्रीरगु । अर्जुनेंसी ॥ १९ ॥ ना तरी शब्द ब्रह्माब्धी । मथिल व्यासबुद्धी । निवडिलें निरवधी । नवनीत हें ॥ २० ॥ मग ज्ञानाग्निसपर्कें । कडसिल विवेकें । पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ २१ ॥ जें अपेक्षिजे विरक्तीं । अनुभविजे सतीं । सोहंभावें पारगतीं । रमिजे जेथ ॥ २२ ॥ जें आकर्णिजे भक्ति । आदिवंद्य त्रिजगती । तें भीष्मपर्वी सगति । साधिनैल ॥ २३ ॥ जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशाना प्रशसिजे । जें सनकादिकी सेविजे । आदरेंसी ॥ २४ ॥ जैसें शारदियेचिये चद्रकले । माझि अमृतकण कोवले । तें वेंचिति मन मोआलें । चकोरतलग ॥ २५ ॥ तेयापरी श्रोता । अनुभवावी हे कथा । अति हलुवारपण चित्ता । आणूनिया ॥ २६ ॥ हें शब्देंविण सवादिजे । इंद्रिया नेणता भोगिजे । बोला आधीं झाविजे । प्रमेयासि ॥ २७ ॥ जैसे भ्रमर परागु नेति । परी कमलदळें नेणति । तैसी परी आहे सेविती । ग्रथीं इये ॥ २८ ॥ का आपुला ठाउ न सांडिता । आलगिजे चद्र प्रकटता । हा अनुरागु भोगिता । कुमुदिनी जाणें ॥ २९ ॥ ऐसेनि गभीरपणें । थिरावलेनि अतष्करण । आथिला तो जाणे । मातु इये ॥ ३० ॥ अहो अर्जुनाचिया पातीं । जे परिसणेया योग्य होति । तिहीं कृपा करुनि सतीं । अवधान देयावें ॥ ३१ ॥ हें सल्गी मिया म्हणीतलें । चरणा लागौनि विनविलें । प्रभू सखोल हृदय आपुलें । म्हणौनिया ॥ ३२ ॥ जैसा स्वभाव मायेबापाचा । अपत्य बोले जरी बोबडिया वाचा । तर्‍ही अधिकाधिक तेयाचा । सतोखुचि आथि ॥ ३३ ॥ तैसा तुम्हीं मी अगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणीतला । तरि उणावा साहाजें उपसाहला । प्रार्थू काइ ॥ ३४ ॥ परि अपराधु ता आणिकु आहे । जें मीं गीतार्थ कटू पाहें ।

तें अवधारा विनत्र् लाहें। म्हणौनिया ॥ ३५ ॥ हें अनाररत विचारिता। वाचाचि धिंवसा उपनला चित्ता। यन्हविं काय भानुतेजीं खद्योता। शोभा आथि ॥ ३६ ॥ की टिटिभू चाचुवेन्ही। माप सुये सागरीं। मी नेणतु तिया परी। प्रवर्ते एथ ॥ ३७ ॥ आइका आकाश गवसावें। तरी आणिक तैसेंचि होआवें। म्हणौनि अपाडु हे आयवें। निर्धारिता ॥ ३८ ॥ एया गीताशास्त्राची थोरी। स्वयं शंभु विवरी। जेथ भवानी प्रश्नु करी। चमत्कारौनि ॥ ३९ ॥ तेथ हरु म्हणे नेणिजे। देवी जैसें का स्वरूप तुझें। हें नित्यनूतन देखिजे। गीतातत्त्व ॥ ४० ॥ हा वेदार्थसागरु। जेया निद्रिताचा घोरु। तो स्वयें श्रीसर्वेश्वरु। अनुवादला ॥ ४१ ॥ ऐसें जें अगाध। जेथ वेडावति वेद। तेथ अल्प मीं मतिमंद। काइ होयें ॥ ४२ ॥ हें अपार कैसें कवलावें। महातेज कवणें दवलावें। गगन मुठीं सुआवें। मशकें केवि ॥ ४३ ॥ परी एथ असे एक आधारु। तेणेंचि बोले मीं सधरु। जें सानुकूल श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे ॥ ४४ ॥ यन्हविं तन्हि मी मूर्खु। जन्हें जाला असे अविवेकु। तन्हीं सतकृपादीपकु। सोज्वलु असे ॥ ४५ ॥ लोहाचें कनक होये। हे परिसिं सामर्थ्य आहे। की मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धी ॥ ४६ ॥ जरि प्रकटे सिद्धसरस्वती। तरि मुकेया आथि भारती। एथ वस्तुसामर्थ्यशक्ती। नवल काइ ॥ ४७ ॥ जेयातें कामधेनु ऐसी माये। तेयासी अप्राप्य काहीं आहे। म्हणौनि मी प्रवर्तों लाहे। ग्रथीं इये ॥ ४८ ॥ तन्हीं न्यून तें पुरतें। अधिकही सरतें। करुन घेयावें हें तुमतें। विनविले मिया ॥ ४९ ॥ आता देइजे अवधान। तुम्हीं बोलविला मी बोलैन। जैसें चेष्टे सूत्राधीन। दारु यत्र ॥ ५० ॥ तैसा मी अनुग्रहीतु। साधुचा निरोपितु। ते आपला अलंकारितु। भलतैसा ॥ ५१ ॥ तव गुरु म्हणति राहीं। हें तुज बोलावें नलगे काहीं। आता ग्रथा चित्त देईं। झटकरी गा ॥ ५२ ॥ एया बोला निवृत्तिदासु। पावौनि परम उल्हासु। म्हणे परियेसा मना अवकाशु। देउनियां ॥ ५३ ॥

—ज्ञानेश्वरी (इ.स. १२९०), अध्याय पहिला, ओव्या ३२–८४

२

## माझा मऱ्हाठाचि बोलु कवतिकें

तो अध्याय हा सहावा । परि सहियाचिया नवा । सांगिजैल म्हणौनि परिसावा । चित्त देउनि ॥१॥ माझा मऱ्हाठाचि बोलु कवतिकें । परि अमृतातेंही पैजेंसीं जींके । ऐसीं अक्षरेंचि रसिकें मेळवीन ॥ २ ॥ जिये कोवळिकेचेनि पाडें । दीसति नादिंचे रंग थोकडे । वेधें परिमळाचें बीक मोडे । जेयाचेनि ॥ ३ ॥ आइका रसाळपणाचेया लोभा । कीं श्रवणिंचि होथि जिभा । बोलें इंद्रिया लागे कलभा । येकमेका ॥ ४ ॥ साहाजें शब्द तरा विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे का रसचि हा आमुचा । घ्राणासि मानो जाये परिमळाचा । हा तोचि का होईल ॥ ५ ॥ नवल बोलतीये रेखेची वाहाणी । दाविता डोळेयापुरां लागे आणि । ते म्हणती उघडली का खाणि । रूपाची हे ॥ ६ ॥ जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धावे बाहिरें । बोलु भुजाहीं आविष्करे । आलिंगावेया ॥ ७ ॥ ऐसा इंद्रिय अपुलाला भावीं । झोंबती परि तो सरिसेपणेंचि बुझावी । जैसा एकला जग चेववी । सहस्रकरु ॥ ८ ॥ तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण । पाठेया भावज्ञा फावति गुण । चिंतामणीचे ॥ ९ ॥ हे असो तेया बोलाची ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरलीं । ही प्रतिपत्ति मिया केली । निष्कामासि ॥ १० ॥ आता आत्मप्रभा नीचनवी । तेचि करुनि ठाणादिवी । जो इंद्रियातें चोरूनु जेवीं । तेयासीच फावे ॥ ११ ॥ एथ श्रवणाचेनि पांगें । वीण श्रोतया होआवें लागे । हे मनाचे मीचि आग । मोगिजे गा ॥ १२ ॥ आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचेयानि आंगा घडिजे । मग सुखेंसीं सुरवाडिजे । तेया माझि ॥ १३ ॥ ऐसें हळुवारपण जरि येईल । तरीचि हें उपेगा जाइल । येऱ्हवीं आघवी गोठि होईल । मूका बोले तेयाची ॥ १४ ॥ परि त असो आता आघवें । नलगे श्रोतेया कडसावें । ज एथ अधिकारिये स्वभावें । पूर्णकाम ॥ १५ ॥ जेहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची कुरवंडी । तेवाचौनु एथिची गोडी । नेणति आणिक ॥ १६ ॥ जैसा वायसीं

चद्रु नोलखिजे। तैसा प्राकृतीं ग्रथु हा नेणिजे। आणि तो हिमाशुचि जेवि खाजे। चकोरांचें ॥ १७ ॥ तैसा सज्ञानासि तरी हा ठाउ। आणि अज्ञानासि आन गाउ। म्हणौनि बोलावेया विषो पाहा हो। विशेषें नाहिं ॥ १८॥ परि अनुवा दलों मी प्रसंगे। तें सज्जनीं उपसाहावें लागे। आता साधेन काइ श्रीरंगे। निरूपिलें जें ॥ १९ ॥ तें बुद्धी हीं कवळितां साकडें। म्हणौनि बोलीं विपायी सांपडे। परि श्रीनिवृत्तिकृपा उजियेडें। देखैन मी ॥ २० ॥ जे दिठीहीं न पविजे। तें दिठीविण देखिजे। जन्हैं अतींद्रिय लाहिजे। ज्ञानबळें ॥ २१ ॥ ना तरी जे धातुवादियांहीं न जोडे। तें लोहींचि पन्हेरें सापडे। जरी दैवयोगें चडे। परिसु हाता ॥ २२ ॥ तैसी सद्गुरुकृपा होए। तरि करितां काय आपु नोहे। म्हणऊनी ते अपार माते आहे। ज्ञानदेउ म्हणे ॥ २३ ॥ तेणें कारणें मीं बोलैन। बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परि भोगवीन। इंद्रियाकरवीं ॥ २४ ॥

— ज्ञानेश्वरी, अध्याय सहावा, ओव्या १३-३६

## ३

## श्रोत्यांना सलगीची विनवणी

तरी अवधान एकलें देइजे। मग सर्व सुखासि पात्र होइजे। हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड आइका ॥ १ ॥ परि प्रौढि न बोलें हो जी। तुम्हा सर्वज्ञाचां समाजीं। देया अवधान म्हणे हे माझी। विनवणी सलगी ॥ २ ॥ का जे ललेयाचे लले सरति। मनोरथाचे मनौरे पुरति। जरी माहेरें श्रीमंतें होति। तुम्हा ऐसीं ॥ ३ ॥ तुमचेया दीठिवेयाचिये ओलें। सासिनले प्रसन्नतेचे मले। ते साउली देखौनि लोले। श्रातु जी मी ॥ ४ ॥ तुम्ही सुखामृताचे डोहो। म्हणोनि आपुलिया सर्वे वोल्हावो लाहो। आणि एथही सलगि करूं जरि बिहो। तरी निर्वो कें पा ॥ ५ ॥ आणि बालक बोबडा बोली। वाकुडां विचुकीं पाउलीं। ते चोज करुनि माउली। रिझवी जैसी ॥ ६ ॥ तेविं तुम्हां संताचा पढियो। कैसेनि तन्हीं आम्हावरि हो। दया बहुवा

अलुकी जी आज्ञा । सलगि करित ॥ ७ ॥ वाचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवादृश श्रोते । काई धडेयावरि सारस्वत । पढा सिकिजे ॥ ८ ॥ अवधारा आवडे तेसणा धुधुरू । परि महातेजीं न मिरवे काइ करू । अमृताचा ताटीं वोगरू । ऐसिं रसायें कैचीं ॥ ९ ॥ हा हो हिमकरा वीजण । की नादापुढां आइकवणें । लेणेयासि हें लेणें । केहीं आहे ॥ १० ॥ साया परिमळें काइ तुरुबावे । सागरें कवणी ठाइ नाहावें । हें गगनचि अडे आवर्ते । ऐसा पवाडु कवा ॥ ११ ॥ तैसें तुमचें अवधान धाए । आणि म्हणो हें देखो होये । ऐसें वक्तृत्व कवणातें आहे । विचारिजो ॥ १२ ॥ तर्‍हीं विश्व प्रकाशितेया गभस्ती । हाथिवेनि कीजे काइ आरति । का चूळोदकें अपापती । अर्घ्यु न दीजे ॥ १३ ॥ प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबला अर्चितस भक्ति । म्हणौनि बोलु जर्‍हीं गंगावती । तर्‍हीं स्वीकराल ॥ १४ ॥ बाल बापाचा ताटीं रिग । रिघौनि बापातेंचि जेवउ लाग । कि तो संतोषाचेनि वेग । मुख ओढवी ॥ १५ ॥ *तैसा मी जर्‍हीं तुम्हाप्रति । चावटे करितसे बाळमती । तर्‍हीं तुम्हीं संतोषिजे ऐसीचि जाति । स्नेहाचि एया ॥ १६ आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्हीं सत घेतले आहा बोहें । म्हणौनि केलिये सलगीचा नोहे । भारु तुम्हा ॥ १७ ॥ अहो तान्हे याचि लगें झटे । तरि तेणें अधिकेंचि पान्हा फुटे । रासें प्रेम दुणावटे । पढियतेयाचेनि ॥ १८ ॥ म्हणौनि मज लेंकरुवाचेनि बोलें । तुमचें कृपाउ पण निदेलें । चेइलें हें जी जाणवलें । एयालागि बोलिला ॥ १९ ॥ वेइहनि चान्दणे पिकविजत आहे काइ चेंपणीं । कीं वारेया घापत आहाति वाणीं । हा हो गगना गवसणी । घुफिजतसे ॥ २० ॥ आइका पाणी नाधिजवाचें न लग । नवनीतीं माथुल न लगे । लाजिलीं वारााणु न निग । देखौनि जेयात ॥ २१ ॥ हें असो शब्दब्रह्म जिये माज । शब्दु मावळलेया निवात निदिजे । तो गीतार्थु म्हाटिया वाल्हिने । हा पाडु काइ ॥ २२ ॥ परि

* तर्‍ही मी बल्दैत्य भक्त उती । तें कुपसाइावें सतीं ।
जैसें बाल्क धास मुये अपुल्या हातीं । पिलामुखी ॥
[ महेश्वर पंडित, ऋद्धिपुरमहात्म्य ( १ स १३०४ ) ]

मींचं श्रीकृष्णाचें बोलणें। आणि नम्रमीचेयाचि ऐसें मी ना म्हणे। यया निवाडु तरवडु जाणें। जेया गीतार्थु आथि ॥ ५ ॥ एव नवें अध्याय पहिले। मिया मतीसारखे बोलिले। आता उत्तरखड आदरिलें। ग्रंथिच आइका ॥ ६ ॥ तेथ विभूति प्रतिविभूति। प्रस्तुत अर्जुना सांगिजती। ते विन्धा रसवृत्ती। म्हणिपैल कथा ॥ ७ ॥ देशियेचेनि नागरपणें। शातु शृगारातें जीणे। वोविया कीं होंति लेणे। साहित्यासि ॥ ८ ॥ मूलग्रथी चेया संस्कृता। सर्वे नीट म्हाटी पढता। अभिप्रायें मानलेया उचिता। कवणि भूमी तें नेणवे ॥ ९ ॥ जैसे आगिचेनि सार्ध्यपण। लेणेयासि आगचि होये लेणें। तेथ अलंकरलें कवण कवणें। हें निर्वचेना ॥ १० ॥ ऐसी देशी आणि संस्कृत वाणी। एका भावाचा सुखासनीं। शोभती ते आणि। चोखट आइका ॥ ११ ॥ उठैलेया भाव रूप। करिता लाग रस वृत्तिच वडप। चातुर्य म्हणे हें पडप। जोडल आम्हा ॥ १२ ॥ तैसें देशियेचें लावण्य। हरौनि रसा आणिजैल तारुण्य। मग म्हणिपैल अगण्य। गीतातत्त्व ॥ १३ ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय दहावा, ओव्या ३४–४६

## ५

## सारस्वताचे गोड झाड

आता एयावरि एकादशीं। कथा आहे दोहा रसिं। जेथ पार्था विश्व रूपसीं। भेटि होइल ॥ १ ॥ जेथ शातचिया घरा। अद्भुत आला आहे पाहुणेरा। आणि येराहिं रसा पातिकरा। जाला मानु ॥ २ ॥ वधूवराचिये मीलणीं। जैसिं वऱ्हाडिया हिं टगईी लेणीं। तैसें देशिचिये सुखासनीं। मिरवले रस ॥ ३ ॥ परि शातादभुत रवे। जे डोलेयाचा अजुलि घेयावें। जैसे हरिहर प्रेमभावें। आले खेवा ॥ ४ ॥ नातरि अवसेचा दिसीं। भेटली दोन्हीं बिंबें जैसीं। तेविं येकवला रसीं। केला जेथ ॥ ५ ॥ मीनले गगायमुनेचे ओघ। तैसें या रसा जालें प्रयाग। म्हणौनि सुस्नात होत जग। आघवें एथ ॥ ६ ॥

मध्यें गीतासरस्वती गुपित। आणि दोनी रस ते बोध मूर्त। यालागि त्रिवेणी होये उचित। फावली आपा॥ ७॥ एथ श्रवणाचेनि द्वारें। तीर्थि रिगता सोपारें। ज्ञानदेऊ म्हणे दातारें। माझेनि केलें॥ ८॥ तीरें संस्कृताचीं गहनें। तोडूनि मऱ्हाटिया केली शब्दसोपानें। रचिली धर्मनिधानें। निवृत्ति देवें॥ ९॥ म्हणौनि भलतेणें एथ न्हावें। प्रयागी माधव विश्वरूपाते पाहावें। एतुलेनि ससारा देयावें। तिलोदक॥ १०॥ हें असो ऐसें सावेव। एथ सासिनले आधि रसभाव। जेथ श्रवणसुखाची राणिव। जोडली जगा॥११॥ जेथ शातादभुत रोकडे। आणि एरा रसा पडप जोडे। हें अल्पचि परि उघडें। कैवल्य जेथ॥ १२॥ तो हा अकरावा अध्याऊ। जो देवाचा आपणपे ठेविता ठाऊ। परि कैसा सदैवाचा राऊ। जे एथहि पातला॥ १३॥ आदि अर्जुनचि काइ म्हणो पातला। आजि हा आनंदतेयाहि सुकाळु जाला। तें गीतार्थु हा आला। मऱ्हाटिया॥ १४॥ एयाचिलागि आता माझें। विनविलें ते आदरिजे। तरि अवधान आता दीजे। सज्जनी तुम्हीं॥ १५॥ आहो तेवि चि तुम्हा संताचिये सभे। ऐसी सलगी कीर करू न लभे। परि मानावें जी लोभे। अपत्या माते॥ १६॥ अहो पुसा आपणचि पढविजे। मग बोले तरं तव माथा तूकिजे। का करविलेनि चोजें न रिझे। बाल्का माए॥ १७॥ तेवि मी जें जें बोलें। तं प्रभु तुमचेचि केले। म्हणौनि अवधारिजो आपुले। आपण देवा॥ १८॥ ह सारस्वताचें गोड। तुम्हीचि लाविलें जी झाड। तरी अवधानामृतें वाड। सिपौनि कीजे॥ १९॥ मग ई रसभावफूलीं फुलैल। नाना फलभारे भरैल। तुमचेनि प्रसादें होईल। उपयोगु जगा॥ २०॥ येया बोला सत रिझले। म्हणति तोखलों गा भले केलें। आता सांघें जें बोलिले। अर्जुनें तेथ॥ २१॥ तव निवृत्तिदासु म्हणे। कृष्णा अर्जुनाचें बोलणें। मी प्राकृतु काइ साधो जाणे। परि बोल्वाल तुम्हीं॥ २२॥ अहो रानिचिया पालेखादरा। नेवाणे करविलें लंकेश्वरा। एकला अर्जुनु परि अकरा। न जीणे क्षौणी॥ २३॥ म्हणौनि समर्थु होये माहाकारी। मान्हवें कैसे चराचरीं। तुम्ही सत तियापरी। बोलवा मातें॥ २४॥ तरि आता बोल्तसे आइका। हा गीता अभिप्राऊ नीका। जो वेकुंठनायका। मुखौनि निगाला॥ २५॥ आपु ग्रथु गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता।

नियें ग्रंथीं ॥ २६ ॥ तेथिचें गौरव कैसें वानावें। जें शंभुचिये मती नागवें। तें आता नमस्कारिजे जीवें। हेंचि भलें ॥ २७ ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय अकरावा, ओव्या १–२७

## ६

## अंबेची प्रार्थना

जयजय वो शुद्धे। उदारे प्रसिध्दे। अनवरत आनंदे। वर्त्तिये ॥ १ ॥ विषयव्याळें मीठी। दीधलेया उठणे नाहि ताठि। तूझेनि वो गुरुदृष्टी। होये माण ॥ २ ॥ तरी ताप कोणात पोळी। केमेनि सोमु जाली। जरा प्रसादरस कल्लोळीं। पूर येसि तू ॥ ३ ॥ योगसुखाचे सोहळे। सेवका दावीसि स्नेहाळे। सोहंसिद्धीचे लळे। पाळीसि तू ॥ ४ ॥ आधारशक्तीच्या अंकि। वाढविसि तू कौतुकि। हृदयकोशपाल्कीं। हालवीसि पं ॥ ५ ॥ प्रत्यग्ज्योतीची वोवाळणीं। करिसी मनपवनाचि खेलणिं। रिद्धिसिद्धिचीं वाल्लेणीं। लेववीसी माये ॥ ६ ॥ सतरावियेचें स्तन्य देसी। अनाहताचा हल्लरु गासी। समाधिबोधें निजविसी। बुझाउनी ॥ ७ ॥ म्हणौनि साधका तू माउली। पीके सारस्वत तूझा पाउलीं। या कारणें साउली। न सांडीं तूझीं ॥ ८ ॥ आवो सद्गुरुचिये दीठी। तूझ कारुण्य जेयात अधिष्ठी। तो सकल विद्याचिये सृष्टी। धाता होए ॥ ९ ॥ म्हणौनि अंबे श्रीमते। निजजनकल्पलते। आज्ञा दे पा मात। निरुपणीं ॥ १० ॥ नवरसा भरवि सागरु। करवीं उचित रत्नाचे आगरु। भावार्थाचे गिरिवरु। निफजवि माये ॥ ११ ॥ साहित्य सोनेयाचिया खाणी। उघडवि देशियेचिया अक्षोणी। विवेकवेलीची लावणी। होदे सैंघ ॥ १२ ॥ संवादफल निधानें। प्रमेयाचि उद्यानें। लावीं म्हणे गहनें। निरंतर ॥ १३ ॥ पाखांडाचे दरकुटे। मोडीं वाग्वाद अव्हाटे। कुतर्कांचि दुष्टें। मावजे दवडीं ॥ १४ ॥ श्रीकृष्णचरणी मातें। सर्वज्ञ करि वसतें। रागिये वैसवीं श्रोतें। श्रवणाचिये ॥ १५ ॥ मऱ्हाटियेचा नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं। घेणें देणें सुखाचि वेन्ही। जगा होदेईं ॥ १६ ॥ तू आपुलेनि स्नेहपल्लवें। मातें पाखुरवीसि सदैवें। तरि

आतान्वि हें आयर्वे। निर्मीन मीं ॥ १७॥ इये निनविर्णियेगाठि। अवलोकिर्ते गुरुदृष्टी। म्हणे गीतार्थेसि उठी। न बोल वहु ॥ १८॥ तेथ जी जी महा प्रसादु। म्हणौनि सविया जाला आनदु। आता निरोपिन्विल प्रबधु। अवधान दीजो ॥ १९॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय बारावा, ओव्या १–१९

७

आनदाचे आवार। माड़ जगा॥

तो श्रीकृष्णार्जुन सवादु। नागरीं बोलि विशदु। सागो टाउ शुधु। वोवियेचा ॥ १ ॥ नसुदीन्वि शातिकथा। आणिजैल किर वाक्पथा। परि शृगाराचा माथा। पायो ठेविति ॥ २ ॥ दाउ वेल्हाल देशीं नवी। जैसी साहित्यातें वोजावी। अमृताही चूकि ठेवी। गोडिसेपणे ॥ ३ ॥ बोलु वेल्हानि तेनि गुणें। चद्रासि घे उमाणें। रसुमरगु भुल्वर्णे। नादु लोपी ॥ ४ ॥ खेच राचेया ही मना। आणि सात्त्विकाचा पान्हा। श्रवणासवें सुमना। समाधि जोडे ॥ ५ ॥ तैसा वाग्विलासु विस्तारु। गीतार्थेसी विश्वभरु। आनदाचे आवारु। माड़ू जगा ॥ ६ ॥ फीटो विवेकाची वाणि। हो काना मना जीणि। देखो आवडे ते खाणि। ब्रह्मविद्येची ॥ ७ ॥ दीसो परतत्त्व डोल। पाहो सुखाचा सोहळा। रिगो महाबोधु सुकाळा। माजि विश्व ॥ ८ ॥ हें निफजे आता आघवें। ऐसें बोलिजैल बरवें। जें अधिष्ठ्ली असे परदेवें। निवृत्ती मीं ॥ ९ ॥ म्हणौनि आगरी सुभेदिं। उपमाश्लेष कादाकोंदी' झाडा देईन प्रतिपदीं। ग्रथार्थासि ॥ १० ॥ हा टाउ्वेरि मातं। पुरतेया आहे सारस्वतें। नेरें असे श्रीमत। गुरुरायें ॥ ११ ॥ तेणें जी कृपासावायें। मी बोलें तेतुलें सामाये। आणि तुमन्विये सभे लाहे। गीतार्थु म्हणों ॥ १२ ॥ वरि तुम्हा सताचे पाये। आजि मी पातला आहें। म्हणौनि जी नोहे। अटक काहीं ॥ १३ ॥ प्रभु काश्मीरिं मूक। नुपने जी क्वतुकें। नाहिं गुणि सामुद्रिकें। लक्ष्मीयेसि ॥ १४ ॥ तेसी तुम्हा सतापासिं। अज्ञानाची गोठि काइसी।

यालागीं नमरसिं। वरिसैन मीं ॥ १५ ॥ किंबहुना आघवा। मज अवसरु देयावा ॥ १५ ॥ ज्ञानदेओ म्हणे बरवा। साधैन ग्रथु ॥ १६ ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय तेरावा, ओव्या ११४९–११६४

## ८

## ते श्रीकृष्णवदनामृत

का भरलें चद्रतारागणि। नभ सिधु आपणेया आणि। तैसा गीतेसिं मी अतष्करणि। सूदला तुवा ॥ १० ॥ जें त्रिविध मलकटां। सडिलासि सूभगा। म्हणौनि गीतेसि मज वसैठा। जालासि गा ॥ २ ॥ परि हें काइ बोलों गीता। जी हे माझी उन्मेसलता। जाणे तो समस्ता। मोहा मुके ॥ ३ ॥ सेविली अमृतसरिता। रोगु दवडुनि पाडुसुता। अमरपण उचिता। देउनि घली ॥४॥ तैसें गीता हे जाणितलिया। काइ विस्मो मोहो जावेया। परि आत्मज्ञानें आपणपेया। मीळिजे एथ ॥ ५ ॥ जेया आत्मज्ञानाचा ठाइ। कर्म आपुलेया जीविता पाइ। होउनिया उतराई। ल्या जाए ॥ ६ ॥ हारपलें दाउनि जैसा। मागु सरे वीर निलासा। ज्ञानें कल्मु वल्चे तैसा। कर्मप्रासादा ॥ ७ ॥ म्हणौनि ज्ञानिया पुरुसा। कृत्य करु सगळे देसा। ऐसा अनाथाचा सखा। बोलिला तो ॥ ८ ॥ तें श्रीकृष्णवदनामृत। पार्थु भरनि असे ओसडत। तव व्यासकृपा एत। सजयासि ॥ ९ ॥ तों धृतराष्ट्रु राया। सूत असे पान करावेया। म्हणौनि जीवितातु तेया। नव्हेचि भारा ॥ १० ॥ य इवि गीताश्रवण अवसरिं। आवडा लागतां अनधिकारी। परि सेविं तेचि उजिरी। पाति लाभली ॥११॥ जेधवा द्राक्षीं दूध घातलें। तेधवा वाया गेलें गमलें। परि फळपाकि दूणावलें। देखिलें जेविं ॥ १२ ॥ तैसीं हरिविभित्रचीं आदरें। सजयें साधितलि आदरें। निहीं अधु तो अवसरें। सुखिया जाला ॥ १३ ॥ तेंचि महाटेनि निन्यासें। मिया उन्मेख ठसेठोमसे। जाणें नेणां तैसें। निरोपिलें ॥ १४ ॥ सेवतींये अरसिकाहि। आग पाता विशेपु नाहिं। परि सौरभ्य नेलें तिहिं। भ्रमरिं जाणिजे ॥ १५ ॥ तैसें घडतें प्रमेय घेइजे। न्यून तें तें मज देइजे।

जें नेणणें हें साहाजें। रूप किं जाला ॥ १६ ॥ तरि नेणतें जन्हि होए। तन्हि देखोनि बापु कि माए। हरिखु केंहिं न माए। चोज करिति ॥ १७ ॥ तैसें संत माहेर माझे। तुम्हि मीनलेया मी लाडैजे। तेंचि ग्रथाचेनि व्याजें। जाणिजो जी ॥ १८ ॥ आता विश्वात्मकु माझा। स्वामी श्रीनिवृत्ति राजा। तो अवधारु वाक्यपूजा। ज्ञानदेउ म्हणे ॥ १९ ॥

— ज्ञानेश्वरी, अध्याय पधरावा, ओव्या ५४७–५६५.

## ९

### श्लोकाक्षरद्राक्षलता

एथ भारताचा पवाका। आणूनि अक्षरा एका। सजये कुरुनायका। दीधला हातिं ॥ १ ॥ जैसा नेणों केवडा वन्हि। का परि गुणाग्रि ठेऊनि। आणि जे सूर्याची हाणी। निस्तरावेया ॥ २ ॥ तैसें शब्दब्रह्म अनत। जालें सवालक्षु भारत। भारताचे सर्ते सात। सर्वस्व गीता ॥ ३ ॥ तेयाहिं साता शताचा। इत्यर्थु हा श्लोकु शेषिचा। व्यासशिष्य सजयाचा। पूर्णोद्गारू हा ॥ ४ ॥ एणें एकेंचि श्लोकें। राहे तेणें असिके। अविद्याजाताचें नीकें। जींतले होए ॥ ५ ॥ ऐसेया श्लोका से सात। गीतेचि पर्दे आगे वाहत। पर्दे म्हणों किं अमृत। गीताकाशिचे ॥ ६ ॥ कीं आत्मराजाचिये सभे। गीते उभ्डवले हे खाबे। मत्र श्लोक प्रतिभे। ऐसे एती ॥ ७ ॥ कीं गीता हे सप्तशती। मत्रप्रतिपाद्य भगवती। मोहमहिषमुक्ती आनदली असे ॥८॥ म्हणौनि मनें कायें वाचा। जो सेवकु होईल इयेचा। तो स्वानदसाम्राज्याचा। चक्रवर्ति करी ॥ ९॥ कि अविद्यातिमिर रोसें। श्लोकसूर्याचि सावाइके। खेलविले गीतामीसें। रायें श्रीकृष्णें ॥ १० ॥ कि श्लोकाक्षरद्राक्षलता। माडौ जाली आहे गीता। ससारपथश्राता। निसावावेया ॥ ११ ॥ कि सभाग्यसतीं भ्रमरीं। केल्ले ते श्लोक कल्हारिं। श्रीकृष्णास्यसरोंवरीं। साकिनली हे ॥ १२ ॥ किं श्लोक नव्हति आन। गमे गीतेचें महिमान। वाखाणिते बदिजन। उदड जैसे ॥ १३ ॥ कि श्लोकाचिया आवरा। सात से

करूनि सौंदरा। सर्वागम गीतापुरा। वसों आले ॥ १४ ॥ किं निजकांता आलेया। आवडि गीता मिळविया। श्लोक नव्हति वाह्या। पसरू कां जो ॥ १५ ॥ किं गीता कमळिचे भृंग। किं गीतासागरतरंग। किं हरिचे हे तुरंग। गीतारथिंचे ॥ १६ ॥ किं श्लोकसर्वतीर्थोतु। आली गीता गंगा अद्भुतु। जे अर्जुनु जाला सिंहस्थु। म्हणौनिया ॥ १७ ॥ किं नव्हे हे श्लोक-श्रेणी। सतत जाली चिंतामणी। कीं निर्विकल्प लावणी। कल्पतरूची हे ॥ १८ ॥ ऐसेयां से सात श्लोकां। परी आगला एकु एका। आतां कोणु वेगलिका वानावा पां ॥ १९ ॥ दीपा आदीलु मागीलु। सूर्यासि धाकुटा वडीलु। अमृतसिंधु खोलु। उतलु काइसा ॥ २० ॥ तानी आणि पारिठी। इया कामधेनूतें दीठी। सूनि जैसिया गोठी। कीजती नां ॥ २१ ॥ तैसे पहिले आणि सरते। श्लोक न म्हणावे गीते। जूनि नवें पारिजातें। असति काइ ॥ २२ ॥ आणि श्लोकां पाडु नाहिं। हें किर समर्थु काइ। येथ वाच्य वाचकहि। भागु न धरी ॥ २३ ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय अठरावा, ओव्या १६३८–१६६०

## १०

## श्रीव्यासांचे थोर उपकार

आणि कृष्णार्जुनिं मोकली। गोठि केली निराली। तें श्रीव्यासें दाविली करतलीं। घेऔं ये ऐसी ॥ १ ॥ बालकातें चोरसें। माय जेवऊं बैसे। तेव्हलिं तेया ठाकति तैसें। घास करी ॥ २ ॥ कां अफांटा समीरणा। आपैतेंपणेंसिं आणा। केलें जैसें बीजणा। निर्मूनियां ॥ ३ ॥ तैसें शब्दें जें न लभे। तें घडूतु अनष्टुभें। स्त्रीशूद्रादिप्रतिभे। सामाविलें ॥ ४ ॥ स्वातीचेनि पाणियें। न्हवेति जरि मोतियें। तरि आंगीं सौंदरांचियें। कां शोभती तियें ॥ ५ ॥ नादु वाद्या नैयंता। तरि कां गोचरू होता। फुलें नव्हतां घेपता। आमोदु केवि ॥ ६ ॥ गोडें नव्हति पक्वान्नें। तरि कां फावती रसनें। दर्पणेविण नयनें। नयनु कां दीसे ॥ ७ ॥ द्रष्टा श्रीगुरुमूर्ती। न रिगता दृश्यपंथीं। तरी

का ह्या उपास्ती । आकलता तो ॥ ८ ॥ तैसे वस्तु जें असख्यात । तेया संख्या इयें शतें सात । नव्हनि तरि कोण एथ । लागों ये तें ॥ ९ ॥ मेघ सिंधुचे पाणी वाहे । तऱ्ही जग तेयातेंचि पाहे । का जे उमप तें नोहे । टाकतें कोण्हा ॥ १० ॥ आणि वाचा जें न पवे । तें हे श्लोक नव्हति बरवे । तरि कानें मुखें फावे । ऐसे का होतें ॥ ११ ॥ म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वा जाला उपकारु । श्रीकृष्णउक्ति आकारु । ग्रथाचा केला ॥ १२ ॥

## ११

## देशिकार दूर्वादलें

आणि तो मिया हा आता । व्यासाचिं पदें पाहात पाहाता । आणिला श्रवणपथा । मऱ्हाटिया १३ ॥ व्यासाविकाचे उन्मेष । राहाती जेथ साशक । तेथ मी रक येक । बाचालें करीं ॥ १४ ॥ परि गीता ईश्वरु भोळा । जे व्यासोक्तिकुसुममाला । तरि माझिया दूर्वादला । ना न म्हणे ॥ १५ ॥ आणि जेया सिंधुतटा । पाणिया येति गजघटा । तरि काइ मुरकुटा । वारि जतसे ॥ १६ ॥ पारिकुटें पाखिरु । गगनीं नुडे तरि काइ करू । नभ क्रमूनि थोरू । गरुडु देखें ॥ १७ ॥ राजहसाच चालणें । भूतळिं चालावें कवणें । तरि आणिकिं ही कुन्हेपणें । चालावें लाग ॥ १८ ॥ जी आपुलेंनि अवकाशें । अगाध घेपे कलशें । चूळु चूळु पाणी ऐसें । घेउनि निग ॥ १९ ॥ दिवियेच्या आगिं थोरी । तरि ते बहुताते जातें करी । वाति आपुलिया परी । आणीकी ना ॥ २० ॥ जी समुद्राचेनि पैस । समुद्रीं आकारीं आभासे । थिल्लरीं थिल्लरा ऐसें । बिंबेचि पैं ॥ २१ ॥ तेवि व्यासादिक महामती । वावरों ये इये ग्रथीं । मा आम्ही ठाका हे युगति । नि मल्लेचि कीर ॥ २२ ॥ जिये सागरीं जल्चरें । सचरती मदराकारें । तेथ काइ सफरें । पव्हा न व्हावि ॥ २३ ॥ अरुणु आगाजवळिके । म्हणौनि सूर्याते तो देखे । मा भूतळींचि ने देखे । मुगी काई ॥ २४ ॥ म्यालागीं आम्हा प्राकृता । देसिकारें बाधा गीता । म्हणण हें अनुचिता । कारण नव्हे ॥ २५ ॥ आणि बापु पुढा जाये । देव्या उखलता

पायें। आणि हळू हळू ये। तरि तें न पवो काई ॥ २६ ॥ तैसा व्यासाचा मागोवा घेनू। भाष्यकारातें पूसतु। अयोग्युही मी न पवतु। कें जाइन ॥ २७ ॥ आणि पृथ्वी जेया क्षेमा। तुभगे स्थावरजंगमा। जेयाचेनि अमृतें चंद्रमा। निववी जग ॥ २८ ॥ जेयाचें आंगें असिकें। तेज लाहूनि अर्के। आंधाराचे सावाइकें। लोटिजतसे ॥ १९ ॥ समुद्रा जेयाचें तोए। तोया जेयाचें माधुर्य। माधुर्या सौंदर्य। जेयाचे होतें ॥३०॥ पवना जेयाचें बल। आकाश जेणें पघल। ज्ञान जेणें उज्वल। चक्रवर्ती ॥ ३१ ॥ वेद जेणें सुभास। सुख जेणें सोल्लास। हें असो रुपस। विश्व जेणें ॥ ३२ ॥ तो सर्वोपकारी समर्थु। सद्गुरु श्री निवृत्तिनाथु। राहाटत सज आंतु। रिगौनियां ॥ ३३ ॥ आतां आइती गीता जगीं। मी सागें मन्हाटिया भंगीं। येथ कें विस्मयालागि। ठाउ॰ असे ॥ ३४ ॥ श्रीगुरुचेनि नावें माती। डोंगरीं जेयापासिं होती। तेणें कोल्यिं त्रिजगती। एकावट केली ॥ ३५ ॥ चंदनें वेधिलीं झाडें। जालिं चदनाचेनि पाडें। वसिष्ठें मानिली कीं भाडें। भानुसीं पाठीं ॥ ३६ ॥ मा मी तंव चित्ताधिला। आणि श्रीगुरु ऐसा दादुला। जो दीठीवेनि आपुला। बैसवी पदीं ॥ ३७ ॥ आधींचि देखणी दीठि। वरि सूर्यु पुरवी पाठि। तैं न दिसे ऐसी गोठि। कोठें असे ॥ ३८ ॥ म्हणोनि माझे नीच नवें। श्वास हो प्रबंध होआवे। श्रीगुरुकृपा काइ न्हवे। ज्ञानदेउ॰ म्हणे ॥ ३९ ॥

## १२

### ग्रंथवैभव

या कारणें मियां। गीतार्थु मन्हाटिया। केला लोकां लागिया। दीठिचा विखो ॥ ४० ॥ परि मन्हाटे बोल रंगे। कवलिता जैं गीतांगें। तैं गा तेयाचेनि पांगें। एकावट जाले ॥ ४१ ॥ म्हणौनि गाता गाउ॰ म्हणे। तैं गाणिवें होये नेणें। ना मोलें तरि उणें। गीतांहीं न आणिती ॥ ४२ ॥ सुंदर आंगीं लेणें न सए। तैं तो मोकळा श्रिंगारु होए। ना लेइलें तरि आहे। तैसें कें उचित ॥ ४३ ॥ का मोतियांची जैसी जाति। सोनेयांहि मानु देति। ना यन्हवि तऱ्हि

मानवति । आंगेचि गुणु ॥ ४४ ॥ नाना गुफिलीं का मोकळीं । उणीं नन्दति परिमळीं । वसंतागमींचि वाटोळीं । मोगरीं जैसीं ॥ ४५ ॥ तैसी गाणीव तें मिरवी । गीतेंवीण रंगु दावी । तो लोभान्ना बधु ओवी । घेली मिया ॥ ४६ ॥ तेणें आबालसुबोधें । ओवियेचेनि बंधें । ब्रह्मरसमुस्वादें । आगरें गुफिलीं ॥ ४७ ॥ आता चंदनाचा सेजारीं । परिमळालागिं निमिष भरी । पाघरणें जियापरी । न लगे तेथ ॥ ४८ ॥ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागतखेंओ समाधि आणी । आइकिलेया व्याखाणी । व्यसन न ल्गी ॥ ४९ ॥ पाठु करिति व्याजें । पांडित्यें एथ वेसजें । तें अमृततें नेणिजे । पातलेया ॥ ५० ॥ तैसेनि आइतेपणें । कविल्वा जालें उभणें । मननिदिध्यासश्रवणें । जींतलें आता ॥ ५१ ॥ हे स्वानन्भोगाची सेल । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रिया पोसवील । श्रवणाकरवीं ॥ ५२ ॥ चंद्रातें आगरणें । भोगूनि चकोर सिहाणे । तऱ्हीं फावे जैस चांदिणें भल्तेया ॥ ५३ ॥ तेसें अध्यात्मशास्त्रीं इयें । एक अतरंगचि अधिकारियें । येरि लोक वाक्चातुर्यें । होईल सुरिया ॥ ५४ ॥ ऐसे श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव असे जी साचें । ग्रंथु नव्हे हें कुरूपेचं । वैभव तिये ॥ ५५ ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय अठरावा, ओव्या १६७४–१७२९

## १३

## दुरिताचे तिमिर जावो

आता विश्वात्मक देवें । एणें वाग्यज्ञें तोषावें । तोखोनि मज देयावें । पसायदान हें ॥ १ ॥ जे खलांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मी रति वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचें ॥ २ ॥ दुरिताचें तिमिर जाओ । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥ वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळीं । भेटतु भूतां ॥ ४ ॥ चला कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणींचे गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ५ ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे

होतु ॥ ६ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदि-पुरुषीं । अखंडित ॥ ७ ॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषें लोकीं इये । दृष्टा-दृष्टविजयें । होआवें जी ॥ ८ ॥ येथ म्हणे विश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ॥ ९ ॥ ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्री गोदावरीच्या कुळीं । दक्षिणिलीं ॥ १० ॥ तेथें त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोशक्षेत्र । जगाचें जीवनसूत्र । जेथ श्रीमहालसा ॥ ११ ॥ तेथ यदुवंशविलासु । जो सकलकळा निवासु । न्यायातें पोषीत क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ १२ ॥ तैं महेशान्वयसंभूतें । श्री निवृत्तीनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥ १३ ॥ एवं भारताच्या गावीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवीं । जे गोष्टी केली ॥ १४ ॥ जे उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥ १५ ॥ तिये गीतेचा कलशु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥ १६ ॥ पुढती पुढती पुढती । इया ग्रंथा पुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होईजो ॥ १७ ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय अठरावा, ओव्या १७७२–१७८८

## १४

### ग्रंथपरिहार

परी गा श्रीनिवृत्तिराया । हातातळीं सुखविलें तूं या । तरी निवातचि मिया । भोगावें कीं ॥ १ ॥ परी महेशें सर्या हातीं । दिधली तेजाची सुती । तया भासा अंतर्वर्ती । जगचि केलें ॥ २ ॥ चंद्रासी अमृत घातलें । तें तयाचि कायी येतुलें । कीं सिंधु मेघासी दिधलें । मेघा भागु ॥ ३ ॥ दिवा जो उजिवडु । तो घराचाचि सुरवाडु । गगनीं आथी पवाडु । जगाचा कीं ॥ ४ ॥ अगाधे ही उचंबळती । ते चंद्रीची ना शक्ति । वसंतु करी तैं होती । झाडांचें दानी ॥ ५ ॥ म्हणोनि असवर्य । हें देविकेचें औदार्य । याचूनि स्वातंत्र्य । मासें नाहीं ॥ ६ ॥ आणि हा येव्हडा ऐसा । परिहारु देऊं कायसा । प्रभु

प्रभावविन्यासा । आड ठाऊनि ॥ ७ ॥ आम्ही बोलिलों जें कांहीं । तें प्रगटचि असे ठाईं । मा स्वयप्रकाशा काई । प्रकाशावें बोलें ॥ ८ ॥ विपायें आम्ही इन | कीजे तें पा मौन । तरी काय जनीं जन । दिसतें ना ॥ ९ ॥ जनातें जनें देखता । द्रष्टाचि दृश्य तत्त्वता । कोन्ही न होनि आयिना। सिद्धातु हा॥ १० ॥ यया परौतें काहीं। सनिद्रद्दश्य नाहीं। आणि हें तरा आधींहि। असतचि असे॥ ११ ॥ तन्ही ग्रथ प्रस्तावो । न घडे म्हणे पावो । तरी सिद्धानुवाद लाहो । आवडीं करू ॥ १२ ॥ पढियत सदा तेंचि । परी भोगीं नवी नवी रुची । म्हणोनि हा उचितुचि । अनुवादु सिध्दु ॥ १३ ॥ या कारणें मिया । गौप्य दाविल बोलोनिया । ऐसें नाहीं आपसया । प्रकाशचि हा ॥ १४ ॥ पूर्ण अहता वेढला । सैंर आम्हींच दाटलों । मा लोपलों ना प्रगटलों । कोणा होऊनी ॥ १५ ॥ आपणया आपणपें । निरूपण काये वोपे। मा उगेपणें हरपे। ऐसें आहे ॥ १६ ॥ म्हणोनि माझी वैखरी। मौनाचेंही मौन करी। हे पाणियावरी मकरी। रेखिली पा ॥ १७ ॥ एव दशोपनिषदें। पुढारीं न दळती पदें। देखोनि बुद्धी बोधें। येथचि दिधली ॥ १८ ॥ ज्ञानदेव म्हणे श्रीमत । हें अनुभवामृत । सेउनी जीवन्मुक्त । हेंचि होतु ॥ १९ ॥ मुक्ति कीर वेल्हाळ । अनुभवामृत निखळ । परी अमृताही उठी लाळ। अमृतें येणें ॥ २० ॥ नित्याचा चाडु होये । परी पुणिवेचा आतु आहे । हे का मी म्हणों लाहे । सूर्यदिठी ॥ २१ ॥ प्रिया सावायिली होये । तें अगींचे अगीं न समाये। येरव्हीं तेथेंचि आहे । तारुण्य कीं ॥ २२ ॥ वसताचा आला । फळीं फुलीं आपला । गगनाचिया डाळा । पेलती झाडें ॥ २३ ॥ यालागीं हें बोलणें। अनुभवामृतपणें। स्वानुभूति परगुणें। वोगरिल ॥ २४ ॥ मुक्त मुमुक्षु बद्ध । हे तववरी योग्यता भेद । अनुभवामृतस्वाद। विरुध जव ॥ २५ ॥ गगा अवगाहना आली । पाणियें गगाचि जाली । का तिमिरें भेटली । सूर्या जैसी ॥ २६ ॥ नाहीं परिसाची कसवटी । तववरीच वाणियाच्या गोठी । मग पधरा वयाच्या पाठीं । बैसाव कीं ॥ २७ ॥ जैसें जया अस्तरा । भेटती गाभारा । ते वोघ जैसे सागरा । आतु आले ॥ २८ ॥ तैशा अकारादि अक्षरा । भेटती पन्नासही मात्रा । तसें या चराचरा । दुसरें नाहीं ॥ २९ ॥ तैसी तया ईश्वरीं । अगोळी नुरेची दुसरी । किंबहुना सरोभरा । शिवेंशिवि ॥ ३० ॥

म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृतें येणें । मगु भोगिजे सणें । विश्वाचेनि ॥ ३१ ॥

—अमृतानुभव, प्रकरण दहावें, ओव्या १–३१

## १५

## भाषामध्यें मऱ्हाटी सर्वोत्तम

इतुकी वसिष्ठ ऋषीची बोली । म्या संस्कृताची मऱ्हाटि केली । उधरा वेया केवळी । बहुता लोका ॥ १ ॥ जैसी दीपामाझिं दिवटी । का तिर्थामाझि पूर्णिमा गोमटी । तैसी भाषामध्यें मऱ्हाटी । सर्वोत्तम ॥ २ ॥ जैसी सरितामध्यें गोदावरी । का पर्वतामध्यें रत्नगिरी । तैसी भाषामध्यें साजिरी । मऱ्हाटी पैं ॥ ३ ॥ हरळामध्यें रत्नकिळा । का पुष्पामध्यें कमळ । तैसी भाषामध्यें सोह्ळ्ला । शोभिवत दिसे ॥ ४ ॥ दुर्गांनरि शोभे चरीं । का मुक्ताफळें शोभती हारीं । तैसी शोभे भाषामाझारि मऱ्हाटी पैं ॥ ५ ॥ तीर्थामध्यें काशी । का व्रतामध्यें येकादशी । भाषामध्यें तैशी । मऱ्हाटी शोभिवत ॥ ६ ॥ परिमळामध्यें कस्तुरी । का अमरामध्यें शमरारी । तैसी मऱ्हाटी सुंदरी । भाषामध्यें ॥ ७ ॥ ऐसी मऱ्हाटी सुंदरी । ते संस्कृता शोधु करी । शटिक वैसवी हृदयमंदिरीं । अज्ञानाचा ॥ ८ ॥ मूर्खहृदयातें शोधी । निविध अर्थातें शोधी । अज्ञानासी बोधी । मऱ्हाटी पैं ॥ ९ ॥ मूर्खासि चतुरा करी । सोधु दावी सारासारी । ज्ञानत्य वाखाणी सरारीं । मऱ्हाटी हे ॥ १० ॥ बहुत संस्कृतीं अनुरागु । सर्वशास्त्रीं विचारु चागु । परि मऱ्हाटीवाचूनि पागु । कवण फेडीं ॥ ११ ॥ मऱ्हाटी बोल्ना बरवी । सर्वत्र जाणीव मिरवी । दुर्जनाक्षरवीं साडवी । पाराड पैं ॥ १२ ॥ ऐसिया मऱ्हाटिया पवित्रा । लेणें करीन अध्यात्मशास्त्रा । बहुता लोकासीं पवित्रा करावेया ॥ १३ ॥ या कारणें कष्टी । योगु मूनु दृष्टी । निववीतसे श्रोतेय्ना सृष्टी । ज्ञानदेव ॥ १४ ॥ श्रोते जना नमस्कारू । तुम्ही सर्व सुखाचा सागरू । तुमचा होये कृपाकरू । तरि यथामि रूप ॥ १५ ॥ मगल पदार्था अनेका । वक्ता चतुरु जाला निका । परि श्रोतेनवीण वक्ता । चतुरु येवि ॥१६॥

ताथुवेविण प्रकारु । केवि होये मुक्ताचा हारु । तैसा श्रोतयाविण टीकाकारु । श्लाघ्यु केवा ॥ १७॥ खिर नीर येकत्र पवाडु । तेथ राजहंस करी वाडु । तरी पयजळाचा निवाडु । केवि होये ॥ १८ ॥ समुद्रीचा पाणिबुडा । काढी विविधें मुक्ताफळें फुडा । परि पारखियेविण सुपाणि खरडा । केवि होये ॥ १९॥ स्वामींचे अवसान अनस्वरीं । सेवकु उठे प्राणांतरी । तेथ स्वामी दुचिता तरि । कवण करी मानु तया ॥ २० ॥ चरण चालणें होति कीरु । परि तो नेत्रीं असे अधिकारु । तैसा वक्ता नोहे चतुरु । श्रोतेनविण ॥२१॥ वन्हि प्रसवौनि खड-तरु । सूर्यकाती होये निर्धारु । परि तो ठेविला अधिकारु । रविमंडळीं ॥ २२ ॥ सोमकातु द्रवता वीरु होये । परी ते हातवटी चद्रीचि आहे । तैसा वक्ताचि परी वक्ता नोहे । श्रोतेनविण ॥ २३ ॥ वैखरी बोलोनी वगत्रीं । परि तो आइकता अधिकारु श्रोत्रीं । तेसी श्रोतेनविण जगत्रीं । वक्ता केवि माने ॥ २४॥ तुमचिये कृपेवीण । वक्तव्य मानी क्वण । मिं प्राकृत येक हीन । श्लाघ्य क्जिे ॥ २५ ॥ *मनें वाचा कर्मणा । पुढिलाच्या प्रमाणु समान गुणा ।* मेरु येवढें महिमाना । ठेवा तुम्हीं ॥ २६ ॥ ऐसें कारुण्य तुमचें चोखडें । जें कल्पतरूचेनि पाडें । आर्ति पुरवी म्हणौनि कोडें । विनवितसे ॥ २७ ॥ तुम्ही अवलोकाल प्रियता । तरि ग्रथु घेईल मान्यता । मज दुर्बळासी म्हणतील ज्ञाता । योगज्ञानी ॥ २८ ॥ तुम्हा श्रोतया शुभा । अक्षोभ तुमची सभा । म्हणौनि मिं आपशोभा । दावितुसे ॥ २९ ॥ जैसें अगणित तारामडळ । कीं समुद्रार्णवींचें जळ । तैसें तुमचें सभामडळ । अक्षोभ जी ॥ ३० ॥ ना विष्णुलोकींची सृष्टि । अमोघ मेघाची वृष्टि । का अमृत चद्राची दृष्टि । तैसे तुम्ही ॥ ३१ ॥

— योगवासिष्ठ, अध्याय पहिला, ओव्या २९३–३२३

## १६

### सकल सुखें वर्तो जन

जें अनक्षर अव्यक्त नि शब्द । जें पूर्ण सत्य शुद्ध बुद्ध । तें तुवा केलें विशद । मच्छादिया ॥ १ ॥ वशपरपरा गुरु । ऋषीश्वरामाजि थोरु । होता

आत्मज्ञान अधिकार। वसिष्ठासि ॥ २ ॥ हें बोलिले वसिष्ठ। म्हणौनु नाव वासिष्ठ। यामाजि श्रेष्ठ। आत्मज्ञान ॥ ३ ॥ तव ज्ञानदेव म्हणे कृपासागरा। अहो जी परवस्तुचेया अवतारा। निवृत्तिनामाचेया पारा। कवण जाणे ॥ ४ ॥ तुम्हांसि आत्मज्ञानदृष्टि। परात्मस्वरूपीं भेटि। तयाचें अंतरीं हे सृष्टि। तुम्ही हो ॥ ५ ॥ श्रीगुरु आणि संताचेनि मोह्। काहीं बोलिलो अध्यात्मसोये। वाक्य श्रीगुरु अर्पित होये। आज्ञा तुमचि ॥ ६ ॥ संत म्हणती ज्ञानेश्वरा। अलंकारले या शास्त्रा। तें परमेश्वरा। अपावें कीं ॥ ७ ॥ मग उभा ठाकौनि पाठीं। वोत्री प्रबंध प्राप्तिं। विनविंत अव्यक्तासिं। ज्ञानदेव ॥ ८ ॥ ब्रह्म बोलिजे चिद्रूप। ब्रह्म म्हणिजे नादरूप। तेया ब्रह्मा माझ वाक्पुष्प। अर्पित हो ॥ ९ ॥ ब्रह्म बोलिजे ज्योतिस्वरूप। शब्दब्रह्म म्हणती एक। त्या ब्रह्मासी माझ वाक्य। प्रीति पावो ॥ १० ॥ जे ध्यानधारणा आसनीं। नित्य ध्याइजे योगिजनीं। स्वाधीन जो निरंजना। तो प्रीति पावो ॥ ११ ॥ अर्पिलें वाक्पुष्प। मन जालें परमानंदरूप। मग मागितसे उमप। पसायदान ॥ १२ ॥ जे सर्वां जीवा निर्वैर। दुष्टदुर्जन होतु योगपर। आनंदभरितु चराचर। न व्यापें दुःख ॥ १३ ॥ पापाडिये अनित्यत्व। त्या घडो परमेश्वरीं भजन। ते पावो आत्मज्ञान। हेचि पसाय ॥ १४ ॥ नारी पुरुष प्रीति होतु। गाई बहुक्षीरातें स्रवतु। बहुधान्य पिकतु। धरित्री ॥ १५ ॥ वृक्ष शोभोत फळीं फुलीं। राजा प्रजा पाळी। पर्जन्य वर्षो महींतळीं। कामरूप ॥ १६ ॥ सकल सुखें वर्तो जन। सकळीं परमेश्वरीं मन। हेंचि पसायदान। म्हणे ज्ञानदेव ॥ १७ ॥

—योगवासिष्ठ, अध्याय दहावा, ओव्या १४८–१६४

## १७

### अभंग

रूप पाहतां लोचनीं। सुख झालें वो साजणी ॥
तो हा विठ्ठल बरवा। तो हा माधव बरवा ॥

बहुता सुकृताची जोडी । म्हणुनि विठ्ठल आवडी ॥
सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर ॥ १ ॥

* * *

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥
हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥
असोनि संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥
ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणें । द्वारकेचा राणा पांडवाघरीं ॥ २ ॥

* * *

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥
जाईन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलीया ॥
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगी ॥
बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाची भेटी । आपुलिये संवसाटी घेऊन राहे ॥३॥

* * *

एकतत्त्व नाम दृढ धरी मना । हरिसी करुणा येइल तुझी ॥
तें नाम सोपें रे राम कृष्ण गोविंद । वाचेशीं सद्‌द्रढ जपे आधीं ॥
नामापरतें तत्त्व नाहीं रे अन्यथा । वायां आणिका पंथा जाशी झणी ॥
ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं । धरोनि श्रीहरी जपे सदा ॥ ४ ॥

* * *

सोनियाचा दिवस आजी अमृतें पाहिला ।
नाम आठवितां रूपीं प्रगट पैं झाला ॥
गोपाळा रे तुझें ध्यान लागो मना ।
आनु न विसंबे हरी जगत्र जीवना ॥
तनु मनु शरण विनटलों तुझ्या पाईं ।
रखुमादेवीवरावाचूनि आनु नेणें कांहीं ॥ ५ ॥

* * *

दैव करी तरी काय न होई । दगडालिये नई तरिचेल ॥
सूर्यकिरणावरी मुंगियाच्या हारी । अग्निचे पाठारीं पीक होय ॥

फुटतील पाय चालतिल भिंती । मेरु मशक येती समतुका ॥
ज्ञानदेव म्हणे अघटित घडे । गुरुकृपे जोडे परब्रह्म ॥ ६ ॥
पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती । रत्नकीळा फाकती प्रभा ।
अगणित लावण्य तेज पुंजाळले । न वर्णवे तेथींची शोभा ॥
कानडा हा विठ्ठलु कर्नाटकु । येणें मज लाविला वेधु ।
खोळ बुंथी घेऊनि खुणेची पालवी । आळविल्या सादु नेदी ॥
शब्देवीण संवादु दुजेवीण अनुवादु । हें तव कैसेनि गमे ।
परेहि परतें बोलणें खुंटलें । वैखरी कैसेनि सांगे ॥
पाया पडू गेले तव पाऊलचि न दिसे । उभाचि स्वयंभु असे ।
समोर कीं पाठीमोरा न कळे । ठकचि पडिले कैसें ॥
क्षेमालागीं मन उतावीळ माझें । म्हणवूनि स्फुरताती बाहो ।
क्षेम देऊं गेलें तंव मीचि मी एकली । आसावला जीवरावो ॥
बाप रखुमादेवीवरू हृदयींचा जाणुनी । अनुभव सौरसु केला ।
दृष्टीचा डोळा पाहों मी गेलीये । तंव भीतरीं पालटु झाला ॥ ७ ॥

* * *

काय करिसी सकळ देवाचे वैभवविलास ।
माझिया स्वामीविण ते अवघे उदास रया ॥
तपन त्या कमळा कमळीं विकासु ।
सुकवी भयकु काय करिसी सुधांशु ॥
साताही वाराचे दिवसु एकियाचि सुरिजे ।
तैसें सर्वां सर्वपण माझियेन श्रीराजें ॥
सर्वज्ञ सुंदर देव होत का भलतैसे ।
परि जडातें चेष्टविते आणिका पैं नसे ॥
जया नाम नाहीं रूप चिन्ह काहीं ।
नामरूप चिन्ह स्वयेंचि पाहीं ॥
बाप रखुमादेवीवरु आहे तैसाचि पुरे ।
काय करिसी आणिका देवाची गोठी रे रया ॥ ८ ॥

* * *

## २

## ताटी उघडा ज्ञानेश्वरा

मजवरी कृपा करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा ॥
विश्व रागें झालें वन्ही । संतमुखें व्हावें पाणीं ॥
शब्दशस्त्रें झालें क्लेश । संतीं मानावा उपदेश ॥
विश्वपट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ १ ॥

*

संत जेणें व्हावें । जगबोलणें सहावें ॥
तरिच अंगा थोरपण । जया नाहीं अभिमान ॥
थोरपण जेथ वसे । तेथें भूतदया असे ॥
रागें भरावें कवणासी । आपण ब्रह्म सर्वदेशीं ॥
ऐसी समदृष्टी करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ २ ॥

*

ब्रह्म जैसें तैशापरीं । आम्हा वेढिलें भूतें चारीं ॥
हात आपला आपणा लागे । त्याचा करूं नये राग ॥
जीभ दातानें चाविली । कोणें रत्तीशी पाडिली ॥
( थोडे दुखावलें मन । पुढें उदंड साहाणें ॥
चणे खावे लोखंडाचे । मग ब्रह्मपदीं नाचे ॥ )
मन मारुनि मधन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ३ ॥

*

गिरी गव्हर कशासाठीं । राग धुसविली पाठीं ॥
ऐसा नसावा सन्यासी । परमार्थाचा द्वेष द्वेषी ॥
घर जाधिलें डोंगरी । विषय हिंडे दारोदारीं ॥
काय केला योगधर्म । नाहीं अंतरीं निष्काम ॥
गंगाजळ हृदय करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

## निवृत्तिनाथ

मेघ अमृताचा जेथूनि पवाड । दुजियाची चाड नाहीं तेथें
तें रूप अरूप सुंदर सांवळें । भोगिती गोंवळे सुखसिंधु
विराट नाटकु वैराज जुनाट । गोपवेषें नट नंदाघरीं
निवृत्ती सत्वर सेवी सुखसार । प्रकृती आकार लोपे ब्रह्मीं ॥ १ ॥

*　*　*

सारासारधीर निर्गुणपरतें । सादृश्य पुरतें हरिनाम
तें हें कृष्णनाम यशोदेच्या घरीं । वनीं गायी चारी यमुनेतटीं
सुलभ सुभग आगम निगम । तो हा आत्माराम गोपवेषें
निवृत्तीचें सार गयनीचें गूज । मज मंत्रबीज उपदेशिलें ॥ २ ॥

*　*　*

## मुक्ताबाई

१

देउळीचा देवो घरभरी भावो । कळसेंवीण वावो जातु असे ॥
जाताति वाउगे नटनाट्यसोंगे । चित्त अनुरागें भजती ना ॥
असोनि न दिसें उगयाचि पिसें । घेती वाया वसे सज्जनेंवीण ॥
रावो रंक कोइ न म्हणेचि सोइ । सासारिले अइ न कळे तया ॥
भ्रांतिचेनि भूलीं वायाचि घरकुली । माया आड ठेली अरे रया
मुक्ताई परेसी दुभतें चहूंसी । सत्रावी सर्वेसीं एका देवें ॥

*　*　*

## २

### ताटी उघडा ज्ञानेश्वरा

मज३री कृपा करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा ॥
विश्व रागें जाले वन्ही । संतमुखें व्हावें पाणी ॥
शब्दशस्त्रे जालें क्लेश । संतीं मानावा उपदेश ॥
विश्वपट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ १ ॥

*

संत जेणे व्हावें । जगबोलणें सहावें ॥
तरिच अंगा थोरपण । जया नाहीं अभिमान ॥
थोरपण जेथ वसे । तेथें भूतदया असे ॥
रागें भरावें कवणासी । आपण ब्रह्म सर्वदेशीं ॥
ऐसी समदृष्टी करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ २ ॥

*

ब्रह्म जैसें तैशापरी । आम्हा वेढिलें भूत चारी ॥
हात आपला आपणा लागे । त्याचा करू नये राग ॥
जीभ दातानें चाविली । कोणें बत्तीशी पाडिली ॥
( थोडे दुखावलें मन । पुढें उदंड साहणें ॥
चणे खावे लोखंडाचे । मग ब्रह्मपदीं नाचे ॥ )
मन मारुनि मथन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ३ ॥

*

गिरी गव्हर कुंडामाजी । रागें पुरविली पाठी ॥
ऐसा नमावा सन्यासी । परमार्थाच्या द्वेष द्वेषी ॥
घर बांधिलें डोंगरी । विषय हिंडे दारोदारीं ॥
काय केला योगधर्म । नाहीं अंतरीं निष्काम ॥
गंगाजळ हृदय करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

अवघीं साधनें हातवटी । मोलें मिळत नाहीं हाटीं ॥
शुद्ध ज्याचा भाव । त्याला दूर नाहीं देव ॥
( आपण जैसे व्हावें । अग्रें अनुमानोनी घ्यावें ॥
ऐसें केलें सद्गुरुनाथें । बाप रखुमादेवीकांते ॥ )
कोण्ही कोणासी सिकवावें । सारासार शोधुनि घ्यावें ॥
लडिवाळ मुक्ताबाई । बीज मुद्दल ठायीं ठायीं ॥
तुम्हीं तरोनी विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ५॥

## ३

## झोक्यांवरील ओव्या

पहिली माझी ओवी परतूनि पाहिलें । दृष्टीनें देखिलें निजरूप ॥१॥
दुसरी माझी ओवी दुजें नाहीं मनी । लक्ष तुझे चरणीं लागियेलें ॥२॥
तिसरी माझी ओवी श्रीसरूपता । हात तुझा माथा सद्गुरुनाथा ॥ ३ ॥
चवथी माझी ओवी शून्य जेथ आटे । वस्तु घन दाटे मागेंपुढें ॥ ४ ॥
पाचवी माझी ओवी पाचही अणुआराना। पंचवीसीयाचा रीघ नाहीं ॥५॥
साहावी माझी ओवी साहस्य देखणें । वरकड बोलणें फोल झालें ॥ ६ ॥
सातवी माझी ओवी साच वाटे मनीं । अंतरीच्या खूणीं काय सांगूं ॥७॥
आठवी माझी ओवी आठव नाहीं जरा। निर्गुण सोयरा पर्णियेला ॥ ८ ॥
नववी माझी ओवी नादू जे लागले । परपुरुषा रतले जीवेंभावें ॥ ९ ॥
दहावी माझी ओवी धालें माझें मन। डोळा दिसे ऊन रात्रींमाजीं ॥१०॥
म्हणे मुक्ताबाई निवृत्तिचें देणें । योगियाचे खुणें योगी जाणे ॥ ११ ॥

## चोखा मेळा

[ निधन ' इ. स. १३३८ ]

विठ्ठल विठ्ठल गजरीं । अवघी दुमदुमली पढरी ॥
होतो हरिनामाचा गजर । दिंड्या पताकाचे भार ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान । अपार वैष्णव ते जाण ॥
हरिकीर्तनाची दाटी । तेथें चोखा घाली मिठी ॥

* * *

जोहार मायबाप जोहार । तुमच्या महाराचा मी महार ॥
बहु भुकेला जाहलों । तुमच्या उष्ट्यासाठीं आलो ॥
बहु केली आस । तुमच्या दासाचा मी दास ॥
चोखा म्हणे पाटी । आणिली तुमच्या उष्ट्यासाठीं ॥

* * *

माझी तू माउली माझी तू माउली । माझी तू माउली विठ्ठल तू ॥
मज का मोकलीले वेगळें का केलें । का या धाडियेले मगळवेढ्या ॥
चोखा म्हणे मज नाहीं द्रव्याची चाड । तुझ नाम गोड मुखीं गाता ॥

## नामदेव

[ सुमारें इ. स. १२७०–१३५० ]

१

( नामदेवाची आई गोणाई म्हणते )

गोणाई म्हणे नाम्या राहिलासी उदरीं । तेहुनी मी करीं आस तुझी ॥
उपजलासी तं मज झाला संतोष । आनंद उल्हास वाटे जीवा ॥
गणगोतामाजीं केलें या रे नाव । पंढरीचा देव प्रसन्न केला ॥

रात्रंदिवस लेखीं अंगोळी वरी । तू मज ससारीं होसीं म्हणोनि ॥
तव तुज अवचितीं उपजली बुद्धी । मोपळा हा खादीं आवडला ॥
हातीं टाळ घेउनी करीसी आळवणी । घागरिया चरणीं बांधोनिया ॥
साहोनी घरदार आपुला ससार । नाचता विचार न धरिसी ॥
नव्हे तें करिता कोण असे वारिता । परि त्या आपुल्या हिता प्रवर्तावें ॥
मी एक आहे तंव करिन तळमळ । मग तुझा सांभाळ करिल कोण ॥
या विठ्ठलावाचूनी तुज नाहीं रे ससार । हा बोल निर्धार सत्य माझा ॥
कोण्या गुणें तूवा घेतले धरणें । गोणाइ म्हणे करणें फळासी आलें ॥

* * *

२

( पत्नी राजाई म्हणते )

आई जे शिकवी तीतें तुम्ही नाईका । नाहीं भय शका लौकिकाची ॥
लावोनि लगोटी झालेती गोसावी । आमुची ठेवाठेवी कोण करी ॥
ऐसी तुमची स्थिती निलग देखोनी । पडिले चितवनीं काय करू ॥
धडची काटीयें घातले हें कैसे । बळेचि आपणा पिसें लावियेलें ॥
सुखाचा ससार करोनि बारा वाटे । नाव केलें मोटें जगामाजीं ॥
तोडियेला मोह साडियेली माया । भुलविले तुमचिया चित्ता कोणें ॥
कवणे पुण्य ऐसी जोडियेली जोडी । केली बिघडाबिघडी आम्हा तुम्हा ॥
तुमचिये गति लेंकरें नेणती । कोण चालविती घराचार ॥
म्हणोनि माझे चित्त आपुलेनि उद्वेगें । कवणा जीवांचें सांगे सुखदुःख ॥
सर्वस्वें साडोनी धरिला तुम्ही देव । येणें पुसिला ठाव ससारीचा ॥
आमची करुणा न वाटेची कांहीं । विनविते राजाई नामदेवा ॥

* *

## ३

### ( राजाईची तक्रार )

दोन प्रहर रात्र पाहोनि एकांत । राजाइ वृत्तांत सांगे माते ॥
अहो रखुमाबाई विठोबासी सांगा । भ्रतारासी कां गा वेडे केलें ॥
वस्त्रपात्र नाहीं खाया जेवायासी । नाचे अहर्निशी निर्लज्जसा ॥
चवदा मनुष्यें आहेत माझ्या दारीं । हिंडती दारोदारीं अन्नासाठीं ॥
बरा मार्ग तुम्ही उमजोनि सांगा । नामयाची राजा भली नव्हे ॥

* * *

## ४

### ( ज्ञानेश्वर व नामदेव यात्रेस गेले असतानाचा प्रसंग )

तंव निजभुवनीं वैकुंठीं सुरें पंढरीनाथा । नित्य जीवीं आर्त निजभक्ताचें ॥
कृपेचा बोरसु होता देवापोटीं । तेंचि करी गोष्टि रुक्माईसीं ॥
क्षेम माझा नामा यावा एक वेळा । मग मी जीवा वेगळा जाऊं नेदी ॥
आजि माझा डावा कां ल्वतो लोचन । करितसे स्फुरण वामबाहु ॥
उद्वेग उपसर्ग वाटताती जीवा । कोण्या जिवल्गासीं झाले कष्ट ॥
वाजता पै वारा न लागावा राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकासीं ॥
वाटे तहानभूक झाली त्या पीडणी । तरीच माझ्या मनीं ऐशी दशा ॥
तंव ती विश्वमाता विचारी नावेक । अवचिता शोक पडिला कानीं ॥
तृषाक्रांत नामा करितसे धावा । वेगीं जाउनि देवा सांभाळावें ॥
तव तो आर्तबंधू ऐकुनि वचन । मनाचेनि मनें वेग केला ॥
*तव गडगडीत कूप उदकें ओसंडला । कल्पांतीं खवळला सिंधु जैसा ॥*
ज्ञानदेव म्हणे झालें अभिनव । कैसा ऋणी देव केला येणें ॥
सावध करुनिया दिलें आलिंगन । सांडें निर्लोभ उतरिलें ॥

येरें चरणावरी ठेवियेला माथा । म्हणे माझी आहे चिंता विठोबाशी ॥
नामा म्हणे माझे बहु लळे पुरविले । कं देखेन पाउले विटेवरी ॥

## ५

### ( कुलवृत्तात )

गोणाई राजाई दोघी सासू सुना । दामा नामा जाण बापलेक ॥
नारा म्हादा गोंदा विठा चौघे पुत्र । जन्मले पवित्र त्याचे वंशीं ॥
लाडाई गोडाई येसाई साकराई । चौघी सुना पाही नामयाच्या ॥
निंबाई ते लेकी नाउबाई बहिणी । वेडी पिसी जनी दासी त्याची ॥
इतुक्याही जणीं अभग आरंभिले । देवें पूर्ण केले नामा म्हणे ॥

## ६

### स्फुट अभंग–पदें

पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।
पतितपावन न होसी म्हणुनी जातों माघारा ॥
सोडीं देवा ब्रीद आता न होसी अभिमानी ।
पतितपावन नाम तुझें ठेवियलें कोणीं ॥
घेसी तेव्हा देसी ऐसा असती उदार ।
काय रोधूं देवा तुमचें कृपणाचें द्वार
उच्छिष्टाचीं शितें देवा न टाकिसी बाहेरी ।
कोणी दिधली भगवता तुज भूपणाची थोरी ॥
हातीं घेउनि झागड झेंडा फिरेन त्रैलोक्यीं ।
पतितपावन न होसि हरि तू मोठा घातकी ॥
नामा म्हणे या तुमचे न लगे मज काज ।
प्रेम असो या हृदयीं तुमचे आठवीन पाय ॥ १ ॥

पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । केशवा भेटावें जीवलगा ॥
काया वाचा मन चरणीं ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावे लिंबलोण ॥
बाहेरी भीतरीं कैवल्य आघवें । वाचें न बोलावें ब्रह्मानंदु ॥
चिरंजिव नामा कंठी धरी प्राण । करी तुझे ध्यान रात्रंदीन ॥ २ ॥

* * *

देहुडा चरणीं वाजवितो वेणू । गोपिकारमणु स्वामी माझा ॥
देखिला गे माय यमुनेचे तीरीं । हात खांद्यावरी राधिकेच्या ॥
गुंजवर्ग डोळे माथा थावरकोटी । मयूरपिच्छ वेटी शोभतसे ॥
सगुण मेघश्याम लावण्यसुंदर । नामया दातारा केशिराजा ॥ ३ ॥

* * *

## ७

## बाळक्रीडेचे अभंग

प्रातःकाळीं मुलें येताती सकळ । ऊठ रे गोपाळा म्हणताती ॥
आळस देऊनी उठे देवराणा । बळिराम गोधना सोडीतसे ॥
माता देउनि स्तन काकुळती येत । साभाळा भगवंत वनामध्यें ॥
जवळींच खेळा जाऊं नका दूरी । सांभाळा मुरारी प्राण माझा ॥
होताती उत्पात याजवरी मोठे । मोडतील काटे साभाळावें ॥
आसनीं शयनीं भोजनीं जतन करा । नामया दातारा केशिराजा ॥ १ ॥

* * *

उठोनि प्रातःकाळीं गौळणी बोलती । जाईल श्रीपती वना आता ॥
चला जाऊं त्याचें पाहूं गे श्रीमुख । हरेल ही भूक डोळियांची ॥
तातडीनें येती नंदाचिया घरा । पाहती उदारा कृष्णराया ॥
कुरळे हे केश सुहास्य वदन । आकर्ण नयन शोभताती ॥
अरुणोदय प्रभा अधरीं दिसती । हिरे झळकती दंत तुझे ॥

भावया व्यकरा सुन्दर नासीक । पाहोनिया सुख फार होय ॥
ल्लाटीं शोभत केशराचा ल्ळा । वर बिंदु रेखिला कस्तूरीचा ॥
वैजयंति माळा किरीट कुंडलें । नामयानें केलें लिंबलोण ॥ २ ॥

* * *

गायी घेवोनीया जासी जेव्हा राना । आमचिया मना दु ख वाटे ॥
सुकुमार सावळीं जैसी रातोत्पल । त्याहूनि कावळे पाय तुझे ॥
खडे काटे बहु कठिण तृणमुळें । ठेविसी पाउलें तयावरा ॥
पावतोसि क्लेशा अगा वासुदेवा । म्हणोनिया जीवा दु ख वाटे ॥
सागतसी आम्ही नित्य यशोदेसी । धाडू नको यासी वनामध्यें ॥
नामा म्हणे होय सकळाचा उद्धार । म्हणोनि श्रीधर वना जाय ॥ ३ ॥

* * *

अनेक पुष्पाच्या साजताती माळा । गुजाहार गळा शोभताती ॥
रक्त पीताबर आरक्त अधर । चरण सुंदर चालताती ॥
रक्तचन्दनाची घेतलीसे उटी । मयूरपत्र वेठीं शोभताहे ॥
शिंग रगविती देउनिया रग । चाल्त श्रीरग मागे मागें ॥
चित्तीं सर्वकाळ राहे ऐसे ध्यान । नामा म्हणे धन्य तोची एक ॥ ४ ॥

* * *

परब्रह्म निष्काम तो हा गौळिया घरीं । बाळीवाळे अदुकृष्ण नवनीत चोरी ॥
म्हणति गौळणी हरिचीं पाउलें धरा । रागत रागत येतो हरि हा राजमंदिरा ॥
लपत छपत येतो हरि हा राजभुवनी । नन्दासि राकुनि आपण बैसे सिंहासनीं ॥
सापल्ला देव्हारीं यासी बाधा दाव्यानीं । शखचक्र गदापद्म शारगपाणी ॥
बहुत कष्टे बहुत पुण्यें जोडलें देवा । अनत पवाडे तुमचे न कळती मावा ॥
नामा म्हणे केशवा अहो जी तुम्ही दाते व्हा ।
जन्मोजन्मीं द्यावी तुमची चरणसेवा ॥ ५ ॥

## ८

## देवाला आळ

नाम्या म्हणे देवा ज्ञानदेव सख्रीं । पडेल का दृष्टीं पुन्हा आता ॥
ज्ञानाचा वियोग जडला हृद्रोग । भेटीचा प्रयोग करा देवा ॥
ज्ञानदेव माझा दाखवा या वेळीं । जीव तळमळी त्याच्यावीण ॥
संत अंतरला सखा झाला दूर । आता पंढरपूर कैसें करूं ॥
तुमचें दर्शन ज्ञानकृपादान । पंढरीस येणें याजसाठीं ॥ १ ॥

* * *

ज्ञानदेव पहावा डोळा । ऐसे वाटतें विठ्ठला ॥
जगजेठी जगत्पाल । माझी पुरवावी आळ ॥
तुम्हा काय अनघड । लीले झेलला गिरीगड ॥
कल्पतरुतळीं आस । तया घडे का उपवास ॥
माझ्या कृपाळुवा देवा । हात्तिसरसा घेसी धावा ॥ २ ॥

* * *

ज्ञानदेव माझें सौख्यसरोवर । त्यात जलचर स्वस्थ होतों ॥
दुर्दैवतापानें आटलें तें नीर । वर्षी रघुवीर कृपामेघ ॥
ज्ञानदेवावीण व्याकुळ हे प्राण । तू जगज्जीवन देवा होसी ॥
विठाबाई तू गे जाणसी नाजाण । रक्षी मज कोण दुजें येथें ॥ ३ ॥

* * *

नामा हें वदता डोळ्या आलें पाणी । पडिला धरणी देवापुढें ॥
नामदेवस्थिती पाहुनी श्रीपती । विस्मित ते चित्तीं स्तब्ध झाले ॥
कैशा रीतीं नाम्या संबोधू मी आता । कठीण अवस्था देव म्हणे ॥
प्रेम उचंबळे ऐकता ही आळ । बुझावी गोपाळ नाम्यालागीं ॥ ४ ॥

* * *

देव म्हणे नाम्या पाहे । ज्ञानदेव मीच आहे ॥
तो आणि मी नाही दूजा । ज्ञानदेव आत्मा माझा ॥

माझ्या ठायीं ठेवी हेत । सोडं खत गडी द्वैत ॥
नाम्या उमज मानसीं । ऐसें म्हणे छपीकेशी ॥ ५ ॥

* * *

## ९

## समाधीचे अभंग ज्ञानेश्वरसमाधी

कासावीस प्राण मन तळमळी । जैसी का मासोळी जीवनावीण ॥
दाही दिशा ओस वाटती उदास । करितांती सोस मनामाजीं ॥
घातियेली धोण प्राण आला कंठीं । ज्ञानेश्वरासाठीं तळमळी ॥
नामा म्हणे देवा वाटतसे खंती । चालली विभूती योगियाची ॥ १ ॥

* * *

निवृत्तिदेव म्हणे करता समाधान । काहीं केल्या मन राहत नाही ॥
बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाटे मुरडताती ॥
बांधल्या पेंडीचा सुटलासे आळा । तृण गनोमाळा पांगलेसे ॥
हरिणीविण सोपी पाडियेली ओस । दशदिशा पाडस भ्रमताती ॥
मायबापें जेव्हा त्यागियेलें आम्हा । ऐसें संकट तेव्हा झालें नाहीं ॥
नामा म्हणे देवा पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥ २ ॥

* * *

निवृत्ति सोपान मुक्ताई धाकुटी । धरियेलीं कंठीं पांडुरंग ॥
कळवळलीं मनीं करिती दीर्घध्वनी । आठवती मनीं ज्ञानदेव ॥
विकळ झालं चित्त मत हे दुश्चित । नामा विकळ तेथ होत असे ॥
फार आठवतें निवृत्तिचे चित्तीं । सोपान स्फुदती मुक्ताबाई ॥
आम्हा माता पिता नित्य ज्ञानेश्वर । नाहीं आता थार विश्रांतीसी ॥
छळिलें ब्राह्मणीं प्रतिष्ठानीं जाता । रेड्यामुखीं वेदाता बालविलें ॥
आला चांगदेव व्याघ्र वाहन घेऊन । नेला अभिमान ज्ञानदेवें ॥
नाना प्रकारचे आठवीती शब्द । नामा म्हणे बोध भाविकाला ॥ ३ ॥

## १०

### समाधीचे अभंग : मुक्ताबाईसमाधी

निवृत्ति मुक्ताइनें पाहुनि स्थळ डोळां । आलासे उमाळा ओसंडुनी ॥
तात आणि माता गेलीसे येथूनी । तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न । सांभाळी सोपान मजलागीं ॥
तुझ्या कृपें हरी क्रमियेलें काळा । फुटलासे मेळा तापसांचा ॥
नामा म्हणे यांचें कळवळलें मन । करी समाधान पांडुरंग ॥ १ ॥

* * *

ऋषि म्हणती हरी पातलेसें विघ्न । आता कैसे प्राण वांचतील ॥
कोणाचिया शुद्धी नाहीत्रिया कोणा । म्हणती नारायणा मृत्यू आला ॥
कडाडली वीज निरंजनीं जेव्हां । मुक्ताबाई तेव्हां गुप्त झाली ॥
वैकुंठीं लक्ष घंटा वाजती एक घाई । झाली मुक्ताबाई स्वरुपाकार ॥
एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनीं । जेव्हां निरंजनीं गुप्त झाली ॥
गेलें निवारुनी आकाश आभूट । नामा म्हणे कोठें मुक्ताबाई ॥ २ ॥

* * *

## ११

### समाधीचे अभंग : निवृत्तिनाथसमाधी

जें जें सुख आम्ही अनुभविलें मना । त्याचा नारायणा आठव होतो ॥
ऐसें पदोपदीं निवृत्तिराज कष्टी । कोणकोणाच्या गोष्टी आठवाव्या ॥
ज्येष्ठाच्याही आधीं कनिष्ठाचें जाणें । केलें नारायणें उफराटें ॥
उफराटें फार कळलें माझे मनीं । वळचणीचें पाणी आढ्या गेलें ॥
अवघ्यापरिस कष्टी केलें मुक्ताबाईनें । 'कांहींच बोलणें वडलें नाहीं ॥'
नामा म्हणे विठोबा ऐकरीं बोलणें । अवघीयांचीं मनें कळवळलीं ॥१॥

* * *

नारा महादा गोंदा विठा झाले विकळ । झाकियेली शिळा समाधीसी ॥
गंधर्व आणि देव चिंतावले भारी । दीर्घध्वनी करिती नारा विठा ॥
गोंदा आणि महादा सांडिती शरीर । विसोबा खेचर फार कष्टी ॥
लोपलासे भानु पडला अंधार । गेला योगेश्वर निवृत्तिराज ॥
गेल्या त्या विभूती अनादि अवतार । आतां देवा फार आठवते ॥
नामा म्हणे हरी धरवेना धीर । येतो गहींवर ओसंडोनी ॥ २ ॥

* * *

## १२

### राहिल्या त्या कीर्ती जगामाजीं

गेले दिगंबर ईश्वर विभूती । राहिल्या त्या कीर्ती जगामाजीं ॥
वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं । आतां ऐसे कोणी होणें नाही ॥
सागतील ज्ञान म्हणतील खूण । नयेचि साधन निवृत्तीचें ॥
परब्रह्म डोळा दावूं ऐसें म्हणती । कोणा न ये मुक्ति ज्ञानोबाची ॥
करतील अर्थ सांगतील परमार्थ । नये पां एकांत सोपानाचा ॥
नामा म्हणे देवा सागूनिया कांहीं । न ये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥

* * *

## १३

### विठ्ठलाची आरती

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥
पुंडलिकाचे भेटीं परब्रह्म आले गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥१॥
जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावे जिवलगा ॥धृ॥
तुळसी माळा गळा कर ठेउनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ॥
देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनूमंत पुढें उभे राहती ॥२॥ धृ॥

न्य वेणुनाद अनुक्षेत्र पाळा । सुवर्णाचीं कमळें वनमाळा गळां ॥
राई रखुमाबाई राणी या सकळां । ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ॥३॥
ओंवाळूं आरत्या कुर्वंड्या येती । चंद्रभागेमाजी सोडुनियां देती ॥
दिंड्या पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥४॥ धृ॥
आषाढी कार्तिकी भक्तजन येती । चंद्रभागेमाजी स्नानें जे करिती ॥
दर्शन हेळामात्रें तया होय मुक्ती । केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥५॥

## जनाबाई

### १

ये ग ये ग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥
भीमा आणि चंद्रभागा । तुझ्या चरणीच्या गंगा ॥
इतुक्यासहित त्वां बा यावें । माझें रंगणीं नाचावें ॥
माझा रंग तुझिया गुणीं । म्हणे नामयाची जनी ॥ १ ॥

*                    *                    *

सख्या पंढरीच्या राया । घडे दंडवत पाया ॥
ऐसे करी अखंडीत । शुद्ध प्रेम शुद्ध चित्त ॥
वेध माझ्या चित्ता । हाचि लागो पंढरिनाथा ॥
जावें ओंवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ २ ॥

*                    *                    *

माझा हा विठ्ठल येईल वो जेव्हां । जेवीन मी तेव्हां गोणाबाई ॥
त्वरें राउळासी जाउनिया पाहे । लवकरि बाहे भोजनासी ॥
ज्ञानेश्वराघरीं असेल बैसला । जाऊनि विठ्ठला पहा तेथें ॥
भरलिया रागें क्रोध त्याचा साहे । लवकरी बाहे भोजनासी ॥
जनी म्हणे देवा चला पुरुषोत्तमा । खोळंबला नामा भोजनासी ॥३॥

*                    *                    *

गंगा गेली सिंधूपाशीं । त्यानें अव्हेरीलें तिशीं ॥
तरि तें सागावें कवणाला । ऐसें बोलें बा विठ्ठला ॥
जल काय जलचरा । माता अव्हेरी लेंकरा ॥
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरीतां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

* * *

पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥
घार हिंडते आकाशीं । झाप घाली पिल्लापाशीं ॥
माता गुंतली कामासीं । चित्त तिचें बाळापाशीं ॥
वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधुनिया उदरीं ॥
तैसी आम्हांसी विठ्ठलमाये । जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

* * *

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तीचा कळवळा ॥
त्याचा झाला म्हणियारा । राहे घरीं करी थारा ॥
देव बाटविला त्यानें । दासी जनी गाय गाणें ॥ ६ ॥

* * *

वैकुंठीचा हरी । तान्हा यशोदेचे घरीं ॥
रागनसे हा अगणीं । माथा जावळाची वेणी ॥
पायीं पैंजण आणि वाळे । हातीं नवनीताचे गोळे ॥
धन्य यशोदा माय । दासी जनी वंदी पाय ॥ ७ ॥

* * *

२

धुंद झाला तुझा दरबार ॥ धृ ॥
पुण्यवंत पाताळलोकीं नेला । दरिद्री तो भाग्यवंत केला
चोरट्याचा बहुमान वाढवीला । कीर्तीवानाचा अपमान केला ॥ धृ ॥१॥
वैरियासी दिधली मोक्षसिद्धी । कपटीया दिधली महानिधी
सेवकाच्या तुगा न मिळे चिधी । चालकासी त्रैलोक्य भावें वंदी ॥ २॥

पतिव्रता ती वृथा गुतवीली । वेश्या गणिका ती सत्यलोका नेली
कळी स्वकुळासी लावियेली । यादववृंदा ही गोष्ट बरी नाहि केली ॥ ३ ॥
सत्यवानाचा मृत्यु केला छळ । कीर्तिवानाचें मारियेलें बाळ
सगर म्हणवीसी त्याचें नासी बळ । जनी म्हणे मी जाणें तुझे खेळ ॥४॥

## जोगा परमानंद

कृष्णाचें रुपडें डोंगर जाहाले निळे । गोपाळ सावळे दिसताती ॥
आनंदें मयोर करिताती स्किार । देखोनि सुंदर चक्रपाणी ॥
रूपाचेनि रुपें धरितो गोधनी । कैवल्याचा दानीं पाहताती ॥
जोगयाचा स्वामी कृष्णरूप देखोन । श्वापदालोचनीं प्रेम वाहे ॥

## परिसा भागवत

आषाढ शुद्ध एकादशी । नामा विनवी विठोबासी
आज्ञा द्यावी हो मजसी । समाधि विश्रांतिलागी ॥ १ ॥
आयुष्य कळसासी आले । अभंग त्या सिद्धी नेले
ज्ञानेश्वर सगतीं घडलें । तीर्थमीस जगदोद्धार ॥ २ ॥
जन्मा आलियाचे कृत्य । जन लागावे सुपथें
विठ्ठल मंत्र त्रिभुवनातें । जग जागत महिमा हा ॥ ३ ॥
सर्व सिद्धी मनोरथ । तुझ कृपें पावलों सत्य
म्हणे परिसा भागवत । नामा नाम जपनसे ॥ ४ ॥

## म्हाइंभट

### १

### जतीचा दशकु

१ मगळमूर्ति : मगळकीरति : । मगळ तुमचे नाम ॥
मगळदायका : मगळकारका : । मगळरूपा, गोविन्दुदेवा ॥ १ ॥
*जयतु मगळमगळा : । परममगळरुपा : गोविन्दुदेवा ॥ धृ ॥*
सकळ मगळाचे : निधान पातले : । जेहीं सेवीले : तुमचे चरण ॥ २ ॥
मगळ सन्निधी : मगळ सबधु : । नागदेवा स्वामी अनिमीत बधु ॥ ३ ॥
२ सकळ मगळाची होये जया वृष्टि : । तया अवलोकी का मातें कृपादृष्टि ॥१॥
परमानदा श्रीप्रभुगोविन्दा : । विनती अवधारा : जी करुणाकरा ॥ धृ ॥
लया जाती जीव : मळ सकळ : । ते उजरी का मज : ज्ञान निर्मळ ॥२॥
ताप हरु होये : वर्षाव अमृताचा : । तया मजशी बोला : का परा वाचा ॥३॥
भवभयहरण : भवसुखा कारण : । तें देयावें जी : मज सन्निधान ॥ ४ ॥
नागदेवाचा दातारु : श्रीसर्वेश्वरु : । सकळ जना अभयकरु : देत असे ॥५॥
३ परम मगळ जयाः पर पावन जया । पर कारण जया : गोविन्दुराया ॥१॥
परमानद जया : परम पुरुष जया : । परम सतोष जया गोविन्दुराया ॥२॥
परम शुद्ध जया : दुरितनिवारणा · । ससारतारणा जयजय स्वामी ॥ ३ ॥
श्रीगोविन्दजया : श्रीगोविन्दजया : । श्रीगोविन्दजया जयतु मगळ मगळा ॥४॥
[ हा धुवा प्रतिष्ठानीं हेडाउमठीं प्रज्ञासागरीं प्रथमदर्शनीं सर्वज्ञासि बोळगविला, तो म्हाइंभटी एथ माडिला. ]
४ जयजयकारीं : मगळ उच्चारी । या वोवाळीती नारी : श्रीकृष्णदेवो ॥१॥
चदन चपक : कुकुम दधी अक्षता : कुकुमे मेळौनि मगळ धामा लोक करीती ॥ धृ ॥
नागदेवास्वामी : श्रीसर्वेश्वरू : । करुणाकरा : श्रीमनोहरा ॥ २ ॥
५ परियेळीं आरतीया : उजळीलीया : । श्रीगोपिनाथु गोपी ओवाळु आलीया ॥ १ ॥

शंख भेरी निशाण वाजती : । गोपाळ गाती : आनि आनि परी ॥ धृ ॥
गोकुर्ळी अवतरला : करुणाकरू : । नागदेवो म्हणे : हाचि सर्वेश्वरू ॥२॥
६ ऐसा उच्छाओ : नंदाचा राउळीं : । पुष्पवृष्टी वरी : केली अमरीं ॥१॥
नारद तुंबर वीनवीती : सुस्वरीं गाती : । श्रीकृष्णरावो देखा ॥ धृ ॥
तेथ परमानंदाचा : होतसे वर्षाओ : । श्रीकृष्णरायाचें : पाहाता श्रीमुख ॥२॥
नागदेवाचा स्वामी : कैवल्याचा दानी : । अवस्वरू पाहाती : देवो विमानीं ॥ २ ॥
७ अमरगण गगनीं : पाळाति आनंदे : । कालीयादमन केलें गोविन्दें ॥१॥
भुजंग जिणौनि : आले मुरारी : । श्रीदावळी पुढा : पढती नागारी ॥ धृ ॥
महदाइसाचा स्वामी : श्रीसर्वेश्वरु : । तो पाहे वो सुंदरीः श्रीपरमेश्वरु ॥२॥
८ परशुरामें जो : केला आचारी : । तो कैवल्यदानी : क्रीडे मातापुरी ॥ १॥
सये वोवाळु जावो : सह्याद्रिराॐ : । श्रीदत्तात्रेय देवादिदेवो ॥ धृ ॥
अलर्काचे ताप छेदीले तिन्ही : । तो कोथळ्या स्वामी : श्रीचक्रपाणी सये ॥२॥
[ **एथ कोथळोबासांचे नांव म्हाइंभटीं घातलें तयाचिये पोटींचें वोखटे फेडावया** ]
९ अपरा परु सकळा : विश्वाचा दातारु : । तेणें केला अवतारु : ऋद्धिपुरीं सये ॥१॥
नीच दिवाळी : नीच उच्छाओ : । जेथ गोविन्दुरावो क्रीडा करी सये ॥धृ॥
गोविन्दुराजु : कोथळ्यास्वामी : । तो देखिला आम्हीं : आत्मारामु सये ॥२॥
१० जयाची अवस्था : ता पं भेटला. । देवें मनोरथु : पुरवीला आता ॥ १॥
आता न मडु माये : यादवाचे चरण : । मंगला कारण आता ॥धृ॥
नागदेवाचा दानारु : श्रीसर्वेश्वरु : । शरणागतातें नुपेक्षी : करुणाकरा ॥२॥
११ जयतु मंगळ मंगळा : म्हणौनि केली वोवाळणी ॥
परमानंदा श्रीचक्रपाणी : जीवाचया जीवना ॥ १ ॥
सकळ सिद्धान्ता अगोचरा : श्रुति न येती निर्धारा ॥
परमानंद करुणाकराः मंगळार्ति दातारा ॥ धृ ॥
उज्वळ आरतीः सुरवर विमानीं पाळाती ॥
सदैव भक्त वोवाळतिः मंगळमूर्ति गोविन्दु ॥ २ ॥

[हे जती एळापुरी मल्हारवसयीसि महापूजा अवसरीं उपासनी अळगविली ]
आरते करुणाकराः नागदेवाचा दातारु ॥
सर्वे भावी परमेश्वरः ते नागानिका वोवाळी ॥ ३ ॥

## २

### प्रार्थना

मगळ निधानु : कृष्ण देवकीया बाळु ॥
सये न लावावा वेळु ' दोघी जणी जावो वोवाळु ॥ १ ॥
गोपी जनीसहित करिताये विनोदु ॥
देखोनि राय गोविन्दुः पावे परमानदु ॥ धृ ॥
आरत करुणाकरु आम्हा देइल अवसरु ॥
नागदेवाचा दातारुः सर्वेश्वरु मनोहरु ॥ २ ॥
[ हे प्रार्थनेची जनी आणि जतींचा दशकु म्हाइभट श्रीप्रभुचा पूजा अवस्वरीं म्हणत होते, तो मुखीं येत होता तो कवीश्वरबासी पुस्तकीं लिहिला तै पासौनि मार्गी प्रवर्तला. ]

## नरेंद्र

## १

### श्रीगणेश निर्वचन

उमे शकराचा कुमरू : कीं सार्घा गणाचा ईश्वरू ' तो सेंदुरें साडबरूः गोरा मेरू जैसा ॥ १ ॥ तयाचा ठाइं सिध्दींचे सर्गे नानाविध वसताति भोग तेणें आधारें देव अनेग ' सुरवाडले ॥ २ ॥ दान-मुदाकिनीएचेनि वोलें निद्रांचें नदनवन पाल्हेलें . दाताचेनि तेजें सूर्ये झाटलें . विघ्न

तम ॥ ३ ॥ तेया गणराजाचें उदार रूपडें : थोरपणें देव जिंतिले होडें : कवीसि शब्दब्रह्मीची राणीव कोडें : जेणें पाळिली ॥ ४ ॥ गणेशें मनोरथ मुद्रा दीधली : कविता पदीए सेश भरिली : तव पुढा सारदा देखिली : सारस्वत–फळेंसीं ॥ ५ ॥

## २

## श्री शारदा निर्वचन

ते देवी कवि-कुळ दीपकू : कीं साहित्यसृष्टीचा चाळकु : कीं सारस्वत-गंगेचा नियत्रकु : कुमारि-वेशें ॥ ६ ॥ जियेचिया आगाचिए वोपे : मोतियाचें लेणें हारपे : वाटेगरियाची गवसणी धापे : पुजेचेनि मिषें ॥ ७ ॥ ते विद्या धरी कवणां वारांणे : जियेचिया रूपाचें चादिणें : कवीसि दाखवी वोपणें : प्रमेयाचें ॥ ८ ॥ तें आदि–कुमारि विनोदें : महाकवीं नवरसाचें घिउदें : पेहें देउनि परिये टे : अनुहात शब्दीं ॥ ९ ॥ ते देवता तरि शब्दब्रह्मींची : पुन नित्रावती राधा मुरारिची : तिया सलगी देवाचिया भाटिवेची : दीधली सामग्री ॥ १० ॥ तिया सतोसें आइला : अमृताभिशेखू नेला : हातीं परियलु दिधला : रस–फळाचा ॥ ११ ॥ ते आपुलिया कणवा महाकवी : नवरसाचे-मेघ वोळवी : सावायाचे दिवटे खोलवी : कविता–पुढा ॥ १२ ॥ कवि चाळती तेणें उजियेडें : वरि गुरु-कृपेचे आजन जोडे : तैंचि ठेवे दिसती चोखडे : श्रीकृष्ण–कथेचे ॥ १३ ॥

## ३

## कथारंभ

आता परियसा कथामुख : कैसी कवितेची रेख : तुम्हा दीजैल आनद-सुख : सादानुकेसी ॥ १४ ॥ श्रीचक्रधराचा वाणिता कीर्तिचद्र : चढवीन मुखाचा

समुद्र : जळसेन करीन म्हणे नरींद्र : सभेचे लोक ॥ १५ ॥ आदि कवीचें बोल्णें : वेदांतरी रचिलीं स्मृति-पुराणें : परि सरि न पवेति पवित्रपणें : श्रीकृष्णकथेसीं ॥ १६ ॥ आणिकें काव्यें नाटकें कथा : आख्यान प्रबंध चित्र-गाथा : परि सरि न पवेति सर्वथा : देवाचिया पवाडेयासीं ॥ १७ ॥ श्रीकृष्णू परब्रह्म निरवधी : येर अवतार ते प्रतिनिधी : अंशकळा अवतरती हे प्रसिद्धी : देव बोलती ॥ १८ ॥ या कारणें देवकी-नंदनेंसीं : आणिक देव न पवेति सरिसी : म्हणौनि श्रीप्रभूची चरित्रें गोडसी : सकळ शास्त्र पाता ॥ १९ ॥ याचि कारणें शुकादिकीं आपण : ज्ञानाचें करूनि मेळवण : शब्द ब्रह्म दुहिलें अदुहन : काढिलें लीळामृत ॥ २० ॥ तया रस-कवींचे शब्द : चंद्र कळेसी बोलेती ब्रीद : ते आइकता निगे दाद : क्षीर-सागरासी ॥ २१ ॥ कुंकुमाची वेलि ल्याली : तिया मुक्ताफळांचिया तुरंबी : तैसिया अक्षेरांचिया लाती : कविता-लते ॥ २२ ॥ प्रबंधिचा झळके परिमळु : तेथ रचना होय मळयानिळु : सराउ दे पटाचा ढाळु : कामिनीं-कटाक्षासी ॥ २३ ॥ साहित्य-सेवतियाचा घागोली : जे ग्रंथ-देवते वाति लावोंली : विणेयापासौनि तयाची बोली : वोता रगु दिसे ॥ २४ ॥ उन्मेख-चंद्राचा तुपारी : कथा-कापुर केळीचा उदरीं : प्रमयाचा पोतास करणे परी निफजे जागालागीं ॥ २५ ॥ कविता-कामिनीयेचा धरूनि हातू : भावो दोहीं आंगी मल्पतु : चाले साहित्य सावरेया आतु रसु स्वेद सुळिये ॥ २६ ॥ ऐसे आदि-कवींचे बोल : अमृता पासौनि बहुये रसाळ : वादवीति आनंद दोंदिल ब्रह्म-सुखातें ॥ २७ ॥

अजन: सदैरा पर ज्ञानाचे ॥ ३० ॥ शास्त्र अभिमानाचा हाथियेरीं : रिगों न ल्हाति परब्रह्म–नगरी : तियें गाह्लिां आगरीं: आनाति मार्गा ॥ ३१ ॥ नाव निरेन्या वक्तेयासी: नुमानेचि देवाचिया गुणाची रासी : ते काई मवने मनुस्यासीं येकें मुखें ॥ ३२ ॥

## ५

## कवित्वाची रंगवृत्ति

काई पूर्ण चद्र मडळ: पाहुनि सोळाके मुक्ताफळ: की अमृताचें हातजौळ रुपी चरणोदकाची ॥ ३३ ॥ तैसें वेदशास्त्रीं: मज प्राकृता केउती सरिसी. पुन मुच नाहीं आगिरे कथेसी. मुरारी–वाचौनिया ॥ ३४ ॥ श्रीकृष्णाचा गुणीं जीतिनल्ग : माझा जिउ श्रीचक्रधरा विनटला. तो आतुल आनदु घोसडला: कवितेचेनि मिसे ॥ ३५ ॥ जें विरहिणींचा मनीं वसें · तें नोल्ता होए आनारिंग: जें वाचिता ये रस डोळमें : भाव–लिखित ॥ ३७ ॥ तैसें देवाचा गुणीं विसवता: मि वियाळ मोरें उसगता ॥ मावो वोळगाया श्रोता. प्रेम-गर्भ ॥ ३५ ॥

## ६

## श्रोत्याकडून कवित्वाचे चीज

जाग अनधारितु स्थानिचे जे भारतीय शब्द ब्रह्मीचे · ते नाणें पारखीतु या नोलाचे : जें देशीं सरतें ॥३८॥ जैसें मेघाचिये जवळिके ; जरि नापैये नव्हेति जोन्हिके: तरि भू गोळकाची पन्हे उदकें कवण भरिते ॥३९॥ तैसें कळाविदा चेनि रितु–राजें मुरग शब्द कोकिळ कुजे तया सुखाचिये सेजे : विसवतिये रम राजहंसे ॥४०॥ जाणिवेचेनि चद्रमडळें : रस–समुद्रा भरिते चढे आगळें : येदवी उपेवे वडवानळें. नेणिवेचेनी ॥ ४१ ॥ जरि रसु वोडवे शब्द वेधी : तरि नेणिवेचिया लोहात वेधी : तेवीचि अमरा होति देहसिद्धी : कवितेसी ॥४२॥

## ७

## श्रीकृष्णचरित्र, मराठी भाषा व भागवत याची प्रशसा

आता सुमन देतु अवधान : धुमजुसे साहित्याचेन ' जग मोजें नाचवीन ' आनदाचा ॥ ४३ ॥ आधींचि जगा चदन आवडे : वरि देवाचें अनुलेपन जोडे : तरि कवणा वालभ न पडे : तया सुराचें ? ॥ ४४ ॥ तैसे आइकत श्रीकृष्ण–चरित्र ' होय सकळ सुखाचें छेत्र वरि जोडे ब्रह्म-सुख पवित्र : ते मऱ्हाटी बोलैन ॥ ४५ ॥ जिये भाषेचिये रसवृत्ती सा भाषाचे कुपे कीजेति निगुती : ते मऱ्हाटी कवण जाणे निरूती ' जे रसाचे जीवन ॥ ४६ ॥ ते मऱ्हाटे[१] बोल रसिक वरि दावीन देशियेचें बिक : म्हणैन सव्याख्यान श्लोक मिसे बोवियेचेनि ॥ ४७ ॥ चौदा विद्याचीं रसायनें : असेरा धर्माचीं जीवनें काढुनि ब्रह्मसुखाचें बोनें : सुके केलें भागवत ॥ ४८ ॥ तो पुराणातुल आनद समुद्र। तेथ दशमस्कदु त्योचि चद्र : तें चादणें सावैन म्हणे नरिंद्र। रुक्मीणि सेंवर ॥ ४९ ॥

—रुक्मिणीस्वयवर ( इ. स. १२९२ च्या सुमारास ), ओव्या १–४'

## ८

## अस्ताचळावरील सूर्यवर्णन

तव उचित-चद्रिका म्हणे सूर्या अस्ताचळी होत उपेणें : जैसें तेजाचें साटवतें वोपणे ' मर्दी पवळेयाचा ' ॥ १ ॥ की कुकुम वनी सरागु : झेंपावत शृंघार विहिगु : कीं त्रिनेत्रें तातला अनगु . रिगत पश्चम समुद्रीं ॥ २ ॥ कीं ठेविला प्रकाशाचा मुडा ' पानाळीं पेणें होत गरुडा की श्रीकृष्णु आर्विला पश्चिमिली कडा ' कमळरातिचेनि ॥ ३ ॥ की सध्या-सरोवरीं सारसिचा गिवसु ' करू आला सोनेयाचा सारसु : तैसा सूर्य होताय प्रवेशु अस्ताचेळीं ॥४॥

१. माझा मऱ्हाटाचि बोलु — ज्ञानेश्वरा, अ ६।१४

## ९

## सायंकालीन अंधःकार

तेथ फुटले इंद्रनिळाचे घोरे : तैसा माथा उधविला आधारें : कीं डोंगर उन्मळीले गरुडोद्गारें : पाचिचे हे : ॥ ५ ॥ कीं दाटत कस्तुरीयेचे मेघ माजिरे : कीं पिल्लीं पसरिलीं गगन सागौरें : कीं ब्रह्म-गोळकु भरला पुरें : कृष्ण गंगेचेनि ॥ ६ ॥ कीं नानळैली तमाळाची वाडी : कीं महा मोहाची धुपाडी : कीं चग्त धावा पृथियेचा पाडीं : ठौळ काति-लोहाचें ॥ ७ ॥ ना तरि कमळौनि असासिते : कदर्पाचेनि दळग्यें वसतें : भवराचे घालणें घातलें अनचिते : विरहिणींवरी ॥ ८ ॥ कीं भू गोळकाचा देउळीं : रती अनंगें पूजिली गगन काळी : ते पुजा दिसतसे निळी : निळोत्पळाची ॥ ९ ॥

## १०

## सायंकालीन कार्ये

सकोचलीं कमळं : पश्चिये टाकिती अविसाळे : चक्रवाकें होति व्याकुळें : वीयोगें प्रीयाचेनि ॥ १० ॥ नानाविधा फुलाचा आमोदीं : सैग उधाति राज विदी : तेथ दाटत शृंगारियाची मादी : पेटे फुल सातेचा ॥ ११ ॥ द्विजीं सारिलीं सध्या-वंदनें : शोडषोपचारीं देवता पुजनें : अग्निहोत्रें केलीं उपासने : मौनें विसर्जलीं ॥ १२ ॥ नगरीचा प्रासादीं : मगळ तुराचा शब्दीं : पेरुने-कागचा मार्दी : आकास अपतरले ॥ १३ ॥ शृंगारू करौनि गणिका : उगाणा घेत कामुका : स्वैरिणीतें नेति दूतिका : सांगेयासी ॥ १४ ॥ कैसी मेहुलनी माजिरी : उजियेडातें आधळेया करीं : दिवे नेइजति घरोघरीं : हातीं धरुनिया ॥ १५ ॥

## ११

### दिव्याचें वर्णन

नगरीं उजळैले कुळैवे : ठाइ ठाइ आरड लाटैवे · जैसि निधानें नरोनि सदैवें : यादव प्रतापाचीं ॥ १६ ॥ कीं सहस्रकरें निगता : आधार सिथिल माताइता : तीयें सलें ठेनिलीं मज पाता : सर्त साक्तिचीं ॥१७॥ कीं आधारें अंतुर नायर्के : सूर्याचिया धुरा धरिलिया तवकें कीं काळवखेयाचा समुद्रीं मागिकें प्रथम-जातें ॥ १८ ॥ साजवेळ जिगौनि मेहेलनी : आणि सध्या रागानी वोपगी कीं विजूचे गर्भ गळिनले धरणी : धाडि गडदेचिया ॥ १९ ॥

## १२

### नक्षत्राची शोभा

तव गगनीं नक्षत्रें उमटत . जैसी आकाशीं घाटौलि पुल्त · ना तरि मेघ वीणि साधित : मोतियाची ॥ २० ॥ कीं पारा धुनि करीती चकोरें : ते सैग मदाकिनीचे येत्र गोरे : कीं दिसति बागलिंग ऐतारे : गगन-नर्मदेचीं ॥२१॥ तव भारती म्हणे महुरैला चद्र · तो प्रसगें साधेल कवि नरेंद्र : जो वाणिता रसाचा समुद्र : चढैल अठवा ॥ २२ ॥

## १३

### चद्रोदय

अवघे पुढिलीये बीजे : चादणें निसयलें सहजें : मग पचमीचें देखिजे : फुलैरा धुनीत ॥ २३ ॥ तैसीचि चीक भरी होये अष्टमी : निमुरवत देखिजे दशमी : ते रसि नवें फेडिजे विहगमीं : चकोर कुळींचा ॥ २४ ॥ ऐसा उदया चळिचा उपरवाळा : उपहुडु जाला चद्र मडळा : जैसी रासी जाली गगनाचा

राळा : चकोरा पीकाची ॥ २५ ॥ कीं चाडणेयाचा समुद्र : तेथ निगत लक्ष्मी मुख-चद्र : कीं कृष्णालागि धाडितये इद्र : पाउडु अमृताचा ॥ २६ ॥ कीं गगन मडपीं चद्रिका नेत्री : नक्षेत्राचीं फुलें लागलीं कीं अमृताचेनि भिजें रिल्दलीं : आसारें चद्राचेनि ॥२७॥ कीं आकाशाचिये वोपे-आतु : कैलासु असे प्रतिबिंबतु : कीं मन्मथ-नाथाचा गुदरू स्वेतु : कापडिल खीरोदक ॥ २८ ॥ कीं गगनाचिये गरुडीं : घातली कर्पुर चुरी चोखडी : सरावो ध्यावया चहुबुडीं : अनगें आचार्यें ॥२९॥ कीं देवाचिये कीर्ति दुर्सीं : मिळौनि ब्रह्म इसेसी : साकुवें गाळिलें आकासीं रूपे चद्राचेनि ॥३०॥ कीं क्षीराब्धिचें दूध उमप : सिंपा वेया चौ गानिचें रोप : गगनाचा राहाटीं माप : सुधाक्षराचें ॥३१॥ कीं चेडनि सिद्ध रसाची उटी . यकाकी निगावया धूर्जेठी : कास घालौनि गगनाचा हटीं : कुसुमायुधु हा ॥ ३२ ॥ कीं आकासीं अमृताची अवधि : की अनग सजिवनी दिव्य-औषधी : कीं उगमींची देवता प्रसिद्धी . चादिणेयाची ॥ ३३ ॥ कीं चद्र नव्हे तें स्वेत दीप : माझारि सावळें तें श्रीकृष्णाचें रूप वरि टाकौनि पाहो आलें स्वरूप . श्रीचक्रधराचें ॥३४॥ कीं भूगोळकाचा प्रासादीं जैसा : गाळिया अमृताचा आरसा . तेथ श्रीकृष्णाचा बिंबला ठसा : कळकु नव्हे तो . ॥३५॥ कीं गोपि नाथु जोडावेया नोवरा ' स्वर्गिचिया मिनलिया तारा ' गगन गगे मोतियाचा वालु-सरा . पुजिला निळोत्पळीं ॥ ३५ ॥

## १४

## चद्राच्या कळाचे कार्य

कीं चद्राचिया उघडिया भूजा : कुमोद-कळेयाचेया सेजा ' बाधेति भवरा चिया पुजा : अमोद-देवते ॥ ३७ ॥ कळाविदु नाहीं चद्रासारिखा जो बाणें निन विंधी दो लग्गा . चद्रकातीं उदक वरिखा : जेणें दाविला ॥३८॥ नेणा ते कैसी चादिणेयाची माधवी : । जडा समुद्रातेंही माजवी . भरितेयाचेनि मिसें वोल्हावी ' । पृथ्वियेसी ॥३९॥ कुन्दिदाळें चद्र–कराचें . । उघडीति मद शुक्ति काचें : ठेवणें ठेविति मोतियाचें : । मेघा मिळौनि ॥ ४० ॥ चद्र आपुला

सोळा कळीं केळीचेया गाभेवनाचा नळीं । येशाचें री पेरी भूतळीं ' मिसें कापुराचेनि ॥ ४१ ॥ चद्र बिंबाचा पाणि पात्री ' । चद्रिकेचि वारुणि पवित्र वक्त्री पान करूनि रात्रीं : दुलती चकोर ॥ ४२ ॥ जणें चद्र आगावरि ससारा करूनि दीधला कळाचा चारा तया उमाकांत अभारा । धरिला सिरसा ॥ ४३ ॥

— रुक्मिणी-स्वयंवर, ओव्या ४६७–५०९

## महदंबा ( महदाइसा )

### १

कृष्ण व रुक्मिणी याच्या लग्नाचा शृगारसाज

रात्रि प्रकाळली वेला पाहारु पाहाटा
पचमशब्दीं राउळीं उच्छावो श्रीजगन्नाथा
नारद तुंबरु हरिप निर्भर प्रेमें गोविंद गाती :
यसोदा देवकादेवी तिया न्हाणियासीं आदत करीती ॥ १ ॥
माली-मर्दना दीधली राया मुरारी
पेखणें कराती विद्याधरा नारी
देव गधर्व तेथे रुपी पहाती वेधिलें आनदें
यादव पडुसुत सकळै सभा पातले गोवींदं ॥ २ ॥
मादनें जालें देवकीचया बाळा
माल्गठीं नेसला सोनेसळा :
सर्वांगीं भोरि केली मृगनाभीचा आडा लल्लाटीं
बासिंगें हीरेयाची जाति जती मीरवती वीरगाठी ॥ ३ ॥
कठीं घातली अमोलिक एकावळी
रत्नाचें झळझुके कार्नीं लेइले वनमाळी

करीं सरी सात्तळीया आंगुळिया मुद्रिका चरणीं तोडरू :
यर्गावा कैवल्याचा पुतळा कैसा सर्वेश्वरू : ॥ ४ ॥
वोवाळीती देवो मंगळचारीं :
सेस भरीती सांवळिया सुंदरी :
वीप्र देती आसीर्वाद वीजया होइ म्हणती देवकीचया कान्हा :
योगीय–भक्तिजन तळउपर जागवीती पुरुषोत्तमा : ॥ ५ ॥
उद्धवदेवेसी कीजे हा मंत्रु :
नीकट वर्तत असे शीशुपाळु शत्रु :
सन्नाधावध होआ कटकामीतरी म्हणती पालाणा पालाणा :
भक्त–आंगवळेसर्वे रथीं चढिनले गोविन्दुराणा : ॥ ६ ॥
रुक्मिणीसि न्हाणे करीती तीया बाळा :
सेलद्रीया आणिले अनेक अलंकार :
काकणें कळावीया अंदु पायवटे पदकें लेववीती :
रत्नाचें हार कृष्णा–राणीं सालंकृत्य करीती : ॥ ७ ॥
रुकमिणी शृंघारु देता जालि पाहार :
तंव भीमकें घडिएची केली प्रतेष्ठा :
लोणव्रण केळवण मूळ नाहाणेयासी आइति करिती :
तंव बाळा वेग्र जाली तिया स्मरीले द्वारकापती : ॥ ८ ॥

—धवळे पूर्वार्ध

## २

### कृष्ण–रुक्मिणी लग्नसमारंभ

रामु म्हणे सोडा यातें पाठवा माघारा :
नेसौ दीधलें देवें भीमकाचेया कुमरा :
क्षणें मनीं लाज धरीसी तुजसी सालेपणें केला चाकरु :
दीधला कंठीचा हार प्रीये बचनें बोलले सर्वेश्वरू : ॥ १ ॥

तंव येक भीमकासी सांघति मातु :
रुखमिणी हरिली श्रीकृष्णरावो असे जातु :
पुरला मनोरथ तया मनीं बहुत आनंदु :
धन्य ते बाळी माझी जिया वरु लाधला गोविन्दु : ॥ २ ॥
सकळ आइतीसी पाठीं चाले भीमकु :
माहादेवीं भेटले यादवटीळकु ·
दरीशन घेउनीया सीरीं धरीले चरण :
अपराधा क्षेमा कीजो यादवराया श्रीकृष्णा आलो तुम्हा सरण : ॥ ३ ॥
भीमक वीनवी अवधारा हृषिकेशा :
माझीया राउळीं अभीशेषा .
सेम पडीमा यादवासहितु बोला श्रैमा द्वारकेराया :
उधरीं सोमवसा रुखमीणी प्रसादे अर्चीन पाया : ॥ ४ ॥
वीनवीले देवो रुक्मिणी सवें नेली राउळा ·
मग पाठवीलें कृष्णरायासी मूळा .
मंडपाची रचना हरीखें करी विश्वकर्मा विंदानीं :
वैकुंठाहूनी अरवी दीसे जेथ परणु येति सारंगपाणी : ॥ ५ ॥
सवीं सुवासनीं बाळा करीती परीयेळ :
तुरया गजरीं जानी कृष्णरायासी मूळ :
गजीं घोडा राणें मनीं मंगळचारीं पातले वाद्यंत्राचें घोष :
वऱ्हाडां पाये पखाउनि तेया उचडुनीं पुरपें तांबोळ वीशेष : ॥६ ॥
कृष्णाचिया माता सुवासिनी प्रेमळीती :
रावीले पाए येकि मळिवट रेखीनी :
मुक्तामाणिकाचें दाडें वासिंग कनककचोळी :
जवादि कस्तूरी पानें पोफळें धरियेली पाटोली नियां वरमाया उचलगि केली ॥७
न्हाणें करीनी कृष्णा परमपुरुषा :
वेदध्वनी नृत्य वाद्याचे घोष :
कर्पूरगंध पोखिनी नारी स्वरिंगें होतसे अमृताचा वर्षावो :
एकि आल्गिनें चीनीति येकी चौरीस होउनी पाहानी श्रीमुखभावो : ॥८

वेधिला जन कृष्णें कैवल्यनार्थें :
परमानदु पावले दृष्टीपार्ते :
व्यापारु करु वीसरतानी तव गर्ग म्हणे कीजे वेगु :
मग कळसु पाळिला वोवाळिला नोवरा श्रीरगु : ॥९॥
पीतावर देवो नेसले सोनेसळा :
कटीं कौस्तुभ घातला कस्तूरीचा मळिवट रेखील :
मकरकुंडले देवें कानीं धरीया :
गर्भांगें पद्मराग पार्थातबें माथा भरीया : ॥ १० ॥
पन्हरयाची सरलें देवो लेइले हातीं :
आगोळिया मुद्रिका हारें उधाती :
कैवल्याचा पुतळा घोळनु तोडरु चरणीं मीरवताये वार्की
बोलति सकळ जन परब्रह्म अवतरले मृत्यलोकीं : ॥११॥

— धवळे उत्तरार्ध

## ३

### कृष्णवर्णन

कासे पीतावरु कठीं रुदमाळा । कानु शोभे सावळा रुक्मिणीचा ॥
राधाभरि कावडी पडिभरें चालतु । खेळतु यनांतु दत्तु सए ॥
गावो द्वारावती गोमतीए प्रातीं । गोदरीए क्रीडती चक्रपाणी ॥
गावो दे अविद्रे धाली निजपदीं । केले कृपानिधी रिधपुरीं ॥
चापेगौरवाती चापयाच्या दती । चापौली साजती चक्रपाणी ॥

## ४

### युद्धानतर

क्षेत्रीं उठावले हरीली रुक्मीणी । घसरे सैन्य दोन्ही मीडीनली ॥

क्षिती कापे सुर पाहती अंबरीं । जिंतीएले वैरी रामकृष्णीं ॥
आइकोनि रुक्मीया क्रोधें धावीनला । मग धरुनी बांधला ध्वजास्तभीं ॥
आलासि रुक्मिणी सोडऊ सर्वथा । भादरला माथा रुक्मीयाचा ॥
इखितु सर्वज्ञ हासौनि रुक्मीया । तव रामु म्हणे मेहुणेया मानु केला ॥

## ५

## समारोप

जालें हें संपूर्ण रुक्मिणीस्वयंवर । मातृकी नागर वोवीबधी ॥
नागदेवाचा स्वामी कृपेचा सागरु । सेवा सर्वेश्वरु सर्वभावीं ॥
वाचीता आइक्ता देवाचें चरित्र । होती प्रेमपात्र शुद्धबुद्धी ॥
वाखाणीले गीत माहादाइ किंकरीं । देवा कृपा करी भक्तिभावें ॥

— मातृकी रुक्मिणीस्वयंवर

## ६

## चक्रधरवर्णन

गोमतीए तीरी निळेया गुढरा । राजेया गुजरा कृष्णराया ॥
नीळा गुढरु राजा गुजरु । मार्गीरीं मढपीं श्रीचक्रधरु ॥
गोमटें माजीरें आरव कुडीचें । राजेया डींडीचे चक्रधरा ॥
गोरे अंग चाहींया ढवरीया चदनें । श्रीचक्रधरा झगें दीठी होए ॥
बापु म्हणे कीं माइया मासेया साजणी । गोतती साजणी चाहीं यावो ॥

# भास्करभट्ट

## १

### पढतां श्रीकृष्ण पवाडे

साहित्याचेनि परिमळें । शृंगारेंचेनि मेळें । प्रबंध होती मातावळें । कवीजनांचे ॥ १ ॥ एऱ्हें नाहीं नवलु । वाणितां परब्रह्म केवलु । कैसे दीसती बोलु रसाळु । तें आइकावें श्रोता ॥ २ ॥ मोतियांचें घांपे । रांविलें कुंकुमरसें । तर्ऱ्हीं न एति करीं सरिसें । प्रबंधेंसीं ॥ ३ ॥ पातां प्रमेयांची गोडी । अमृता उपजे अनावडी । साकरेची कीजे कुरोंडी । कवितालतेसीं ॥ ४ ॥ बोलु जेंवि सुधारसें घोळिलें । कीं चांदिनां चुंभळिलें ॥ नां ते परिमळें वोविले । चांपेयाचेनि ॥ ५ ॥ पढतां श्रीकृष्ण पवाडे । ठिकसां बोलां घोपु पडें॥ रसरंगाचें पाहाळ उघडे । श्रोतेयांसी ॥ ६ ॥ वाणितां कान्हु चौहातु मल्लु । अडअ होतुसे नवलु ॥ बोलु रसें दोंदिलु । नाचतु दिसे ॥ ७ ॥ कृष्णकथेचें आलें कीजे खोलु । बुद्धी भावरसाची जीती अलु ॥ तर्ऱ्हें प्रबंधलतेची वेलु । वाढती दिसे ॥ ८ ॥ वाणिता वनमाळी । शब्दसुखाची होए नव्हाळी ॥ कविता भली पाखाळी । सुरंगु दिसें ॥ ९ ॥ साहित्याचिए सेजें । बोलांचा रंगु उपलविजे ॥ तेवींचि काव्य कीजे । मणे कवी भास्करू ॥ १० ॥ तार्किकांचिया वज्रसांखळा । कीर्ति खांबीं नाळीची अवलिळा ॥ माताइ तें वादी दिग्गजु सकळा । भूमंडळीचें ॥ ११ ॥ साहित्याचिया खेडकुळिया । सुदेशा बोलांचियां चिपुळिया ॥ सिपनें खेळतीं सांवळियां । रसवृत्ती ॥ १२ ॥ फुन वाचां रसाळां । गर्बू सांडवीण कोकिळां ॥ कलहंसा अवकळां । करीन मी ॥ १३ ॥ नावाडी घेऊनी चंदनां वर्सी । अंगीं माखजले पाहे मासी ॥ तेवि गुण सांडोनि दोषु गिवसी । क्षुद्र जनू हें ॥ १४ ॥ पाचीचा गुण ढाळाचें मोतीं । नातरी पन्हरेयां वाणवती । तेवी सुजनु घेतीं बोलुं माझें ॥ १५ ॥ भणौनि शिशुपालवधी कथा । जे भक्तीरसांची गाथा । कीं सोनवें कैवल्यपथा । पाजळली तें ॥ १६ ॥ ना ते मुक्तीवनितेची दूतिका । कीं ज्ञानांजनाची शलाका । कीं कैवल्यमंदिरांची पताका । झळकतुसे ॥ १७ ॥

दिशें तारावन। दक्षिणे विलासवन। जेवी का राऊळगण। वसताचें॥ १५॥ पश्चिम दिशे कमलावन। उत्तर दिशे जैतवन। जेथ उभिलें अगें पाळेगण। कोकिळाचें॥ १६॥ जेथ सतरा शतें उद्यानु। तीनि सहस्र उपवनु। एरा वनाचि गणनु। कवण जाणे॥१७॥ जिअ आपुलिया वरवा। नंदनवनातें मागती वरिवा। जेथिंचें हासती भारव। उमावनातें॥ १८॥ इंद्रनीळाची सोली। गगणासी घातिली सगळी। तैसी श्यामिका अतराळीं। देखिली तेणें॥१९॥ कीं मदनिएचा मेला। वनश्रिया वेढिला। ना तो वसतं वर्त्त वाधिला। नीलोत्पलाचा॥ २०॥ गाभेवनाचें करौनि माप। मविजे परिमळाचे मोप। तेया सानें केतकीचें कुप। चहूंकडें॥ २१॥ पवळेयाचेआ मणिगविया। वरि डोल्नी रत्नाचिआ वगडपाठिया। कल्पतरुचिआ मानाठिया। हेलावती चहूंकडें॥ २२॥ जेथ पाणी टाळी वरुतु। दारें धरी मळयमारुतु। अव्हे लावी रतिकातु। पार्यातकाचें॥ २३॥ वनकराचिआ आडौरीं। रत्नाचे हातगुडे वेर्‍हीं। सोंकरितातिे तुरविआवरी। पूसेयात॥ २४॥ हाती घेऊनि आवारीं। एकी गानी स्वराची पडीमर्टी। तेनें रंग पहुडला उठी। अनगराजा॥ २५॥ चंदन तरूचिआ साउलिया। पगगाचिआ सुपेतिया। तेथ डोळा लाग रती शीतलिया। राजकुमरीं॥ २७॥ कामकटकाचा गज नजाटू। तैसा कोकिलाचा कल्कलाटू। तो आइकिलेआ होय हृदयस्फोटु। विरहियासी॥ २७॥ तो प्रदेशु कैसा वाणावा। जेथ सदा साही ऋतुचा मेळावा। पुन्ह वसंताचा उठावा। तो आनुचि दिसे॥ २८॥

—शिशुपालवध, ओव्या २३२–२५९.

## २

## युद्धवर्णन

ते व्हेळीं यदुपाळें। पाइवार्त वारिलें। पुण ते असहानु जगत्ले। धरि तीचि ना॥१॥ अवचिता विसरा। पोडेया न धर्लीतीची पारगा। तव पुढिल अमुआरा। भिर्णे सरल॥२॥ हो रे हो जालें। तव पारकें ससारलें। सेग वाती

ना तरा शांतरस सींपता । सासीनली ज्ञानल्ता । कीं विवेकाची सौभाग्यदेवता मूर्ति जाली ॥ १८ ॥ कीं प्रब्रह्मवसतीची कोकिळा । जीवु चकोरसजीवनी चंद्रकला । कीं निम्होळ संसारवाटची विश्रामुशाळा । आर्तजनालगीं ॥ १९ ॥

—शिशुपालवध, आव्या १५-३३

दिशें तारावन। दक्षिणे विलासवन। जेवीं का राऊळवाग। वसताचि ॥ १५ ॥ पश्चिम दिशा कमलावन। उत्तर दिशा जैतवन। जेथ उभिलें असे पालेगण। कांक्षिळाचि ॥ १६ ॥ जेथ सतरा शतं उद्यानु। तीनि सहस्रें उपवनु। एरा वनाचि गणनु। कवण जाणे ॥१७॥ जिंअ आपुलिया नखा। नन्दनवनात मागती परिखा। जेथिचें हासती आरव। उमावनातें ॥ १८ ॥ इंद्रनीळाची खोली। गगणासीं घातिली सगळी। तैसी श्यामिका अतगळीं। देखिली तेणें ॥१९॥ कीं मन्मथिएचा सेला। वनश्रिया वेढिला। ना तो वसंत वर्ते वाविला। नीळो त्पलाचा ॥ २० ॥ गाभेवनाच करौनि माप। मविजे परिमळाचे मोप। तेया सोनें केतकीचें कुप। चहूंकडे ॥ २१ ॥ पवळेयाचेंआ मणिसविया। वरि डोल्ती रत्नाचिआ वगडपाळिया। कल्पतरुचिआ मानाठिया। हेलावती चहूंकडें ॥ २२ ॥ जेथ पाणी ढाळी वरुनू। दारें धरा मळएमारुनू। अप्टे लावी गतिकानू। पार्यातकाचे ॥ २३ ॥ वनक्रमाचिआ आडौरीं। रत्नाचे हातगुडे नेहीं। सोकरिताति तुरबिआवरी। पूसेयात ॥ २४ ॥ हाती घऊनि आघार्गी। एकीं गाती स्वराची पडीमटीं। तेनें रग पहुल्ला उठी। अनंगराजा ॥ २५ ॥ चन्दन तरूचिआ साउलिया। पगगाचिआ सुपैतिया। तेथ डाळा लाग स्ती शीतलिया। राजकुमरी ॥ २७ ॥ कामकन्काचा गज मजाट्ट। तैसा कोकिलाचा कल्कलाट्ट। तो आइकिलेआ होय हृद्यस्फाटु। विरहियासी ॥ २७ ॥ तो प्रदेशु कैसा वाणावा। जेथ सम साहीं ऋतुचा मेळावा। फुन वसताचा उठावा। तो आनुचि दिस ॥ २८ ॥

—शिशुपालवध, ओव्या २३२–२५९.

## २

## युद्धवर्णन

ते व्हली यदुपाळें। पाण्वातें वारिलें। पण ते असहानु जगन्ले। धरि नीचि ना ॥१॥ अवचिता विसरा। धान्या न घलीतीची पानरा। तव पुढिला असुआरा। भिडा सरल ॥२॥ हो रे हो न्मलें। तव पारवें ससार्गले। सग धावी

निले । सिंहुनादु देता ।। ३ ।। रणतुराचेनि बम्राळें । भीडींनिली दोंनि दळें तेथ बहुत माणुस रणा आलें । एरु एराचें ।।४।। पाडवी बाणीं जिंतिलें । त एरू मोडिलें । भीमसेनें पाचारिलें । फुन परततींचि ना ।।५।। तेआ मा भीमसेना । जुजता नहुती आगवणा । परतिजे ऐसी हाव कन्हणा । उपजेरि ना ।।६।। तेआ झुजाची कळाकळी । ते देशाचि वेगळीं । महाकाळेंशीं क्वळी टेऊ॰ पातातीं ।।७।। आमोलेयाचेआ दळमीडा । पुरता हातियेरू कैंचा तेव्हडा भगऊनि पर्वताचा हातगुडा । जुझतु असे ।। ८ ।। रथे रथू दाटी । गजें गज उपटी । घोडिआ रउता दे मिटी । एकें वेळें ।।९।। अर्जुनाचेनि काडाळें । बहु माणुग्न रणा आलें । मग महारथिअे परतैलें । जैतवना जवळिके ।।१०।। तिहींश घेऊनि आद ठु । न लगता बहूत वेळु । पिटैनी सूदला शिशुपाळु । पाळेय आते ।।११।। मग पाडवीं ऊ॰हट्ठु केला । दळभारु मागौता परतैला । एरीक काई करिता जाला । नेंगु तो ।।१२।। धाडौनिया शिशुपाळें । शैल्यातें आफाविलें मग वृत्ताटु सागीतिलें । तै तेआपुढें ।।१३।। तव शैल्यें भणतिलें । काईं पाडउ काढिले । पाचै एकें वेळें । नाघोनि आणैन ।। १४।। आता काई बोरे वायाची । ते व्हेळीं मीं तेथ नसेची । एन्हवीं नि पाडवी सृष्टीची । करीनि फेडिता ।।१५।। तव वदीनिलें शिशुपाळें । आधी मीं हीं ऐसेंचि बोलें । पुण जुझ तिअे वेळें । ते विसरौनि गेला ।।१६।। एरू भणें काई तू जालासीं । मा देखत खेऊ॰ पळतीं कैसी । आता यादवा लावैन विवशी । तरी शैल्यु होअें ।।१७।

— शिशुपालवध, ओव्या ८७३-८८९

**श्रीचक्रधराचें नमन** चैतन्याचिये आळा । कैवल्यद्रुमु कोंभैला । तो चापेगौरु अभिनंदिला । श्रीचक्रधरु ॥ ३ ॥

**आचार्यांचे नमन व स्तवन** पडिलेया ससाराची अडणी । जो पुरवी ब्रह्मविद्येची तवनी । तो आचार्यां शिरोमणी । नमीन नागार्जुनु ॥ ४ ॥ जो विवेकाचा सारथी । वैराग्याचा जालरथी । आधाओ कैवल्यपथीं । जीव जातासी ॥ ५ ॥

**निमित्याचा उपयोग आन ग्रंथकर्त्याची स्वकृत्ति** तया नागार्जुनाचा उपदेशु । म्हणौनि जोलवेया शांतिरसु । भास्करु कवी जाला सौरसु । वोवि प्रबधीं ॥ ६ ॥ चैतन्याचिये खोल वाटे । पाता वेदाचि धाव कुठे । तें श्रीकृष्ण रूप नेटेंवोटें । कवण वर्णुं जाणें ॥ ७ ॥ पुन तें घननीळ सावळें । परब्रह्म नेपाळें । वाणिता वेंचिजति फळें । मुक्तिलतेचीं ॥ ८ ॥ वर्णिता यादव नरद । तिर्यंचा सीद्धे सारश्वतमतु । म्हणौनि उचका फणिंद्र । रची शब्दसाग रातें ॥ ९ ॥ आता श्रीकृष्णाचिया किर्तिचंद्रिका । विकासली उन्मेषकळिका । जरा जानाची मनोनासिका । सुपरिमळ करीन ॥ १० ॥ पुराणिचें दळवाडे । रसाळकारे सानडें । म्हणौनि भानो न निवडे । कळानिदासि ॥ ११ ॥

**रसिक ग्रंथ जालेया ऐक म्हणून विनति करावी न लगे** तया प्रमेयाची वोडवन । वरि दीनें साहित्याचें वोल्हावन । तरि कविता वशिकरण । करणासि नव्हे ? ॥ १२ ॥ वर्णिता यदुपति । बोलीं सहज वेधवती । म्हणौनि श्रोतेया विनती । सुआरी न लगे ॥ १३ ॥ काइ भवरासि कमळीं । काहीं मानिले असे हातातळीं । कि कोकिला रसाळीं । नेसा दीधलें ? ॥ १४ ॥ ना तरि मेघमडळें । काइ चातक लाचाविलें । किं चंद्रें मुळ पाठविलें । चकोरासि ? ॥ १५ ॥ म्हणौनि प्रबधु होइल रसिकु । तरि आइकेल श्रोतियाचा देशकु । तऱ्हीं ते आइकतु बोल एतु । विज्ञापनाचा ॥ १६ ॥

**श्रोता अजाणिता सिला तरी वोल्तेयासि स्फूर्ति होये** भेगति द्रावक गोटे । तरि लोहासि झरा फुटे । सामकाता गळति थबटें । चद्रकरा तव ॥१७॥ ना तरि देखौनि रविमंडळ । विकासे कमळाचें बाबळ । कोंभैजे केतकी-जौळ । मेंघी करूनि ॥ १८ ॥ तेसा सुरमें जोडे श्रोता । तरि रसभावीं फुटे कविता । तोंनरु ये सारस्वता । नव रसाचे ॥ १९ ॥ सामर्थ्याची अणी । रोउनि

वोविजे मुक्तामणि। तरि चक्रवर्तिचा कंठभूषणीं। योग्य होये ॥ २० ॥ तैसा जानाचिया सभा। शोधिजे शब्दरत्नाचा गाभा। तै मीरवे अल्कारशोभा। कविता वधुसि ॥ २१ ॥

कथामहत्त्व तिये कवितेची गोडी। कोकिळाची तराय मोडी। गीत साळ करी वुडी। किन्नराची ॥ २२ ॥, आपुळा कळरवीं। कविता कळहंसातें पदवीं। ते रागमाधुर्य सीरवीं। मधुकरातें ॥ २३ ॥ आगिचिया सौरभ्यकळा। उणें आणि परिमळा। गांभीर्ये करी अवकळा। गगनगर्भा ॥ २४ ॥ रतीचीये भूलतेसीं। ल्यें चातुर्ये कासी। पडप टे सध्या वधुसि। अंगरागाचें ॥ २५ ॥ पदप्रमयाच गुंफणें। स्यामा सुजबधातं जिणे। कोंवळीक घाली सीरणें। शिरीषपुष्पासी ॥ २६ ॥ निच निच नारागणा। दीजैल सध्यारागाच रावण। तऱ्हीं आखराच सुरगपण। अधिक दीसे ॥ २७ ॥ पदाचा मेळावा। रत्नाकरा करी चढावा। प्रमय करी हेवा। अमृतलहरीसीं ॥ २८ ॥ आतु चद्रकरा। झळाळु दीसे सुधाकरा। तैसे पदाचेया पदग। भीतरि भाव चोळा दीसति ॥२९॥ पिळिलेया चद्रबिंब। सुगति अमृतधाराचें कदब। तैसे पुगति तुब। नवरसाचे ॥३०॥ ऐसिये कवितालते। ब्रह्मविन्नेचीं फुलं दिसति फाकतें। तरि पसरतेनि हातें। कवण न तोडी ? ॥ ३१ ॥ पविन गंगोदका। सरिसि परतिजे कस्तुरिका। तरि परिमळाचेया कवतिका। का न लवावि ॥ ३२ ॥ कापुरकेळींचा फरीं। दिसति तुळसिचेया मजरी। तरि तोडुनि कवरमारीं। कवण न अर्चे ? ॥३३॥ ब्रह्मविद्येचेनि कसे। कामतत्त्वा भाजनीं दीसे। तरि कवणाचें मन आपैसे। अभिलापु न करी ? ॥ ३४ ॥ तैसे साहित्याचा राहाणी। शातिरसा अवतरण आणी। तरि माझी पवित्र वाणी। कवण नाईकें ? ॥ ३५ ॥

— उद्धवगीता, ओव्या १–३५.

## ५

## मूर्तिवर्णन स्तोत्र

### पचकारंभ

सर्वांगीं चंदनाची परिकर अरवी मोरि केली ललाटी।
टीळा कस्तूरिकेचा झळकत अरवे झळबुके मौक्तिकाचे ॥
कठीं मंदारमाळा मुकुलित दळ वो मन्मथा केतकीची।
तेणें माया नृवेषेंविन मम सगये जन्म गेले वृथे वो ॥ १ ॥
खेळे लीलाविलासी स्फुटितै कुचतटी वापिर्के सिंपणे जो।
म्हाले लीलाविलासी स्मितमधुरसुधा घोळले बोल बोले ॥
वारी लीलारविंदे वदन परिमळा लुब्धल्या भृंगमाळा।
लीलाकैवल्यदाता झडकरि सजनी मेळवी प्राणनाथु ॥ २ ॥

### गोपिकाक्रीडावर्णन

वेणी सोवी सुदीव स्फुटित परिमळें वीरली गयचापीं।
झेली प्रोत्फुल्लफुल्लस्तबकु कार्तिकें ब्रह्म जो गोपिवेषें ॥
वेधें वेधीं जगातें सुरवरवनिता वालमें भूललीया।
तो मी नेत्रीं न देखे धिगधिग सखिये ! हे जळो जन्म माझे ॥३॥

### विरहवर्णन

भूमी शय्ये कनककमळीं पूरिता नोज्नय्या।
आगीं तापू मलयजरजें दूरि कर्पूर साडी ॥
दृष्टीपूढा नदवि निपुण पत्रवेली क्चोळ।
नानापुष्पें रमणु न पवे तिळक यादवाचा ॥ ४ ॥

### पंचकसमाप्ति

हा वो बाळे कथन करि का भूतळीं गोमटा जो।
रूपें सत्वें भवभयहरू धर्मकामार्थदाता ॥
कंसाराती कमलनयन् मुष्टिचाणूरहर्ता।
तो हा देखे विपुलनयनीं द्वारके कृष्णराजा ॥ ५ ॥

## सप्तक

तीर्थांमीं जन्मभूमीं प्रकटित परमानंदमार्गी गतीतें ।
देयी जीवां विसावा उभयकुलतटीं गौतमी पूत केली ॥
जेहीं रातोत्पलातें स्वक्रियशुभगुणें जिंतिलें वर्णगंधें ।
श्रीरंगांकीतरंगीं सुचरणकमलें चुंबिते योग भृंगी ॥ १ ॥
तें कैं देखे न डोळां ? परतरसुफलां सृष्टि हे जीवितेंशीं ।
कैंच्या जंघा ? सुरेखा उपजघनतटीं जन्मभूमी अनंगा ॥
सेलामध्ये प्रदेशीं मिरवत सजनी मालगंठी परेशा ।
वेढीला योगिराजें करवित सहजें पारणें लोचनासीं ॥ २ ॥
नाभीस्थानी सखोली विकसित भ्रमरी सुंदरा रोमराजी ।
चांपेगौरीं सुवक्षीं अळिउळरमणा मालकंठीचि तैसा ॥
आडा ललाटपट्टीं मृगमदविलसत्पत्रवल्लीं सुरेखीं ।
पूजा बंधी सुगंधी सकरुण विरजा लोचनीं पातु मातें ॥ ३ ॥
कैसे दोर्दंड सख्ये ! भवभयजलधीं मग्न जीवस्समूहा ।
तारू आर्तासि आलें कुसुमगुणविरःश्रीसुवास स्वभावें ॥
शोभा जी श्रीकराग्रीं सुमनशरकरीं चारुपूर्णप्रमोदें ।
लीलाऔदार्यरूपें स्तबकु मिरविला आर्तपूर्ण प्रदानें ॥ ४ ॥
सुस्मीत श्रीमुखीं जें भवतमहरणीं चांदिणें पूर्णचंद्रीं ।
तें वो ! तापा प्रहारीं सुविमल सजनी ! सेविजे जें चकोरीं ॥
तेथें श्रीमंत वाचाऽमृतमधुरपरा वेधबोधप्रपूर्णा ।
ज्या मातें नीववीलें भ्रमण निरसिलें नूरिजे त्या सुजाणा ॥ ५ ॥
तांबूल श्रीमुखीं जें अधरशुभतरीं गतले रंगरंगीं ।
कैसे सुनीलनेत्रे ! सपलवित जना पूर्णकामप्रसगीं ॥
पुष्पाचें झळंवुके विकसित सदनीं लग्नकर्णीं विशेषीं ।
मुक्तामालसर्यभंगीं मिरवत सजनी । सौरभ्येतें प्रसूते ॥ ६ ॥
चांपेगौरू सुहावा प्रतिमतनु परावेष सुरेख सख्ये ।
सौंदर्यानंदमूर्तीं प्रकटित सुकृतीं देखिला चक्रपाणी ॥

दृष्टावस्थातिगाटी तवविण सजनी ! नाहि जीणे जिवाशीं ।
मीळे तें काइ चोखें ? पुरविल सोहळे स्वामिनागार्जुनाचा ॥ ७ ॥

## दामोदर पंडित

### १

### वृन्दावनवर्णन

वधिला आघासुरु । देवीं केला जयेजयेकारु । मग सपुजितु श्रीकृष्णु सपरिवारु । आले वृदावनासि ॥१॥ देवें वन प्रिति पाईलें । म्हणौनि श्रीमत पावन जालें । जेथचें झाडपण धन्यें म्हणितलें । श्रीउद्धवादिकीं ॥२॥ जैसें वृदा वन पावन । तैसे वर्णु नेणिजे तें महिमान । जें निरतर क्रिडास्थान । सर्वेश्वराचें ॥ ३ ॥ सफळें तरुची जिवित । आपण देउंग्वानि जेयातें । जेहिं निवविलीं आर्त्तभूतें । शरीरसपति ॥ ४ ॥ तरुचि देखौनि नमृता । मुनीजन विस्मो पावत । म्हणत फलपुष्पीं पूजा करित । चरणकमलासि ॥ ५ ॥ दरिशणें सदाफल जालें । स्पर्सें सात्त्विक भाव प्रकटलें । इंद्रनिलकाति वेधले । तैसे सुनिल दिसताति ॥ ६ ॥ आनदें फलपुष्परस श्रवत । पृथ्वी साद्रव होउनि गल्त । तो पुडरा होतसे अमृता । पातालिचेया ॥ ७ ॥ पापीए न देखती वृदावन । जेथ अरस डित असति सुरगण । तेथ मोकारा केलासे जना । दिव्या फल्पुष्पासि ॥ ८ ॥ वृदा वनिचि मुनिलता । गगनिं असे प्रतिबिंबत । सुमनसे उमग्त । ते जैसे तारागण ॥ ९ ॥ कीं दिस असता तारा न दिसे । तें उणे फेडावेया दोसें । वन श्रीया वेढिलें जैसे । अबर नभश्रिरीं ॥ १० ॥ वना बाहिराळी आर्गी विसाल । साल साल तमाल । आगें जतन करीं ते प्रबल । तैसे रारागाइत ॥ ११ ॥ तेया भितरिली ओल्ठी । गगनचुबिता नारिएली । उततिया खजुरी पोफळि । आग्लेति ॥ १२ ॥ तियाहि आतुलि आर्गी । सारस-निगुणि नारगी । मधु फाकडिया मातुलगि । फणस गभैरी ॥ १३ ॥ वरिखत रसाचे वडप । तैसे निनिहतर द्राक्षमडप । उघडलें मागिकाचे मोप । तैसें पक्व दाडिंब ॥ १४ ॥

क्वण गणी चुत-चपक । जेथ असंख्यात पार्यातक । पल्लवित दिसति असोक । लक्ष सख्या ॥१५॥ चदनाचा आरा थोरु । माजि निविडतरु कल्पतरु । जेया तळीं नदाचा कुमरु । खेळे गोपाळिंसीं ॥ १६ ॥ तेया जवळि सरोवरें । चद्र मडळाकारें । दारुविलीं श्रीचक्रधरें । सवघडेयासि ॥१७॥ सुधाजळे भरितें । जळ क्रीडा खेळति जळदेवतं । जेथ जाली निंद्रें भूत । उन्कपानें ॥१८॥ गज सिंह सार्धुल । एकत्र व्याघ्र मृग चितल । श्रीकृष्णें निवनिले पशु सक्ल । आनदु सवती ताति ॥ १९ ॥ कनककमळ विकाशति । भ्रमराचिआ झाका वरि पडति । तेथ राजहस चारे वाचिती । अमृत-कदाचे ॥ २० ॥ स्फटिका शिलातलावरी । गौरी पुजिताति विद्याधरी । वरु मागताति मुरारी । आम्हा पति होआवा ॥२१॥

—वछाहरण, ओव्या १२४–१४४

## २

## यमुनावर्णन

देखौनि मेघसावळि श्रीमूर्ती । आनदें मयूर नृत्ये करीती । शुक सारिका सवादति । वेदात सिद्धाति ॥१॥ वर्धे एऊनि वृन्दावना । आडिं गाताति देवा गना । तेथ खेणु एकु श्रीकृष्णाचें मन । स्थिरावलें ॥ २ ॥ जेथ सदा रितुसीं रितुपति । येक्ष येक्षिणी क्रीडा करीति । वनदेवता नाचति । आनद भरिता ॥३॥ असो हे शब्दरचना । वर्णु नेणिजे तें वृदावना । देऊंचि पावेया येमुना । निगते जाले ॥ ४ ॥ कालिदी—जल निमल । श्रीकृष्ण-काती श्यामल । प्रतिबिंबलि म्हणौनि सुनील । होउनि गली ॥ ५ भगतिभावें उव्ळगता । केवि वणावि सायुज्येता । जेयाचेया सनिधि सरुपता । जडा जालि ॥ ६ ॥ देखौनि श्रीचक्र पाणि । कैसी सभ्रमीत जालि तरगीणि । किं आनदली अत ष्कणिं । रोमाच दाटले ॥ ७ ॥ कीं आलगावेश श्रीकृष्णुराजा । तिया बहुति केलिया भुजा । तैसे तरग पडियासले मज । कामाद्रियेचे ॥ ८ ॥ मग आनद-सागरीं मीनलि । तैसी निश्चल जालि । कि देहभान विसराल । श्रीकृष्णवर्धे ॥ ९ ॥ किं जन्मलिं देवाचा चरणिं । ते उतवल्पण असे मनिं । म्हणौनि मेटों आली मदाकिनी । कालिंदि

न्हवें ॥१०॥ कि श्रीकृष्णाचिया सगति । आमचि फिटैल अधोगति । म्हणौनि भेटों आलि भोगावति । पातालौनि ॥ ११ ॥ आधिचि पठिजे पुराणी । वरि स्परिखु जाला देवाचा चरणि । तेथौनि तीर्थां सिरोमणि । ऐसें बिरीद जालें ॥१२॥ सोम कातिं बांधले घाट । जेथ झिगेला वाळुवट । मुक्ति गर्भ सुक्ति-सपुट । दिसताती ॥१३॥ श्रीकृष्णकातिचि फाकनसे किल । तैसे ठाइ ठाइ इद्रनिल । रत्नकुटाचिके वालु मौआल । उदकाजवलि ॥ १४ ॥ किं तें रत्नाकराचें अर्धांग । म्हणौनि आगाथिलें ठिकल्ग । तैसे एकें वेळें सप्ताग । लेणें लेइली ॥ १५॥ किं कैवल्ये-नाथा श्रीचक्रपाणी । नवरत्नाचि ओवाळणि । करिं कमलाचि उचलणी । तैसी दिसतसे ॥ १६ ॥ उभयतुरीं द्विजवृंद्रं । निज-कर्म-रतें निशब्दें । दृष्ट युतें ठेवित पदें । जैसे मुनीराज ॥ १७ ॥ एकाग्रगुष्ट तपिए बक । नासाग्निं दृष्टि घालिताति दांत । ऐश दिक्षीत तैसे चक्रवाक । प्रियातें साहिती ना ॥ १८ ॥

— वछाहरण, ओव्या १६४–१८१

## ३

### धुवा

आणिक बोलना । ले न लागो श्रवणा । रूप तरी नयना । आवडो तुझें ॥
तू परदैव । इतुलें जाणें । बहुतें विर्घें । जाकळीति ॥
जिवें मी कही । न विसंबे तुज । हेंचि यावें मज । गोविंदराजा ॥
निरतर करी । मी तुमचें स्मरण । ऐसेचि यो का माझेया मना । गोविंदराजा ॥
आणिकीं बुझाविता । डिंभ न बुझावें । मायेलागी रोवें । ते काइ अपराधी ? ॥
माझी से न सडी । आर्तोदार्नीं । नागदेवा स्वामी । श्रीचक्रपाणि ॥

## ४

### आरती

मूर्ति उदारा श्रीमत राजया । नरसुरपन्नगाच्या नारी योळगे आलीया ॥

हेमपात्रीं दीपरत्नाचे करकमळीं । आरतिया ऐसा मंगळ अवसरु आम्ही
देयंजी स्वामीया ॥
अवस्वर परमानंदें निजजन सकळही निर्भर । प्रवर्डी ब्रह्मादिकांत·
गाळवुगचा (?) गजर ॥
आळउनि मंगळ मंजुळ गाति किन्नर । वरुषति पुष्पवृष्टी जाला आनंद थोर ॥
जयजय परमानंदा तुवां धरिला अवतारु । स्थापिलें परपदिं द्दारीला
पृथ्वीचा भारु ॥
तुझेंनि दास्येंविण हा पुनरपि न चुके दुस्तरु । मुकुटाचेनि भूपणें
आम्हां नाही अधिकारु ॥
अवसरु जाला परमानंदे आनंदपूर्ण । अद्यापि स्वामीयेरु पातले निजभुवना ॥
आरोगुन तृप्त कामं सुगंध वाडा समचन । परवाचा परशास्त्र
नागदेवा निरुपण ॥
जयजय आनंमित बंधु अपारकरुणासागर । शरणागततारका
शक्तां स्वानंदकरा ॥
अगाध उपमा हे जननीजनका सोहंवरा । प्रसन्न होशी स्वामियां
मुनि दामोदर दातारा ॥
—(६–१०)

## हयग्रीवाचार्य

[इ. स. १२६५–१३२४]

### कृष्णनमन

श्रीचक्रपाणिचरणाबुजसेवकाश्री । नागार्जुनकृत मिया शिरसा प्रणामू ॥
वाचा म्हणेन शुभ नाम तुझे पवाडे । षड्वर्गदुर्गनवनाथपतीन नाथा ॥ १ ॥
यदुकुलतिलकाश्री अत्रिकूलप्रदीपा । द्विजकुळव्रतरूपा नास्ति विद्याप्रकोपा ॥
यतिमुनिकृतवेषा त्वां नमो सर्वदोषा । विदलितभवदुःखा चक्रपाणी सुरेषा ॥ २ ॥

### बालकृष्ण

प्रातःकाळीं यशोदा दधिमथन करी तेथ गोविंद मागें।
क्षुत्क्षामस्तन्यपानें सुतृपित नव्हता ऊतले दूध देखे॥
धावे बैसोनि रंगीं सकल पयमिठी दीधली तेथ आगी।
येरे कोपौनि रागी दधिमथनशिळा फोडिली शीघ्र वेगीं॥ ३॥
नादें विद्धा मुरारी प्रियविरहभरें पीडिता गोपनारी।
केली भातार चोरी स्वशिशु परिवरीं बैसुनी चाललीया।
चंद्रारश्मी प्रकाशे वनपथसुरसे कृष्णगीतें निराशे।
जाली चित्ते परेशें गृहपति निरसे अंतरें पातु कृष्णा॥ ४॥

### कंसचाणूरमर्दनानंतर

येला दैत्यासि मारू वृजपति कुमरू शीघ्र यादौहि आला।
फोडीली नंदिशाळा सुजनक जननी श्रीपती क्षेम देती॥
जाला आनंद पूर्णा सुरमणि मथुरा उग्रसेनासि दील्ही।
प्रेमें श्रीउद्धवासी सुतृपित नयनीं नेलि पें राज्यसख्या॥ ५॥
छेदीले वन नष्ट दैत्य फरशे स्वागी सुतीक्ष्णु स्वयें।
पाळीले वनचंदनस्तरु यदू पूरीत दृष्टामृतें॥
स्थापीले सुर सर्वदा निजपदा श्रीकृष्णराजे प्रभू।
ज्ञानी भक्त भवाब्धि तारित नहू त्या चक्रपाणी नमो॥ ६॥

### ब्राह्मण रुक्मिणीचा निरोप नेतो

सुकुशल नृपकन्ये तोषला कृष्णरावो। अवसर तय पूसे विप्र सांगे मुदेवो॥
करधृतविटकाजी* दृग्धता हस्तदाये। न वचत न सरेता बोलिले पैं श्रीरंगें॥७॥

### रुक्मिणीहरणानंतर

येरीकडे नोवरदेव देखा। डावासि रूसे त्यजि कंकणातें॥
चाशींग तोडी वरदेसि खूडी। देवोनि फेडी हळदी त्वचेची॥ ८॥

* मग कापुरविडा देवीं आदरिला। तव हातीं जाळु निगाला
तेणें हृदयचा देवो बोवाळिला। मगळमूर्ति म्हणौनिया॥ (न रु. ६८८)

द्वारकेंत

सुशुभित यदुपुरीं गोपुरीं दिव्य शोभा । कनककमळसंभा पाचुबद्धा सुभूमी ॥
प्रखर शुभपताका गुढिया चित्र वस्त्रें । सकळ गृह पवित्रें शेषही वर्णु नेणे ॥९॥
हरिहर निकराची रूपडें चेतनें पैं । त्रिभुवन लवलाही येति पाहों प्रभूतें ॥
रुकमिणि हरि दोघे मंदिरातु प्रवेशे । ऋषिमुनि सरिसे ते शांतिपाठी स्तवीती॥१०॥

जरासंधवधानंतर

हाहाकारू हिताता, नृपसुत त्वरिता येउनी आड घाली ।
रथापोनी कृष्णराजें झडकरित विजे आरतापासि केलें ॥
राये बांदीहि मुक्ती निज करुनि शतें आठ साहस्रवीया ।
सर्वेशाशें निघाले हरि करुनि भलें धर्मभेटीसि आले ॥ ११ ॥
रतनखचित झारी घे करीं द्रौपदीने । चरणकमळ धर्मा क्षालिता हेमपात्रीं ॥
दमघुषसुत आला देत गाळी मुरारी । झडकरि शिर शौरी तोडिले चैद्यराजा ॥१२॥

चक्रधरस्तुती

चाले भले निजकळा गति डोळसाते । आकर्शित् वदन ते मिरवे प्रभूचे ॥
वक्षःस्थळी कुमुदगंध सुगंधमाळा । भाळी टिळा द्विजकिळा किळ फाकताहे ॥१३॥
चक्रेशा त्राहि मार्ते शुभ सुकृतपथे लागले राखसी तूं ।
ते नाहीं नीजनाथा सुरसकळपथा नातळे सर्वथा जी ॥
काम् क्रोधाधकारी रजतमकुहरीं सप्तपाताळवन्ही ।
गेलां पैं शून्यभारी म्हणउनि स्वकरीं काढि सर्वज्ञ नाथा ॥ १४ ॥
लीळा उच्चारि जीवा निजपति अथवा आइके कर्णपूटी ।
नाना गोष्टीसि मीठी करुनि करपुटी दास्य चक्रेश्वराचें ॥
ग्रामातें लंघिता तूं न चलत बहु तू आठवीं चक्रपाणी ।
निर्वाणी क्षेमदाता मिळविल त्वरिता स्वामि नागार्जुनाचा ॥ १५ ॥

— गद्यराजस्तोत्र, श्लोक १, २, ७, २०, ३२, ३३, ९१, १७५, १७९, १८२, २०७, २१०, २७०, २७७, २७९

# पंडित विश्वनाथ वाळापूरकर

## १

### परा वाचा महत्त्व

तर पर-वाक सारद। जया होय वरद। तया पर जाणीव विशद। हृदयाशीं ये॥ १॥ ते मेघ गंभीर वाचा। वर्षाव करी ज्ञानाचा। तें पूर ये जाणिवेचा। उन्मेष-गंगे ॥२॥ जैसे सोमकांत चंद्रकरीं। जव भेदती ना अंकरीं। तव द्रवौनि श्रवती नाहिरी। जीवनार्ते ॥ ३॥ ना तरी मूढ नेणतें। प्राज्ञ होती सारस्वतें। मग तेंचि सकळ सृष्टीतें। चाळिते होती॥ ४॥ तैसे परवाक परिसे। जव बुद्धि धातु न परिसे। तवचि जीर्णी असे। अज्ञानत्व॥ ५॥ मग पालटौनि आज्ञ। तोचि होय विचारज्ञ। करी जीवाते सर्वज्ञ। परा वाचा॥ ६॥ म्हणुनि ते प्रबोधाचें जिव्हार। विवेकाचें भांडार। हो काज तत्त्वसार। सकळ जीवाचें॥ ७॥ तें परशास्त्रींचें वीज। सकळ सिद्धांताचें गुज। आत्मविद्या निज। प्रकाशु॥८॥ तें सारासार निचारी। प्रवीण वस्तु निर्धारी। जिया परब्रह्माक्षरीं। रिघावा होय॥ ९॥ ते अध्यात्मकुळदीपका। प्रसन्न होय आइका। तर प्रमय स्फूर्ती तर्का। उजियेड करी॥ १०॥ तिये वाचेंविण देखा। सहस्रवदना नये लेखा। तो अनत मज मूर्खा। केवी लक्षा ये॥ ११॥

## २

### कथा महत्त्व निरूपण

पर जो भक्तीचा कुवासा। भावग्राहिक या आशा। बाधतसे धिंवसा। स्तुतीलागी॥ १२॥ जैसे धर्मश्रवणेंविण। न होय दोषनिरसन। ना तरी न फिटे मूर्खपण। शास्त्रहीनाचें॥ १३॥ तैसे न करिता गुणकथन। वाचेशीं नाहीं पवित्रपण। न स्मरता श्रीचरण। जीव शुद्ध नव्हे॥ १४॥ म्हणौनि भल्तया परी। मूर्ही अथवा ज्ञातारीं। स्तवावा श्रीमुरारी। गुणनिधान॥ १५॥

पर कोरडिया जाणिजा । चाड नाहीं देवदेवा । तो आभरिजे सेवा । भक्तिभावें ॥ १६ ॥ या लागीं ग्रंथ सुवर्णाच्या तार्गी । रसाचीं नोणें वाटीं । प्रमपूर्वक देईन गोमटी । देवा आरोगण ॥ १७ ॥ सिद्धांत कर्पूरवासें । घोळून साहित्य रसें । भावविडा प्रबंधमिषें । स्वामीं देईन ॥ १८ ॥ तरी पोरसलेनि प्रेमभावें महती आदरें आइकावें । हें न लगे प्रार्थावें । आर्त म्हणोनी ॥ १९ ॥ ल्यके वाक्जाळ । न गोले पाल्हाळ । बोलभाव गर्भरसाळ । तैसें बोलेन ॥ २० ॥ तर तें सुवर्म श्रोते । निर्मत्सरु जाणते । तें परिसौनि ये कयें । थोर सतोषती ॥ २१ ॥ जैवी लेकुरावाचें बोल्णें । बोनडेन्चि कनतीकवाणें । तं सन्मुख होउनी शहाणे । आइकों ठाकती ॥ २२ ॥ परिसौनि तया शब्दातें । मायबापा ये स्नेहाचें भरतें । तेंवि माझिये बाळमतीतें । सत मानवती ॥ २३ ॥ असो हें सागता कथारभु । जेणें परीतोषोनि प्रभु । पसाय दे परम लाभु । म्हणे मुनी निश्वनाथु ॥ २४ ॥

— ज्ञानप्रबोध ( इ. स. १३३१), ओव्या ३७–६०

## ३

## ग्रंथकर्त्याची रुकवृत्ती

आता पुरे हें बहुव्याप्ती । ग्रंथ आणू समाप्ती । वर माझी येतुली प्राप्ती । स्तवन करावया ॥ १ ॥ आगम निगमाचिये मतीं । जेथ पैस नाहीं स्मृतीं । अगा धत्वें नेणौनि श्रुती । म्हणति नेति नेति ॥ २ ॥ तेथें शोच्य कोठे लागे । जेथ वेदु नुधविती टाग । म्हणौनि शिहाणिजा असि जे उग । हे जाणीव मोठी ॥३॥ पर तू स्नेहाळु माउली । म्हणौनि असळीं केली । का जे अनिर्वाच्य तें आग्रिली बोली । स्तविले मिया ॥ ४ ॥ पर तो माझा भाव ऐसा । दशिवें चंद्र वांजाळिजे जैसा । ना तर सूर्यातें जैसा । कीजे दिपावळी ॥ ५ ॥ असो हे भाव लिया मतीं । बोल्लिली ग्रंथ व्युत्पत्ती । ज्ञानप्रबोध कथा संगती । परिसावी संतीं ॥ ६ ॥ का जे तुम्हीं ईश्वर विग्रहिये । भक्ती कीर्जन विषयें । या लागीं जाग रुची कथाचिये । रसा रुप करू ॥ ७ ॥ तुम्हा जागतेयाचियें सभे । माझें कथा

केरू न शोभे । पर भक्तिरसीं जीभे । उपजली चाड ॥ ८ ॥ या लागीं चावटे र केली । पर ते चि रसाळ वोडवली । का जे गुरु प्रसन्नता बोळली । तिये माजी । ९ ॥ तेणें माझी प्राज्ञावली । सामग्रिया साशिनली । मग काव्य फळा आली । ानप्रबोधें ॥१०॥ माझ सहज बोलणें अरिरा । पर वाच्य केलें ज्ञान-पियूख । नेणें अवधान झालें मुग्ध । सुजाणाचया ॥ ११ ॥

४

भक्तिमहिमा

अहो कुशलतापणें जेवीं । सुगरणी रसु कामावीं । कांहीं अमृताची चवी । आगानया ॥ १२ ॥ तव अरें नये रुचीं । तेथ गोष्टी कें अमरत्वाची । तैशीं सकामें काव्यें लौकिचीं । शृंगारसहितें ॥ १३ ॥ अथवा साहित्यालंकारयुक्त । रसाळ काव्य वोडवे निवृत्त । पर अनन्य भक्ती अमृत । तैसें नव्हें ॥ १४ ॥ जैसें पीयूष सहज निरळ । रससोय नाणिता गोडीसें रसाळ । आणि अमरत्वें सत्य सुफळ । सेवी तया होयें ॥ १५ ॥ तसी साहित्य घोळली येगे । काव्यें अवगा होतीं रुचिकरें । पर विणा भक्ती अनुसरें । नव्हेति मोक्षा हेतू ॥१६॥ म्हणौनि न शुद्धी श्रीभक्ती । बोलता सुरस आणि दे मुक्ती । ये अर्थी उपपत्ती । अमृताची ॥१७॥ त्याही अमृतावरी । आनशर्न काल जिंजिति जरी । तर मृतरूपें या मसारीं । कवण न सेवी ? ॥ १८ ॥ तैसी भक्ती गोड मगलदायक । वर चद विजे साहित्याचें बीक । ऐसी कथा पवित्र कोण एक । सुरसु नायिकें ? ॥१९॥ आर्ताचा ठायीं विशेषु । आह्लादवया उपजे हरिषु । जैसा का घण घोषु । मयोगर्भी ॥२०॥

५

श्रोयास विनती

या लागीं संता श्रोतया विनती । कराबी न लग बहुती । पर मांड्न्दा तव

ते देखिले भिक्षुकू। वृक्षातळीं ॥ ११ ॥ हे देवाचे सतु। म्हणौनि केले दड सतु। तेनीचि रचना विशेष पातु। साउमा चाले ॥१२॥ तेथें उचपणें कळमी। स्पर्श कीजेत आकाशीं। देखे चातुर्दक्ष तैसीं। सुरालय ॥ १३ ॥

## २

## देऊळवर्णन

सागाळाचिया उचिया। पाता दृष्टी राचिया। जालिया बुद्धि डौचिया। ते रचना पाता ॥ १४ ॥ जी प्रासादाचेनि मीषें। आकाश मान्च मधले जैसे। दृष्टी उळवताति सायासे। जरि अत लाहाति ना ॥ १५ ॥ की प्रासाद मेरू। वरि कळस पूर्ण चद्रु। तें शारदि देवेंद्रु। क्रीडा करी ॥ १६ ॥ कीं देवता वरि। प्रासाद छत्र धरीं। उळगतातीं ऋद्धिपुरीं। देवरायातें ॥ १७ ॥ ना ते प्रासादा जैसीं। म्हाती इंद्रिय आगसी। भणौनि विषय सुखनासी। गमले मज ॥ १८ ॥ ऐसीं नगर मडीतें देउळ। देख गोक्षीर धाम धवळार। ना तिए जागा उजळे। दृष्टीवेनि ॥ १९ ॥ जीतें समीपें भोग स्थान। रचमचीत जने। भणौनि निस्पृहीं कली वीजनें। मनन शीळीं ॥२०॥

## ३

## सरोवरवर्णन

तया देव-यतना जवळिले। सरावरें देखे सुलक्षणिक। तेथ गहुवा करिती चक्रवाकें। विरहकातरें ॥ २१ ॥ निर्दोष नि ष्पाप निर्मळ। वासइत परिपूर्ण जळ। सर्वांग जाळीं वाचाळें। कलरवीं पक्षियाचेनी ॥ २२ ॥ टाइ टाइ अवर। नित्रत मण्डित घार। जैसे प्रवृत्ति पाथावरि तावर। तपो निधि ॥ २३ ॥

—ऋद्धिपुरवर्णन (इ स १३६३ ), ओव्या ७१-९३

प्रिती । म्हणत असे ॥११॥ अहो ! जें आपणया लाग करवें । तें पदयतिया उपनें देयावें । तैसें सतातें म्हणतो आइकावें । ग्रथन माझ ॥ २७ ॥ नेंवि अपत्य बोला शिक । की ते जनक आइका ठाकें । तेंनि माझें ग्रथन कवतिकें । आइकावे तुम्हीं ॥२२॥ लागते असेल तें घ्यावें । न लागतं टाळोनि घालावें । पर तुम्ही जागता निवटावें । राजहंसी ॥२४॥ हें मिया बोलिलीं मातृ । इहीं सूनि सिद्धातु । तं तार्किक विचारितु । निर्धारुनी ॥२५॥

— ज्ञानप्रबोध, ओव्या ११६३-११८७

## पंडित नारायण व्यास बहाळिये

### १

### बाह्यप्रदेशवर्णन

ऐसी आटवीन देवाची थोरी । तेवींचि जीव रास विचारी । तव देखे आगरीं । रुसराए सासीगले ॥ १ ॥ सवरितु नगराची वरव । तैसे चातुर्य आरव । वरि सुहावे कल्रव । पक्षियाचे ॥ २ ॥ भवपाप छेदु । जो ब्रह्मादिक वद्यु । तो पातला सरधु । देवगायाचा ॥ ३ ॥ आमुर्त सरधु सोडले । पृथ्वी पुवा एकोळे । भगौनि पाताळा गेली मूळें । मज पाता ॥४॥ परोपट्टति लागोनि तेथा । विनयो आति जेथा । निरवीनी फळ पत्र छाया । श्रातातें ॥ ५ ॥ निहारुणं रमायणें । तरि हाति विहगमाचीं कुजनें । तळवरीं भिशुरार वीजनें । तेणें लोळ धाती ॥६ ॥ ते नि क्व निरोपाधी । करुनि निधुद्रा ढुध मग बैसले समाधी । तापसु ने ॥ ७ ॥ मी सरयाचेनि अन्ले । स्मरण पीसारि आलें । त ध्यान दीसे लागल । न्वण एकवर्ती ॥ ८ ॥ वन्नि कामनोवान डाही । नवल्र पीर आवर्डाचा वाहीं । ब्रह्म मुकाळु लाधल तेही । जे रा रिगालें ॥ ९ ॥ ईश्वरविरहं तातलं । आनदपय उतल ॥ तैसे डोळे दीमर झळवैले ।अश्रुपार्ता ॥ १०॥ ऐसे परमाथु मचवू । जे नव्हेति आतमचवू

देखिले भिक्षुकु । वृक्षातळीं ॥ ११ ॥ हे देवाचे मतु । भणौनि केले दड तु । तेवींचि रचना विशेष पातु । माउमा चालो ॥ १२ ॥ तेथ उत्तपर्णे ळमा । स्पर्श वर्जित आकाशीं । देखे चातुर्दक्ष तेसीं । मुराळयें ॥ १३ ॥

२

देऊळवर्णन

गाराठाचिया उचिया । पाता दृष्टी टाचिया । जालिया बुद्धि गोचिया । ते रचना पाता ॥ १४ ॥ कीं प्रासादाचेनि मीषें । आकाशा माच ाधरे जैसें । दृष्टी ओळघताति सायास । जरि अत लाहाति ना ॥ १५ ॥ की प्रासाद मेरू । वरि कळस पूर्ण चद्रु । तें शारदि देवेंद्रु । क्रीडा करी ॥ १६ ॥ कीं देवता वरि । प्रासाद उत्र धरा । ओळगताती ऋद्धिपुरी । देवरायातें ॥ १७ ॥ ना ते प्रासादा जैसीं । खाती इंद्रिय आगमीं । भणौनि विषय सुखनासी । गमलें मज ॥ १८ ॥ ऐसीं नगर मडीतें देउळ । देव गोक्षीर धाम धवळारें । ना तिए जागा उजळ । दृष्टीवेनि ॥ १९ ॥ जीतें समीप भोग स्थान । रचमचीत जने । भणौनि निस्पृहीं वर्जी वीजनें । मनन शीळीं ॥ २० ॥

३

सरोवरवर्णन

तया देव-यतना जवळिके । सरोवरें देखे सुलक्षणिक । तेथ नाहुवा करिती चक्रवाकें । विरहकातर ॥ २१ ॥ निर्दोष नि ष्पाप निर्मळ । वासडत परिपूर्ण जळ । सर्वांग जाली वाचाळ । कलरवीं पक्षियाचेनी ॥ २२ ॥ ठाइ ठाइ सरवर । नित्रत मन्ति घाट । जैसे प्रवृत्ति पाभावरि तारू । तपो निधि ॥ २३ ॥

—ऋद्धिपुरवर्णन ( इ स १३६३ ), ओव्या ७१–९३

# चोंभा

## उपाहरण

जीर्नी नाहीं निर्मळपण। सदा कठिण अंतरन। पाये न व्हाती कद्द णीयें वेळें। जाता दींडीं जागरणा ॥ १ ॥ जरि बैसलेया देयें संत। आरत मनन केची तेथ। ऐसी काही नुपजेची बुधी। त्यासी घालिजे दडवत ॥ २ ॥ पाये धुनी पाहीजे ईस्वरु। ऐसा नुपजेची वीचारु। घीगी घीगी जीतिव माझे। का नुपजनीला भूमीभारु ॥ ३ ॥ ऐसा वीनवीला करुणा वचनीं। तव ते कृपाळु भवानी। अभयें करु ठेविला माथा। उपदेसीला हरी चरणीं॥४॥ आता मज सत्तीचा प्रसादु। वरी भत्तीचा अनुवादु। चोंभा म्हणे अनुवादैन। उपाहरणीचा प्रबधु ॥ ५ ॥

—उपाहरण, ओव्या ३१-३५

* * *

भवती अस्त्रीयाची रावणें। तेथे घातली ते राजकुमरी॥ पाच सतें सोनारसीणी। उपा तेयाचे रावणी। आगाजवळी प्रधानकन्या। जे का बुधीवता सीरोमणी॥ प्रधानकन्या देषा। जीये नाव चीत्ररेषा। तीयेसी नीरोवीली ते ताठा। तुज लागे हें माणीक॥ पार्वतीचीये वोळगे न्यावी। राराजवळी आणावी। दों ठाईं स्वरमु असे। आणी नेउती जानों नेदावी॥ पुरुषाचेंनी नावें पाहीं। तेथ वारेया सौरसु नाहीं। मरण ग्राधौनी पालवी। कवण रीगैल तीये ठाई॥ ऐसीये परीची जतन केली। बहुत येक दीस गेले। रायें मानिला वीस्वासु। वीघ्र न घडेची ल्पेटलें॥ ऐसी कव्हणी येकी अवसरीं। राजदता चीया माचेया वरी। भवती अस्त्रीयाची वोळग। बैसली होती राजकुमारी॥ चीत्ररेषा उभी ठेली। तव प्रभातेची घडी भरली। घाला श्रीयाराची आईती। वोळगेची वेळ जाली॥ जानों भवानीचीया दरुसना। ठाकेल देवीची सेवना। येता जाता उसीरु होईल। दीसु चढैल मध्याना॥ भुकै जसी राज कुमरी। नोळग सारु झडकरी। तेया सवदा सवें उठीली। तीयेचें उतर

नव्हेरी ॥ श्रींगार होता केला । नेसली पीरोदकु सेला । तेया वरी वालिपेची बुधी । एन्द्वीं उबारेन गादेल॥ उदयो भास्करु चोपडा। कापुरें सहीतु घेतला वीडा । मुपा फोडी हातीं पाणें । मग ते नीगालीं झडझडा ॥

— २४ ३५

*    *    *

मागा सस्त्र जें घातले । सैन्य पानेकी आसीलें। ते पळाले गरुडा भेण। दळ मागौ तें उठीलें ॥ आता पडेल येयाचा तोंडीं । होईल सैन्याची रापोंडी। मग कवणा येउनी उठवीसी। होईल आता रणसाडी॥ तैसेयाचेया अस्फुरा। वेगीं धावे सारग धरा। देवें कांहीं येकु उपावो । जंव हे न पवे समोर ॥ बुधी फुरली नारायेणा । सस्त्र सुमरीलें वाग। मेघ वोळले गगनीं। काळे भयानक दारुण ॥ गगनीं वरीपला जळधरु। तेणें वीझाला वैश्वानरु। सवेंची ईस्वराचेया सैन्या। वरी पडला अधकारु॥ जाला वीरुणुचा पोकारा। तें मेघाचा पोर्गी गारा। सीळीं पापाणीं वरीपत। सघारले दळभार॥ भवतीया वीजु ल्यल्पीती। तुटौनि तडक पडती। कांहीं न दिसे लोचनीं। तेयें कैंचा गभस्ति ॥ गर्जत मेघ गडगडीती। अवचीते तडक पडती। हा कोपला वीरुणु। गुडे रथावरी पडती॥ ऐसे वरीपले जलधर। सवेंची आले महापुर। मर्डी वहातें गेलीं। संघारलें दळभार॥ तीयें अवस्वरीं प्रीजापती। देपा सुमरीला मारुतीं। वान्यसस्त्र जपीनला। झडकरी पातला उचीती॥ तेयाचीं अवस्वरा। कैंचा नेतो भवीनला वाग। तेणें वीघोळलें मेघ। पलु सुटला जळधरा॥

— १७४२–५२

# वहिरंभट ( वहिरा जातवेद )

## १

### श्रोत्याना विनंति

जो अत्रेयगोत्र उदयाचळिं । बोधप्रकाश किरणमाळि । जयाचे घेति बोदपाळी । मुमुक्षजन ॥ १ ॥ त्या चिंतामणिचेनि प्रसादे । दशमस्कंध वोवि प्रबंधें । वहिरेनि जातवेद । गायन केलं ॥ २ ॥ श्रीगुरुचिंतामणिचा । प्रसादु मज भाग्याचा । केलें त्या श्रीकृष्णाचा । वाणिता मिं ॥ ३ ॥ वरि जन्मु सद्वंसिं । अनतु लाधला जयासि । त्या कौडिण्यरुपीसतानासि । भक्तिवरदान ॥ ४ ॥ आता कैसि श्रीधरि टीका । कैस रूप पहिल्या श्लोका । या श्रोतेयाच्या विवेका । प्रार्थितु असे ॥ ५ ॥ जे मागें धन्य थोर । तैसेचि तुम्हीं भाग्याकार । ते श्रीकृष्णाचें चरित्र । प्रार्थितु असा ॥ ६ ॥ मि काये द्ये ग्रंथि । प्रवर्तीनया माझी मति । तरि लोक का न गवति । गभस्तिविण ॥ ७ ॥ तैसें माझ मी पण । नाहीं मज आधिन । नावरे आगाधपण । चद्र जैस ॥ ८ ॥ गगनिंचेनि अबोधरें । ताडव माडिजे मयोरें । का वमति पचमस्वरें । कोकिळा किळ ॥ ९ ॥ तैस श्रीगुरुचेनि यीक्षणें । येण वदनें वदणें । तरि मज कैवि वाणें । अहंकृति चढे ॥ १० ॥ आणिक बाळक बोलगड । त्याच वादनिति ते कोड । तांतरं परि गोड । वाग्ति शब्द ॥ ११ ॥ शुद्रादिका वदु न भजे । मा राम कृष्ण उच्चारिजे । तैसा ( मी ) योग्य नव्हे परि साज । पै श्रीकृष्णनामें ॥१२ ॥ या कृष्णनामाची गोडी । श्रीगुरुनि लाविली पुढी । म्हणानि ग्रंथिचिंबें जोडि । रिगालो मिं ॥ १३ ॥ सालि ना, निज केवळें । ऐसिं रसकल्लोळाचिं फळें । तैसिं अक्षरें घडघासाळे । कृष्णनामाचि ॥ १४ ॥ या फळाचा सहज वासु । निरुपचार सिद्धरसु । सेविजे जि यथावकाशु । करूनिया ॥ १५ ॥ आता कृपाळु तुम्हीं श्रोते । चित्त द्यावें श्रीकृष्णकथे । मी श्रीधराच्या मार्गातें । पाहोनि चालें ॥ १६ ॥ ये अर्थि प्रवर्तवितु । जाणता तो कृष्णनाथु । जैसा बाळकासि पडितु । न्यामकु होय ॥ १७ ॥ का सेवकु होय असोयिता । तो

बोलु स्वामिचे माथा । म्हणति तूझा वागविता । नेटका नाहीं ॥ १८ तैसे यिये ग्रंथि । मी जरि चुकें युक्ति । अनङ्ग सुबद्ध म्हणति । तो बोलु कृष्णासि ॥ १९ ॥ जैसे न प्रगटिजे दिनकरें । तव जनु न झावे व्यापारे । तैसें कृष्णें दातारें । वागविजे बुद्धि । २० ॥

— भैरवी टीका, अध्याय पहिला, ओव्या ७३–९२

## २

## यशोदेचा बाळतविडा

आता गोपिकाची लाहा की । शृंगारु करिती येकमेकी । चाला गे नवल की । यशोदेसि पुतु ॥१॥ आजी जसवतीसी पाहालें । पुढें पुतातें असैल घेतलें । हें थोर देवें केलें । आनदु आम्हा ॥२॥ लौकरी चला गे साजणी । पुत्रेसी घेवाळू बाळतिणी । शीघ्र त्या गे लेणीं । तातडी सारिखी ॥३॥ येकी म्हणती तातडी कायेसी । जो आनदु जाला हे मानसी । हे यशोदा आम्हा माणदेशी । पुत्रवती जाली ॥४॥ नेसलिया रुचीचीं वस्त्रें । वाणें परीची विचित्र । अलकारादि कर्णपत्रें । मोतिल्ग ॥५॥ नेत्रीं सुन्लें अंजन । पाहवेया यश्वदेचें निधान । कैसे तांबोळें वदन । सुरग दिसे ॥६॥ नवकुंकुम पिंजरी । तयाची टिकुली सुदरी । केशर चदनेसी अबरी । मळिवट्ट शोभे ॥७॥ थोर असे कटितट । चचल कुच घनतट । आवेव दिसती प्रगट । कुची जही ॥८॥ घेउनी कनकताटें करीं । बाळतिणी विडा अतरी । पर्णे पुष्पें फळें हरिद्री । आणि वस्त्रे ॥९॥ या कृष्णासी बाळलेणें । निंदुली जिवती चरणभूषणें । सरी आकुडे सुवर्णे । रत्नमडित ॥१०॥ राया हें काय सांघिजे काहाणी । जो नित्य न मायें त्रिभुवनीं । त्यासी आगुळी गौळणी । नेत आहेती ॥११॥ आणि वस्त्रें नदासी । वरी कृष्णाच्या अल्कारासी । ऐश्या आल्या मदिरासी । बाळतिणी-चिया ॥ १२॥ बाळकृष्णाच्या दर्शना । कैसिया गौळणी सुल्क्षणा । त्याचेया सोज्वलपणा । आथिर राया ॥१३॥ जे रत्नें तेजा आगळीं । युक्त कुडलें कर्णी मडळीं । जडित पदकें कठस्थळीं । स्तनासमीप ॥१४॥ त्यांसी मार्गी चाल्ता ।

विचित्रें अंबरें शोभता । मस्तकींहुनी गळता । पुष्पें भूमी ॥१५॥ या हस्ताचा अनुकारू। रसानिता बुधी पदरू। तव कंकणाचा तेजाकारू। विद्युल्लतेऐसा ॥१६॥ गोपीका प्रतोनि पाहता। तानवडा दिसे चचळता। पयोधरा तेची अवस्था। चंचळत्वाची ॥१७॥ ते कुचतट मडळीं–। मध्यें शोभे हारावली। ऐशा सुशोभित नदराउळीं। प्रवेशलिया ॥१८॥ वाजंतराचे गजर। त्या प्रवेशुनी नदमंदिर। जाले बैसकार। गौळी गोपिका ॥१९॥ पागवरी चाळतिणी। लॉ बैसविती कामिनी। मग करिती आक्षवाणी। कृष्णेंसहित ॥२०॥ ब्रह्मादिक न देखती माथा। त्यासी गौळणी लाविती अक्षता। परिक्षिति पाहे समर्था। लीळा आवडली ॥२१॥ गोपिका कृष्णा वोवाळिती। वोवाळिता ऐसे मागती। चिरकाळ आमुतें श्रीपती। पाळिता होये ॥२२॥ होय जगत्रयाचा गोसावी। मातेसी सुखमुख दाखवी। ऐश्या गौळणीं सर्वभावीं। आशीर्वादु देती ॥२३॥ मग अळकार अर्पिले। पूर्णासि अंगुळें लेवविलें। जसवती नदा बैसविले। पागवरी ॥२४॥ मग वस्त्रें अर्पिती। मगळतुरें वाजती। त्या सद्‌पुत्रा पडती। वोवाळणिया ॥२५॥ मग तया श्रीहरी। उपचार करिती नारी। आडया घेतलासे करीं। ज्यातु हें जग ॥२६॥ हळदिलेंहें मिश्रित। उदकयोगें सिंचन करीत। तो सर्वद्रष्टा पाहात। टकमकित ॥२७॥ मग त्या अनंता रागीं। गाती श्रीकृष्णालागीं। काय सागौ सभाग्यें। गौळणी तिया ॥२८॥

— भैरवी टीका, अध्याय पाचवा, ओव्या ५१–७८

३

## कृष्णलीला

त्या समर्थाचि माता। कैसी शोभे गुसळिता॥ जिसि निधान अनंता। ऐसे घरिं॥ १॥ थोर असे कटिविभागु। पितांबर वाटोळा सुरगु। निळिं धारि शोभे योगु। ते नेसलिसे ॥ २॥ तेयावरि कटिमेखल। क्षुद्र घंटिका

घुळघुळां। घोस लागले मुक्ताफळा। लगडौनियां ॥ ३ ॥ पुत्रस्नेहें पान्हा-युक्त। दोन्ही कुचतट उद्धत। महि गुसळिता कापत। आपलेनि भारें ॥४॥ रविदोरू वोढिता वेगें। वाम सव्य डोलें अंगें। त्या श्रमल्या भुजांचेनि योगें। रुणझुणिती कंकणें ॥५॥ जरि उजवेनि आगें झाले। तंव कर्णभूषण डोले। रत्नखचित तेजाळें। जैसे रविमंडळ ॥६॥ डावेनि अंगें डोलु देतां। दुजें कर्णभूषण झळकतां। पूर्णमेसि पूर्णता। चंद्रि जैसी ॥ ७ ॥ गुसळितां जाला श्रमु। वदनिं उमटला घमु। कबर-विरगुंठीचा नेमु। मोकळा दिसे ॥ ८ ॥ ते मस्तकिहुनि गळति। पुष्पजाति मालति। त्या गुसळखांबाभवति। विखुरलीं सुगंधें ॥ ९ ॥ ऐसें मंथन करिता सुंदरि। धन्य तेचि चराचरिं। जिसि थान मागे श्रीहरि। जगन्नाथु ॥ १० ॥ तिये गुसळिता यशोदें। थान मागिजैल गोविंदें। तिसि दृष्टी सुनि-मुकुंदें। येयिजत असे ॥ ११ ॥ जैसा पूर्णिमेचा चंद्रु। कनकधुळि धूसरु। तैसें अत्रचित्रें लेंकरूं। जवळी आलें ॥ १२ ॥ डेरीयांतु भवे माथुला। कृष्णें रविदोरु धरिला। माते म्हणे उगला। येरु भुकेलों म्हणे ॥ १३ ॥ अंबे येन्हढा दिसू जाला। नेंगसी मी भुकेला। माता म्हणे खोडियाला। पुरे करी ॥ १४ ॥ हा वो ,म्यां जरी पुरें करावें। तरी येथें कवणें खेळावें। हां रे तुजसी न बोलवे। मज बोल्ता ॥ १५ ॥ रविदोरु दोहीं पदरिं। यशोदा धरिला करिं। म्हणिये करू दे मुरारि। साडी खोडी ॥ १६ ॥ अंबे जे घरदारा सोडुनि। तीर्थ सन्यासु घेउनि। त्यासी तिन्ही पाहार टळौनि। उठि क्षुधेची खोडी ॥ १७ ॥ आणिक येक मौनी जाले। ते मित्राचे कासे लागले। त्या दोघांहि घडविलें। क्षुधा खोडि ॥ १८ ॥ येक पय-आहारु करिति। ते परघरीं चित्त देति। ऐसी क्षुधा खोडी नाचविति। वीतरागियाही ॥ १९ ॥ मा अंबे मी तव धाकुटा। येरिं म्हणे हा रे बाजटा। तूं बोलता रे धीटा। चौघासी नावरसि ॥ २० ॥ अंबे तू भलतें म्हण। परी मि गुसळु नेदीन। शीघ्र देयी स्तनपान। यशोदे तू ॥ २१ ॥ होसी रे इटागळा। बोल्माड अवघया आगळा। कामासी खोळंबु केला। तुवा कृष्णा ॥ २२ ॥ मग तया जगकर्तया। मांडीवरी बैसविला माया। हातु लागता थाना तया। पान्हा आला ॥ २३ ॥ तो पान्हायीला स्तनु। तया कृष्णमुखिं सुनु। बैसा भुकेला जगजीवनु। घुटघुटा घेतु ॥ २४ ॥ सुस्मित हास्य ते समईचे। आनन

पाहे कृष्णाचें। ते यशोदेच्या आनदातें। काय पार आहे ॥ २५ ॥ ऐर आनदें पाजी आनदु। यशोदेकडे पाहे गोविंदु। न्याहाळिता मध्यें भेदु हारपला ॥ २६ ॥

—भैरवी टीका, अध्याय नववा, ओव्या १६-४१

४

## तेणे माडिला शृंघारु

तेणें शृगारवें आनदु। अथवा सर्गे आहे गोविंदु। वरि कृष्णाचें ठाई स्नेहवादु। गोपाळासि ॥ १ ॥ खादीं सिदोरिया जालि। वेताटिया कर कमळि। सिंगं काखाग्लिी गोवळि। पाने गळा देव्हडे ॥ २ ॥ आनदे गोपाळ आपलाली। वासुरे पुढें घेंरीं। सहस्र सख्यायुतें चालितली। वृंदावनाकडे ॥ ३ ॥ असख्यातें कृष्णाची वासुरे। त्यातु मेळविली येरीयेरें। ऐसी चारिती येकाकारें। कृष्णासगे ॥ ४ ॥ वासुरें चारा लागलि। बाळकें खेळासि प्रवर्तलि। स्वेच्छा क्रीडते जालि। क्रीडा कैसि ॥ ५ ॥ रामकृष्ण त्याच्या माता। शृंघारिलें होतें निघता। काचाचि लेणि अनता। हार गुजाचें ॥ ६ ॥ मध्ये मध्यें रानमणि। ते जडिले असति सुवर्णि। या अल्कारावरि लेणि। वनातुले लेति ॥ ७ ॥ जो सुदराहुनि सुदरु। तेणें माडिला शृंघारु। वनफळाचा मनोहरु। देखिलेया ॥ ८ ॥ रुद्राक्ष पद्माक्ष आवळे। ते कृष्णें घातलें माळे। वरी स्वरूप सावळ। तेज पुज ॥ ९ ॥ कर्णि खोविले अवतस। जे करुनि गुजाचे घोश। हें फळशृंघार बहुवस। अनतें केलें ॥ १० ॥ वेंदकळी अबीयाचे ठसे। ते कानीं खोविली रशीकेरें। आणी प्रवाळ शोभती तैसे। मस्तकीं खोविलें ॥ ११ ॥ करुनी वनपुष्पाचे हारु। हे कणेर आणि मदारु। मोगरेमध्यें सुदरु। पागर कळे ॥ १२ ॥ काचन पालाशपुष्पें। गणेरे दिसति स्वस्वरूपे। जैसि सुवर्णपुष्पा पे। ठेउ येति ॥ १३ ॥ गुफिली कळलुलि हारिं। मध्यें मध्यें तुळसिमजुरिं। अनेक पुष्पें घोश सिरिं। खोविले

कृष्णें ॥ १४ ॥ माथा मयोरपत्र[1]वेठीं। तेणें मिरवी जगजेठी। गेरुचिया घेतलिया उटी। नील पीत आरक्ता ॥ १५ ॥

—भैरवी टीका, अध्याय बारावा, ओव्या १६-३०

५

## गोकुळातील पहाट

ऐसिया रिति ते रात्री। प्रातःकाळीं गोविन्दाचा चरित्रि। नंद यशोदेचें पुत्रि। मोहित मन ॥१॥ तो कृष्ण अनुचर उद्धउ। त्या तिघाचा येक जिउ। ऐसा सवाद अनुभवु। स्मरला तो भोगु ॥२॥ राया तव उपःकालु जाला। त्या गोपिकासि चेउ आला। तेहिं दिपु लाविला। आपुलाला मदिरी ॥३॥ भग-द्वारें समार्जन करुनि। गुसळणासि डेरा घालुनि। तें दहिं रिचउनि। सुद्ली रवी ॥४॥ त्या गुसळिती समारंभे। घुमघुमिजे ध्वनि नभें। गुसळिता आगें शोभे। आली कैसी ॥५॥ मदिरीं दीप दीप्तिमंतु। गोपिकटि मेखला शोभतु। तो स्पर्धेतें करितु। रत्नकीळमेळें ॥६॥ हा रविदोरु वोढिता। वाम सव्य डोलता। भूषणाचि चचळता। प्रगटली दिसे ॥७॥ रुणझुणा वाजती ककणें। कटिभागीं दिसे डोलणें। तव तव कपिजे स्तनें। आपुलेनि भारें ॥८॥ कठीं रुळे हारावली। कर्णभूषणें तळपति तेजाळि। तेणें तेजें कपोळि। शोभा दिसे ॥९॥ दर्पण पाहोनि मुख। कुंकुम लाविजे सुरेख। वोढिली नेत्रीं काज्ळरेख। कर्णपर्यंत ॥१०॥ मग कमळनयनकृष्णा। गात्याती व्रजागना। ध्वनि गाजला गुसळणा। तो स्वर्गातें गाजवी ॥११॥ माडिलें ते दधीमथन। वरी श्रीकृष्णाचें गायन। तो मिश्रित ध्वनि घोळीन। येकुचि होय ॥१२॥ त्या डेरयाचा घुमघुमाटु। गायनीं स्त्रियाचा कटु। ते ध्वनि गभीर नरवटु। दिशाचें अमगळ गेलें ॥१३॥ तव उदया आला भगवंतु। जो नारायण मूर्तु। तव गोपी देखिला रथु। सुनर्ग अलकारला ॥१४॥

—भैरवी टीका, अध्याय शेचाळिसावा, ओव्या १८८-२०१

[1] मयुरपत्रवेठीं। शोभताहे।—नामदेव

पाहे कृष्णाचें। ते यशोदेच्या आनदाते। काय पार आहे॥ २५॥ ऐसा आनदें पाजी आनदु। यशोदेकडे पाहे गोविंदु। न्याहाळिता मध्यें भेदु। हारपला॥ २६॥

—भैरवी टीका, अध्याय नववा, ओव्या १६-४१

४

## तेणें माडिला शृंघारु

तेणें शृगारवें आनदु। अथवा सगे आहे गोविंदु। वरि कृष्णाचें ठाईं स्नेहवादु। गोपाळासि॥ १॥ खादीं सिदोरिया जालि। वेताग्रिया कर कमळि। सिंग कासाग्रिली गोवळिं। पावे गळा देव्हडे॥ २॥ आनदे गोपाळ आपलाली। वासुरें पुढें केलीं। सहस्र सख्यायुतें चालितली। वृदावनाकडे॥ ३॥ असंख्यातें कृष्णाची वासुरें। त्यातु मेळविली येरीयेरें। ऐसी चारिती येकाकारें। कृष्णासगें॥ ४॥ वासुरें चारा लागलि। बाळकें खेळासि प्रवर्तलिं। स्वेच्छा क्रीडते जालिं। क्रीडा कैसि॥ ५॥ रामकृष्ण त्याच्या माता। शृंघारिलि होतें निघता। काचाचि लेणि अनता। हार गुजाचें॥ ६॥ मध्ये मध्यें रानमणि। ते जडिले असति सुवर्णि। या अल्कारावरि लेणि। वनातुले लेति॥ ७॥ जो सुदराहुनि सुदरु। तेणें माडिला शृंघारु। वनफळाचा मनोहरु। देखिलेया॥ ८॥ रुद्राक्ष पद्माक्ष आवळे। ते कृष्णें घातलें माळें। वरी स्वरूप सावळ। तेज पुज॥ ९॥ कर्णि खोविले अवतस। जे करुनि गुजाचे घोश। हे फळशृंघार बहुवस। अनतें केलें॥ १०॥ वेंहकळी अवीयाचे ठसे। ते कानीं खोविली हृशीकेशें। आणी प्रवाळ शोभती तैसे। मस्तकीं खोविलें॥ ११॥ करुनी वनपुष्पाचे हारु। हे कणेर आणि मदारु। मोगरेमध्यें सुदरु। पागर कळे॥ १२॥ काचन पालाशपुष्पें। गणेरे दिसति स्वस्वरूपें। जैसि सुवर्णपुष्पा पे। ठेउ येति॥ १३॥ गुफिली कळबुलि हारि। मध्यें मध्यें तुळसिमजुरिं। अनेक पुष्पें घोश सिरिं। खोविले

कृष्णें ॥ १४ ॥ माथा मयोरपत्र[1]वेठीं। तेणें मिरवी जगजेठी। गेरुचिया घेतलिया उटी। नीळ पीत आरक्ता ॥ १५ ॥

—भैरवी टीका, अध्याय बारावा, ओव्या १६-३०

५

## गोकुळांतील पहांट

ऐसिया रिति ते रात्री। प्रातःकाळीं गोविन्दाचा चरित्रि। नंद यशोदेचें पुत्रि। मोहित मन ॥१॥ तो कृष्ण अनुचर उद्धउ। त्या तिघाचा येक जिउ। ऐसा संवाद अनुभउ। स्मरला तो भोगुं ॥२॥ राया तंव उपःकालु जाला। त्या गोपिकांसि चेउ आला। तेहिं दिपु लाविला। आपुलाला मंदिरी ॥३॥ मग-द्वारें समार्जन करुनि। गुसळणासि डेरा घालुनि। तें दहिं रिचउनि। सूदली रवी ॥४॥ त्या गुसळिती समारंभे। घुमघुमिजे ध्वनि नभें। गुसळिता आगें शोभे। आली कैसी ॥५॥ मदिरीं दीप दीप्तिमंतु। गोपिकटिं मेखला शोभतु। तो स्पर्धेतें करितु। रत्नकीळमेळें ॥६॥ हा रविदोरु वोढितां। वाम सव्य डोलता। भूषणाचि चंचळता। प्रगटली दिसे ॥७॥ रुणझुणां वाजती कंकणें। कटिभागीं दिसे डोलणें। तंव तंव कपिजे स्तनें। आपुलेनि भारें ॥८॥ कंठीं रुळें हारावली। कर्णभूषणें तळपति तेजाळि। तेणें तेजें कपोळि। शोभा दिसे ॥९॥ दर्पण पाहोनि मुख। कुंकुम लाविजे सुरेख। वोढिली नेत्रीं काजळरेख। कर्णपर्यंत ॥१०॥ मग कमळनयनकृष्णा। गात्याती व्रजांगना। ध्वनि गाजला गुसळणा। तो स्वर्गातें गाजवी ॥११॥ माडिलें ते दधीमंथन। घरीं श्रीकृष्णाचें गायन। तो मिश्रित ध्वनि घोळौन। येकुचि होय ॥१२॥ त्या डेरयाचा घुमघुमाटु। गायनीं स्त्रियाचा कंठु। ते ध्वनि गंभीर घरवंटु। दिशाचें अमंगळ गेलें ॥१३॥ तंव उदया आला भगवंतु। जो नारायण मुर्तु। तंव गोपीं देखिला रथु। सुवर्ग अलंकारला ॥१४॥

—भैरवी टीका, अध्याय शेचाळिसावा, ओव्या १८८-२०१

१ मयुरपत्रवेठीं। शोभताहे।—नामदेव

## ६

## प्रथसमाप्ति

अगा ज्या कृष्णाचें नाम । ऐकता अमगळ नासे परम । आणी उच्चारिता मेघशाम । सर्व सुकृत होइजे ॥ १ ॥ येणें कृष्णें सर्व । रुषिवशीं धर्मपर्व । प्रवर्तविलें आपूर्व । हे काहीं आपूर्व नव्हे ॥ २ ॥ त्या कृष्णाचा हेतु । पृथ्विभाव फेडि त्वरितु । येयें कायि आश्चिर्ये मातु । ज्याचि आयुधें काळचक्र। ॥३॥ ते सकळजनि वसता । आणी जनु तेथेंचि असता । तो कृष्णरूपें उत्कठवता । भुमडळीं वसे ॥ ४ ॥ तों देवकिचा ठायिं जन्मला । हा प्रवादुची रुढला । जैसा सींपीवरि देखिला । रजताभासु ॥ ५ ॥ ते रजत घेऊ जाईजे । तें सिंपिची पाविजे । तैसा कृष्णजन्म न साजें । जे आजन्मा म्हणौनि ॥ ६ ॥ यादवामधें जे श्रेष्ट । ते सभासेवक कनिष्ट । आपुला ग्राहु दडिजे नष्ट । आधर्मादिक नासिलें ॥ ७ ॥ आणि स्थिरचर जे जीव । हे आचेतनहि सर्व । पातकें नासोनि आपूर्व । पवित्र केलें ॥ ८ ॥ हे सुस्मित जे श्रीमुख । तेणें व्रजपुरनायक । त्या वनितादिकासि सुख । कामाचें वाढविलें ॥ ९ ॥ यापरी जो परु । म्हणिजे उत्कृष्ट थोरु । स्वधर्म रक्षणीं अत्यादरु । लीळातनु भरित ॥ १० ॥ जेणें मच्छादि मूर्ति । धरुनि केली कीर्ति । जो यादवामध्यें अनत शक्ति । अनतकर्मी जो का ॥ ११ ॥ त्याचीं कर्में प्रैत्नपूर्वक । विलोकावीं अवश्यक । जें ऐक्ताचि अनेक । नाशती कर्मे ॥ १२ ॥ आणि ते कर्म आइकता । त्याचे चरणीं भजनता । उपयोग चित्ता । निरतर ॥ १३ ॥ तै कृष्णचरणीं अनुव्रति । उपजे जया निरुति । त्या फळाचि शाति । ऐक राया ॥ १४ ॥ मरणधर्मु जो प्राणी । तो मुकुदकथाश्रवणीं । आणि कीर्तन करी जो वदनीं । चिंतन मननासीं ॥ १५ ॥ तेथ वाढे जे अनुव्रति । तेणे त्याचिया लोका पावती । जे लोकीं दुस्तर गति । कृताताादिकाहीं ॥ १६ ॥ तो काळुवेगु नाहीं तेथें । हा समर्थु नादे जेथें । म्हणौनि राजे राज्यातें । साडोनि भजिन्नले ॥ १७ ॥ ग्राममदिरें साडिती । वनीं जाउनि बसति । ऐसे गा परिक्षिति । भजिनले श्रीकृष्ण ॥ १८ ॥ ऐसा शुक–परिक्षिति–संवादु । श्रीभागवत दशमस्कदु ।

ऐकतां होय आनंदु । सज्जनांसी ॥ १९ ॥ हा श्री चिंतामणीचा प्रसादु । म्हणे बहिरा जातवेदु । ऐक्यरुपें सच्चिदानंदु । सदोदित ॥ २० ॥

—भैरवी टीका, अध्याय नव्वदावा, ओव्या २१४–२३३

## अज्ञानसिद्ध

### मराठीची महती

निजरूपाचें ज्ञान । वांछीतसे तुझें मन । तरी परीस एकाग्र होऊन । विवेकयुक्ति ॥ १ ॥ जे निरोपिलें वेदांतीं । प्रतिष्ठिलें उपनिषदार्थी । ते ब्रह्म प्राकृत दृष्टांतीं । सांगो तुज ॥ २ ॥ जरी म्हणसी प्राकृत वाचा । परी अर्थु नव्हे प्राकृत तेथीचा । हा अभिप्रावो घेसी अनुभवाचा । तरीच साचा सुख पावसी ॥ ३ ॥ जैसी माया अविद्येमाजी जाण । एकचि व्यापक चैतन्य । त्या उपाधि किंचित निरसन । ते एकपण एकात्मता ॥ ४ ॥ तैसें संस्कृत आणि प्राकृता । दोन्ही वाणी विवंचिता । दोहींचा अर्थु पाहता । एकरूपची ॥ ५ ॥ कीं पिंडब्रह्मांड पृथक् पृथक् । पाहतां दिसे भिन्नात्मक । परी दोहींमाजी एक चाळक । ते निष्कळंक निजरूप ॥ ६ ॥ तैसें दोहीं वाचेचें बोलणें । परी अर्थु नव्हे एकचि जाणणें । हे जाणिजे विचक्षण । एकपणें एकार्थु ॥ ७ ॥ दो नयनाच्या अंतरीं । दृष्टि एकचि निर्धारी । तैसे दो शब्दा कुसरी अर्थ निरंतरीं । एकचि असे ॥ ८ ॥ किंवा दोन्ही श्रवणपुटीं । ऐकिजे एकेचि गोष्टी । तेथें न दिसती दृष्टीं । अर्थभेद शब्दाचे ॥ ९ ॥ दोन्ही आधरे एकचि बोलण । या दोहीं करीं एकचि करण । दो चरणाचें एक चालण । हे प्रसिद्ध जाणे विवेकिया ॥ १० ॥ ऐशा दिसती दोन्ही वाचा । परी एकचि शब्दार्थ तया दोहींचा । हा विवेकु ज्ञातियाचा । अभिमानियाचा भिन्न भावो ॥ ११ ॥ जरी म्हणो पवित्र अपवित्र । तरी दोहींमाजी एकचि मातृकाक्षर । हे जाणिजे चतुर । अहंकारें न पविजे ॥ १२ ॥ जैसें क्षीरामाजीं सपूर्ण । घृत असें मिश्रित होऊन । तें मयासें मथन करून । काढिजे निवडूनी बादेरीं ॥ १३ ॥ तैसें संस्कृत

वाचिती । मग अनेक युक्ती प्रयुक्ती । मऱ्हाटीया सागती । विशदार्थ करुनिया ॥ १४ ॥ नारळीचें फळ गोमटें । वरी पाहता दिसे करवटे । भीतरी नेटपाटें उत्तम दिसे ॥ १५ ॥ जे वरिवरि पाहता । फळाची करिती उपेक्षिता । ते वंचिती भीतरार्था । अल्पमतिये जाण पा ॥ १६ ॥ तैसी उखर वाणी मऱ्हाटी । परी भीतरार्थी घालिता दृष्टि । होइजे सुख सतुष्टी । स्वानुभव ज्ञान ॥ १७ ॥ कीं कर्दळी फळ पक्व घडी । वरीवरी पाहता सालडी । भीतरी अमृतरस गोडी । तैसी वाणी मराठी ॥ १८ ॥ इक्षुदंड कृष्णवर्ण । परी रसी गौल्यता सपूर्ण । तैसे म्हाराष्ट्रवचन । भीतरार्थ जाण गौल्यता ॥ १९ ॥ जे सस्कृताचा गर्व घेती । आणि प्राकृताते निंदिती । ते गर्विष्ठ अहङ्कृती । आपस्वार्थी बोलके ॥ २० ॥ आपुले वृत्तीस जो समान । त्याचे आलुमाळ करिती स्तवन । आपणासी न मने ज्याचा गुण । तयासी निंदी आपण यथेष्ट ॥ २१ ॥ विद्वज्जन पुराण वाचिती । दुसरिया देखता गर्वे बोलती । मग एक एकातें निंदिती । प्रतिवाद करिती अभिमाने ॥ २२ ॥ उत्तम देववाणी म्हणतें सस्कृत । तेची वाचण्यानें गर्ने नाडो पाहत । सभेंत ब्राम्हणातें विभ्रशित । य अभिमानें मुक्त होय कैंचा ॥ २३ ॥ ऐसेया अभिमानियाचें बोलणें । तुवा न घ्यावें अत.करणें । अर्थलाभे सुखी होणें । तरीच पावन परमार्थ ॥ २४ ॥ फणसाचिया फळावरी काटे । भीतरी अमृताचे साटे । तैसें बोलणें महाराष्ट्र परी भीतरार्थ गोमट ब्रह्मात्मक ॥ २५ ॥ जरी म्हणसी देववाणी । हीण लोकाचें बोलणी । जे वस्तु होय हीनापासुनी । ते देव ब्राम्हणी अंगिकारिजे ॥ २६ ॥ हीन माक्षिचिये पोटीं । रिघती मधाचिया खोटी । त्या प्रिये सकल सृष्टि देवद्विजा ॥ २७ ॥ कीं मृगाचिया मदापासुनी । कस्तुरी जन्म हीन स्थानीं ते ब्राह्मणीं । प्रियवतु होय ॥ २८ ॥ परिमळवृत्तिलागी साचे । मार्जाराचे वृषणाचे । चर्म घेती परी त्याचे । न पाहती हीनस्थान ॥ २९ ॥ तैसे हीन लोकाचें बोलण । ते मराठी वाचा जाण । परी अर्थपरमार्थसाधन ॥ सायामें वीण ॥ ३० ॥ तरी एके एके अभिप्रावो । निश्चतोमुखी वदता देवो । ह श्रुतिशब्दाचा अन्वयो । प्रत्यक्ष पाही ॥ ३१ ॥ तरी हे सकळीक देववाणी न्येष्ठे चैतन्यापासोनी । ह प्रिस्क्ति चे पे मर्मी । रो अभिमानी ह मूट ॥ ३२

' देववाणि देव चाळक । येराचा कवण प्रकाशक । हा पाहे पा विवेकू । हृदय

भीतरी ॥३३॥ वाच्यवाचक वचन । वाचा चाळकु श्रीनारायण । सकळही वाचा जाण । तोचि वद्‌वी ॥ ३४ ॥ या शब्दभेदामाजीं परियस । शीघ्रची पाविजे अर्थास । ते अगिकारिजे अवश्य । जाणत्यानि ॥३५॥ नाना शास्त्र घोष करिती । नाना परी वाचा कष्टविती । परी अर्था न भेदती । वेदांताच्या ॥३६॥ माया सकळ कष्टाविरहित । जो उपनिषदाचा निजार्थ । तो महाराष्ट्रिया वाणी पाविजेत। ते उत्तम कीं हीन ॥३७॥ सर्व उदीमेवीण वनिष्ट। न करिता द्रव्य पाविजे यथेष्ट। तरी तयाचे अदृष्ट। काय सामान्य गा ॥ ३८ ॥ कीं कृपि कर्मावीण । प्राप्त होय संपूर्ण धान्य । तरी तयाचिया भाग्यासमान । दुजे काय असे ॥३९॥ न करिता औषध धन्वतरि । रोगी अरोग्यता पावे शरारीं। तरि तयाचिया भाग्यास थोरी । अतिगहन की ॥ ४० ॥ का एकाएकी जाण । अधासी होते देखणे नयन । तरी तयाचे भाग्य गहन । हें काय सागणें लाग ॥४१॥ तैसे सकळ साधनावीण। महाराष्ट्र वचनेकरून । तू पावसी ब्रह्मज्ञान। तरी परम भाग्य की ॥४२॥ तरी येथे एक असे अभिप्रावो । वाणी शब्दाचा अन्वयो । नाना परी उद्भवो । होय मनुष्यमुखीं ॥४३॥ एक नवरसी झळकती । श्रोतियासारिखे अनुवादती । प्रपचिका रसाळ युक्ती । घाउनी चित्तीं मोहिती ॥४४॥ कामरस असे ज्याचे मनीं । तो शृगाररस वर्णी । तेणे सुखावती अत करणीं । परी परमार्थ ज्ञानी दुरावले ॥४५॥ श्रोतिया मनीं अद्भुत रसु । युद्धकथा परिसता उल्हासू । तो तोचि यथानकाशु । वर्णिता होय ॥४६॥ श्रोतिया चित्ती करुणा रसु । वक्ता तैसाचि दानि विलासू । तेथें परमार्थाचा ह्रासू । होय प्रकाशू प्रपचाचा ॥४७॥ म्हणोनी विषयरसिक अनुवादु । जीवासी लागला तोचि छदु । विषयरसीक सबधू । निजबोध दुरावे ॥४८॥ रसवृत्ति कळापूण । विद्याभिमाने ये अभिमान। तेचि तयासि बधन । परी परमार्थज्ञान दुरावे ॥ ४९ ॥ तरी तू ऐसे करी । साडी नवरसीक शब्द कुसरी । रिघे परमार्थाभीतरी । एकाग्र करा मनोधर्मू ॥ ५० ॥ हे एकाग्र वृत्ति परिसता। निजज्ञान होय तत्वता। मग होय पावता। निजात्मज्ञान ॥५१॥ तरी खडज्ञान भेदभ्राती । स्वानुभवज्ञाने निरसती । ज लाभे अनुभव प्राप्ती। ते कळे ऐसे ॥५२॥

— वरदनागेश, अध्याय पहिला, ओव्या ५१-१०२

## नामा पाठक

१

### अर्जून–आनीराहो मेट।

अर्जुन म्हणे प्रतीज्ञा ऐकें आता। जरी शर न तोडीसी हनुमता। तरी मी अग्नीकाष्ठें भक्षीन तत्वता। वायोसुता बोले पा ॥ १॥ मग मीं दोहीं प्रतीज्ञेसी। शरबंधन न तुटे आम्हासी। तरी मृत्य नाहीं या देहासी। राहीन तुझे ध्वजेसीं सत्य ॥ २ ॥ ऐसा पणें नेल दोघींजगीं। अर्जुने स्वेत माधवार्णी। म्या पीठ केल ततक्षेणीं। पार्थ अग्नी भक्षु पाहे ॥ ३॥ तेणें अग्नी चेतविला। श्रीहरी अतरी स्तविला। तव तेथें येक ब्राह्मण आला। आसी वाद केला वेदोक्त ॥ ४॥ तो पुसे आर्जुनासी। अग्नीकाष्टें का भक्षीसी हें समुळ साग मजपासी। मग आग्नीसी भक्षावें ॥ ५ ॥ तें ऐकोनी द्वीजाचें वचन। त्यासीं सागीतलें कथन। तो म्हणे यासी साक्षी कवण। हें प्रमाण सागा मज ॥६॥ आम्हीं म्हणों साक्ष आत्माराम। येरु म्हणे वाउगा हा श्रम हें स्थुळु देहींचें कर्म। करूनी नेम साक्षीत्व पाहिजे ॥७॥ ऐकें धर्मशास्त्रींचें वचन। याचा साक्ष असावा जाण। तें तुज सागो नेमुन। सावधान आवधारी ॥ ८ ॥ मुख्य कर्मासी साक्षे आसावा जाण। शरीरसमधी साक्ष सुह्रद सज्ज्न। युध्यीं साक्ष पक्षपाती जाण। ईतरजन साक्ष वेव्हारी ॥ ९ ॥ सत्वरुपी साक्ष आपणासमान। साक्षीवींण कार्य ते नीर्फळ जाण। आता मज साक्षे करुन। प्रत्यक्षेसी करावें ॥१०॥ हें मानलें आम्हासीं। परी तो माव करू रुसीनेसी। हे न कळे कोण्हासी। पार्थ शेरेसीं नाघे श्वेत ॥११॥ मग रूप धरीले वीशाळ उडी घातली तीन वेळा। परीं तो वज्रापरीस सबळा। अनुमात्र न ढळेची ॥ १२ ॥ जो धरी कुर्मावतारु॥ पृष्ठीं वाहिला पृथ्वीचा भारु। तो अर्जुनाचा सखा सारगधरु। वळ वीचारु तेथे न चले ॥ १३ ॥ ऐसा लाघवी श्रीहरी। मज आणिली पा हारी। तो पाडवाचा साह्यकारी। काये वानु थोरा त्याची पा ॥ १४॥ ऐकोनी अर्जुनाचा पुरुषार्थ। आनीराहो जाला वीस्मीत। म्हणें ताता

वेळे धर्म बधुसहीत भेटो आला। कृष्ण धर्मे अर्जुने नमस्कारीला। मग ह्रुदई धरुनी आलींगीला। पार्थवीरू॥ ११॥ नकुळसहदेवो केला नमस्कारू। मग जाला वेसकारू। प्रधाना म्हणे युधिष्ठिरु। आता वेगू करावा॥ १२॥ ते वेळें आणवीली उस्णोदकें। चरणक्षाळण जालें कौतुकें। टीळे गधाक्षता कर वीलीया हरीस। धर्मरायें॥ १३॥ देवाची स्तुती करीती। द्वीज वेदध्वनी उच्चारती। राये वोळगे येती। युधीष्ठीराचीया॥ १४॥ ते वेळे जाला बैस कारु। मुडे गादीयाचा परीकारु। ऐसा राव युधीष्ठीरू। बैसवीता जाला यादवासी॥ १५॥ वीडे देऊनीया सबळा। वस्त्रे आळकार परवुळा। सभा घनवटली प्रबळा। गीत नृत्य होताती॥ १६॥ अळकार वस्त्रे पाने पोफळें। आली द्रोपदी सखीयासह मेळें। राउळागणी प्रवेशीली तये वेळें। भेटी जाली सोळा सहस्त्र गोपागनासी॥ १७॥ करी आरती घेतली। द्रौपदी राउळागणी प्रवेशली। सोळासहस्त्र अतापुरा भेटली। तीहीं नमस्कारीली सकळजणी॥ १८॥ तीये नमस्कारीले सकळजणीं। देवकीये आलींगीली ह्रुदई धरुनी। सत्यभामा रुक्मिणी आदीकरुनी। अष्टैपाट महीशी आलीं गीताती॥ १९॥ रत्नखचीत आळकार। द्रौपदीये वाहाती आहेर। तो वोलीले सारगधर। द्रौपदीसी भेटे जाऊ॥ २०॥ द्रौपदी सुभद्रा सुदरा। रत्नखचित अळकारा। कृष्ण आले तया अवेस्वरा। भेटावया द्रौपदी सुभद्रेसी॥ २१॥ मदिरा आले वनमाळी। बहीणीसी भेटते जाले तये वेळी। वीजई व्हावे ऐसे बोलीली। द्रौपद बाळा॥ २२॥

— प्रसग तिसरा, ओव्या २४–४५

## सेना न्हावी

[ इ. स. चवदावें शतक ]

आजी सोनियाचा दिवस। दृष्टीं देखिलें संतास॥
जीवा सुख थोर जाहलें। माझें माहेर भेटलें॥

अवघा निरसला शीण । देखतां संतचरण ॥
आजी दिवाळी दसरा । सेना म्हणे आले घरा ॥ १ ॥

## कान्होपात्रा

[ इ. स. पंधरावें शतक ]

नको देवराया अंत पाहूं आतां । प्राण हा सर्वथा फुटों पाहे ॥
हरिणीचें पाडस व्याघ्रें धरियेलें । मजलागीं जाहलें तैसें देवा ॥
तुजविण ठाव न दिसे त्रिभुवनीं । धावें वो जननी विठाबाई ॥
मोकलोनी आस जाहले मी उदास । घेई कान्होपात्रेस हृदयांत ॥ १ ॥

पतित तूं पावना । म्हणविसी नारायणा ॥
तरि सांभाळी वचन । ब्रीद म्हणविसी जाण ॥
याती शुद्ध नाहीं भाव । दुष्ट आचरण स्वभाव ॥
मुखीं नाम नाहीं । कान्होपात्रा शरण पायीं ॥

## भानुदास

चतुर्भुज मूर्ति लावण्य रूपडें । पाहतां आवडे जीवा बहु ॥
वैजयंती माळा किरीट कुंडलें । भूषण मिरवे मकराकार ॥
कांसे सोनसळा पीतांबर पिवळा । कस्तुरीचा टिळा शोभे माथे ॥
शंख चक्र हातीं पद्म तें शोभलें । भानुदासें वंदिलें चरण कमळ ॥ १ ॥

परदेशींची वस्तु पंढरीस आली । ते दैवें पावली पुंडलिका ॥
देतां घेतां लाभ बहुतांसि झाला । बिसावा जोडला पांडुरंग ॥
न करितां सायास वस्तूची आयती । वैष्णवीं बहुति वेंटाळली ॥
भानुदास स्वामि कृपेचा सागर । विठ्ठले कल्पतरु वोळला आम्हां ॥ २ ॥

कोरडीया काष्टीं अंकुर फुटल । येणें येथें जालें विठोबाचें ॥
समर्थाचा आम्हीं धरिला आधार । तरीच सत्वर आला तेथें ॥
माझीये संकटीं आलासी धाउनी । भानुदास चरणीं लागतसे ॥ ३ ॥

जैसा उपनिषदाचा गाभा । तैसा विटेवरीं उभा ॥
अंगींचिया दिव्य प्रभा । धवळिलें विश्व ॥
उगवती या सुरज्या । नवरत्नें बाधू पूजा ॥
मुगुटी भाव पैं दुजा । उपमा नाहीं ॥
दोन्हीं कर कटीं । पीतांबर माळ गाठी ॥
माळ वैजयंती कंठीं । कौस्तुभ झळके ॥
कल्पद्रुम छत्राकार । तळीं त्रिभंगीं त्रिदार ॥
मुरली वाजवी मधुर । श्रुतीं अनुरागें ॥
वेणुचेनी गोडपणें । पवन पांगुळला तेणें ॥
तोही निर्वे एकगुणें । अमृतधारी ॥
अहो लेणियाचें लेणें । नादसुरयासि पैं उणें ॥
विश्व नेघिलें येणे । गोपाळवर्पे ।
पुंडलिकाचेनि भावें । श्री विठ्ठल येणें नावें ॥
भानुदास म्हणे दैवें । जोडलें आम्हा ॥ ४ ॥

तृण चारा चरू विसरली । पक्षी कुळें निवांत राहिलीं ॥
गाइ व्याघ्र एकेठायीं जाली ॥ वैरभाव समूळ निसरली ॥
वृंदावनिं वेणु कवणाचा माये वाजे । वेणुनाद गोवर्धनु गाजे ॥
पुच्छ पसरुनि मयोर विराजे । मज पाहातां भासती यादवराजे ॥
यमुनाजळ स्थिर स्थिर राहे । रविमंडळ चाल्तां स्तब्ध होये ॥
शेष कूर्म वराह चकित राहे । बाळा स्तन देऊं विसरली माये ॥
ध्वनी मंजुळ मंजुळ उमटवी । वाकीं रुणझुण रुणझुण वाजती ॥
देव विमानीं बैसोनि स्तुति गाती । भानुदासा फावली प्रेमभक्ती ॥ ५ ॥

## दामाजीपंत

हरहर विठ्ठल जगदुद्धार । जाहला महार मजसाठीं ॥ धृ ॥
धन्य बेदरीचा पाच्छाय । त्याचा केला म्या अन्याय ।
धान्य लुटण्याचा उपाय । झाला अपाय मजलागीं ॥ १ ॥
षड्गुणैश्वर्य श्रीभगवान् । सांडुनि देवपणाचा अभिमान ।
पायीं घालुनि तुटकी वाहाण । नेसला जीर्ण लंगोटी ॥ २ ॥
माथा बांधुनि चिंध्याभार । कांखि काबळी खांद्यावर ।
मुखानें म्हणत असे जोहार । काळा दोर निजकंठीं ॥ ३ ॥
ऐसे केलें कैसे देवा । माझ्या सुकृताचा ठेवा ।
महार जालासी माधवा । लाविला बगवा मजसाठीं ॥ ४ ॥
ज्याचें धान्य लुटिलें जाण । तो तरि घेता माझा प्राण ।
दामा म्हणे गुणनिधान । झाला महार जगजेठी ॥५॥

## गुणदास

### राजपुत्र श्रेणिक बौद्धधर्म स्वीकारतो

मग श्रेणिकु म्हणे मामा । चाला जाउ तुमचा ग्रामा । वेनातट दाखवा आम्हा– । कारणे देखा ॥ १ ॥ ऐसे म्हणोनि दोघे निघाले । मग ग्रामा येरासि आले । मग ते भुकेले जाले । तिये वेले ॥ २ ॥ मग श्रेणिक महाराजे । म्हणति मामा जेवण किजे । पडि येथि विश्रामु घेइजे । मग पुढा जाउ ॥ ३ ॥ मग श्रेष्टि म्हणे कुवरा । मज खर्चीया नाहि पोलरा । कैसे भोजन किजे सुदरा । ते सांगिजो पा ॥ ४ ॥ कुवरु म्हणे उपावो कीजे । या गांवामध्य जाइजे । मग भोजन मागिजे । बुधिवले ॥ ५ ॥ मग कुवरु गावातु गला । तो ब्राह्मणे येतु देखिला । मग म्हणाति मला । हा रजपुत देखा ॥ ६ ॥ तिये गाविचे धनि ब्राह्मन । ते माहालेमि कृपन । पारि नैसले अववे येउन । मोक्ला वेसि ॥७॥

येकें फेले पुंडलिक दिळे । तुलसिगाठि भरिले गळे । येक ते पदति जिव्हाग्रळे वेदशास्त्र देखा ॥ ८ ॥ एक म्हणवित अजाणि । येक मरताति गामिमाणि । येक म्हणविति अध्यायेनि । पाठक देखा ॥ ९ ॥ येक म्हणविति उपाध्ये । एक आचार्य भट सुधे । येसे देखिले तेणें विबुधें । कुंवरे देखा ॥ १० ॥ त्याप्रति श्रेणिकु माहा राजे । सवदु घातला भोजनाकाजे । आम्हि चोलगुरायाचे चोजे । आम्हा जेउ घाला ॥ ११ ॥ तव ब्राह्मण बोलते जाले । या गावि करभार वर्जिले । येथ भोजन नाहि दिधले । हा ईनाम गांउ ॥ १२ ॥ तंव कुंवरु कोपिनला । मग ब्राह्मनाप्रति म्हणे भला । मि राजपुत्र भुकेला आला । तुम्हाजवळ ॥ १३ ॥ तुम्हि ब्राह्मनजाति भिकारि । दया नाहि तुमन्चा शरिरि । तुम्हि कठिण अभ्यंतरि । पाषाण जैसे ॥ १४ ॥ येसे म्हणौनि निघाला । बौधसालेपुढें उभा ठेला । मग तेणे बौधे बोलाविला । महंते नावें ॥ १५ ॥ मगधदेसिचे राजे हो । आंतीं तुम्हि साउमे या हो । कुंवरु म्हनतसे पाहा हो कर्मगति आम्हा ॥ १६ ॥ कवणि ठांदचा कवणु मि । देशांतरें काढिलें कर्मि । बापे नेमिलि अधर्मि । राज्याकारणें ॥ १७ ॥ मग बोधु पैज बोले । जरि तुज राज्य जालें । तरि आमते तुवा भलें । मानावें देखा ॥ १८ ॥ मग कुवरु आनंदें निर्भरु । मग वंदिला बौधगुरु । बौध धर्माचा अंगिकारु । केला तेनें ॥ १९ ॥

— श्रेणिकचरित्र, ओव्या ३४२–३६०

## श्रीगोविंदराज गुरुवल्लाळ

### श्रीमूर्तिचें मानसपूजन

तेणें स्मरणें आकर्षिली । श्रीमूर्ति पुढा उभी जाली । मग तेनें आसनीं बसविली । अनुतापाचिया ॥ १ ॥ आवडीचेनि उचंबळे । नेत्रजल हेलावले । तेणें उष्णोदकें केले । चरणक्षालन ॥ २ ॥ ते षट्कर्म टाकिले झाडौनि । विकारविकल्पाचे संमार्जन करौनि । मग कामक्रोध वाटौनि । भरलिया रंग-मालिका ॥ ३ ॥ घांसौनि चतुष्टयें परेशू । जे उगाळिताती कस्तूरीचा वासू ।

ते तपचदन परेशू। अर्चिले आपलेनि करें ॥ ४ ॥ मोगर्या चापेकळी। याहुनी परिमळी। मनसुमनें ओळगविली। श्रीदेवराशासी ॥ ५ ॥ श्रीकंठीं कंठमाळा निरंतर। गळा गळदंडा इातसर। आवडीसहित अनुरागदोर। गुफौनि ओळगविली ॥ ६ ॥ नुल्लाळे चतुराननें। उचलौनि आणिले धुपटनें। काळा साधौनि यत्नीं धरिले तेनें। तो काडार सागैन आता ॥ ७ ॥ सात रंग चौदा उथाळी। बाहातर ओवरिया एक्वीस पाननळी। तेथ बाहुले रेखिले तळीं। कुमर उमेशंकराचा ॥ ८ ॥ नाना परिचे प्रकारू। सात रंगी आसीमसाहासु। चहु वेदाचे अग्रू। तेथ वेली रखिल्या ॥ ९ ॥ तेतीस कोडीसहित इंद्र। उमेसहित ब्रह्मरुद्र। परिवारेसहित फनेन्द्र। देखिले रंगोरंगी ॥ १० ॥ दहा दहा झल्लुबके पाच खानी। वरिला रंगी दोनदोनी। वागवावया गुण तिन्ही। एकवटले ॥ ११ ॥ नव जालधरी तेया। केली धू कोंडैल तो जावया। तेथ आगारा घालौनिया। विरहाग्नीचा ॥ १२ ॥ तेथ कनकपरियेल भावाचा। रत्नदीपु उजळिला जीवाचा। मग ओवाळिला स्वामि विस्वाचा। दोहीं करीं ॥ १३ ॥ अनुसरण विडा ओळगौनि। जीवें लिंब्रलोण उतरौनि। स्मरण विस्तारौनि। घाली दंडवते ॥ १४ ॥

—भक्तिप्रबोध, ओव्या २६७–२८०

## कृष्णमुनीश्वर

### ऐसे ब्रह्माडज्ञान सपूर्ण

तरी हा ब्रह्माडगोलकु। तुज निरोपिला एकु। अनंत ब्रह्माडे चैतन्य देसकु। रची सहारी माझिये इच्छे ॥ १ ॥ माझेनि शनें पाहाता। सकल फलें नासीवतु गा भारता। भक्ताकारणें फळदाता। अविनाशु मी एकु ॥ २ ॥ माझी ब्रह्मविद्या जाणौन। जे मज रीगती शरण। तेयाचे अवघे भवभ्रमण। चुक्वीन मीं ॥ ३ ॥ ऐसी परविद्या सारु। नियडवेया ब्रह्मविद्या थोरू। ते सकळा अंत परु। बोलिजे गा ॥ ४ ॥ चतुर्वेदें नेति नेति मातें निरुतें। येरु

शास्त्र आगममतें। पुराणादि ठाकैलें आसते। ते चेचीं मातें जाणती ॥ ५ ॥ षट्शास्त्र सा दर्शनें। भाराविली अन्यथाज्ञानें। आणि अष्टादश पुराण। माझा नेणती मार्गु ॥ ६ ॥ ऐसा आले अपरापरू। कव्हणीच नेणती माझा पारू। तो मी घेचौनि अवतारु। तारी जीवजातासी ॥ ७ ॥ मज भक्तावाचौनि। सखा नाहींचि गा कव्हनीं। तरी मज शयनासर्नी भोजनीं। विसरों नको ॥ ८ ॥ एसा हा ब्रह्माइगोल्कु। सिद्धि पावला गा सद्विवेकु। मनुशताधिकाद्विज प्रमोदें निकु। मृगशीर्ष रात्रेसी ॥ ९ ॥ जो पार्था बोध करी सर्वेश्वरु। तेया नावें कवीकीकरु कविकुळी दिक्षेसी निरधारु। परियसा बुधजनो ॥ १० ॥ ऐसे ब्रह्माडज्ञान सपूर्ण बोल्लविया हेचि कारण। जे निरसावे अज्ञान। म्हणौनिया ॥ ११ ॥

—ब्रह्माडगोल्क (इ स १५१०), ओव्या २३५–२४५

## कामराज

### सुदर्शन–विवाह

आता अधीकारु दुसरा। अजितनाथ तीर्थंकरा। शास्त्र करी सा गनधरा। त्या नमन माझ ॥ १ ॥ दुसरी नमीन सारजा (दा)। मी पुत्र वो तुझा। प्रसन होई वो आत्माजा। माये माझीये ॥ २ ॥ ब्रह्म जिनदासे घातला धडा। तो मज आधारु जाला कुडा। मी अलाबुधि न बोनडा। त्या नमन माझ ॥ ३ ॥ आता वऱ्हाडाची आइका परी। सायरदत्ता करीता जरी। गला रुपभदासाघरी। ते परीयेसा पै ॥ ४ ॥ ते व्हेळी सायरदत्ते देखील। रुपभदास हरीखेला। सिंहासनीं वैसवीला। आन्देसी देखा ॥ ५ ॥ सायरसेटी बोल्तु। सुदरानु तुम्हा पुत्रु। कन्या मागावि तवरी तु। मनारमा पै ॥ ६ ॥ ऐसे आयकोनीया वचनें। थोर आनदला जी मर्न। आता बोलावा कासजने। वाजवासी ॥ ७ ॥ रुशभदास होट बोल्ता। तुला सायरदत्त पै श्रुता। थोर जालासी क्रुपा करीता। आवरी मी ॥ ८ ॥ दुवलीया सापडे निधानु। अधकारु फेडावया

मानु । तैस जोडीलासी सजनु । आम्हालागी ॥ ९ ॥ तु भला जी सोइरा ।। आलासी टाकुनी घरा । सुदर्शनु नवरा । करावया जी ॥ १० ॥ तुम्हासारीखा इन्ही । दैवें जोडीला पाही । अनलगे करन कांहि । आम्हालासी ॥११॥ धन्य धन्य आमचे । यने जाले जी तुमचे । भाग्ये सुदर्शनाचे । मोटे जी देखा ॥ १२ ॥ ऐसी वचनी संतोसीला । वस्त्रे अलंकारे पुजीला । मग सोइरीकें नीघाला । आनंदेसी ॥ १३ ॥ आनंदे वाजतीं भेरी । सवे चालती सारी । सायरदत्ताचे घरी । गेल देखा ॥ १४ ॥ करीताती तांबोलवीडी । कापुरें देताती पान विडी । भली केली परवडी । बरवी या परी ॥ १५ ॥ यरें मागुती वोपीली वस्त्रें । तेनें संतोसीली समस्ते । लग्न घेतले सुमुहुर्ते । बरवें भी देखा ॥ १६ ॥ ऐसी केली होती भार्सी । दान दीधले याचकासी । आले जिनभुवनासी । देवपुजालागी ॥ १७ ॥ प्रथमारंभी धर्म करने । मग शुभकार्य मांडने । तेने हरतील विघ्ने । सकलै देखा ॥ १८ ॥ इतुकाजि अवेस्वरी । मंडप घातला कुसरी । वाले ताटीयावरी । सेववीला देखा ॥ १९ ॥ दवने मोगरे केतकी । जाईजुई मालती । चापे परीमलति । सुगंध पैं ॥ २० ॥ दीव्य प्रज्वलती लांबी । ठाइठाइ नाचती नाटरंभी । गुढी पां लहकती घरुंबी । वारुवासी देखा ॥ २१ ॥ मंडपी सोभे तोरने । नोवरीया बांधले कंकने । सोइरीया आमंत्रन । मुळे केले ॥ २२ ॥ ऐसी मंडपासी रचना । मिलोनी बहुता सजना । शडुरसे पक्वान । परवडी देखा ॥ २३ ॥ उदकें भरोनीया घागरी । ठेवीलीया घडोचीयावरी । कापुरे घोळोनीया परी । वावरताती ॥ २४ ॥ कापुरे भीजोनिया फोडी । सफारे देती पानविडी । ऐसीया परवडी । ते करीते जाले ॥ २५ ॥ अगर कर्पुर केदार । सुगंधद्रव्य बहुता परी । सीपीताती परोपरी । यकमेकाते ॥ २६ ॥ बरवीया करीती न्हानवरी । दोघे मिलोनि सवंगडी । थोर केलीया परवडी । सकलिका पै ॥ २७ ॥ ऐसी या जेवनावरी । केलीया सकलीका णगरी । मग फीरवीली नोवरा नवरी । आनंदेसी पै ॥ २८ ॥ सकलीके वाझंत्रे वाजती । धवल मंगल गीत गाती । मग नवरा शृंगारती । बहुतापरीसी ॥ २९ ॥ दोल गुढीया छेत्रे । सोभीती विचीत्रे । मखरे सोडवीले पवित्रे । वोपीली जी ॥ ३० ॥ सुदर्शनु जी नोवरा । आरुढ झाला हयवरा । बहुता जी नवरा । वेढीतु देखा ॥ ३१ ॥ कनकदंड ढळती चवरे । वाजंत्रे वाजती गुजरे ।

सुदर्शनु दीसे साजिरे । कामदेवो जैसा ॥३२ ॥ सर्वांगी घेतली उटी । चाडींग मीरवे ल्लहाटी । हिरे झळकती मुगुटी । जातिवत पै ॥ ३३ ॥ थोर पुष्पाचीया माला । तीइमाजि दीसे झळाळा । उत्तम नेसली पाटोला । मीरवतुसे देखा ॥ ३४ ॥ उद उधळीती उळनी । पृथ्वी सींपीताती जीवनी । धवल गाती सोवासीनी । नानाविध पै ॥ ३५ ॥ ऐसी या जी परी । सागता असे थोरी । सायरदत्ताघरी । पावले देखा ॥ ३६ ॥ ऐसे दृष्टात जानोनी । मनोरमा जी शृंगार करोनी । अतर पटाका धरुनी । म्हनती सावधान ॥ ३७ ॥ जे बोलिले असे शास्त्रि । श्रीवे नाचा स्तरी । लग्न तैसीयापरी । लाविय़ले देखा ॥ ३८ ॥ शास्त्रोक्त लावीले लग्न । मग पुजील सर्वज्ञ । याचका दीधले दान । मनविछीत देखा ॥ ३९ ॥ वस्त्रे अलकार भुसने । सकर्‍हीका झाली भोजने । तेने सतोसीली सजने । थोर जी देखा ॥ ४० ॥ ते न्हेली म्हने रुशमदासु । तु जोडलासी सोइरा सुरसु । मनोरथ पुर्विले सर्वसु । थोर जी देखा ॥ ४१ ॥ ऐसे वचने सतोसील्ग । थोर सुखाते पावल्ग । घरा घेउनीया आला । नीजमदिरा ॥ ४२ ॥ ते न्हेली पुरली आस । सुख भोगीता सर्वस । मातापीतीया सतोस । थोर जी देखा ॥ ४३ ॥

— सुदर्शनचरित्र, ओव्या १२५–१६७

## पंडित मेघा

### १

### जसोधर व अमृतादेवी

मग ब्रह्म म्हणे मारुदत्ता । त्वा होवावे येकचित्ता । माझ्या चरित्राची वार्ता । सांघेन देखा ॥ १ ॥ राया माल्न देशामीतरि । उज्जनी नाम नगरी । तेथे रावो राज्य करी । जसोधर नाम ॥ २ ॥ तो सकल कलाचा भडारु । प्रजापालकु सुखाकारु । वैरीयासी गजनेदारु । न्यायवतु देखा ॥ ३ ॥

त्या चंद्रमति पटराणी । हंसगमना चंद्रवदनी । चक्षु चकिताय हरिणी । तैसी दिसे ॥ ४ ॥ मग राणी आणि राजा । जैन धर्म करिती वोजा । पुण्य जोडिती पै काजा । परत्राच्या देखा ॥ ५ ॥ कीत्याका दिवसा उपरि । ते चंद्रमतीच्या उदरीं । गर्भु उपजला सुपरि । सुक्रीता फल्ली ॥ ६ ॥ जे डोहले उपजले । हरिखेंसी राये पुरविलें । सुख भोगिता पुरे झाले । नवमास देखा ॥७॥ मग तीय जाला कुमरु । रूपे पाहता मनोहरु । सुख जैसें कुमुदाकारु । तैसे दिसे ॥ ८ ॥ मग बाल क्रीडा करितु । मायबापा सुख दावितु । दिनदिन प्रति वर्धतु । बीज चंद्र जैसा ॥ ९ ॥ नाव ठेविले जसोधरु । नानाविद्याभ्यासचतुरु । यौवनभरमनोहरु । जाला देखा ॥ १० ॥ मग इतुका अवसरी । वीट देशाभीतरि । विमलवाहण सुपरि । राज्य भोगितु ॥ ११ ॥ त्याची सकलकारणी । रूपलावण्याची राणी । भर्तारचित्तगामिनी । सौभाग्यवती ॥ १२ ॥ त्या दोघाच्या उदरीं । जन्मली येकी कुवरी । रूपसौभाग्य मनोहरी । जैसी देवकन्या ॥१३॥ नाव ठेविले अमृता । मग जाली यौवनभरिता । बापासी पडली चिंता । पाणि ग्रहणाची ॥ १४ ॥ मग जसोधराकारणें । कुवरीसी आलें मागणें । विचारुणी रावो म्हणे । आम्ही निश्चो देउणी ॥ १५ ॥ मग विवाह घडला । महोछवेंसी विवाह केला । जसोधरु परनुनु आला । अमृतादेवी ॥ १६ ॥ मग अमृता आदिकरुणि धरिल्या पाचसे राणी । ब्रह्म म्हणे पुण्येकरुणि । परियेसी राया ॥ १७ ॥ अमृता आणि जसोधरा । प्रीति उपजली त्या सुंदरा । सुख भोगिता संसारा । दोघेजणें ॥ १८ ॥ ऐस्यापरि सुख भोगिता । काळु जाय धर्मु करिता । ब्रह्म म्हणे मारुदत्ता । परियसे पा ॥ १९ ॥ जसोध जो माझा पिता । आरिसा मुख पाहाता । पलित देखौनि महता । वैराग्य जालें ॥ २० ॥ संसारु जाणौनि अथिरु । मज दिधला राज्यभारु । आपुणु जाला दिगंबरु । स्वधर्मु घेउनु ॥ २१ ॥ मग राज्य आलें माझा करीं । गजअश्वादि लक्ष्मी उदरीं । पुत्रु जाला सुपरि । जसोमति नाम ॥ २२ ॥ तो रूपसौभाग्ये आगळा । विद्याचे निधि निर्मला । वृद्धि करि चंद्रकला । तैसा दिसे ॥ २३ ॥ मग जाला यौवनवंत । कुवरी वरिल्या बहुत । ऐसे आम्ही राज्य भोगत । न्यायमार्गे पै ॥ २४ ॥ एकवेळा रावो जसोधरु । सभे बैसला मनोहरु । चिंतितुसे मनोहरु । अमृतेचे रूप ॥ २५ ॥ मग म्हणे मनाभीतरीं । धन्य मी येणे ससारीं । अमृतादेवी

माझा घरीं । पट्टराणी ॥ २६ ॥ ते रूपलावण्याची खाणी । बोल्तसे अमृतवाणी । माझ्या मनाची स्वामिणी । जाणनी असे ॥ २७ ॥ तरी मी आता ऐसे करु । जसोमति देउनु राज्यभारु । सुख भोगु म्हणे जसोधरु । अमृतेसी ॥ २८ ॥ जव ऐसे चिंतितु रावो । तव उपजला कामदाहो । आला दिनकराचा सेवो । मग रात्रि जाली ॥ २९ ॥ मागिल वेला दिनकरु । उगवला पैं निशाकरु । परिवारें केला जोहारु । विसर्जली सभा ॥ ३० ॥

—जसोधररास, अधिकारु दुसरा, ओव्या १९५–२२४

## २

### ग्रंथसमाप्ति

आता स्वर्गसुखाची वेवस्था । सांगता वाढैल कथा । तें जाणावें येरा ग्रंथा । बोलिलें असे ॥ १ ॥ या कारणें भव्य जीवीं । सर्वदा दया पालावी । ते कर्में टाळावी । जेणें हिंसा घडे ॥ २ ॥ आपुल्या हातीं न कीजे । पुढील करीं न करविजे । करिता देखोनि नानिजे । हरिखु मनीं ॥ ३ ॥ हिंसा सबदु न बोलिजे । पुढिलाचा मुखीं न बोलविजे । बोल्ता देखौनि नानिजे । हरिखु मना ॥ ४ ॥ हिंसा कर्मु न चितवावें । आणि पुढील चिंतु न द्यावें । चिंतिति त्यावरि नानावें । हित चित्तीं ॥ ५ ॥ जीउ मारिता पाप उपजे । न मारिजे न मारविजे । मारता देखौनि नानिजे । हरिखु मनीं ॥६॥ आपुण दया पाळिजे । पुढील करवीं पाळविजे । पाळी त्यावरि आणिजे । हरिखुभावा ॥ ७ ॥ पुन्य होये जीउ पाळिता । पाप होय जीउ मारिता । पापपुन्याची वेवस्ता । या दोघा मार्गी ॥ ८ ॥ जे आइकति श्रोतेजन । त्यासि जाणवे पापपुन्य । फेडे ज्या अज्ञान । इये कथचें ॥ ९ ॥ जव हातीं पाप संपत्ति । जसोधरु आणि चंद्रमति । तव पावले जे गति । तें कथिजे यथ ॥ १० ॥ त्या दोघा जिये वेळे । धर्म पावले निर्मळे । त्यावरि जाले सोहळे । तें कथिजे यथ ॥ ११ ॥ मारदत्त आणि चंडमारि । अभयमति आणि ता भिकारि । पाप हातें जवनरि त्याच्या घेरा ॥ १२ ॥ तवनार त्याच्या मना । वर्तली दुष्ट वासना । ते लागले

धर्मध्याना। जेव्हा पावले पुन्य ॥ १३ ॥ जरि धन्य धन्य जिनशासन। ज्या-मार्जी ऐसे कथन। वोळखीजे पापपुन्य। ज्याचेनि बळे ॥ १४ ॥ नेनु मी मन्हाटे बोलणें। नेणु वोवीचे बंधनें। अक्षर होय अधिकउणें। तें नैनेंव मज ॥ १५ ॥ जे असेल थलवित गलले। वोवीसी झडप असे गेले। ते शोधावें वहिलें। ज्ञानवतें पैं ॥ १६ ॥ हा कथे सागडा सागरु। एकुवाचौनि जिनवरु। आणिकु पावे पारु। ऐसा नाहीं कोण्ही ॥ १७ ॥ तरी मी अज्ञानु कैसे। कथन केले जैसे तैसे। भक्ति घडेल ऐसें। म्हणोनि रपा ॥ १८ ॥ जो ब्रह्मचारि साति पासु। तेणें मज साहासु। केला कथेचा प्रकासु। मेघा म्हणे ॥ १९ ॥

— जसोधररास, अधिकार पाचवा, ओव्या ११४६–६४

## आचार्य गुणकीर्ति

### धर्माचे माहात्म्य

बुडता संसार सागरि। वेगवत्तर धर्म उधारि। निर्वाणि कर्मावेगळा करि। जिव देखा ॥ १ ॥ धर्मे सुभगति पाविजे। या धर्मि चित्त लाविजे। अचल स्थानक पाविजे। धर्मफले ॥ २ ॥ धर्मु जाणावा दाहा लक्षणि। दृढ पाळावा निजमनि। प्रथम उत्तम क्षमा जाणि। दुजे मार्दव पैं ॥ ३ ॥ आर्जव सत्य सौच सयमु। तप त्याग आकिंचन धर्मु। ब्रह्मचर्य महाधर्मु। जाणिजे पैं ॥ ४ ॥ येन दाहा लक्षणि साधिजे। दृढ सुभ कर्म बाधिजे। मग जे जे मनि चिंतिजे। ते ते घडे देखा ॥ ५ ॥ हे जिउ नरकपाताळि। पडल्या धर्मु सामाळि। उद्धरण नैसवि निराळि। परमपदि ॥ ६ ॥ तरि सुक्लपदाचा दाता। स्वर्गलक्ष्मीयेचा पिता। धर्मु सकल पदार्था। साधन देखा ॥ ७ ॥ या जिवा धर्मु साहाकारि। आलेया विघ्नाते वारि। जो पापा सागडा वैरि। तो जवळा न ये ॥ ८ ॥ या धर्मिष्टा जिवा कारणें। मुक्ति वनिते सामोरे येणे। जैसि पतिव्रता सुमने। भर्तारांप्रति ॥ ९ ॥ जो प्राणिया सुष्टधर्मि। स्वप्नातरि नव्हे

अकर्मि । त्याचां घरि अनेक लक्ष्मी । सहजे उपजे ॥ १० ॥ जे सदा धर्मु करिती । त्रिकरण सुद्ध भावे भक्ति । रत्नत्रय क्षमा प्रति । साधिति जे ॥ ११ ॥ जे जे माहासमरथ । ते ते पुरति मनोरथ । धर्मांचे फले जथातथा । पद पाविजे ॥ १२ ॥ बरवे गोमटे सुंदर । त्रैलोक्य सौख्य मनोहर । अवलिळे परिकर । याकति देखा ॥ १३ ॥ या धर्मिष्टा जिवा काहि । कोन्हा वस्तुसि वाणि नाहि । सकल पदार्थु पाहि । धर्मफले ॥ १४ ॥ धन्य जन्म त्या प्राणियांचे । दुर्लभ मनुष्य जन्माचे । जे विधान करिति धर्मांचे । सुफलफले ॥ १५ ॥ धन्य ते आयुष्य निरंतर । धन्य ते कुल सुदर । धन्य ते जाति परिकर । जेयें धर्मु किजे ॥ १६ ॥ धर्मेविन वृथा जिणें । धर्मेविण निरय जाणे । परिभ्रमण करणे । ऐसें धर्मेविण ॥ १७ ॥ जरि जिणे धर्मेविण गेले । ते मानव जिताजि मेले । इये वसुंभरे वोझें जाले । धर्मेविण देखा ॥ १८ ॥ जे धर्मे संयुक्त मरणे । ते जुगाच्या कोडी जिणे । धर्मेविण अवतरणे । कदापि न चुके ॥ १९ ॥ बहुत काय बोलु वाग्जाल । अनंत या धर्मांचे फल । ऐसे जाणुनि सकल । धर्मु साधा ॥ २० ॥

—पद्मपुराण, ओव्या ३४३–३६२

## कृष्णदास

[ इ. स. सोळावें शतक ]

### आतां परिएसा श्रीकृष्णकथा गहन

श्री परेशाय नमः ॥ जयजय श्रीचक्रधराय नमोनमः ॥ श्रीचक्रपाणि विभु परात्परब्रह्मा ॥ परात्पर परमेश्वरा ॥ जय परं पुरुषा ॥ १ ॥ परावरदानी परा पुरुषोत्तमा । जयजय सर्व जीवोद्धरणा । कृपासिंधु श्रीचक्रधराय नमो ॥ २ ॥ स्वस्ति श्री भागवती कथा उद्धारण । शुभमंगलकारण । रुक्मिणीसैवरू श्रीकृष्ण-स्तुतिस्तवन । गुणकीर्तन पढतां श्रुणतां शुभदायक सकल तिमिर निवारण । शुभ मंगलमस्तु श्रीकृष्णाय नमस्तु नमः ॥ ३ ॥

जयजय अगाधा अनंता आपारा । जयजय परब्रह्मा परात्परा । जयजय सर्व जींवोद्धारणा श्रीचक्रधरा । नमो आदिपुरुषा ॥ १ ॥ फेडावेया सृष्टीचा भारु । जेणें यदुकुळीं केला अवतारु । तो वंदू कृपेचा सागरु । श्रीकृष्णरावो ॥ २ ॥ जेणें पवित्र केली द्वारावती । जींतु उद्धरिले देशा नाहीं मिती । आणि विद्यामार्ग प्रकटिले क्षितीं । तेया नमो सर्वेश्वरा ॥ ३ ॥ जो अगाधु न कळे वेदश्रुती । तो आत्मारामु होउनी क्रीडे क्षितीं । तेया साष्टांगीं कैवल्यपती । श्रीप्रभुराया ॥ ४ ॥ जेणें उभयशक्ति स्विकरूनी । जींवा केली ज्ञानप्रेमाची धवधनी । तो करुणाकर आर्तादानी । वंदू श्रीचक्रधरु ॥५॥ आता वंदू अत्रि अनुसुयाचेया सुता । जो आर्तादानी सर्व सिद्धीचा दाता । तेया साष्टांगीं श्रीदत्ता नमन माझें ॥ ६ ॥ सकळ विद्या देवतागण । अखंड वोळगती जयाचे चरण । तया साष्टांगीं नमन । श्रीदत्तात्रेया ॥ ७ ॥ जे शब्दब्रह्मींची कुळेश्वरी स्वामिनी । ते ब्रह्मविद्या लुठताये जेयाच्या चरणीं । तेया श्रीदत्तालागौनि । नमन माझें ॥ ८ ॥ ऐसा वंदू तो श्रीदत्तात्रेयदेवो । तो शब्दब्रह्मीं बोलता पढो नेदी संदेहो । आणि फेडी अज्ञानतमाचा ठावो । परानंद करुणा तो ॥ ९ ॥ आता वर्णावया श्रीकृष्णकथा । मज वाक्सिद्धी देयी जी श्रीदत्ता । आर्तदानी अनाथनाथा । देवदेवा ॥ १० ॥ जी तू जरी होसी प्रसन्नु । तरी मुक्येया जोडे सारस्वातज्ञानु । आणि अंधु देखती निधानु । गुप्त पाताळींचें ॥ ११ ॥ तरी आता मज होइ जी प्रसन्न । देइ अवलीळामतिज्ञान । करावेया कृष्णकथावर्णन । देईं वाक्सिद्धी ॥ १२ ॥ मग प्रसन्न जाले दत्तात्रेय देवो । दीधला ताबुळ दान पसावो । म्हणे आता वर्णी रे श्रीकृष्णरावो । साचे रुक्मिणीसैंवरू ॥ १३ ॥ आता नमीन श्रीगुरु कर जोडौनि । जेहीं दाविला देवो श्रीचक्रपाणि । तया लागौनि काइसेन हीं । नव्हे उत्तीर्ण ॥ १४ ॥ आता नमीन कवी ब्रह्मादिका समस्त । जे वीतराग ज्ञानी जे कृष्णदासु । तेयासी साष्टांग प्रणिपातु । केला मिया ॥ १५ ॥ आता परिएसा श्रीकृष्णकथा गहन । जे आइकता निवारे जन्ममरण । आणि सर्व किल्मिषा करी क्षालन । श्रवणमात्रें ॥ १६ ॥ पुराणामाजि भागवत थोर । तयामाजि रुक्मिणीसैंवरकथासार । तें आता आइकत श्रोते नर । अवधान देउनी ॥ १७ ॥ हे शब्दब्रह्ममुद्रिका नवावर्त । तेयावरी वेदपुराण रत्नें समस्त । तयामाजी माणिक तें भागवत ।

उत्तम कृष्णकथा ॥ १८ ॥ तेया माणिकामाजि निल पडरर । तैसे श्रीभागवतीं रुक्मिणीसेंवर । उत्तम पवित्र परिकर । दुर्लभ तिहीं लोकीं ॥ १९ ॥ हें आइ कता रुक्मिणीसवर । सर्व सिद्धी पावती नारा नर । आणि रोग दोष नासती थोर । जे जोडिले कल्पातीचें ॥ २० ॥ आणि निपुनिका पुत्र होती । निर्धना होय धनसपत्ती । आणि इच्छिलें मनोरथ पुरती । सकळ जनाच ॥ २१ ॥ विसाराची महाविखे हरती । जोडीले अपमृत्यू चूकती । आणि पुढिलें महा विघ्नें लोटती । हे आइकता कृष्णकथा ॥ २२ ॥ पढता वाचा जन्म होईल सुफळ । आणि आइकता रोग दोख नासती सकळ । सेरी पद पावती वेवळ । श्रीकृष्णगती ॥ २३ ॥ का जे ये ग्रथीं अधिपती । आपण कथानायकु श्रीकृष्ण चक्रवर्ति । म्हणौनि महापातक भगा जाती । हे आइकता श्रीकृष्ण कथा ॥ २४ ॥ जरी म्हणाल कथे दिधली वाउगी महती । तरी तुम्हां सांगैन दृष्टाती । जया जया जालीया प्रतीती । तीया आइका पा ॥ २५ ॥ हेचि श्रीकृष्णकथा भागवतीं । शुक हरिवरीं सागितली परिक्षिती । तं आइकता त्या जाली मुक्ती । सत अहोरात्रामाजि ॥ २६ ॥ आणि हेचि कथा चाल्ता भारत । जयमुनीचे कुष्ट गेले निभ्रात । अठरा हत्या फिटलीया त्वरित । जन्मेजयाचिया ॥ २७ ॥ आणि हीच कथा आइकिली मदोदरी । तीचे कुष्ट गेले जे होते मुरारी । म्हणौनि एका श्लोकाची थोरी । श्रीकृष्ण वाग्गती ॥ २८ ॥ आणि दारी पहिली राजसुयर्ही । त अपमानिले भीष्म नारदमुनी । त परसपर जाले तत्क्षणीं । श्रीकृष्णें उठविली ॥ २९ ॥ आणि आइका रितुध्वजाची राणी । मदलेसे पान लागले पाताळभुवनीं । तीयेसी काइसेन नव्हे धावनी । त्रैलोक्यामाजि ॥ ३० ॥ ते व्हेळी कमळ स्वेतरु दोघीजणी । श्रीकृष्णनाम घेती झाडनी । तेणे मदेलसा जाली तत्क्षणीं । हरली माहाविखे ॥ ३१ ॥ म्हणौनि ही कृष्णकथा नारदमुनी । स्वर्गी वाखाणीती इद्रभुवनी । आणि कैलास सत्यलोकस्थानी । पढती हरिहर ब्रह्मादिक ॥ ३२ ॥ आणि हीच कथा क्षीरसागरीं । शेष सहस्रमुखें स्तुति करी । तें आइकुनी लक्ष्मीयेसी अगधारीं । वेधु उपनला ॥ ३३ ॥ ऐसी त्रिभुवना कथा पावन । स्तविताती श्रीकृष्णकथा गहन । ब्रह्मादिक ऋषी सुरगण । मानव आदिकरूनी ॥ ३४ ॥ सर्व तीर्थ क्षेत्र व्रत दान । हे अवघाचि श्रीकृष्णकथा गहन । जैस का अमृत

आस्वादन । पार्वी सकळ रसे ॥ ३५ ॥ जेसे सर्व तीर्थ समुद्रस्थानीं । कीं सकळ रस अमृतस्वादनीं । तैसी श्रीकृष्णकथाश्रवणीं । होती सर्व पुण्यफळें ॥ ३६ ॥ आइका जे गगातीर्थ शिरोमणी । ते असे सदा श्रीकृष्णाचा चरणीं । तेचि ब्रह्मा वाहे कमडलु घालौनि । महेशें धरिली शिरीं ॥ ३७ ॥ तो श्रीकृष्ण सर्व तीर्थांचा रायो । तया वर्णिता महापातका होय क्षयो । म्हणौनि त्रिभुवना वालागितायें देवो । मुरारी पवित्रपणें ॥ ३८ ॥ ऐसा हा तरावेया भवसागरू । श्रीभागवतकथा मोक्षाचें तारू । जीवासी उतरी पैलपारू । जे श्रीकृष्णपदासि ॥ ३९ ॥ ऐसें पवित्र परिकर । श्रीकृष्णकथा रुक्मिणीस्वैंवर । तें आइकतु श्रोते नारी नर । दत्त चित्त देउनिया ॥ ४० ॥ मागा व्यासादिकीं मुनी । कथा बोलिली संस्कृत वाणी । ती आता म-हाठिया करौनि । सांघीजताये ॥ ४१ ॥ अपभ्रंशी पिशाची जाणी । मागधी आणि सुरसेनी । संस्कृत प्राकृत या षड्वाणी । आणिकी छपन्न भाषा ॥ ४२ ॥ या भाषाचे पाकविस्तार । करावेया येकी म-हाटि चतुर । तीयेचेनि प्रसादें जाणिजति विचार । सर्व भाषाचे ॥ ४३ ॥ म्हणौनि संस्कृताची टीका । म-हाटि म्हणिजताए आइका । जैसी हेमाची मुद्रिका । वरी गरुड पाचु ॥ ४४ ॥ तैसी छपन्न भाषाचे मुगुटीं । शोभे सुहावी सुदर म-हाटि । आणि संस्कृता वाढविलें पोटीं । वागवी करीं धरौनी ॥ ४५ ॥ जैसी स्नेहाळु जननी । अपत्या वागवी करीं धरौनी । तैशी षट्भाषा लागौनी । व्यापारवितुसे ॥ ४६ ॥ येणें श्रोते कोपती क्षणी । म्हणती संस्कृत तव देववाणी । तियेसी उपमा का रे सानी । दिधली तुवा ॥ ४७ ॥ तरि एकु सांघैन परिहारू । आइका करौनि विचारू । हा सहजचि शब्दनिर्धारू । घग्ना ऐसीच असे ॥ ४८ ॥ म-हाटि स्त्रिलिंग वाक्य । मग संस्कृत तव नपुसक । म्हणौनि बाल्कत्व आइक । तेयासिचि साज ॥ ४९ ॥ ऐसी सर्व भाषाची जननी । उत्तम पवित्र म-हाटी वाणी । आदिपुरुष अंगिकारिली म्हणौनि । आनिवार बीदें जाली ॥ ५० ॥ तिये म-हाटिये भाषा । रुक्मिणीसैंवरु सांघैन आइका । श्रवण जालेया महापातका । क्षाल्न करी ॥ ५१ ॥ ऐसी रुक्मिणीसैंवर कथा सुहावी । श्रोते प्रसन्न होउनी आइकावी । मी सांगैन बोबडा बोलीं । म्हणे कवी कृष्णदासु ॥ ५२ ॥

— रुक्मिणीस्वयवर (इ. स. १५७६), प्रसगु प्रथम, ओव्या १–५२

# नागराज

## १

### श्रोत्याची आळवणी

असो हे सकलाचेनि प्रसादवरें : पापा क्षयो करावया पुरे : प्रतिष्ठान वर्णन पुढारें : बोलैन निकें ॥ १ ॥ जयाचेनी श्रवणजळेंकरुनी : विसाळे विवेकें-गगनी : मानसद्दम वाढति भारें आतौनि : फळीं आनदाचा ॥ २ ॥ तरि श्रोता द्यावें अवधान : जें परमार्गिया जीवन : वर्णीन प्रभुक्रीडास्थान : ते आइकतु वाणी ॥ ३ ॥ जो नेणिजे वेदा बोलता : सकल पुराणा ऋषीमता : तो मर्त्यो निवेकरहिता : वर्णवे केंवी ॥ ४ ॥ आगम धरुनि अहकारु : स्तउ पाति श्री चक्रधरु : तव तयासीही वेडिनेचा भाऊ : ठेवी ब्रह्मविद्या ॥ ५ ॥ जऱ्ही शेषा सहस्रवदना : चपला होति बहुती रसना : तऱ्ही देवाचेया येकाही गुणा : वाखाणु नेणे ॥ ६ ॥ अहो स्तवावेया श्री मुरारी : जऱ्ही चीदादि जाले नागारी : तऱ्हीं येकाही चरीत्र गुणाची थोरी . न वर्णवे तया ॥ ७ ॥ मग तया स्वामीचें स्थान : वाखाणु जाणें कवण : येक परमार्थ ज्ञान : वाचुनिया ॥ ८ ॥ तेथही करिता निर्धारु ' देवाचा महिमा सागरु : बोलता कपु येतासे थोरु : परावाचेसि ॥ ९ ॥ तेथ वैजातिरूपें अबद्धु : वरि अनादि दोषें असे बद्धु : केंवि स्तवीन गुणरूप अगाधु : तया परब्रह्मातें ॥ १० ॥ परि प्रसन्न जाला देवाचा राणा : तेणें लाधला परमार्थज्ञाना : म्हणौनि धींवसा बाधला स्तवना : मिषे सेवेचेनि ॥ ११ ॥ वरि भलतैसा प्रकारीं नेणता जऱ्हीं स्तविलें श्री अनता : तऱ्हीं तो भक्तीचा अधिष्ठाता ' स्वीकार करी ॥ १२ ॥ का तो करुणेचा अवतारु : सेवा अनुचीतींही न धरी विरु क्रिया अगिकारी साना थोरु निवडु नेणे ॥ १३ ॥ परि भक्तीचें अनुसधान : न सडीत क्रीडा महिमान : बोलैन तें ध्यान स्तवन : आइकतु क्ये ॥ १४ ॥ आणि तुम्हा अतरे असे दुजें : तें हें बोलणें मज साजे : म्हणौनि विनर्वायेही लाजिजे : परि विनवीतु असे ॥ १५ ॥ का जे साहित्यरसें बोलता : कवण नाइके विबुधेशुकथा : परि तो भाव नसता

सुजाण श्रोता : अवधान नेदी ।। १६ ।। म्हणौनि श्रोतया लागुनी : मी करितार्चे विनवणी : जें चीत द्यावें क्यान्मोदनीं : वेडया बोल्ता ।। १७ ।। जेवि बाळा बोल्ता नेणिना : परि आइको टाके जाणाचा थोवा : तेवि मज स्तविता देवा : आइकावें तुम्ही ।। १८ ।। आता स्वामी स्तविता अनेक : मुर्तिगुण--क्सुम--स्तनक : देइन प्रीतिभारपूर्वक ' सुहृद स्रोतयासी ।। १९ ।। का तें सकळापासुनि बहुवसे : मज पदियेति जीवा ऐसे : म्हणौनि माझा मनीं वसे : ते तया देईन ।। २० ।। जे देवाचा चरणकमळीं : प्रेमामोट सेवति आह्राळशाह्राळी : तया निज किंरिराही नव्हाळी : करिन क्येची ।। २१ ।। शब्दसमुद्रीं निरुते : चढविन प्रमयाचें भरिते : दावीन साहित्य तरगाते : श्रोतया पुढा ।। २२ ।। बोलैन मऱ्हाटी आप्रूप : परि प्रभूक्रिडारसे सुरस : करीन योगियाचें मानस : अती प्रेमरूप ।। २३ ।। पाता विवेकदृष्टी : तिये नाव तरि मन्हाटी : परि अशेष भावाते दळवटी ; अगाथपणें ।। २४ ।। जे शब्दसुखाचें जन्मस्थान : विवेकासि सुलोचन : तया वाणी करीन क्रिडावर्णन : म्हणे श्री नागराजु ।। २५ ।।

—प्रतिष्ठानवर्णन, ओव्या ४५–६९

## २

### प्रथमहिमा

तया समर्थाचिये स्तुती : मज मशका नेउती मती : ब्रह्मविद्येची गती : कुठली जेथ ।। १ ।। नातरि उदैलेया सुर्यमडळ-तनके : जरि प्रकाश धरवे बचके : तरि तयाचें स्तवन नेटकें : होववे मज ।। २ ।। शौच्या सुधाकरु आवडे चागु : परि तया न देववे चद्रिकाचा अभगु : तेवि मज अशक्ता तो नि:सगु : न वर्णवे तयाचा गुणीं ।। ३ ।। परि क्पाटी जयजु सुलोचनु : पर-प्रसादें जाला प्रसनु : म्हणौनि परमार्ग विवर्धनु : मिथ केला ग्रथु ।। ४ ।। करुनि परवाक्-विवरु : प्रसादी धरुनि आदरु : स्तविला श्री चक्रधरु : मीयें ओवियेचिनि ।। ५ ।। तेथ आनद-समुद्रीं जनला : माझा हृदयमडळी उगवला : तो विवेकुचद्र असे श्रवला : तया अक्षेरावरी ।। ६ ।। तयाचें करुनि

# नागराज

## १

### श्रोत्याची आळवणी

असो हे सकलाचेनि प्रसादवरें : पापा क्षयो करावया पुरे : प्रतिष्ठान वर्णन पुढारे : बोलैन निर्के ॥ १ ॥ जयाचेनी श्रवणजळेंकरुनी : विसाळे विवेकें-गगनी : मानसद्दम वाढति भारें आतौनि : फळीं आनंदाचा ॥ २ ॥ तरि श्रोता यावें अवधान : जें परमार्गिया जीवन : वर्णीन प्रभुक्रीडास्थान : ते आइक्तु वाणी ॥ ३ ॥ जो नेणिजे वेदा बोलता : सकल पुराणा ऋषीमता : तो मर्त्या निरंतरदिता : वर्णवे केवी ॥ ४ ॥ आगम धरुनि अहंकारु : स्तउ पाति श्री चक्रधरु : तव तयासीही वेडिवेचा भाऊ : ठेवी ब्रह्मविद्या ॥ ५ ॥ जन्हीं शेषा सहस्रवदना : चपला होति बहुती रसना : तन्ही देवाचेया येकाही गुणा : वाखाणु नेणे ॥ ६ ॥ अहो स्तवावेया श्री मुरारी : जन्ही वीदादि जाले नागारी : तन्हीं येकाही चरीत्र गुणाची थोरी : न वर्णवे तया ॥ ७ ॥ मग तया स्वामीचें स्थान : वाखाणु जाणें कवण : येक परमार्थ ज्ञान : वाचुनिया ॥ ८ ॥ तेथही करिता निर्धारु : देवाचा महिमा सागरु : बोल्ता कपु येताये थोरु : परावाचेसि ॥ ९ ॥ तेथ वैजातिरूपें अबद्धु : वरि अनादि दोषें असे बद्धु : केवि स्तवीन गुणरूप अगाधु : तया परब्रह्मातें ॥ १० ॥ परि प्रसन्न जाला देवाचा राणा : तेणें लाधला परमार्थज्ञाना : म्हणौनि धींवसा बाधला स्तवना : मिषें सेवेचेनि ॥ ११ ॥ वरि मलतैसा प्रकारीं नेणता : जन्हीं स्तविलें श्री अनंता : तन्हीं तो भक्तीचा अधिष्ठाता : स्वीकार करी ॥ १२ ॥ का तो करुणेचा अवतारु : सेवा अनुचीतींही न धरी निरु : क्रिया अगिकारी साना थोरु . निवडु नेणे ॥ १३ ॥ परि भक्तीचें अनुसंधान : न सडीत क्रीडा महिमान : बोलैन तें ध्यान स्तवन : आइक्तु क्ये ॥ १४ ॥ आणि तुम्हा अंतरें असे दुजें : तें हें बोल्णें मज साजे : म्हणौनि विनतीयेही लाजिजे : परि विनवीतु असे ॥ १५ ॥ का जे साहित्यरसें बोल्ता : कवण नाइकें विबुधेंद्रुकथा : परि तो भाव नसता

सुजाग श्रोता : अवधान नेदी ।। १६ ।। म्हणौनि श्रोतया लागुनी : मी करितायें विनवणी : जें चीत द्यावें कयान्मोडनीं : वेडया बोलता ।। १७ ।। जेवि बाळा बोलता नेणिवा : परि आइको ठाके जाणाचा थोवा : तेंवि मज स्तविता देवा : आइकावें तुम्ही ।। १८ ।। आता स्वामी स्तविता अनेक : मुर्तिगुण--कुसुम--स्तनक : देइन प्रीतिभारपूर्वक : सुहृद स्त्रोतयासी ।। १९ ।। का तें सकळापासुनि बहुवसें : मज पदियेति जीवा ऐसे : म्हणौनि माझा मनीं वसे : ते तया देईन ।। २० ।। जे देवाचा चरणकमळीं : प्रेमामोद सेवति आह्याळनाह्याळी : तया निज किंकिराही नव्हाळी : करिन कथेची ।। २१ ।। शब्दसमुद्री निरुते : चढविन प्रमयाचें भरितें : दावीन साहित्य तरगाते : श्रोतया पूढा ।। २२ ।। बोलैन मन्हाटी आश्रय : परि प्रभूक्रिडारसें सुरस : करीन योगियाचें मानस : अती प्रेमरूप ।। २३ ।। पाता विवेकदृष्टी : तिये नाव तरि मन्हाटी : परि अशेष भावाते दळवटी ; अगाधपणें ।। २४ ।। जे शब्दसुराचें जन्मस्थान : विवेकाचि सुलोचन : तया वाणी करीन क्रिडावर्णन : म्हणे श्री नागराजु ।। २५ ।।

—प्रतिष्ठानवर्णन, ओव्या ४५–६९

## २

### ग्रंथमहिमा

तया समर्थाचिये सुती : मज मशका केउती मती : ब्रह्मविद्येची गती : कुठली जेथ ।। १ ।। नातरि उदेलेया सुर्यमडळ तवकें : जरि प्रकाश धरवे चवकें : तरि तयाचें स्तवन नेटकें : होववे मज ।। २ ।। शौच्या सुधाकरु आवडे चागु : परि तया न देववे चद्रिकाचा अभगु : तेवि मज अशक्ता तो निःसगु : न वर्णवे तयाचा गुणीं ।। ३ ।। परि कपाटी जयजु सुलोचनु : परप्रसादें जाला प्रसनु : म्हणौनि परमार्ग-विवर्धनु : मिया केला ग्रंथु ।। ४ ।। करुनि परद्वाक्–निरूर : प्रसादी धरुनि आदर : स्तविला श्री चक्रधर : मीयें ओरियेचिनि ।। ५ ।। तेथ आनंद–समुद्रीं जनला : माझा हृदयमडळी उगवला : तो विवेकुचद्र असे श्रवला : तया अक्षेरावरी ।। ६ ।। तयाचें करुनि

आदोहन : जें आदरें सेवीति पीयुषपान : तया प्रत्यक्ष होये आत्मज्ञान : जेणें मोक्ष सिद्धे ।। ७ ।। का जें ध्यानसरोवरीं सुरग कोमळ : मिया ग्रथनमीषे आव्हमिले चरण–कमळ : जेणें मुनीभ्रमरा जोडे साध्यफळ : प्रेमामोदाचें ।। ८ ।। हा कींकरा भक्त नर्न्येद्र : सतसा आनदचद्र : विद्यार्थिया विवेक समुद्र : भावमुद्रेचा ।। ९ ।। श्रोतवता डोळसा : तया ग्रथ नव्हे हा आरिसा : जो भाव वाहिजे तो तैसा : आतु दावीतु असे ।। १० ।। हे शरणागतांचे रक्षण : भवभिता राउळिचें स्थान : श्रातलेया स्नेहपुर्ण : माउली हा ।। ११ ।। हा मोक्षफळदु उत्तमु : मार्गी ब्रोलिजे कल्पद्रमु : साइलीये अर्थी विश्रामु : संतानु हा ।। १२ ।। हा पापासि वज्रकपाट : मोक्षाची धर्मवाट : आइकता श्रवणा अवीट : स्वरूप जयाचें ।। १३ ।। हा ब्रह्मविद्येचा मितरू : परमहसा अमृत सरोवरू : असो हें श्रोते आइकति करुनि आदरु : तया काइएक नव्हे ।। १४ ।। तुटे अव्यया–ज्ञान–बधु : प्रतीती ये चतुर्विधु बोधु : सेखीं अव घाचि भवसींधु : तरिजे येणें ।। १५ ।। मग केवळ–ल्क्षणे : परमानदेसीं साजणें : तेथ न लक्षिणे शाश्वतपणें : चेतन वर्गासि ।। १६ ।। आणि हें महंताचेन वरें : मिया ग्रथन केले साचारें. तरि तें तुम्ही आपुलेचि म्हणौनि आदरे : आइको ठाकिजे ।। १७ ।। जेवि देखुनि मनुष्या कुपळा : गधर्व देति आपुली कळा : मग तेचि दृष्टी निर्मळा : पाहों ठाकति ।। १८ ।। तेवि तुमचेया प्रसादाचें : निष्पन्न माझिये वाचे : तें आपुलेंच म्हणौनि साचें : आइकावें आदरें ।। १९ ।। येव्हवीं तुम्हा सीधात–वक्तयापुढें : मीया ग्रथन केंवि करावे सुढें : परि हें तुमचेचि दये पुडें : फळलें मज ।। २० ।। मिया अश्रद्धा वाणी : धावा वाइला श्रीचक्रपाणी : ऐसा साहित्य भगु सुजाणी : क्षेमा किजे ।। २१ ।। सकल साधना सारभुत : हा प्रतिष्ठान वर्णन ग्रथ : श्रवणें श्रोतयाते मगळ पावत : म्हणे श्री नागराजु ।। २२ ।।

—प्रतिष्ठानवर्णन, ओव्या ८०७–८२८

# सरस्वती गंगाधर

## १

## गुरुचरित्रमहिमा

नेणे कवित्व असे कैसे। म्हणोनि तुम्हा विनवीतसे। ज्ञान द्यावें जी भरवसें। आपुला दास म्हणोनी ॥ १ ॥ न कळे ग्रथप्रकार। नेणे शास्त्राचा विचार। भाषा न ये महाराष्ट्र। म्हणोनि विनवीं तुम्हासी ॥ २ ॥ समस्त, तुम्ही कृपा करणें। माझिया वचना साह्य होणें। शब्दव्युत्पत्तीही नेणें। कविकुळें तुम्ही प्रतिपाळा ॥ ३ ॥ ऐसे सकळिका विनवोनी। मग ध्याइले पूर्वज मनीं। उभय पक्ष जनकजननी। माहात्म्य पुण्यपुरुषाचें ॥ ४ ॥ आपस्तब शाखेसी गोत्र कौंडिण्य महाऋषि। साखरे नाम ख्यातीसी। सायदेवापासाव ॥ ५ ॥ त्यापासुनि नागनाथ। देवराव तयाचा सुत। सदा श्रीगुरुचरण ध्यात। गगाधर जनक माझा ॥ ६ ॥ नमन करिता जनकचरणीं। माता पूर्वज ध्याता मनीं। जो का पूर्वज नामधारणी। आश्वलायन शाखेचा ॥ ७ ॥ काश्यपाचे गोत्रीं। चौंडेश्वर नामधारी। रागें जैसा जन्हु अवधारी। अथवा जनक गंगेचा ॥ ८ ॥ त्याची कन्या माझी जननी। निश्चयें जैसी भवानी। चपानामें पुण्य राणी। स्वामिणी माझी परियेसीं ॥ ९ ॥ नमिला जनकजननीसी। नतर नमू श्रीगुरुसी। झाली मति प्रकाशी। गुरुचरण स्मरावया ॥ १० ॥ गगाधराचे कुशीं। जन्म झाला परियेसी। सदा ध्याय श्रीगुरुसी। एका भावें निरतर ॥ ११ ॥ म्हणोनि सरस्वति गगाधर। करी संतासी नमस्कार। श्रोतया विनवी वारवार। क्षमा करणें बाळकासी ॥ १२ ॥ वेदाभ्यासी संन्यासी। यती योगेश्वर तापसी। सदा ध्याती श्रीगुरुसी। तयासी माझा नमस्कार ॥ १३ ॥ विनवीतसे समस्तासी। अल्पमती आपणासी। माझे बोबडे बोलासी। सकळ तुम्ही अगिकारा ॥ १४ ॥ तावन्मात्र माझी मती। नेणे काव्यव्युत्पत्ती। जैसे श्रीगुरु निरोपिती। तेणेंपरी सागत ॥ १५ ॥ पूर्वापार आमुचे वशीं। गुरु प्रसन्न अहर्निशीं। निरोप देती मातें परियेसी। चरित्र आपुलें विस्तारावया

॥ १६ ॥ म्हणे ग्रंथ कथन करी । अमृत घट स्वीकारी । तुझे वशीं पारपरीं । लाभती चारी पुरुषार्थ ॥ १७ ॥ गुरुवाक्य मज कामधेनू । मनीं नाहीं अनुमानू । सिद्धी पावविणार आपणू । नृसिंह सरस्वती ॥ १८ ॥ त्रैमूर्तीचा अवतार । झाला नृसिंह सरस्वती नर । कवण जाणे याचा पार । चरित्र कवणा वर्णवे ॥ १९ ॥ चरित्र ऐसें श्रीगुरुचें । वर्णुं न शके मी वाचें । आज्ञा असे श्रीगुरूची । म्हणोनि वाचे बोलतसे ॥ २० ॥ व्यास पुत्र पौत्रीं असे चाड । त्यासीं हे कथा असे गोड । लक्ष्मी वसे अखंड । तया भवनीं परियेसा ॥ २१ ॥ ऐसी कथा जयाचे घरीं । वाचिती नित्य प्रेमभरीं । श्रियायुक्त निरंतरीं । नांदती पुत्रकलत्रयुक्त ॥ २२ ॥ रोग नाहीं तया भवनीं । सदा सतुष्ट गुरुकृपेंकरोनी । निःसदेह सात दिनीं । ऐकता बंधन तुटें जाणा ॥ २३ ॥ ऐसी पुण्य पावन कथा । सांगेन ऐक विस्तारता । सायासाविण होय साध्यता । सद्यः फल प्राप्त होय ॥ २४ ॥ निधान लाधे अप्रयासीं । तरी का कष्ट सायासीं । विश्वास माझिया बोलासी । ऐका श्रोते एकचित्तें ॥ २५ ॥ आम्हा साक्षी ऐसे घडलें । म्हणोनि विनवीतसें बळें । श्रीगुरुस्मरण असे भलें । अनुभवा हो सकळिका ॥ २६ ॥ तृप्ति झालिया ढेकर । जेवीं देती जेवणार । गुरुमहिमेचा उद्गार । बोलतसें अनुभवोनी ॥ १७ ॥ मी सामान्य म्हणोनी । उदास व्हाल माझे वचनीं । मक्षिकेच्या मुखातूनीं । मधु केवीं ग्राह्य होय ॥ २८ ॥ जैसें शिंपल्यात मुक्ताफळ । अथवा कर्पूरकर्दळ । विचारिता अश्वत्थमूळ । कवणापासाव उत्पत्ती ॥ २९ ॥ ग्रंथ कराल उदास । वाकुडा कृष्ण दिसे ऊस । अमृत निघे त्यात रस । दृष्टि द्यावी तयावरी ॥ ३० ॥ तैसें माझें बोलणें । ज्यासीं चाड गुरुस्मरणें । अंगिकार करणार शहाणे । अनुभविती एकचित्तें ॥ ३१ ॥ ब्रह्मरसाची गोडी । अनुभविता फळे रोकडी । या बोलाची आवडी । ज्यासीं सभवे अनुभवा ॥ ३२ ॥ गुरुचरित्र कामधेनु । ऐकता होय महाज्ञानु । श्रोतीं करोनिया सावध मनु । एकचित्तें परियेसा ॥ ३३ ॥

— गुरुचरित्र, अध्याय पहिला, ओव्या ३४–६६

* * * *

## २

### आरती

कृष्णा पंचगंगा संगम निजस्थान । चरित्र दावुनि केलें गाणगापुरगहन । तेथें भक्त श्रेष्ठ त्रिविक्रम यति जाण । विश्वरूपें तया दिधलें दर्शन ॥ जयदेव जयदेव जय सद्गुरुदत्ता । नृसिंह सरस्वत्या जय विश्वभरिता ॥ १ ॥ वंध्या साठीं वर्षें पुत्रनिधान । मृत ब्राह्मण उठविला तीर्थ शिंपून । वांझ महिषी काढवी दुग्ध दोहून । अत्यजाचे मुखीं निगम पूर्ण ॥ २ ॥ शुष्क काष्ठीं पल्लव दावुनि लवलाही । कुष्ठी ब्राम्हण केला साधु निजदेहीं । अभिनव लीला त्याची वर्णू मी कायी । म्लेंछ राजा येउनि वंदी तव पायीं ॥ ३ ॥ दिपवाळीचे दिवसीं भक्त येऊनी । आठहि जण मस्तक ठेविति तव चरणीं । आठहीं ग्रामीं भिक्षा केली ते दिनीं । निमिषमात्रें तंतुक नेला शिवचरणीं ॥ ४ ॥ ऐसें चरित्र दावुनि जडमूढ उद्धरिले । भक्तवत्सल ऐसें ब्रीद मिरवीलें । अगाध महिमा म्हणुनी वेद श्रुति बोले । गंगाधरतनय वंदी पाउलें ॥ ५ ॥

# त्र्यंबकराय

## १

### धन्य धन्य हे मऱ्हाटी

तुमचेनि अभिवदनें । ज्ञान होय ज्ञातधरणें । म्हणौनि आरंभि येपणें । अत रण ॥ १ ॥ या उल्लासाचें हावें । युक्ति पदपथीं धावें । ते ब्रह्मानंदीं विसावें । येचीं प्रसंगी ॥ २ ॥ सौम्याचेनि पीके । शब्द होती नेटुके । पाठी उन्मेषा ही अधीकें । दळें चढती ॥ ३ ॥ तुह्मी पुरस्काराल हे वाणी । तैं याचा होईल ताम्रपर्णी । ते मोलातीत पीकेल खाणी । शब्दरत्नाची ॥ ४ ॥ तुमचे कृपेचे लाहेल जळ । तें रसना होईल घनपटळ । पाठिं मुक्तामणि सकळ ।

द्रवैल शब्द ॥ ५ ॥ पाहाता सर्वांचीं शेषें । ते तुह्मी प्रकृति पुरुषें । कथामूळीं सतोषें । नमस्कारु आह्मीं ॥६॥ तुमचा अभिवदनी । फिटे सर्व ही सीराणि । येरा देवता येपणी । उदार्यता कैंचीं ॥ ७ ॥ कल्पतरु कल्पलता । तुह्मीं ताद्दशें उभयथा । येरा वनतरु देवता । का मी शोचु ॥ ८ ॥ या वरीं स्मरलें निकें । तुह्मीं सर्वांची मूळिकें । तुमचा नमनीं सकळिके । नमस्कारिलीं म्या तें ॥ ९ ॥ मूळीं पावलीया पाणी । शाखापल्लवा होय धणी । फळें घेईजती वोहोनी । देंठाम्रिचीं ॥ १० ॥ येणें नमस्कारें सहसा । होति अभिमुख त्रिदशा । जेवि प्रसन्न केल्या नरेशा । सैन्य वश्य ॥११॥ तुमचा अवलीला वरु । तो मतिज्ञाना विस्तारु । माडला खु मुदरु । ब्रह्मावबोधु हा ॥१२॥ तत्व चोधाचा निर्मिता । ब्रह्मसायुज्य पूर्णता । तो मज ज्ञानदाता । श्रीगुरुदेवो ॥१३॥ हा दृष्टिगोचर ऐसा । दिसे प्रपचाकारु ठसा । परि जीव घे शिवदशा । कृपे ज्याचें ॥ १४ ॥ *भवे भवार्णव तरिजे । हें ताल नसे दूजे । प्रपचें तत्व* उल्लघिजे । हें हातधरणें ज्याचें ॥ १५ ॥ देह पट्ट घडी सान । नेमलें दीसे प्रमाण । तें दाविलें उक्लोन । अगाध जेणें ॥ १६ ॥ कर्मब्रह्म पल्लव । ऐसें विस्तारलें सर्व । यासी आदि अत सींव । आथीचि ना ॥ १७ ॥ हे प्रमाण *गुजदेह होय । उक्लरुलें ब्रह्माडी न समाये । मा आत्मपदवीं सामाये । हा कोण* ठावो ॥ १८ ॥ येवढा उदार्याचा स्तभु । दे ब्रह्मश्रीचा पूर्ण लाभु । तो रोकडा *कमळगर्भु । आह्मी लाहों ॥ १९ ॥ यावरी सर्वांचें कारण । श्रोते हो तुह्मा* विज्ञापन । स्वस्त करूनी अत करण । परिसा वचनें ॥ २० ॥ तुह्मीं बोला कृपाभिदें । तें वाचावल्ली पेलील दादें । रसनाडेरीं पदें । पुष्पें येती ॥ २१ ॥ तुह्मी ज्ञानगिरीचे डोहो । आह्मीं गौरवस्नान लाहों । तेणें तुह्मा सन्मुख राहों । अर्घ्येवचनें ॥ २२ ॥ आह्मा हेचि दिवाळी । आजि जिव्हेचा परळीं । तुह्मा सज्जनातें वोवाळीं । शब्दरत्नीं ॥ २३ ॥ तुमचें कृपाकटाक्ष । मज चेष्टविति प्रत्यक्ष । एकें निमिषें ही लक्ष । सावे आह्मा ॥ २४ ॥ पूर्णिमेची पीयूषकळा । चकोरें घेतीं गळाळा । मात्र येक जिव्हाळा । तोचि तया ॥ २५ ॥

* * * *

साठीतीस्या कोट्दि दिनि । चातकें तृप्त होति घनीं । संवत्सर हि धणी । हेचि तया ॥ २६ ॥ हे ना प्रेता संजीवनी । चढे आयु

प्याचें पाणी । तेविं तुमचा तोयलेपणीं । सुपचि आज्ञा ॥ २७ ॥ जी तुमची प्रसन्नता । उल्लास पावे वाग्देवता । ते पदें प्रसवैल पूर्णता । ब्रह्मविद्येचीं ॥ २८ ॥ तेणें बोधार्णव होय उतलु । उन्मेष मेरु घे तळु । हा विचार येवढा ब्रह्मगोळु । हातिचा होय ॥ २९ ॥ तुह्मी ज्ञानाब्धि ठाईंचे । तेथ शब्द गङ्डूष आमुचे । पूर्ण न करिती तऱ्हीं याचें । रहस्य घेणें ॥ ३० ॥ हो का भलतैसा वक्ता । पण पदरसु घेतो श्रोता । श्रोतेविण कविता । शोभे केंवि ॥ ३१ ॥ स्वकरें कुचमर्दना । सतोष न पवे कामिनी । तेवि श्रोतयावाचूनि । दीन वक्ता ॥ ३२ ॥ जेवि सुवायूचेनि तोरें । मन्दाग समुद्रिं चालें । तेवि श्रुत संवादि बोलें । उठती बोल ॥ ३३ ॥ वल्याचे पदडोळ । स्वभावें होती आधळें । का जे श्रोतासूर्य न मिळे । अर्थप्रकाशी ॥ ३४ ॥ जो अर्थ गीवसी श्रोता । तेची पदीं वोडवीं वक्ता । तो सवाद अमृता । उणें आगीं ॥ ३५ ॥ जैसा द्राक्षिचे आळा । दीधले रग उमटे फळा । तेवी श्रोतेस्नेहें निव्हाळा । वाचका होय ॥ ३६ ॥ श्रोते सावध नसते । वक्ते या स्थळें बोलते । गुणकीर्तन आच्छादते । ईश्वरादिकाचें ॥ ३७ ॥ वेदशास्त्र पुराण । याचें अपाडें महीमान । परि हें हि श्रोतयावाचोन । रूपा न ये ॥३८॥ असो हें नम्रता सजातीसंयोगु । तो काइ करावा कथारगु । जैसा नग्नाचा शोचागु । परा सगर्भु नोहे ॥ ३९ ॥ सुदर शाल्मली दोडे । सेविता कोण रसु आतुडे । पागरयुप्प दैंठफेडें । कोण तुरंगीं ॥ ४० ॥ जैसीं असाळीं मेघडबरें तैसीं निरर्थक उत्तरें । तें सेविती गवारें । आदरेंसी ॥ ४१ ॥ जे परिपूर्ण पवित्र । नित्य शुद्ध सर्वत्र । जें भूमिअगें चित्र । हें येवढें उठे ॥ ४२ ॥ यासी वचले मूढ । शोचिति वृथा काबाड । आत्मतत्त्वीं कोड । कैचें तया ॥ ४३ ॥ सुकाळ असोनु सर्वेपरि । रोगी अनार्त अव्हेरी । तेवी दुर्जन ब्रह्मउत्तरीं । विषादु मानी ॥ ४४ ॥ सूर्य न मनें उल्का । वायसु ने घे मयका । नावडती बोळवीत्का । पद्मकमळें जैसीं ॥ ४५ ॥ अधापुढा रत्नरासी । किं भोगवस्तु विधवापासी । कि नपूसकापुढें जैसी । सुन्दर श्यामा ॥ ४६ ॥ ऐसे जे मूढ जन । त्यासि उपदेशील कवण । जें बोल्ता ब्रह्मज्ञान । उफाडती ॥ ४७ ॥ माडल्या शुद्ध रसा । मूर्ख पाषाडी कैसा । चकोरच्या उपमा जैसा । राहो निगे ॥ ४८ ॥ भोजनाचा प्रथम मासीं । दातुरा आडळे मासी । पाषाडा ब्रह्मकर्येसि ।

तैसी होय ॥ ४९ ॥ असो तें पापाडी मूढें । काईसी तुमचें स्तुतीपूढें । काय कल्पतरू गर्णेरी झाडें । हारीं शोभती ॥ ५० ॥ तुम्ही प्रभूचे अवतार । तेणेसी चि निरंतर । यास्तव हें उत्तर । बोले आम्हीं ॥ ५१ ॥ तुम्ही स्वभावें सावधान । तेय आम्ही विज्ञापन । करावया कारण । येक आहे ॥ ५२ ॥ जी आमचा उद्धारु । ग्रथा आदि अतीं मनोहरु । तुमतें न करता नमस्कारू । पतन असे ॥ ५३ ॥ यास्तव तुमची स्तुति । आम्ही न करू काकुळती । तुम्ही स्वभावें सभापति । पूज्य आम्हा ॥ ५४ ॥ माझे स्तुतिचेनि पाडे । गोसावीं न पडावें भीडे । शुद्धाशुद्ध तेव्हडें । निवडावें जी ॥ ५५ ॥ भक्त अभक्त ऐसे । देव नेणें मानसे । त्याचें देवपण कैसे । सपादैल ॥ ५६ ॥ चद्रकात फटिका । निवाडु नोहे मयका । तै चद्रपणाचा लेकिा । आलु तया ॥ ५७ ॥ येक वाटल्या पयपाणी । हस न घे निवडोनि । तो हसु हसपणी । वाखाणू नये ॥ ५८ ॥ का ज्वराज्वरलक्षणें । मूळी धन्वतरी तेही नेणें । त्याचीं कोण प्रयोजनें । उपचारविषईं ॥ ५९ ॥ का न्यायान्यायविचारणा । जैं प्राण्किक जाणी मना । तैं त्याच्या प्राण्णिपणा । हानिचि होय ॥ ६० ॥ तेवि शुद्धाशुद्ध कविता । जैं न पाहे श्रोता । तो श्रोतेपणें वानिता । लाजचि असे ॥ ६१ ॥ यास्तव सुचित सावधानी । इंद्रिये ठेऊनि श्रवणीं । आइकावी सुवाणी । शुचि कथा ॥ ६२ ॥ हें आहाच परि सघन । देशस्तेमध्यें ब्रह्मज्ञान तें हलुवे हं वचन । मानू नये ॥ ६३ ॥ जैसा सुकासनाचा मार्गु । तैस महाराष्ट्र प्रसगु । आगी बाणें राजयोगु । रोकडाचि ॥ ६४ ॥ ये महाटीचे पल्लवें । जीव उगमातें पावें । तरी कासया उल्थावें । पानाचें कवळे ॥ ६५ ॥ हें आरुष आरुत वचन । रोकडें कराचें काकण । वेदशास्त्राचें दूहन । मोकळे तें हें ॥ ६६ ॥ तें आदिग्रंथाचेंचि आटि । उपसोन कीजे महाटी । हा अर्थु जीवाचीये गाठी । नाधता भला ॥ ६७ ॥ गुह्य कवटे फोडिता । मद्रला जोडे आईता । तेवि सस्कृता । गर्भु सुदेशी हे ॥ ६८ ॥ जैसा का कापुर कर्दळिचा । त्यासी नाहिं गर्भु त्वचा । तैसी महाराष्ट्राचा । अर्थविषई ॥ ६९ ॥ वापी कूप देववाणी । मध्यें सखोल अर्थुपाणि । ते सुदेसी सेदणी भरुनि । आहाच कीजे ॥ ७० ॥ याहीमध्यें कारण । अर्थ सगर्भ प्रमाण । तेचि देशभाषा वाचून । येर कामाडकष्ट ॥ ७१ ॥ हे आहाच आरुती बोली । जरि शुद्ध बोधें आथिली ।

तरि संस्कृतिची काढीली । पवित्र होईल ॥ ७२ ॥ आमोदार्थ आणि पवित्रपणा । तळा आणिजे चंदना । तो वोडीसत्व का इंधना । विभाडों नये ॥ ७३ ॥ पुढीलिया स्वान्तसरिसा । प्रयत्नें आणिजे उसा । तो कणार्थ बुद्धि कणिसा । रक्षू नये ॥ ७४ ॥ तेवि संस्कृत केवळ । अर्थे करावें प्राजळ । येऱ्हवीं रक्षता फळ । कोण त्याचें ॥ ७५ ॥ अर्थज्ञानें पदें प्रासे । वरि बैसति प्रमाणें सुरसे । ते मऱ्हाटी पुरवील मडसें । विद्वज्जनांचीं ॥ ७६ ॥ धन्य धन्य हे मऱ्हाटी । ब्रह्मविद्येचि कसवटी । हा द्वारशिळेचा पोटी । परिसुजोडला ॥ ७७ ॥ हे घरिंची कामधेनु । आगमिंचा संतानु । अमृत उकळा पूर्णु । माथणींये आला ॥ ७८ ॥ हा पल्लवींचा चिंतामणी । मोक्ष गींवसीला आगणी । नापु रे हे पवित्र वाणी । ऐसीनि आहे ॥ ७९ ॥ शुद्धस्वरूपीं निर्दोष । ते हे सुदेशीं सुरस । यास्तव घेणें सर्वांस । सादरेंसी ॥ ८० ॥ हे ब्रह्मरसाची पव्हे । नडनाचु होय जिव्हे । यास्तव इळवें नव्हे । बोल्णें माझें ॥ ८१ ॥ जैसी सुगंधाची कळी । ते विकासलेया काळी । गंधघाणमेळीं । आनंदु दावी ॥ ८२ ॥ तेवि या ग्रंथाचि खोली । सगर्भ मना नाहीं आली । तव वरि हे महाराष्ट्र बोली । आहाच वाटे ॥ ८३ ॥ केतुकी कण्टकामाझारी । आहे आमोदाचि पेटारी । किं रंभेचा सोपटगाभारीं । पोतासु दळी ॥ ८४ ॥ हा सगर्भ ग्रंथु उल्हाटे । तै सर्वज्ञता प्रगटे । आत्मा रोकडाची भेटे । हें सामर्थ्य याचें ॥ ८५ ॥ हें पवित्र माझे बोलणें । ब्रह्मीशाचि पुढा पेखणें । का जे ग्राहिकावाचूनि वाणें । विके कैसें ॥ ८६ ॥ हा अबोधा प्रबोध । परिणामका संवाद । आरंभिला सुविद । शास्त्रतिल्कु ॥ ८७ ॥ ते श्रीसिद्धेशप्रसाद । चामुंडेचेंनि वरदें । चाल्तीं होतिं पदें । निंबकाचेंनि मुखें ॥ ८८ ॥

— बालबोध, प्रथम खंड, ओव्या १८–१०५

## २

## हें प्रेमदाइक लेणें

ये शब्दघनदाटा अक्षरें । सुरसमंदाकिनी द्वारें । श्रवण सिंधुसी निर्धारें

हृदयें मांदुस करावी। सांटवणें यासी॥ २३॥ हें अज्ञानतमां निरसी। ज्ञान-प्रकाशुही प्रकाशी। ते हें समर्थ सुदेशी। सर्वज्ञपणें॥ २४॥ वेदशास्त्र दुर्मवल्ली। तेथीचि पुष्पें यें गुंफीली। जें अमोदगुणें आथीली। मकरंदबोधें॥ २५॥ जें आनंदरंग बहलें। शोभति अभेद पददळें। वेचोनि टाकिलीं अरळें। संशयाची॥ २६॥ हे कुसुमाक्षर वोवणी। वोवि पूर्ण आत्मगुणी। गुह्यगुह्य घोळुनि। मेळवणि केलि॥ २७॥ ते हे पास चिर माळा। घातलि शिष्यांचा गळा। ते शोभे अमळा। नाना पदार्थें॥ २८॥ हें प्रेमदाइक लेणें। कंठि धरील अतिमानें। तो श्रोत्रयासी साजणें। न करी कैसा॥ २९॥ श्रोता वक्ता समंधी। तुटे संशये भवव्याधी। विशेषें आनंद माहानिधि। प्राप्त होये॥ ३०॥ यास्तव हा ग्रंथु बरवा। समूळ सुजाणि ध्यावा। जरी विश्वासु होईल जीवा। तरिचि निका॥ ३१॥ संसारमूळ छेदकें। तेचि शास्त्रें अलोलिकें। तें घेईजति कौतुकें। हीतार्थालागी॥ ३२॥ यास्तव श्रोतां जनी। आदि मध्य अवसानी। बोल घ्यावे विचारुनि। सुघट ते॥ ३३॥ जरि येईल हीतार्था। नाठील संशय जन्मवेथा। आत्मा प्रकाशेल तरिचि या ग्रंथा। वंदुनि घेणें॥ ३४॥ परमार्थविषीं जे पाहीजे। ते जरी येथे लाहीजे। तरिचि आदरें घेईजे। बाळबोधु हा॥ ३५॥ असो हें ईश्वरज्ञाना आधारु। ग्रंथ संपविला सविस्तरु। तै चैत्रशुध प्रतिपदा संवत्सरु। बहुधान्य नामें॥ ३६॥ अंक नव सात सा च्यारी ४६७९। ये वरुषें कलि कर्मेलि माघारी। तैं शालिवाहन शकु पंधरा शीरीं। दोनी पूर्णे॥ ३७॥ ऐसी सुदिनि कौतुकें। ग्रंथ संपविला त्रिवर्कें। पदें जाली सुरसीकें। शंकर वरदें॥ ३८॥ चामुंडेचा स्नेह तारु। तेणें उतरलो ग्रंथसागरु। म्हणे राजयोगी कुमरु। श्रीभैरवाचा॥ ३९॥

—बालबोध, तृतीय खंड, ओव्या १३६–१७४

संगमा येति ॥ १ ॥ पूर्वप्रगित वैरागरें। वाचा वेचिले शब्दहिरे। हे श्रवण श्रीमंता साजीरें। अळंकार होती ॥ २ ॥ हें ब्रह्मवृष्टी शब्दधारा। एति सुविद श्रवण सरोवरा । परि मोघगिरिच्या पाठारा। झरोनि जाति ॥ २ ॥ इखरद उदोत्कार। ते हें *प्रगटलें शब्दाकार। ग्रंथभूमि सविस्तर। प्रकाशले कीर* ॥ ४ ॥ चांमुडेचें स्नेहपान्हा। हा आणिला ग्रंथु भरणा। विशेषें श्रोतश्रवण-पाना । योग्य आहे ॥ ५ ॥ असो हे केली ग्रंथबोवनी। परि जो वोविला शब्द मनि। 'तो नाहि आला परतोनि। माळिके ये ॥ ६ ॥ देशीक वचनाचा वेचीवां। तो हा जाला राशींवा। संस्कृताचा गोडिवां। येथें आहे ॥ ७ ॥ ज्या बाळां नाहिं जननी। *त्यासी सर्वेही सोयरिं। सद्बुधी सांडवला प्राणि।* तो-यापरी ॥ ८ ॥ यास्तव सगर्भवानी। पूर्वशुचके सुज्ञानी। ते बोलावि बोलनी। आत्महितें ॥'९ ॥ तो हा शिष्यकुळां हितार्थु। मिं बोलिलों परमार्थु। परि संत हो जी तुह्मा समर्थु। नव्हे हा ग्रंथु ॥ १० ॥ जे ज्योति तिचि महिमा। मार्जिल ते सन्यासाचि तमां। वांचुनिहिं भानुचि सीमां। उलंघवे काई ॥ ११ ॥ मृत्याचा मृत्य हरी। परी अमरा अमर न करी। तन्हि स्वादार्थु सुरवरी। अमृत सेवनें ॥ १२ ॥ दिनाचें दरीद्र हरी। ईश्वरा उपकारु न करी । तन्हि शोभनार्थ द्वारीं। चिंतामणी स्थापिला ॥ १३ ॥ *आर्त्तिकांसी कल्पद्रुमु। परि तो हरिना हरीचा श्रमु। तन्हि लावनि* केला उत्तमु। *श्रृंगारवाटिके* ॥ १४ ॥ तेवी ह्मां शीष्यां निर्धारु। तुम्हां न करील उपकारु। तन्हि हा माझा आदरु। भूषणार्थ घेणें ॥ १५ ॥ हा अबुधाचें अर्थ हरी। प्रबुधा उजळणी करी। ज्ञानावरी ज्ञान भरी। बाळाव-बोधु हा ॥ १६ ॥ अविदाचि अविद्या नाशी। सुविदां सद प्रकाशी। परमार्थु परमार्थासी। गुंफनि करी ॥ १७ ॥ बुधि बुधीचे नेहटी। बैसे घालुनि मांड कुटी। प्रेम प्रेमां दळवटी। चालनें होये ॥ १८ ॥ ब्रह्मीए ब्रह्में गाजे। योगी चि यौगें माजे। प्रकाशु प्रकाशांचि बीजें। घेउनि उठे ॥ १९ ॥ गुरु डोले गुरुपणें। बोलु बोलतें जिणें। आनंदासी पाहुणें। आनंद होति ॥ २० ॥ ऐसी यें समयें उत्तरें। सगर्भ घेणें चातुरें। येथीचें ज्ञान निर्धारें। सुखी होणें *॥ २१ ॥ असंदायें ब्रह्मज्ञानि। त्याहिं भली हे वाणि। जे धन्यकुळा निधानि।* विशेषु मानि ॥ २२ ॥ हे पवित्र विद्या भली घ्यावी। आत्मपल्लवी ग्रंथी द्यावी।

हृदयें मादुस करावी। सांटवणें यासी ॥ २३ ॥ हें अज्ञानतमा निरसी। ज्ञान प्रकाशही प्रकाशी। ते हें समर्थ सुदेशी। सर्वज्ञपणें ॥ २४ ॥ वेदशास्त्र दुर्म वल्ली। तेथीचि पुष्पें यें गुफीली। जें अमोदगुणें आथीली। मकरदबोधें ॥ २५ ॥ जें आनदरग नहलें। शोभति अभेद पददळें। वेचोनि टाकिली अरळें। सशयाची ॥ २६ ॥ हे कुसुमाक्षर वोवणी। वोवि पूर्ण आत्मगुणी। गुरुगुह्य घोळुनि। मेळवणि केलि ॥ २७ ॥ ते हे पास चिर माळा। घातलि शिष्याचा गळा। ते शोभे अमळा। नाना पदार्थे ॥ २८ ॥ हें प्रेमदाइक लेणें। कठि धरील अतिमानें। तो श्रोनयासी साजणें। न करी कैसा ॥ २९ ॥ श्रोता वक्ता समधी। तुटे सशये भवव्याधी। विशेषें आनद माझानिधि। प्राप्त होये ॥ ३० ॥ यास्तव हा ग्रथु नरवा। समूळ सुजाणि घ्यावा। जरी निश्वासु होईल जीवा। तरिच निका ॥ ३१ ॥ ससारमूळ छेदके। तेचि शास्त्रें अलोलिकें। तें घेईजति कौतुकें। हीतार्थालागी ॥ ३२ ॥ यास्तव श्रोता जनी। आदि मध्य अवसानी। बोल घ्यावे विचारुनि। सुघवट ते ॥ ३३ ॥ जरि येईल हीतार्था। नाशैल संशय जन्मवेथा। आत्मा प्रकाशैल तरिचि या ग्रथा। वदुनि घेणें ॥ ३४ ॥ परमार्थविषीं जे पाहीजे। ते जरी येथे लाहीजे। तरिचि आदरें घेईजे। बाळबोधु हा ॥ ३५ ॥ असो हें ईश्वरज्ञाना आधारु। ग्रथ सपविला सविस्तरु। तै चैत्रशुध प्रतिपदा सवत्सरु। बहुधान्य नाम ॥ ३६ ॥ अक नव सात सा च्यारी ४६७९। ये वरुषें कळि कर्मलि माघारी। तें शाळिवाहान शकु पधरा शीरीं। दोनी पूर्णे ॥ ३७ ॥ ऐसी सुदिनि कौतुकें। ग्रथ सपविला निर्मकें। पदें जाली सुरसीकें। शकर वरदें ॥ ३८ ॥ चामुडेचा स्नेह तारु। तेणें उतरलो ग्रथसागरु। म्हणे राजयोगी कुमरु। श्रीभैरवाचा ॥ ३९ ॥

— बाळबोध, तृतीय खड, ओव्या १३६–१७४

# विष्णुदास नामा

## बुधबावणी

### १

ज्ञानरत्नाचा दिवा । हृदयें घरामाजी लावावा । तरी अधारीं सापडे ठेवा । पूर्व संचिताचा ॥ १ ॥ पूर्वी म्या केली गुरुभक्ति । म्हणौनि मज एव्हढि ज्ञान मति । तरी बुधबावणीची स्तुती । सांगेन आता ॥ २ ॥ आता श्रोते सावधान । बुधवावणी सांगेन । फिटे अज्ञान अधकारपण । या मूर्ख मनाचें ॥ ३ ॥ ॐनिवे शंभु गाईजे । वोखटें मनीं ना धरिजे । ओळखी पडों न दीजे । तया तस्कराची ॥ ४ ॥ नमन कीजे गोविंदा । न लागीजे करणाचीया झकवादा । न कीजे निंदा । साधुजनाची ॥ ५ ॥ मनि दृढ होईजे । महाविघ्न चुकविजे । मती तर्क घेईजे । वडिलाचा ॥ ६ ॥ सीन सीव म्हणीजे । सीवासी शरण जाईजे सीकविलें कीजे । मायबापाचें ॥ ७ ॥ धर्ममति करावी । धर्मकीर्ती वाढवावी धुमाळी न घालावी । राणीरसा ॥ ८ ॥ अवगुण सांडिजे । अपशब्द न बोलिजे । आशाभगु न कीजे । याचकाचा ॥ ९ ॥ आरभार कीजे । आप्त वर्गा मानु दिजे । आला आवसरु ओळखिजे । जाणतयानें ॥ १० ॥ इच्छा वोखटी मोडिजे । ईश्वरू ध्याइजे । इच्छादान देइजे । लक्ष्मी आसता ॥ ११ ॥ ईश्वरू सेविजे । इच्छिली वस्तू घेईजे । इच्छाफळ मागिजे परमेश्वरीं ॥ १२ ॥ उसीरा न चालिजे मार्गु । उणीयासीं न कीजे सगु । उपशांति न कीजे रागु । स्त्री बाळकाचा ॥ १३ ॥ ऊधार मैत्रासीं न दीजे । ऊजागरपणें आसीजे । उणी गोष्ट न बोलिजे । सभेमाजी ॥ १४ ॥ रीता हातीं गुरुसीं न भेटिजे । रिणाचा सग्रह न कीजे । रिपुसी न विसंबिजे । जाणतयानें ॥ १५ ॥ रीतराहाटीं आसिजे । रुपि वर्गाचा मानु दीजे । रीण अधमाचें न घेईजे । जाणतयानें ॥ १६ ॥ ल्हिा विनोदें आसिजे । लीखित पत्रिका वाचीजे । लिहिता आळस न कीजे । जाणतयानें ॥ १७ ॥ लिहु चागलें जाणिजे । लीखित दडदडा वाचिजे । लीन होउनी आसिजे । जगामाजीं ॥ १८ ॥ एशवत

होईजे । एश कीर्ती जोडिजे । एक भाव धरीजे । देवचरणीं ॥ १९ ॥ ऐसा भाव धरिजे । ऐश्वर्येसी राहिजे । ऐक्य तत्वीं वर्तिजे । विष्णुभक्ति ॥ २० ॥ ओस पुर जाणिजे । वोडि समर्थासीं न कीजे । वोजे राहिजे । जनामाजीं ॥ २१ ॥ औकिया सांडिजे । औगुण न कीजे । औदशा आलिया वोळखिजें । आप्तवर्गासीं ॥ २२ ॥ आतरीं निर्मळ आसीजे । आसील पाहोणीं परणीजे । आतर न दीजे । सज्जनासीं ॥ २३ ॥ आपपरू वोळखीजे । आतीतासीं भजिजे । अति राग सांडिजे । जाणतयानें ॥ २४ ॥ इति श्री वोनामा । सांगे विष्णुदास नामा । येकाक्षरी सांगेन तुम्हा । श्रीगुरुप्रसादें ॥ २५ ॥

— बुधनावणी ऊर्फ शावग अक्षरी, अध्याय पहिला

२

कल्पना वोसटी मोडिजे । कळिजवळी उभे न राहिजे । कळावता मानू दीजे । धुरे देखता ॥ १ ॥ खरें खाटें जाणिजे । खरें गांठीं बांधिजे । खट्याळ न नदीं उतरीजें । जाणतयानें ॥ २ ॥ गर्व बहुत न कीजे । गंभीर होउनि आसिजे । गमन कीजे । चतुरासंगे ॥ ३ ॥ घणवटपणें आसीजे । घडे तेचि काम कीजे । घडीभरी न राहिजे । पापीयासंगें ॥ ४ ॥ नानाविद्या अभ्यासीजे । नास फुडा होऊ न दीजे । नाव राखीजे । वडिलाचें ॥ ५ ॥ चंचळ चित्त न कीजे । चळलीयाजवळीं उभें न राहिजे । चटपट न बोलिजे । सभेमाजि ॥ ६ ॥ छळ दीवस सांडिजे । छेदुर्ते न विसंबिजे । शब्द तो कीजे । मायेबापाचा ॥ ७ ॥ जगनाथ सेविजे । जगीं परउपकार कीजे । जन्म वाया जाऊ न दीजे । जाणतयानें ॥ ८ ॥ झकवादा न लागीजे । झगडा वायाविण न कीजे । झासा न बोलिजे । मलतिया गोष्टीचा ॥ ९ ॥ या देवासी भजिजे । या देहासी रक्षिजे । या हद गोष्टी नाइकीजे । घडीभरीं ॥ १० ॥ टकटक न कीजे । टसीन शब्द न बोलिजे । टपग्री कीजे । काम वडिलाचें ॥ ११ ॥ ठया नावाचा कीजे । ठेवा जतन ठेविजे । ठाव न दीजे । कुसंगासीं ॥ १२ ॥ डंब प्रपंच न कीजे । डसाया सर्पासी न खवळिजे । डगळपणें आसीजे । लोकामाजीं ॥ १३ ॥ ढळो भाके न देइजे । ढळले मंदिरीं न बैसिजे । दार्ढे

चालिजे । काळाचेनी ॥ १४ ॥ नादलुब्ध न होइजे । न्यार कृपणाचा न कीजे । +स चुकविजे । धर्म आचरतां ॥ १५ ॥ तपतीर्थ कीजे जाग । तीर्थदान पुण्यस्नान । तीर्थ शुद्ध मानसीं कीजे भजन । जागतयानें ॥ १६ ॥ थोथाड घेता मोडिजे । थाक पाहोनी चालिजे । थारा न देइजे । कुसंगासीं ॥ १७ ॥ दरुपणा मानु दीजे । ददी बहुताचा न होईजे । दान सुपात्रीं देइजे । जागतयानें ॥ १८ ॥ धनवंताचा सग कीजे । धर्मवंत होइजे । धड गाव वसविजे । वस्तीलागीं ॥ १९ ॥ नामदेवाचें पवित्र । नाम उच्चारी अखंडित । नामें होय हरिहर भक्त । नाम प्रिय गोविंदा ॥ २० ॥ पचवगत्र बोळगीजे । पवित्र साधु तो सेविजे । पाप न लाविजे । भलतिया गोष्टी ॥ २१ ॥ फावे तेचि बोलिजे । फळतें फुलतें झाड तोडिजे । फड न पाडिजे । सौचीयाचा ॥ २२ ॥ बरळ न बोलिजे । बाळकासीं सग न कीजे । बहुत बडबड न कीजे जागतया पुढें ॥ २३ ॥ भक्ति ते आराधिजे । भक्ति भावार्थ कीजे । भवसागरु तरीजे । साधु सगति ॥ २४ ॥ मानु वडिलांचा वाढविजे । माता पिता वंदिजे । मानुनि चालिजे । जागतयानें ॥ २५ ॥ या म्हणौनि मानु दीजे । यश येईल तें बोलिजे । येकलें न जाईजे । भलतिया ठाया ॥ २६ ॥ रसाळ तें गाइजे । रमणिके ठाईं वसीजे । रागें वैराग्य न कीजे । जागतयानें ॥ २७ ॥ लज्जा स्त्री बालकासीं न दीजे । लाघलें त्याचा आळस न कीजे । लक्षण जाणिजे । सर्व शास्त्रांचें ॥ २८ ॥ वसुदेवी भजिजे । वाडर निष्ठुर न बोलिजे । वाफधान्य पेरिजे । जागतयानें ॥ २९ ॥ सद्गुरु सेविजे । सत्यधीर होईजे । सपत्ती वाढविजे । जागतयानें ॥ ३० ॥ खेवो ये तें न बोलिजे । खवळला भुजग न पाहिजे । खोटें न राहिजे । गोत्रजामध्यें ॥ ३१ ॥ शास्त्रविद्या आभ्यासीजे । साच शब्द बोलिजे । सांकडे पडो न दीजे । स्वामिकाजीं ॥ ३२ ॥ हाळहटपणें नसीजे । हारींसीं हाग जाईजे । हाणोनि मानु दीजे । साधुजनासीं ॥ ३३ ॥ आलें उत्तर शुद्ध बोलिजे । आलें यश भलतियासीं न देइजे । आळस न कीजे । भलतिया गोष्टीचा ॥ ३४ ॥ ललित शब्द बोलिजे । लक्षार लागे तें न कीजे । लटाट नसीजे । परस्त्रीयेसीं ॥ ३५ ॥ क्षमारूपी आसीजे । क्षत्रधर्म न सोडिजे । क्षुधेयारिखें जेविजे । जागतयानें ॥ ३६ ॥ ऐसी हे बुधबावनी । सांगितलिया वचनीं । त्या धरिजेति अंत ःकरणीं । सदासर्वदा

॥ ३७ ॥ जो ऐसीया बुधी वर्तेल । तो प्रत्यक्ष साधु होईल । तयासी प्राप्त होतील । सर्व सीधी ॥ ३८ ॥ म्हणौनि हे बुधबावणी । नित्य ऐकावीं श्रवणीं । पठण करिता नित्यानि । सर्व ज्ञान होईल ॥ ३९ ॥ इती श्री येकाक्षरी । संपूर्ण जाली बाराण आक्षरी । ते परिसावि चतुरीं । म्हणे विष्णुदास नामा ॥ ४० ॥

— बुधबावणी ऊर्फ बारग अक्षरी, अध्याय दुसरा

## ३

## अभिमन्यु-वध

मिळोनिया कौरवीं समस्ती । अभिमन्यू पाडिला क्षिती । परी ते भोव ताले भोंवतीं । समोर न येती भयास्तव ॥ १ ॥ अभिमन्यू पडला रणीं । ते वेळीं कांपीनली धरणी । कौरव म्हणती पायवणी । वंदिजे ऐसिया वीराची ॥ २ ॥ जरी यासी पाठिराखा असता । तरी हा संहारिता समस्ता । जवळी येउनी जाला पाहाता । दुर्योधन तयासी ॥ ३ ॥ पाहे तो निमा सुरगोरा । नेटकींच वरुते जाली धारा । येव्हडेनी संहारिले महावीरा । आणी कुमरा लक्ष्मणासी ॥ ४ ॥ तव जयद्रथ तेथे आला । तेणें चरणघात आहाणीतला । देखोनी दुर्योधन कोपला । तयाकारणें ॥ ५ ॥ गाधार म्हणे जयद्रथासी । या भेणें तू पळालासी । तर्ते पडलिया पापरा हाणसी । ऐसा वीर तू पुरुषार्थी ॥ ६ ॥ यावरी बोले गुरु द्रोण । तुवा साचे केला अभिमान । रणीं पडलिया लक्ष्मण । आलासी येथे ॥ ७ ॥ हें अगवन केलें थोर । पडलीयासी दीधली पापर । हासताती सकळही वीर । कौरवदळींचे ॥ ८ ॥ म्हणती अगवग केली भली । पडलीया पापर दिधली । ऐसे ऐकोनिया मान घाली । जयद्रथ लाजें ॥ ९ ॥ मग दुर्योधन आपण । शोभीत जाला सकळही रण । जयाचे गेले होते प्राण । ते सद्गतीला लावले ॥ १० ॥ जित घायाळ उचलिले । ते मेळिकारासी पाठविले । तव पाडवीं ऐकिलें । अभिमन्यू पडला रणीं ॥ ११ ॥ तेथें झाला कोल्हाळ थोर । अनि दु चित्त युधिष्ठिर । ऐकोनिया वृकोदर । आग टाकी धरणीये ॥ १२ ॥ तव येरिकडे मेळिकारीं । वार्ता ऐसिी

सुभद्रा सुंदरी । तेही लोळे धरणीवरा । महादुःख ते काळी ॥ १३ ॥ इतुकें
येथें वर्तलें । येरीकडे कृष्ण अर्जुन गेले । तथें युद्ध कैसें जालें । ते परियेसा
श्रोतेजनें ॥ १४ ॥ विष्णुदास नामा म्हणे वचनीं । आजी अभिमन्यू पडला रणीं ।
अर्जुन आणील रणमेदिनी । द्रोणाचार्यासी ॥ १५ ॥

—महाभारत, द्रोणपर्व

## ४

### ऐसी ही भारतीची कथा

ऐसी ही भारतीची कथा । येथुनी ग्रंथ जाला समाप्ता । स्वर्गारोहण
सरता । अठरा पर्वें जाली येथून ॥ १ ॥ हें पुण्य पावन कथा । व्यासें सांगितली
परिक्षितिसुता । म्हणोनि अठरा ब्रह्महत्या* । गेल्या जनमेजयाच्या ॥ २ ॥
मग तो गंवो करा काये । ऋषी षोडश उपचारीं पूजिला हे । चरण वंदुनी
विनवीताहे । म्हणे उत्तीर्ण काय होऊं ॥ ३ ॥ जी मज दोषावेगळें केलें ।
पातकापासुनि सोडवीलें । ऐसें म्हणोनि ऋषीस न्हाउवीलें । रायें जनमेजये
॥ ४ ॥ तेथ भेरी वाजती निशाण । वर्षसुमनें वर्षती स्वर्गाहुन । म्हणती
सामवेदाचें उद्धरण । ऋषी व्यास पैं करें ॥ ५ ॥ मग राजा जनमेजयो पाहें ।
प्रत्यहीं भारती कथा सेविता जाय । पूर्वजांसी मोक्ष होये । हे कथा ऐकतां ॥ ६ ॥
जी हे पुण्यकथा पावन । भारतीचा इतिहास जाण । पातकांसी मुळींहुन ।
उपडुनि टाकी ॥ ७ ॥ जो हे नित्य कथा पाहे । भावें प्रेमें एकें गायें ।
ते दोघजण पाहे । होती विष्णुरूप ॥ ८ ॥ न देवधर्म यज्ञ होती । परी
बोलता दोनी निस्तरती । तैसी श्रोता वक्ता म्हणीतली । परी असती यत्न ॥ ९ ॥
न चित्त गेलाचें होय । न फळ हरीरूपची होय । चित्त निभ्रसीत आहे । तरी
पुण्य भारती कथा ॥ १० ॥ जी मी तुमचा घरदार । तुम्हा आगरी याचार

* ‘ अठरा हत्या फिटल्या त्वरित । जनमेजयाचिया ॥ ’
— कृष्णदास, रुक्मिणीस्वयंवर, प्रसंग पहिला

जी हे भारती कथा निरंतर । मन आणीजेत जाइजे ॥ ११ ॥ जी ये कथेसि थोर सुग्न आहे । आदि अंतीं अवघाची कृष्ण होये । कृष्ण म्हणता कृष्णाची होये । हा इत्यार्थ वेदींचा ॥ १२ ॥ जी श्रोते माझे जनक जननी । म्या लिनिलें कथा सांगोनी । जी माझा शुद्धाशुद्ध वचनीं । कृष्ण साठवा पोटभरी ॥ १३ ॥ जी हे भारती कथेसी । लिहिता उदार येती मानसी । ते अवघेचि हृषीकेशी । होती सर्वही कृष्ण ॥ १४ ॥ ऐसे बोलोनिया वचन । ग्रंथ जाहला वो संपूर्ण । भारत संपूर्ण जालें येथून । नामा म्हणे विष्णुदास ॥ १५ ॥

— महाभारत, स्वर्गारोहणपर्व

## ५

### आरत्या

१. देवी कामाबाई पुरवी मनची मनकामना वो ।
न कळे तुझा पार हरिहर चतुरानना वो ॥
सिणल्या वेदश्रुती, भगली शेषाची रसना वो ।
विप्र विष्णुदास लागे अंबेच्या चरणा वो ॥

२. येई वो विठ्ठले माझे माउलीये । निढळावरी कर ठेवुनी वाट मी पाहे ॥
येतीयास पुसे जाल्या निरोप । पंढरपुरीं माझा मायबाप ॥
पितांबर शेला कैसा गगनीं झळकला । गरुडावर बैसोनि माझा कैवारी आला ॥
विठोबाचें राज्य आम्हां नित्य दिवाळी । विष्णुदास नामा जीवें भावें ओवाळी ॥

३. चंद्रनारी ओवरी उदंलिली प्रकारीं । कनकाचा मंचक शेजे सुमनेवरी ॥ १ ॥ ओवाळू आलिया शेजे आरति । निद्रा करीं बापा लक्ष्मीपती ॥ धृ ॥ संत सनकादिक यातें आज्ञा दिजे । शुकादिक शानियाचा नमस्कार दिजे ॥ २ ॥ बाळा प्रौढा मुग्धा यातें आज्ञा दिजे । सेवका माझे गायनें पहुडविजे ॥ ३ ॥

विष्णुदास नामा राहिला द्वारा नेहटी । जयजयकार करित देतसे चिरटी ॥ ४ ॥

४ उठा पांडुरंगा आता दर्शन द्या सकळा । झाला अरुणोदय सरली निद्रेची वेळा ॥ १ ॥ संत साधु मुनि अवघे झालेती गोळा । सोडा शेजेसुख आता पाहु द्या मुखकमळा ॥ २ ॥ रंगमंडपीं महाद्वारीं झालीसे दाटी । मन उतावेळ रूप पहावया दृष्टी ॥ ३ ॥ राई रखुमाबाई तुम्हा येऊ द्या दया । शेजें हालउनी जागें करा देवराया ॥ ४ ॥ गरुड हनुमंत उभे पहाती वाट । स्वर्गीचे सुरवर घेउनी आले नोभाट ॥ ५ ॥ झालें मुक्तद्वार लाभ झाला रोकडा । विष्णुदास नामा उभा घेउनि काकडा ॥ ६ ॥

५ लाजलें ग माय आता कोणा ओंवाळू । जिकडे पहावें तिकडे चतुर्भुज गोपाळू ॥ धृ ॥ ओंवाळाया गलें मी द्वारकें । जिकडे पाहावें तिकडे चतुर्भुज सारिखे ॥ १॥ ओंवाळाया गलें मी हो मंदिरीं । जिकडे पाहवें तिकडे चतुर्भुज श्रीहरी ॥ २ ॥ ओंवाळाया गलें सारंगधरा । जिकडे पाहावें तिकडे चतुर्भुज पसारा ॥३॥ वैजयंती गळा श्रीवत्सलांछन । विष्णुदास नामा येणें दाविली खूण

न्याय श्रीद घेईन तुझें आता । पापी कैसा मी साग दीनानाथा।
कैसे पाप मारिले माझ्या माथा। अझुनी लाज का नये तुझ्या चित्ता ॥ ५ ॥
नम्र बोले देवासि हासु आलें । निंदा नोहे स्तवन माझें केलें ।
दीनानाथें तात्काळ उद्धरिलें । विष्णुदास नामा कौतुक बोले ॥ ६ ॥

७

स्फुट अभग

आम्ही न बोलो लटिकें । अवघें वर्तमान खोटें ।
मुगी व्याली शिंगी झाली तिचे दूध किती ।
अठरा राजण भरुनि ठेविले प्याले बारा हत्ती ॥
तळ्यात कासव गीत गाय, तडिवर कोल्हा नाचे ।
घेउनि कागद दौत लेखणी रेकडा पुस्तक वाचे ॥
विष्णुदास नामा म्हणे ऐका याची ख्याती ।
जो लटिके म्हणेल त्याचे पूर्वज नरकी जाती ॥

## कृष्णदास दामा

१

*आइका कथा पुण्यपावन*

आइका कथा पुण्यपावन । भारथिचा इतिहास हा सुजाण । आदीपर्वींचि यथुन । कथा असे चालीलि ॥ १ ॥ मग नमिलि भवानि । जे अनतकोटी-ब्रह्माडनाइकिणि । उत्पत्ति प्रलयो यथपासुनि । ते नमिलि आदीमाता ॥ २ ॥ ते आरुढ होऊन आलि हसापरी । विणा वाइलासे करी । नेपुराच्या झणत्कारीं । विघ्नें गेलिं पलोनिया ॥ ३ ॥ ते सुप्रसन आली घवघवित । प्रेमाचा पान्हा

वोसडत । घे घे दामया म्हणत । सप्रेम रसु यथिचा ॥ ४ ॥ मग वोसगल घेऊन । तृप्त जाले अतक्रण । मग सारजा ओले वचन । आवडि जिविचि ओल मुख ॥ ५ ॥ *मग श्रीगुरुरावो नमियला । जो निराकार असे आकारला । नेति नेति जितु त्याला ।* वाचा वर्णिला केवि पुरे ॥ ६ ॥ मग श्रीगुरुचरणि । माथा ठेविला कर जोडुनि । मग तेणें अस्वासुनि । माथा ठेविला अभयकर ॥ ७ ॥ *तवं तेचि प्रातिचें पाहें । सभे सत बैसल आहे । मग वदीले पाये । तया* कविजनार्च ॥ ८ ॥ तव ते म्हणति दामयासि । अगा यकि आरडी असे आमुचिया जिवासि । तु साग भारति कथेसि । पदी दाम्या बैसउनिया ॥ ९ ॥ तव दामयात असे विनविल । जि व्यासे भारत संसक्रुत केलें । ते म्हाष्ट सागितलं । नामदेविं ॥ १० ॥ जि ते कवित्वि । मिं आपुलि काय घाउ अल्पमति । तव सत म्हणति । आइक वचन दामया ॥ ११ ॥ अरे व्यास *भारथ फर्ले । तेंचि म्हाष्ट नामदेवि केल । तेंच तु साग वहिले । पदि भारथ* बैसउनिया ॥ १२ ॥ तव दामा ओले वचन । जि मज यव्हडे कैच ज्ञान । अरे आह्नि तुजलागुन । साहे असों ॥ १३ ॥ अरे हे मोक्षदायेक कथा । तुज गोड लागेल सागता । आणि तृप्त चित्ता । होइल आमुचिया ॥ १४ ॥ आम्ही जर सागा या सुखासि । तरी हें तुझच कलेल तुजसिं । विल्ह्यु न करीं अवसि । साग भारथि कथा ॥ १५ ॥ आज्ञा स्वामिचि होता पाहे । मग पाइकाचे चाले काये । उगच सागितलें पाहे । म्हणिय करणे लागतसे ॥ १६ ॥ मग वाइट अथवा वरें । होय स्वामिंच्या अडीवारें । पर पाइक अपुल्या सरीर । वेचे कष्ट पाहिजति ॥ १७ ॥ तव सत बोलति हासोनि । दाम्या नवल तुझ्या दृष्टातानि ठेवणि । बरे वाइट दोन्हि । आमुचि लाविलि आग्न्याच सर्व ॥ १८ ॥ जि यास नवल काये । रगि पादकु जिवसाटी करीतु आहे । पर सेवट हाये । यश धुरेच्य ॥ १९ ॥ निरोनि जाण पाइकास । जग वागाणि धुरेस । या आइकोनि वचनास । सत असति तोखले ॥ २० ॥ मग सत म्हणति दामयासि । अरे उपमा नाहिं या तुझ्या दृष्टातासि । एसि गोडी पिउषासि । नाहि पडे याजया ॥ २१ ॥ अरे तुझे सज्योत वचन । हं कल्ले असे आम्हालागुन । भारथि कथा म्हणउन । तुजपर्तीं पुसियति ॥ २२ ॥ अरे यौसि नाव पाहे । यकुचि गगतु आहे । म्हणउन ठेवा पाहे । देण लाग तयासिर ॥ २३ ॥ तैस आम्हि तुजलागुन ।

आपुलें सुख दिधलें सपूर्ण । आता तु निर्भयेंकरून । साग कथा भारथि ॥ २४ ॥ तव दामा जाला विनविता । जि जि परिसा भारथी कथा । परी यकी विनती आता । करणें असे स्वामिया ॥ २५ ॥ जि हे कथा भारति अपार । यक लक्ष सत्ताविस हृजार । ते सागता सविस्तर । मति पुरे केवि माझि ॥ २६ ॥ जि जेवि कथा सागता रामायण । तें शतकोटि सख्या विस्तीर्ण । तें रामदेरायालागुन । सागता मनिं न बैसे ॥ २७ ॥ रावो पुढे कथा परीसतु । मागिल अनुसधान विसरतु । मग रावो असे विनवितु । म्हणे आइक वचन द्विजोत्तमा ॥ २८ ॥ कथा ऐसि करीं निरोपम । जे यक वेलेन्च कले मजलागुन । साक्षभुतो अन्वयो दाउन । यथाप्रिति मज कले ॥ २९ ॥ मग तो द्विजाचा रावो । हेमाडपति छायामडीप केले पाहा हो । क्षण न लागता अभिप्रावो । अवघें रामायेण सागिल्हेत ॥ ३० ॥ जि मज यैसे करावें स्वामि । भारथि कथा बोल्वावि तुर्हि । साक्षभुत अन्वयो जव मिं दाविं । तव कथा कले श्रोतयासि ॥ ३१ ॥ तव संत बोलति वचन । अरे तु कथा साग अन्वयेंकरून । जि पर श्रोते म्हणतिल ताकापुरतें रामायण । दाम्यानें कथा सागितलि भारथि ॥ ३२ ॥

— महाभारत, आदिपर्व, अध्याय पहिला, ओव्या ५–३६

## २

### नारायणवर्णन

माथा मुकट रत्नजडित । जेवी कोटी वींर्णी भानु प्रकाशत । त्या तेजें उजळत । दाही दिशा ॥ १ ॥ मृगनाभीटीळा कुसरी । ल्हार्गी रेखील असे हरी । गधाक्षेता वरी । धगधगिती ॥ २ ॥ भोंवया व्यक्त जाग । नीमळ सुरेखा पूर्ण । कमळाकार नयेन । तया पाती कोरीव ॥ ३ ॥ नासा पुस्ट सरळ । अधररग नाहाळ । दतपक्ती झळाळ । रत्नजोती ॥ ४ ॥ बोल्ता तेज दती । वींज जैसी तळपती । स्रेवनीं कुडलें शोभती । मकराकार ॥ ५ ॥ राया ते म्हणसिल कैसीं । तरी मीन मकराकार आक्रुती तयासी । तयाराजें परियेसीं । रत्नजडित कुडलें ॥ ६ ॥ ते स्रेवनीं शोभत । परी भुजवरी तळपत । तें चोप दावीत

श्रीमुखप्रभेचें ॥ ७ ॥ आधींच रुप सावळें । वरी तेज पडे पीवळें । मग त्या सुढाळें । सुनील रुप दीसतसे ॥ ८ ॥ तेथींचें लावण्य । राया मी कायें सांगो तुजलागुण । कोटी मयेंक येऊन । कुरवडी करीती श्रीमुखप्रभेची ॥ ९॥ कौस्तुभ कंठीं मीर्वत । जो समुद्रमथनीं जाला प्राप्त । चहुकरीं मीर्वत । पचायोध्ये ॥ १० ॥ राया तें तु म्हणसिल कवन । तरी शख चेक्र गदा पद्म जाण । पाचवें पूर्ण । सारग धनुश ॥ ११ ॥ त्या चहु भुजासी शोभत । बाहीं बाहेवटे रत्नजडित । आंगोळीयास मीर्वत । जडीत मुद्रिका ॥ १२ ॥ गळा माळ वैजयती । ते चरना वरी असे रुळती । वनमाळा शोभती । तुळसी आत ॥ १३ ॥ आगीस पातळ चदनाची उटी । जडीत मेखला शोभे मालगठी । अक्षइ पुरिट । भाता असे कासीला ॥ १४ ॥ ह्रदइ श्रीवच्छ पाहे । पदक झळकत आहे । उतरी कष्यत्र पाहे । मीरवे नाभीकमळावरी ॥ १५ ॥ तेथं ब्रह्मयाचें जन्मस्थान । ते कटतटी पीतांबर कासीला जाण । तो जाऊन । चरनावरी असे लोळत ॥ १६ ॥ चरनीं ब्रीदाचा तोडर रुळत । तो असुरावरीं असे मीर्वत । वाकी गर्जत । गजरें पाइ ॥ १७ ॥ नखीं चद्रबिंबें शोभती* । तेथं मुनिजनाची वीस्राती । सीतल म्हणउन असती । भक्तीजन पाइ ॥ १८ ॥

— आदिपर्व, अध्याय पचवीसावा, ओव्या २९–४६

३

## समारोप

ऐसी श्रोतीयाप्रती । दामा करीत होता वीनती । तव व्यासरुशीन प्रेमप्रीती । दामा ह्रदइं असे आळगीला ॥ १ ॥ मग म्हणे वैशंपायेन । दामा तुझीया इष्टार्तेकरुण । आमचे कयेंरुण । तुझी कथा गोड जाली ॥ २ ॥ तवें दामा करी वीनवणी । जी हेंच भवें माझा मणी । तुम्ही समर्थ मज रुणी । करा थोर ॥ ३ ॥ जी तुमचें सबस्तुन वचन । ते मी बोलीलो

* नखें ज्यांची चंद्ररेखा । (व्यकटेश स्तोत्र, ५५)

म्हाष्ट वाणी करुण । तुम्ही तयालागुण । म्हणा जी गोड जालें ॥ ४ ॥ जी तेल गोड तववरी जाले । जवें तूप नाहीं चाखीलें । तैसें माझें म्हाष्ट गोड जाले । जव तुमचें नाहीं आइकीले सवस्कृत वचन ॥ ५ ॥ जी तुमचा दृष्टांत । मज आला न कळत । असो रकास काये आठवत । वचन राज नीतीचें ॥ ६ ॥ जी माझी असे अल्पमती । तयासारीखे दृष्टांत येती । येर काये साजती । तुमचीया वचनासी दृष्टांत हे ॥ ७ ॥ जी तुमचें वचन सवस्कृत । तयासी गोडी मागो पीउश असे येत । तेथ माझें उत्तर दृणात । काये उपेगास येतील ॥ ८ ॥ मग म्हणे रुशी व्यास । दामिया वचन परीयेस । अरे म्हाष्ट आणि सवस्कृतास । भेदु नाहीं सर्वथा ॥ ९ ॥ अरे तोये आणी पाणी । हे वेगळीक असे वचनी । परी चत्री सुजाणी । जाणीने येकीची ॥ १० ॥ अरे तोये अल्पासी सुचले । पाणी जगासी कळलें । म्हणऊन उपगारक जाले । म्हाष्ट वचन सकळासी ॥ ११ ॥ अरे अल्पवीद्या जयास । तोच नादी म्हाधाम । अरे अर्क आणि प्रकाशास । काये असे वेगळीक ॥ १२ ॥ अरे सवस्कृत बोलती वचन । परी जगासी नीतनीती म्हाष्टकरुण । परी शका न पावे तयाचें मन । नाहीं अथासी भेदु म्हणऊनिया ॥ १३ ॥ अरे अतरी उलेखु उपजत । परी शब्दाकारें चालत । तैसा उलेख जाण सवस्कृत । म्हाष्टी प्रगट होतुसे ॥ १४ ॥ अगा सवस्कृत आणी म्हाष्टी पाहे । काये कृष्ण दुजा बोलत आहे । येर करासी काये । वितपत्ती आशा ॥ १५ ॥ अगा मुख्ल ते साधलें । कृष्ण नाम वाचेसी आलें । तेणें अनवेच सुख जाले । कथा अनुसंधान ॥ १६ ॥ तव दामा असे विनवीत । जी तुमचें वचन येथार्थ । मज आधार असत । येव्हडाच स्वामी ॥ १७ ॥ येर्‍हवीं तुमचें वचन सवस्कृत । ते श्लोक व्याख्यानी अपार प्रेमा चालत । परी नसे पुरत । मनास आनंद तेथींची ॥ १८ ॥ जी तेयें म्हाष्ट वचनासी । म्या काये करूनी सागावें क्येसी । तुमचीया येका श्लोकासी । म्हाष्टी वाढती कोटी ग्रंथ ॥ १९ ॥

—आदिपर्व, अध्याय अठ्ठावनावा, ओव्या ५७–७०

## कृष्णदास मुद्गल

### प्रस्तावना, मराठीची व रामायणाची महती

जैसे रानवट पक्षी शुक । समर्थगृहीं करी कौतुक । सुरस अती मानिती लोक । शब्द परिसोनी तयाचे ॥ १ ॥ बहुत वित्पत्ती बहुत मुद्रा । शोधिता साहित्यसमुद्रा । ते शब्दरत्नपरीक्षी महींद्रा । परिस अधिक तुम्ही ॥ २ ॥ गुणज्ञ सुविद्य तुम्ही श्रोते । कवित्वमुद्रा योग्य तुम्ही भोक्ते । तुमचे सुपाणी देखोनी वक्ते । सादरींव मागती ॥ ३ ॥ तुम्ही ज्ञानजळाचे विहरे । विवेक वैराग्यगिरीचे हिरे । नाना भगवतकथामृता थोरें । तुम्ही सुपात्रे सर्वथा ॥ ४ ॥ तुमचे कृपादानजळ बोलावें । माझें बुद्धिज्ञान व्यापारवन पाल्हावें । तेथें जन सकुळ निवे । नवरसफळें सेविता ॥ ५ ॥ वक्ता अतिपाडें अनुवादें । आणि श्रोतयामनीं व्यग्रता नादे । तरी कवित्व रसराज मदे । जैसा जळेंविण अंकुर ॥ ६ ॥ गौल्यता पियूषापरिस मोठी । ऐसीं अन्नें विस्तारिलीं ताटीं । अग्निमद भोक्तयाचे पोटीं । तरी तें व्यर्थची गेलें ॥ ७ ॥ स्वर्गांगनाहूनि अधिक । होतसे नृत्याचें कौतुक । सुषुप्तिनें व्यापिले सभानायेक । तरी तें व्यर्थचि गे[illegible] ॥ ८ ॥ जिंतली किन्नराची गीतशाळा । ऐसी होतसे गायनकळा । बधिरत ऐकत्यांच्या कर्णमिळा । तरा तें व्यर्थचि गेलं ॥ ९ ॥ सौंदर्य पाहता ला[illegible]े मेनका । ऐसी शृंगारिली नायका । चिंतातुर पति आरुढे पर्यंका । तरी तें व्यर्थचि ग[illegible] ॥ १० ॥ म्हणऊनिया श्रोते हो तुम्ही । कथेसि लुब्ध, जैसे भृग पद्मीं । तरीच माझा हृदय व्यामीं । माईल ना ऐसें वा[illegible] ॥ ११ ॥ सपूर्ण हे पूर्णमेचि निशीं । तेथें उदेला कवित्वशशी । आता तुमच्चिया सु[illegible]समुद्रासी । भरितें तुनळेल ॥ १२ ॥ सदा साहित्यासी दद । ऐसे जोडती ज्री मतिम[illegible] । तरी कवित्वाचे विरे दा[illegible] । चडवातं जैसें अभ्र ॥ १३ ॥ मतिमदाचें हृदयीं सादेपु । तरी वाग्विलासीं जडे संतापु । जैसा शून्य मदिरीं दीपु । पाजळिला व्यर्थ ॥ १४ ॥ चिताभूमिसी घालिजे मद्दपु । कीं पका लागिने रत्ननिक्षेपु । का कामधनूचे क्षीर भस्मकूपु । भरि[illegible] जैसा ॥ १५ ॥ गर्भांधाचें पुढ जैसा । फाडुनी दाविने आरसा । का अमृतफळाचा रसु वायसा ।

कनकपात्रीं वाढिला ॥ १६ ॥ द्राक्षफळाचिया राशी । केलिया उष्ट्रमुखापाशीं । मृत्तिका भक्षिती किरले त्यासी । शर्करा हे समर्पिली ॥ १७ ॥ म्हणौनि जेथें मूढमति साजवेळ । तेथें बुडे साहित्य सूर्यमंडळ । पदार्थांचि प्रगट झळाळ । सरिसी लेपोनि राहे ॥ १८ ॥ दरिद्री निजले तृणसेजे । त्यातें षोडशोपचारें पूजिजे । तेविं काव्यकुशलता बोलिजे । हृदयशून्यापुढें ॥ १९ ॥ असो ऐसिये रीतीचें जन । वृद्ध होत्साते बाळकासमान । परी न मेनावे अंतर्मलीन । काव्यव्यसागर साच ते ॥ २० ॥ गुण ऐकूनि ल्यावधी । नरवें न बोलती कुबुद्धी । येकु दोष देखोनि वृद्धी । करितील आपुलेनि मुखें ॥ २१ ॥ पद्मिणींची पवित्र फुल्लारें । सुगंध, राजसें, मनोहरें । तीं पकनासिया दर्दुरें । काय भोगूं जाणतील ? ॥ २२ ॥ जालिया वसंतऋतु प्राप्त । वदनीं वायसाचे वेथा उद्भवत । तैसें निंदकाचें भगतमें चित्त । परकवित्व परिसतां ॥ २३ ॥ निंदकासी दोषाची धणी । परि मज वास्तसें हित अंतःकरणीं । जे पातकाची करी क्षाळणी । मौल्यातें नेणोनी ॥ २४ ॥ आणि सुजनासि प्रिय गुणपुष्टी । दोष असल्यापरी न ये दृष्टी । जैसा कल्कु चंद्राचे सपुष्टीं । चकोरा चाड पीयूषाची ॥ २५ ॥ कुरूप जननीचें वदन । पाहतां न भग बाळकाचें मन । ते करितां तृप्ती स्तनपान । रिघे वोसंगापुढा ॥ २६ ॥ पके घोळिला पद्मिणी नळु । हा विचारूनी करी अळीकुळु । तयासि प्रिय तो परिमळु । म्हणउनि झपावत पद्मिणी ॥ २७ ॥ कोकिळा नाहीं रूपवती । म्हणऊनि कर्णासी कैसी रती । तयासीं ल्गली असे प्रीती । मधुरस्वरआलापीं ॥ २८ ॥ म्हणऊनि सुज्ञ पंडितासी । गुणमाधुर्य घेणें मानसीं । जैसें तोय त्यजूनि राजहंसीं । पयप्राशन करिजे ॥ २९ ॥ असो, हें बोलिलें सहज । पूर्वी बोलिला वाल्मिकराज । तचि उच्छिष्ट कथितां बहुत लाज । लाविती महाप्रागासि ॥ ३० ॥ तरि लज्जा न लागावयाकारणें । वाग्देवीनें नेलें धावणें । कथामार्गी चालतां उणें । पडो नेदी सर्वथा ॥३१॥ उपमा लालित्य अर्थगौरव । तचि जाणावें शुद्धमुद्राकवित्व । ज्याचिये गर्भी जे जे भाव । तेचि चतुरीं निवडूनि घ्यावे ॥ ३२ ॥ जैसे पद्मगर्भीचे पराग । येक मोगूं जाणती भृंग । तेथें काय करावें मातंग । वृथा पुष्पकें नाशक ॥३३॥ जे कवित्वीं नाहीं व्युत्पत्तिविन्यासु । ते कथेसि कैंचा तुरळ रसु ? । तरी श्रोता नव्हे उदासु । ऐसें बोलिलें पाहिजे ॥ ३४ ॥ बोलिलें आतां बोलणें । परि

सतां प्रणिकां होय पारणें । ये पदप्रबंधींची अक्षरें गुणें । आणिती रत्न पुंसासी ॥ ३५ ॥ नाना अक्षरें नवरसाळें । कथाकल्पवल्लीचीं फळें । जयांचे भाग्य आगळें । ते स्वइच्छे सेविती ॥ ३६ ॥ कथा रामायणी विचित्र । वाराणसीपरिस सुक्षेत्र । विचारिता होय पवित्र । गंगेहूनु आगळी ॥ ३७ ॥ सुधारसाहूनि सौल्य । क्षीरनिधीपरिस सखोल । उत्तम रत्नाहूनि अमोल्य । कथा रामायणी ॥ ३८ ॥ शीतकराहूनि शीतळ । तमातकापरीस तेजाळ । व्योमाहूनि विशाळ । अर्थविषयीं ॥ ३९ ॥ कंदर्पकांतीपरीस निर्मळवती । वैकुंठवनितेपरी भाग्यदेती । गौरीच्या अपेक्षा गुणवंती । शिवासि प्रिय होय ॥ ४० ॥ गौरीहूनि आगळी गुणें । शिवासि प्रिय पदार्थी कवणें । म्हणऊनि श्रोतयांचें आक्षेपणें । सहजेंचि पैं आलें ॥४१॥ वक्ता विनवी जोडला करीं । जैं मथन जालें क्षीरसागरीं । तैं हालाहल निघालें बाहेरि । तेणें सृष्टी आहाळली ॥ ४२ ॥ ऐसें देखोनि शिवदयाळ । मग प्राशन केले हालाहल । तेणे तनु निर्मळ । गदगदों पैं लागली ॥ ४३ ॥ पुढें पिनाकपाणी काय करी । शीतळ गंगा शिरीं धरी । तिणें न निवेचि, मग मौळिचा पारी । चंद्रकळा ठेविलि ॥ ४४ ॥ फलद नव्हे ऐसेपरीही प्रेत्न । मग तया हिमालयाचें कन्यारत्न । तिशी शिव दे आलिंगन । परि न तुटे उष्णता विषाची ॥ ४५ ॥ मग तेणें कैलासनाथें । रामकथा आणिली श्रवणपंथे । कंठीं धरिली मुख्यस्वार्थे । तेणें सर्वांग निवालें ॥४६॥ ऐसी ही कथा रामायणी । भक्तिज्ञानवैराग्यवेणी । प्रयाग वाल्मिकाची वाणी । पूर्वदत्तें प्राप्त होय ॥ ४७ ॥ तरी या वाल्मिकऋषीचा महिमा । बोलिजे तितुक्या न्यून उपमा । जें भविष्य काव्य रघुत्तमा । रायाचें कथिलें ॥ ४८ ॥ महाकाव्य हें अर्थतुष्ट । वाल्मिकीकृत, शिंव मानिलें श्रेष्ठ । तेचि परिसा मान्हाष्ट्र । भवच्छेदक सुरसतें ॥ ४९ ॥ मान्हाष्ट्र ऐसे वाटे लोका । परि ते वाल्मिक काव्याची शुद्ध टीका । येक येक अक्षरें ऐका । महापातकें नाशती ॥ ५० ॥ आणिकें नाना मतें तपें । आचरता बहुत कष्टरुपें । पुढे क्लेशांतीं पूर्वसंकल्पें । इच्छाफळ पाविजे ॥ ५१ ॥ तैशी कथा नव्हे रामाची । परिसतां पीयूषापरि रुची । आणिक हे बहू अर्थाची । फळे भोगवित असे ॥ ५२ ॥ कथापंथीं महाराष्ट्रवचनें । परि हीं रसिकें अतिगहनें । जैशी घन-

मक्षिकांचीं वदनें । मधूतें स्रवती ॥ ५३ ॥ नाना, संस्कृत हें चंद्रमंडळ। महाराष्ट्र चंद्रिका केवळ । संस्कृत स्वातीचें जळ । मराठी मुक्ताफळें ॥ ५४ ॥ जैसें दधीचें मथन केलें । त्यातूनि नवनीत निवडिलें । तैसें संस्कृतापासूनि जाहलें । महाराष्ट्रकवित्व ॥ ५५ ॥ इक्षुदंडु रसनायकु । शर्करा पुढें तयाचा पाकु । गोडीचा विचार अधिकु । रसनायकीं जाणावी ॥ ५६ ॥ आमुची देशभाषा मराठी । वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं । म्हणौनु कौतुकें वचनराहटीं । ऐसी पटोत्तरांची ॥ ५७ ॥ असो हें बोलणें वाउगें । आतां वंदूं कथेचेनि मार्गें । श्रोतियाचे मंडळ साहित्य-रंगें । शृंगारूं हल्लहल्लू ॥ ५८ ॥ विचित्र वाल्मिकीनें कथिलें । मागें सुंदरकाण्ड संपादिलें । आतां युद्धकांड आरंभिलें । जें अपूर्व सप्तमध्यें ॥ ५९ ॥ रत्नमाळेचा मध्यमणि । कीं ग्रहसमुदायामाजी तरणि । तैसें युद्धकांड रामायणीं । रसाल बहुसाल ॥ ६० ॥ ऋषेश्वराची बैसली सभा । सूर्य लोपे त्यांचिया प्रभा । कोटि चंद्रासम, धवळीत शोभा । उजळल्या दाहि दिशा ॥ ६१ ॥ मनें सृष्टी, मनें संहारु । ऐसा येकयेक ऋषेश्वरु । पृथकें सांगता होईल विस्तारु । कथा पडेल पाल्हाळीं ॥ ६२ ॥ ऐसिया ऋषेश्वराप्रती । वदे वाल्मिकिगिरा सरस्वती । तेचि गौरीस उमापती । कैलासीं सांगतु ॥ ६३ ॥ ब्रह्मा वदे नारदाजवळीं । आणि वासुकी परिसतु पाताळीं । तरि रामकथा भूमंडळीं । पवित्र जन परिसती ॥ ६४ ॥ मऱ्हाटी वक्तृत्वीं असे रुची । ऐसी संस्कृतामाजीं कैची ? । यद्विषयीं स्वर्ग दृष्टांताची । साक्षी आइका ॥ ६५ ॥ इति श्रीयुद्धकांडकथा रामायणीं । वाल्मीकीकृत भवतारिणी । ते परियेसा श्रवणीं । कृष्णदास मुद्गल म्हणे ॥ ६६ ॥

— रामायण, युद्धकांड, प्रसंग पहिला, ओव्या ४९–११४

## एकनाथ

१

### पदे–गौळणी

१. ऐक ऐक सखये बाई । नवल मी सांगू काई ।।
त्रैलोक्याचा धनी तो हा । यशोदेसी म्हणतो आई ।।
देवकीनें* वाहिला । यशोदेनें पाळिला ।।
पांडवांचा बंदिजन । होउनीयां राहिला ।।
ब्रम्हांडाचा साठवण । योगियांचें निजधन ।।
चोरी केली म्हणउन । उखळासि बंधन ।।
सकल तीर्थें जया चरणीं । सुलभ हा शूलपाणी ।।
राधिकेसि म्हणे । तुझी करिन वेणिफणी ।।
शरण एका जनार्दनी । कैवल्याचा मोक्षदानी ।।
गाई गोप गोपी बाळा । मेळविले आपलेपणीं ।।

२ कशि मी जावू वृंदावना । मुरली वाजवी कान्हा ।।
पैलतिरीं हरि वाजवी मुरली । नदि भरली यमुना ।।
कासे पीतांबर कस्तुरी टिळक । कुंडल शोभे काना ।।
काय करू बाई कोणाला सांगू । हरिनामाची सांगड आणा ।।
नंदाच्या हरिनें कौतुक केलें । जाणें अंतरिच्या खुणा ।।
एका जनार्दनी म्हणा देव । महात्म्य कळेना कोणा ।।

३. माझा कृष्ण देखिला काय । कुणीतरी सांगा गे ।। धृ ।।
हातीं घेऊनिया फूल । अगणि रांगत आहे मूल ।
होते सारवीत मी चूल । कैशी भूल पडियेली ।। १ ।।

* देवकीयें उदरीं वाहिला । यशोदें सायासें पाळिला ।
शेखीं उपेगा गेला । पांन्डवासी ।। –ज्ञानेश्वरी, अ ६।१३७

माथा शोभे पिंपळपान । मेघवर्ण ऐसा जाण ।
त्याला म्हणती श्री भगवान । योगी ध्यान विश्राती ॥ २ ॥
सगे घेउनीं गोपाळ । बाळ खेळे अळुमाळें ।
पायीं पोल्हारे झळाळ । गळा माळ वैजयती ॥ ३ ॥
एका जनार्दनी माय । घरोघराप्रती जाय ।
कृष्णा जाणावें तें काय । कोणीं सागा गे ॥ ४ ॥

४ गौळणी गाऱ्हाणें सागती यशोदेसी ।
दहीदूध खाउनीया पळुनि जातो हृषिकेशी ॥ १ ॥
लाडका हा कान्हा बाई । तुझा तुला गोड वाटे ॥
याच्या खोडी किती सागू । महीपत्र सिंधु आटे ॥ २ ॥
मेळवोनी गोपाळ । घरामध्यें शिरे कान्हा ॥
धरू जाता पळुनी । जातो यादवाचा राणा ॥ ३ ॥
ऐसें मज याणें पिसे । लावियलें सागू काई ॥
एका जनार्दनीं । काया वाचा मनें पायीं ॥ ४ ॥

५ कसा मला टाकुनी गेला राम ॥
रामाविण जिव व्याकुळ होतो । सुचत नाहीं काम ॥ १ ॥
रामाविण मज चैन पडेना । नाहीं जिवासि आराम ॥ २ ॥
एका जनार्दनीं पाहुनी डोळा । स्वरूप तुझें घनश्याम ॥ ३ ॥

६ भुलविलें वेणुनादें । वेणु वाजविला गोविंदें ॥
पागुळले यमुनाजळ । पक्षी राहिले निश्चळ ॥
तृणचरें लुब्ध जालीं । पुच्छ वाहूनिया ठेली ॥
नाद न समायें त्रिभुवनीं । एका भुलला जनार्दनीं ॥

७ वारियानें कुडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥
राधा पाहुनि भुलले हरी । बैल दुभे नदाघरीं ॥
हरि पाहुनि भुलली चित्ता । राधा घुसळी डेरा रिता ॥
मन मिनलेसे मना । एका भुलला जनार्दना ॥

## २

## अज्ञान-दंभावर प्रहार

१. कलिमाजीं दैवतें उघड दिसती फार ।
नारळ आणि शेंदूर याचा भडिमार ॥
लटिका भक्त लटिका देव लटिके सर्व वाव ।
सात धान्याचे धपाटे काय साचा बडिवार ॥
तेल राधा मागती मलिदा वरती काळ कुकू ।
फजीतखोर ऐसे देव तयाचे तोंडावर थुंकू ॥
एका जनार्दनीं सर्वभावें सोपा पंढरिराव ।
तया सांडोनी कोण पुसे या देवाची माव ॥

२. म्हणती देव मोठे मोठे । पूजिताती दगड गोटे ॥
कष्ट नेणती भोगिती । वहा दगडाते म्हणती ॥
जीत जीवा करुनी वध । दगडा दाविती नैवेद्य ॥
रांडा पोरें मेळ जाला । एक म्हणती देव आला ॥
नाक घासुनी गव्हार । देवा म्हणती गुन्हेगार ॥
एका जनार्दनीं म्हणे । जन भुललें मुर्खपणें ॥

३. येऊनी नरदेहा भूतातें पूजिती । परमात्मा नेणती महामूर्ख ॥
दगडाच्या देवा सेंदुराचा भार । दाविती बडिवार पूजनाचा ॥
रांडा पोरें घेती नवसाचें बगाड । नुगवे लिगाड तयाचेनी ॥
आपण बुडती देवा बुडविती । अतकाळीं होती दैन्यवाणे ॥
एका जनार्दनीं ऐसिया देवा । जो पूजी गाढवासम होय ॥

४. भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें ॥
अग्निहोत्राचा सुकाळ । वडा पिंपळासी काळ ॥
तिन्ही देव पिंपळात । अग्निहोत्रीं केला घात ॥
म्हणति सोमयाग करा । सुप धरुनी मेंढा मारा ॥

शेंदुर माखूनिया धोंडा । चाळविती पोरें राडा ॥
एका जनार्दनीं नेम । सर्वांठायीं पुरुषोत्तम ॥

आता मानभाव झाला भिक्षा वाढा बाई भिक्षा वाढा बाई ॥ ध्रु ॥
मुळीचाची मानभाव वस्त्रें काळीं केलीं ।
कोरके मागून झोळी भरली । उलटी काठी धरली ॥ १ ॥
सोन्यारुप्याचे देव आम्ही मोडूनिया खाऊं ।
शेंद्राचे देव आम्ही दृष्टी न पाहूं ॥ २ ॥
एका जनार्दना मानभाव झाला ।
झोळीवरती झोळी ठेउनी गडबडगुडा केला ॥ ३ ॥

## २

### स्फुट अभंग

१. श्रीज्ञानदेवें येउनि स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ॥
दिव्य तेज पुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ॥
अजानवृक्षाचि मुळी कंठासि लागली । येउनि आळंदीं काढी वेगीं ॥
ऐसे स्वप्न होतां आलों अलंकापुरी । तंव नंदीमाजारा देखिलें द्वार ॥
एका जनार्दनीं पूर्वपुण्य फळलें । श्रीसद्गुरु भेटले ज्ञानेश्वर ॥

२ दामाजीचा भाव पाहुनी श्रीहरी । अनामिक निर्धारी स्वयें जाला ॥
घेऊनिया द्रव्य निघाला श्रीहरी । जोहार जोहार करी पातशाहातें ॥
द्रव्य देउनीया रसीद घेतली । भक्ताची माउली विठाबाई ॥
एका जनार्दनीं भक्ताचियासाठीं । धांवे पाठोपाठीं भक्ताचिया ॥

३. चोखियाची भक्ती कैशी । प्रेम आवड त्यासी ॥
ढोर ओढी त्याचे घरीं । नीच काम सर्व करी ॥
त्याचें स्त्रीचें बाळंतपण । स्वयें करी जनार्दन ॥
ऐसी आवड भक्ताची देखा । देव भुलले तया सुखा ॥
नीच याती न मनीं कांहीं । एकाजनार्दनी भुलला पाहीं ॥

४

## आरती

ओवाळू आरती मदन गोपाळा । श्यामसुंदर गळा वैजयंती माळा ॥ ध्रु ॥
चरणकमल ज्याचें अतिसुकुमार । ध्वज वज्रांकुश चरणीं ब्रीदाचे तोडर ॥
नाभीकमळीं ज्याचे ब्रह्मयाचें स्थान । हृदयीं पदक शोभे श्रीवत्सलांछन ॥
मुखकमळ पाहतां सूर्याच्या कोटी । मोहियेलें मानस कोंदाटली दृष्टी ॥
जडित मुगुट ज्याचा देदिप्यमान । तेणें तेज कोंदलें अवघें त्रिभुवन ॥
एका जनार्दनीं देखियेलें रूप । रूप पाहां जातां जाहलों तद्रूप ॥

५

## जोहार

१. मी सतानगरीचा महार । करीतो जोहार ॥ ध्रु ॥ विवेक नाईक माझें नाव । मीपण आलें अहंभाव । पंचभुताचा वसवी गाव । रस्ते चार ॥ १ ॥ आत्मा धनी पाटीलबावा । मनाजी पाड्या चालवि गावा । बुधाजी शेन्या बळकट रावा । घरात बसली आशा आवा । खेळवी पोर ॥ २ ॥ दहा इंद्रियें नऊ वेशी । राहातो दहावे खीडकीपाशीं । माझा मीच मूळ मिरासी । लंभ सद्‌गुरुचरणापाशीं । सार विचार ॥ ३ ॥ कौल शेत वर्षाचें मूळ । काम देशपाड्या सळ । क्रोध देशमुख सबळ । नेणें सरकार ॥ ४ ॥ हिशोब पडेल जमा सरकारी । येइल यमाजीची स्वारी । जीवाजी धरुनी कारभारी । ओस पडेल नगरी स्वारीं । देतील मार ॥ ५ ॥ शेवटीं नाहीं तुमचें घड । पडेल चौऱ्यासीचें कोड । मी तो राहिन एकीकडे । सीवाजीवर घातलें साकडें । सांगतो बा रे ॥ ६ ॥ आवडी राजा मजवर हेत । मीच करीन तुमचे हीत । सतागग लावा चित्त । म्हणे एका जनार्दन विवेकनाथ ॥ ७ ॥

२ ब्रह्माजी पाटील यासी सांगा जोहार । पाटलीन आवाचा डेंगा जाला फार । अवघा गावगुंडी कारभार । आयाजी करिती कि ॥ १ ॥ आवाजीचे साच वेसन खोटी । रावती करा संदेह रोठी । सहज कारभाराची आगआटी । मज नफगसी उजवे दिठी । पाहू नका कीं ॥ २ ॥ कामधामाचा उलगडा करतो । आल्या गेल्यासी जवाव देतो । राहे रहतीचें घर रासितो । हे कष्ट सान काय माय बाप ॥ ३ ॥ कितीकासी लाकड द्यावी । दिंग शिंगुटी ग्याच पुरवावी । फजिती रानगुकीची सोसावी । ही गोष्ट सान कीं ॥ ४ ॥ मेरवा पायवद तोवरे माथा । जीव कष्टला बिगारीं वाहता । चवऱ्याऐर्शी लक्ष गावें हिंडला । हें दु:ख सान कीं ॥ ५ ॥ वुळवाडी योटपणाशीं आले । वटते देईनासे जाले । पादर टाकुनी पळाले । तरी मिराशिचें लिगाड कीं ॥ ६ ॥ न होईना मातीचा पेंडुळा । जनोना खायाचा मायदळा । रजा घेउनी पूर्वस्थळा । जाईन की ॥ ७ ॥ मिरास सर्वस्व कळली सारी । हाक घेउनी जाइन गडावरी । रामजी नावाचे दरबारीं । इनिकत सारी सांगेन की ॥ ८ ॥ मिरास सर्वस्व कळली । पाटलीण आवा धनीन जाली । दिवाणदारचीं तोंडें मारलीं । तेथें आमुचा पाड काय कीं ॥ ९ ॥ कोणी म्हणती देऊ त्याचा । मी नव्हे आजकालचा । माझा वृत्तांत साचा । तो वडिलासी सांगेन कीं ॥ १० ॥ ताळीं गावीं पाटलीण आवा दिवसी । ती आगुनेदी साहेबासी । सारे म्हणती मोकासी । आम्हास तिजवाशीं धाडिता कीं ॥ ११ ॥

६

जरासंध–पराभवानंतर

यादवा यश आलें गाढें । पळता न पाहे मागेंपुढें । रथ गज साहूनि घोडे । वीर गाढे पळाले ॥ १ ॥ पळता पडताती वेंगाटी । योद्धे नव्हो आम्ही वऱ्हाडी । बळिभद्रें भिनपरवडी । रणलगडीं वोपियेलीं ॥ २ ॥ नवराचा वडील भावो । तेणें केला जी गौरवो । पाठीं ताबड्या करुनि पाहा वो । रायें

रावो गोळविले ॥ ३ ॥ निज प्राप्तीसी विन्मुख । युद्धीं झाले पराङ्मुख । राने नरवीर अनेक । पळता दुःख पावले ॥ ४ ॥ देह लोभिये आपुली । पायीं ममतेची वेडी । विस्मरणाची खरस तोंडीं । जेरें मुरकुडी घालिती ॥ ५ ॥ अत्यत प्रळय करिता देख । सर्पपणें दिधली हाक । पोटीं घेऊनिया धाक । एक एक पळाले ॥ ६ ॥ साडिली पुरुषार्थाची लुगडी । केवळ नागवीं उघडीं । विन्मुख पडतीं उघडीं । मेलीं मडीं होऊनि ठेली ॥ ७ ॥ बहु पुरुषार्थी न होय वाट । केवळ नर स्तुतीचे भाट । करिती युक्तिची खटपट । भिकें पोट भरू आले ॥ ८ ॥ एके लटिके करूनि खत । धरणें धरू अस बोलत । आम्हासी विन्मुख जगन्नाथ । जीवघात करू नका ॥ ९ ॥ नवविध साडूनि लुगडी वेगीं । प्रपच राख लाविती अगीं । लक्ष चुकोनी झाले योगी । भिके लागीं हिंगवश ॥ १० ॥ एक मरणाचेनि धाकें । काखे लोभाचें चोंडुकें । प्रपचगाधळाने हरिखे । उदो म्हणूनि नाचती ॥ ११ ॥ एकीं धाक घेतला भारी । धनलोभें कापवीत टिरी । अधर्म टोले वाजती शिरीं । मुखीं उच्चार नकारु ॥ १२ ॥ कामखडेरायापुढें । एक कुतरें झालें गाढें । कोणी आलिया दारापुढें । थगवसूनि रोकडे उठती ॥ १३ ॥ एक झाले कापडी । सलोभ लोभें रगविली उगनी । धरूनि जीवित्वाची गोडी । तीर्थे परवडी मागती ॥ १४ ॥ पळता न पळवे निश्चित । म्हणोनि बैसले ध्यानस्थ । पूजा लोकाची वाछित । भोगी चित्त ठेवोनिया ॥ १५ ॥ दातीं तृण तोडिती पाही । एक म्हणती आम्ही गाई । पशू जाहलो मनुष्यदेहीं । अभक्ष्य पाही भक्षिती ॥ १६ ॥ केवळ देहलोभासाठीं । मोक्षश्रियेसी पडिली तुटी । युद्धीं पळालिया

द्वंद्वयुद्ध । मेहुणेपणाचा विनोद । अतिविनोद निकराचा ॥ २३ ॥ पुढील कथा अतिगहन । रसाळ आहे अनुसंधान । एका विनवी जनार्दन । सावधानवृत्ती परिसावें ॥ २४ ॥

—रुक्मिणीस्वयंवर ( इ. स. १५७१ ), प्रसंग अकरावा, ओव्या ५०–७३

७

## भागवताची प्रस्तावना

पाहोनि दशमाचा प्रांतू । एकादशाचा उदया आतू । एकादशावरी जगन्नाथू । ग्रंथार्थू आरंभी ॥ १ ॥ म्हणोनि एकादशाची टीका । एकादशीस करी एका । ते एकपणाचिया सुखा । फळेल देखा एकत्वें ॥ २ ॥ आतां वंदूं महाकवी । व्यास वाल्मिक भार्गवी । जयातें उशना कवी । पुराण गौरवीं बोलिजे ॥ ३ ॥ तिहीं आपुलिये व्युत्पत्ती । वाढवावी माझी मती । हेचि करीतसें विनंती । ग्रंथ समाप्ती न्यावया ॥ ४ ॥ वंदु आचार्य शंकरू । जो कां ग्रंथार्थविवेकचतुरू । सारुनि कर्मठतेचा विचारू । प्रबोधदिनकरू प्रकाशला ॥ ५ ॥ आतां वंदु श्रीधर । जो भागवतव्याख्याता सधर । जयाची टीका पाहतां अपार । अर्थ साचार पैं लाभे ॥ ६ ॥ इतरही टीकाकार । काव्यकर्ते विवेकचतुर । त्यांचें चरणीं नमस्कार । ग्रथा सादर तिहीं होआवें ॥ ७ ॥ वंदू प्राकृत कवीश्वर । निवृत्ति प्रमुख ज्ञानेश्वर । नामदेव चांगदेव वटेश्वर । त्यांचें भाग्य थोर गुरुकृपा ॥ ८ ॥ जयांचे ग्रंथ पाहतां । ज्ञान होय प्राकृतां । तयांचे चरणी माथा । निजात्मना निजभावें ॥ ९ ॥ संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी । नवी जुनी म्हणावीं । कैसेनि केवीं सुवर्णसुमनें ॥ १० ॥ कपिलेचें म्हणावें क्षीर । मा इतराचें तें काय नीर । वर्णस्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥ ११ ॥ जे पाविजे संस्कृत अर्थे । तेंचि लाभे प्राकृतें । तरी न मनावया येथें । विषमचि तें कायी ॥ १२ ॥ कां निरंजनी वसला रावो । तरी तोचि सेवकां पावत ठावो । तेथें सेवेसि न वचतां पहा हो । दंडी रावो निजभृत्या ॥ १३ ॥ कां दुबळी आणि समर्थ ।

रावो बोळविले ॥ ३ ॥ निज प्राप्तीसी विन्मुख । युद्धीं झाले पराङ्मुख । राने नरवीर अनेक । पळता दुख पावले ॥ ४ ॥ देह लोभिये बापुडीं । पायीं ममतेची वेडी । विस्मरणाची खरस तोंडीं । जेरे मुरकुडी घालिती ॥ ५ ॥ अत्यंत प्रळय करिता देख । सकर्षणें दिधली हाक । पोटीं घेऊनिया धाक । एक एक पळाले ॥ ६ ॥ साडिली पुरुषार्थाची लुगडी । केवळ नागवीं उघडीं । विन्मुख पडतीं उघडीं । मेलीं मढीं होऊनि ठेली ॥ ७ ॥ चहु पुरुषार्थी न होय वाट । केवळ नर स्तुतीचे भाट । करिती युक्तिची खटपट । भिकें पोट भरू आले ॥ ८ ॥ एके लटिके करूनि खत । धरणें धरू असे बोलत । आम्हासी विन्मुख जगन्नाथ । जीवघात करू नका ॥ ९ ॥ नवविध साडूनि लुगडी वेगीं । प्रपंच रास लाविती अगीं । लक्ष चुकोनी झाले योगी । भिके लगीं हिंडावया ॥ १० ॥ एक मरणाचेनि धाकें । काखे लोभाचें चोंडुकें । प्रपचगाधळाचे हरिख । उदो म्हणूनि नाचती ॥ ११ ॥ एकीं धाक घेतला भारी । धनलोभें कापवीत टिरी । अधर्म टोले वाजती शिरीं । मुखीं उच्चार नकारु ॥ १२ ॥ कामखडेरायापुढें । एक कुत्तरें झालें गाढें । कोणी आलिया दारापुढें । वसवसूनि रोकडे उठती ॥ १३ ॥ एक झाले कापडी । सलोभ लोभें रगविली लुगडीं । धरूनि जीवित्वाची गोडी । तीर्थे परवडी सागती ॥ १४ ॥ पळता न पळवे निश्चित । म्हणोनि बैसले ध्यानस्थ । पूजा लोकाची वाछित । भोगीं चित्त ठेवोनिया ॥ १५ ॥ दातीं तृण तोडिती पाही । एक म्हणती आम्ही गाई । पशू जाहलो मनुष्यदेहीं । अभक्ष्य पाही भक्षिती ॥ १६ ॥ केवळ देहलोभासाठीं । मोक्षश्रियेसी पडिली तुटी । युद्धीं पळाल्या पाठीं । आपदा मोठी वीरासी ॥ १७ ॥ यादववीर जगजेठी । न लगती पळत्याचे पाठीं । भेडे न पाहतीच दृष्टीं । उठाउठी पळाले ॥ १८ ॥ रणीं जिंकिले महाशूर । तुरें वाजती अपार । विजयी झाले यादववीर । जयजयकार प्रवर्तला ॥ १९ ॥ वीर सागती युद्धगोष्टी । साडिल्या कन्येच्या गाठी । उल्हास भीमकींच्या पोटीं । हरिखसृष्टी न समाये ॥ २० ॥ आपुलें न पडती रणीं । वधू आले नाहींत कोणी । राजे गेले जी पळूनी । भीमकी मनीं हरिखली ॥ २१ ॥ पुढें होईल विनोदकथा । युद्ध रुक्मिया कृष्णनाथा । तया विनोदाचिया अर्था । संतीं परमार्था परिमावें ॥ २२ ॥ आता कृष्ण रुक्मिया सनद्ध । दोघा होईल

द्वंद्वयुद्ध । मेहुणेपणाचा विनोद । अतिविनोद निकराचा ॥ २३ ॥ पुढील कथा अतिगहन । रसाळ आहे अनुसंधान । एका विनवी जनार्दन । सावधान वृत्ती परिसावें ॥ २४ ॥

—रुक्मिणीस्वयंवर ( इ. स. १५७१ ), प्रसंग अकरावा, ओव्या ५०–७३

७

## भागवताची प्रस्तावना

पाहोनि दशमाचा प्रांतू । एकादशाचा उदया आंतू । एकादशावरी जगन्नाथू । यथार्थू आरंभी ॥ १ ॥ म्हणोनि एकादशाची टीका । एकादशीस करा एका । ते एकपणाचिया सुखा । फळेल देखा एकत्वें ॥ २ ॥ आतां वंदू महाकवी । व्यास वाल्मिक भार्गवी । जयातें उशना कवी । पुराण गौरवीं बोलिजे ॥ ३ ॥ तिहीं आपुलिये व्युत्पत्ती । वाढवावी माझी मती । हेचि करीतसें विनती । ग्रंथ समाप्ती न्यावया ॥ ४ ॥ वंदू आचार्य शंकरू । जो का यथार्थविवेकचतुरू । सारूनि कर्मठतेचा विचारू । प्रबोधदिनकरू प्रकाशला ॥ ५ ॥ आतां वंदु श्रीधर । जो भागवतव्याख्याता सधर । जयाची टीका पाहतां अपार । अर्थ साचार पैं लाभ ॥ ६ ॥ इतरही टीकाकार । काव्यकर्ते विवेकचतुर । त्यांचें चरणीं नमस्कार । ग्रंथा सादर तिहीं होआवें ॥ ७ ॥ वंदू प्राकृत कवीश्वर । निवृत्ति प्रमुख ज्ञानेश्वर । नामदेव चांगदेव वटेश्वर । ज्याचें भाग्य थोर गुरुकृपा ॥ ८ ॥ जयाचे ग्रंथ पाहतां । ज्ञान होय प्राकृतां । तयाचे चरणीं माथा । निजात्मता निजभावें ॥ ९ ॥ संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी । नवी जुनी म्हणावीं । कैसेनि केवीं सुवर्णसुमनें ॥ १० ॥ कपिलेचें म्हणावें क्षीर । मा इतरांचें तें काय नीर । वर्णस्वादें एकचि मधुर । दिसे साचार साम्य ॥ ११ ॥ जे पाविजे संस्कृत अर्थे । तेंचि लाभे प्राकृतें । तरी न मनावया येथ । विषमचि तें कायी ॥ १२ ॥ का निरंजनीं नृपाळ राहो । तरी तोचि सेवकां पावत ठावो । तेथ सेवेसि न वचतां पहा हो । दंडी रावो निजभृत्या ॥ १३ ॥ का दुनळी आगि समर्थ ।

दोहींस रायें घातले हात। तरी दोघींसही तेथ । सहजें होत समसाम्य॥१४॥ देशभाषाविभवें । प्रपञ्चपदार्थी पालटलीं नावें । परि रामकृष्णादि नामा नव्हे । भाषाविभवें पालटू ॥ १५ ॥ संस्कृतवाणी देवें केली । परि प्राकृत काय चोरा पासोनि झाली । असोतु या अभिमान भुली। वृथा बोलीं काय काज ?॥१६॥ आता संस्कृता किंवा प्राकृता। भाषा झाली जे हरिकथा। ते पावनचि तत्त्वता। सत्य सर्वथा मानिली ॥ १७ ॥ वदु भानुदास आता। जो वा पितामहाचा पिता। ज्याचेनि वंश भगवता। झाला सर्वथा प्रियकर ॥ १८ ॥ जेणें बाळपणीं आकळिला भानु । स्वयें जाहला चिद्भानु । जिंतोनि मानाभि मानु। भगवत्पावनु स्वयें झाला ॥ १९ ॥ जयाची पदबधप्राप्ती । पाहों आली श्रीविठ्ठलमूर्ती । कानीं कुंडलें जगज्जोती । करिता रातीं देखला ॥ २० ॥ तया भानुदासाचा चक्रपाणी। तयाचाही सुत सुलक्षणी। तया सूर्य नाम ठेवुनी। निजीं निज होउनी भानुदास ठेला॥ २१॥ तथा सूर्यप्रभाप्रतापकिरणीं। मातें प्रसवली रुक्मिणी । म्हणौनि रखुमाई जननी । आम्हांलागुनी साचचि ॥ २२ ॥ हे ग्रंथारंभकाळा। वदिली पूर्वजमाळा। धन्य निजभाग्याची लीळा। आलों वैष्णवकुळा जन्मोनी ॥ २३ ॥

— भागवत ( इ स १५७३ ), अध्याय पहिला, ओव्या ११४–१३६

## ८

### प्रळयकाल

सूर्योदयेंसीं दिवसस्थिती। लोटल्या अवश्य पावे गती। तेवीं झालिया उत्पत्ति स्थिती। प्रळयाची प्राप्ती अवश्य पावे ॥ १ ॥ एवं पावल्या प्रळयवेळू। खवळे अनादि निधन काळू । तो महाभूतेंसीं भूगोळू । नाशार्थ प्रबळू प्रताप माडी ॥ २ ॥ तेथ जें जें स्थूलाकार व्यक्त। तें तें करूं लागे अव्यक्त। जेवि पेरिलें पिकोनि दोत। स्वयें वाळत उष्णकाळीं ॥ ३ ॥ तृणादि नाना बीजे क्षितीं। स्वभावें वाढिये विरुढती। तेचि शारदिये नाना व्यक्ती। सफळितें होतीं

सुपुष्ट ॥ ४ ॥ तेचि ग्रीष्माच्या अंतीं । फळमूळ मोडोनि व्यक्ती । बीजें लीन होतीं क्षितीं । तैशी काळगती ससारा ॥ ५ ॥ जेवीं वसताचे ऐलीकडी । वृक्षासी होय पानझडी । तेवीं ब्रह्मादिकाची परवडी । काळ झोडी निज सत्ता ॥६॥ जेवीं का वाळलिया शेत । कृपीवळु मळूं लागे समस्त । तेवी अव्यक्ताचें अव्यक्त । काळ त्वरित करूं लागे ॥ ७ ॥ तेच अव्यक्त करिती स्थिती । राया सागेन तुजप्रती । काळाची क्षोभक शक्ती । प्रळयाचे प्रासीपूर्वी पावे ॥ ८ ॥ काळा क्षोभाचिये दृष्टी । शतवर्षें अनावृष्टी । तेणें अत्युल्बणें आटे सृष्टी । पृथ्वीच्या पोटीं काहीं नुरें ॥ ९ ॥ प्राणिमात्र निमाले देख । वनें वाळुनी जाहली राख । बिंदुमात्र न मिळे उदक । यापरी लोक । आटिले काळें ॥ १० ॥ तंव द्वादशादित्यमेळा । मंडळीं झाला एक वेळा । तेथींच्या किरणीं प्रबळीं । त्रैलोक्या सकळा सतप्त केलें ॥ ११ ॥ येती उष्णाचिया आह्या । होती पर्वताच्या लाह्या । तेणें धरातळ लवलाह्या । भस्म झालें राया महाउष्णें ॥ १२ ॥ उष्णें तापलें पृथ्वीतळ । पोळलें शेषफणामंडळ । तें सहस्त्रमुखें विषानळ । अग्निकल्लोळ वमिता झाला ॥ १३ ॥ पाताळतळींहूनि देखा । ऊर्ध्वमुख अग्निशिखा । जाळीतचि तिहीं लोकां । उठिला भडका अनिवार ॥ १४ ॥ क्षोभें दिधला फुकारा । सहस्रमुखें सुटला वारा । तो साह्य झाला त्या वैश्वानरा । जाळीत दिगंतरा वाढला वणवा ॥ १५ ॥ स्वर्ग आणि पाताळतळा । कवळूनि उठल्या अग्निज्वाळा । तंव प्रलयकार्या मेघमाळा । क्षोभल्या त्या काळा अति दुर्धरा ॥ १६ ॥ म्हणाल तेथ मोठमोठे । वर्षों लागले थेंबुटे । तैसें नव्हे गा कडकडाटें । एकीधार सुटे अनिवार ॥१७॥ इतर पर्जन्याच्या धारा । त्या नव्हती तैशा नृपवरा । ऐक प्रमाणाच्या निर्धारा । तो समयो महावीरा अतिदुस्तर ॥१८॥ जैसी का मदगजाची सोंड । तैशा धारा अतिप्रचंड । शत वर्षेंवरी अखंड । पर्जन्य वितंड पैं वर्षे ॥ ९ ॥ विजू निजतेजें नभ जाळी । तेणें कडकडाटें आरोळी । काळाची त्रैसे दातखिळी । ऐसा प्रलयकाळीं मेघ खवळे ॥ २० ॥ उलथलें तेणें जल सैंघ । जेथोनि वर्षत होते मेघ । त्यातेंही विरवूनि साग । जळमय चाग त्रैलोक्य झालें ॥ २१ ॥ अनिवार वर्षता वेग । जेथें मेघांचेंही विरे अंग । या नाव सावर्तक मेघ । अति अमोघ वर्षावो ॥ २२ ॥ तीर्थ क्षेत्र पवित्रोदक । सरिता समुद्र झाले एक । हारपले सूर्य चद्रादिक । तिन्ही लोक

बुडाले ॥ २३ ॥ ऐशिया एकार्णवाचे ठायीं । विराट निराला गा पाहीं । साकार उरें ऐसें कांहीं । उरलें नाहीं नृपनाथा ॥ २४ ॥

— भागवत, अध्याय तिसरा, ओव्या १५०–१७३

## ९

## लोभी ब्राह्मणाची दशा

स्त्रीपुत्र होउनि एक । तिहीं ठेवा नेला कित्येक । गोत्रज मिळोनि सकळिक । बलात्कारें देख । वांटा नेला ॥ १ ॥ चोरीं फोडोनिया घर । काढून नेलें भांडार । आगी लागोनिया घर । वस्तु अपार जळाल्या ॥ २ ॥ हिंवाळ्यानें गेलें शेत । प्रवर्त बुडाला जेथींचा तेथ । विश्वासू ठेवा घेऊनि जात । रात सूत हारपलें ॥ ३ ॥ भाडीं ठेविला कापूर उडे । समुद्रामाजी तारू बुडे । पातिकरावरी घाला पडे । चहूंकडे अपायो ॥ ४ ॥ ठक येऊनि एकांतीं । मुलाम्याची नाणीं देती । धनलोभाचे कापुळतीं । हातींची सपची त्यासी दे ॥ ५ ॥ स्वचक्र परचक्र विरोध धाडी । सगती लावूनि घर फोडी । तळघरींचे ठेवे काढी । भरोनि कानडी धन नेती ॥ ६ ॥ पाणी रिघे पेवा आंत । तेणें धान्य नासे समस्त । धट्टू झाोनि हरा सेत । दैवहत तो झाला ॥ ७ ॥ गोठणीं सेणया रोगू पडे । निमाले गाई म्हशींचे वाडे । उधारें नेले ठाणदी घोडे । तो रणीं पडे महायुद्धीं ॥ ८ ॥ भूमिनिक्षेप जे करू जाती । ते आप गियाकडे धूळी ओढती । तेथ घालूनि निजसपत्ती । ताडी माती स्वयें घाली ॥ ९ ॥ बुद्धि सांगति वाडवाड । येऊनि तांडीं घाला दगड । ऐसे ठेवे बुजिले दृढ । त्याची चाड धरू गेला ॥ १० ॥ ठेवे ठेविले न अनेक । ते पृथ्वीं गिळिले निःशेख । भाग्य झालें ज निमुख । झाले अनोळख ने ठाय ॥ ११ ॥ अधर्में अदृष्ट झालें क्षीण । विपरीत भासे देहींचें चिन्ह । पाल्टला निजवर्ण । ब्राह्मणपण दिसेना ॥ १२ ॥ देखे ता पुसे शानि कोण । तो सांग जरी मी ब्राह्मण । ऐकल्या न मनी मन । वर्णाभिमान मावळलें ॥ १३ ॥ एव नि:शेष नासलें धन । ब्रह्मचर्य गलें जाण । म्लानवदन दीनदीन ।

खेद खिन्न अति दु:खी ॥ १४ ॥ गेलें शेत निमाली कुळवाडी । घर पाडिलें परचक्रपाडी । धन नासलें नाहीं कवडी । अधर्माचे जोडी हे दशा ॥ १५ ॥ नाहीं स्वधर्म कर्म ना दान । विहित भोग न करी आपण । त्या धनलोभ्याचे नासलें धन । जेवी का स्वप्न रकाचें ॥ १६ ॥ दैव झाले पराङ्मुख । त्या हतभाग्याची दशा देख । स्त्रीपुत्रें झाली विमुख । तिंहीं नि:शेख दव डिला ॥ १७ ॥ ऐक धनलोभाच्या ठायीं । इष्टमित्र पूर्वीचि नाहीं । गोत्रजासी त्याचें सुख कायी । दवडिला पाही उपेक्षिनू ॥ १८ ॥ निंदा प्रत्यक्ष करिती लोक । राडा पोरें थुकती देख । खावया नाहीं नि:शेख । मागता भीक मिळेना ॥ १९ ॥ मिळेलागीं जेथें जेथें गेला । म्हणती काळमुखा येथें कां आला । होता धनलोभें भुलला । भला नागविला ईश्वरें ॥ २० ॥ यापरी धिक्कारिती लोक । धन जाऊनि झाला रक । चिंतावर्ती पडला देख । दुखें महादु:ख पावला ॥ २१ ॥

—भागवत, अध्याय तेविसावा, ओव्या १२६–१४६

## १०

### श्रीकृष्णध्यान

प्रातीचें श्रीकृष्णध्यान । पांचा श्लोकीं निरूपण । श्रोता परीक्षिती सावधान । वक्ता ज्ञानधन शुक योगींद्र ॥ १ ॥ पिंपळातळीं प्रसादाघन । ते काळींची मूर्ती जाण । निज तेजें देदीप्यमान । दिशा परिपूर्ण तेणें तेजें ॥ २ ॥ ना धूम ना इंगळ । आरक्ततेवीण अतिज्वाळ । तैशी कृष्णमूर्ति तेजाळ । प्रकाशप्रबळ अतिदीप्त ॥ ३ ॥ कृष्णमूर्तीचे निजप्रभा । लोपली रविचंद्राची शोभा । शून्यचें ठाव नाहीं नभा । सच्चिदानंद गाभा साकार ॥ ४ ॥ चैतन्य-तेजें तनु सुखावली । शांतिरसाची वोतिली । चतुर्भुजचें रूपा आली । तेणें दिशाची गेली काळिमा ॥ ५ ॥ कृष्णमूर्ति स्वच्छ स्वप्रभ । अंगीं प्रगटीं निवले नभ । तेणे घनश्यामता शोभ । अतिसुप्रभ साजिरी ॥ ६ ॥ आधींच नेटका श्रीकृष्ण । वरी घनश्यामता बाणली पूर्ण । तेणें सुखावलें सर्वेगण ।

लागलें ध्यान नारीनरा ॥ ७ ॥ नरनारी बापुड्या किती । सन्यासी भुलोनि ठाती । विरक्त वेधले परमार्थी । देखोनि मूर्ती कृष्णाची ॥ ८ ॥ देखता श्रीकृष्णदर्शन । शिवासी लागलें नित्य ध्यान । पार्वतीही निजमन । कृष्णार्पण स्वयें केलें ॥ ९ ॥ ऐसे अर्गीचें बरवेपण । त्याहीवरी हास्यवदन । साजिरें राजीव लोचन । आकर्ण आरक्त ॥ १० ॥ मस्तकींचे नीलालक । सुगंध सुमनीं गुंफिले चोख । कुर्णी कृष्णरूप मधूक । कृष्णकेशीं देख विगुतले ॥ ११ ॥ स्फुरत्कुंडलें मकराकार । ऐसे वर्णिती कविवर । परी तीं आकारीं निर्विकार । श्रवणें विकार मावळती ॥ १२ ॥ फावलिया कृष्ण श्रवण । आकारविकारा बोळवण । तें श्रीकृष्ण श्रवणीं पूर्ण । देदीप्यमान कुंडलें ॥ १३ ॥ तप्त सुवर्णासमान । उभय पीतांबर जाण । एक कासे विराजमान । दुजा प्रावरण शोभत ॥ १४ ॥ ब्रह्मण्यदेवो श्रीकृष्ण । लक्ष्मी डावलूनि पूर्ण । दक्षिणार्गी विप्रचरण । श्रीवत्सलांछन गोविंद ॥ १५ ॥ कंठीं कौस्तुभ सोज्वळा । कठीं मिरवे रत्नमेखळा । ब्रह्मसूत्र रुळे गळा । आपाद वनमाळा शोभत ॥ १६ ॥ माथा मुकुटाचें सवर्णें । लखलखीत अनर्घ्य रत्नें । कीर्ति मुख बाहुभूषणें । वीरकंकणें विचित्रें ॥ १७ ॥ मंत्र उपास्ती उपासका । तैशा करार्गी करमुद्रिका । त्रिकोण षट्कोणकर्णिका । जडित माणिका शास्त्रोक्त ॥ १८ ॥ वैजयंतीचा सोहळा । पदक एकावळी गळा । नानारत्नें हार मुक्ताफळा । तुळशीमाळा सुगंधा ॥ १९ ॥ दोनी मोतीलग पदर । रत्नें जडित पीतांबर । किंकिणी क्षुद्रघंटा विचित्र । मनोहर शोभती ॥ २० ॥ वाकी अंदुवाचा गजर । चरणीं नुपुराचा झणत्कार । कडे निरुदाचा तोडर । मनोहर हरि चरण ॥ २१ ॥ रातोत्पल कठिणपण । त्याहूनि सुकुमार चरण । घवघवीत श्रीकृष्ण । शोभा सपूर्ण शोभन ॥ २२ ॥ शंख चक्र गदा कमळ । मूर्तिमंत आयुधें सकळ । आश्रुनिया पिंपळ । बैसला पवाठ वीरासना ॥ २३ ॥ त्या वीरासनाचें लक्षण । तळीं सूनी दक्षिण चरण । त्याचे मांडीवरा जाण । वाम चरण आरोहित ॥ २४ ॥ लाजवूनि सध्यारागासी । उण आणोनि बालसूर्यासी । चरणशोभा हृदयेशीं । अतिदीप्तीसीं आरक्त ॥ २५ ॥

*— भागवत, अध्याय तिसावा, ओव्या १८८–२१२*

## ११

### ग्रंथसमाप्ति

ऐसें देवोनि वरदान । हृदयीं आलिंगी जनार्दन । म्हणे या ग्रथीं ज्याचें भजन । त्याचें भवबंधन मी छेदी ॥ १ ॥ हेही अलंकार पदवी । स्वयें जनार्दन चोलवी । एव कृपा केली जनार्दनदेवीं । हे ठेवाठेवी मी नेणें ॥ २ ॥ थोर भाग्यें मी पुरता । पूर्ण कृपा केली श्रोता । समूळ साभाळिलें ग्रथा । अर्थपरमार्थी समसाम्ये ॥ ३ ॥ पुढें या ग्रथाचें व्याख्यान । जेथ होईल कथा कथन । तेथ द्यावें अवधान । हें प्रार्थन दीनाचें ॥ ४ ॥ हे ऐकोनि प्रार्थना जाण । सतोषले श्रोतेजन । हे कथा आमुचें निजजीवन । जेथ व्याख्यान तेथ आम्ही ॥ ५ ॥ ऐसे तुष्टले श्रोतेजन । वरदें तुष्टला श्रीजनार्दन । एका जनार्दना शरण । ग्रथ सपूर्ण जाहला ॥ ६ ॥ वाराणसी महामुक्तिक्षेत्र । विक्रमशक नृप सवत्सर । शके सोळाशे तिसोत्तर । टीका एकाकार जनार्दनकृपा ॥ ७ ॥ महामगळ कार्तिक मासीं । शुक्लपक्ष पूर्णिमेसी । सोमवार शिवयोगेसी । टीका एकादशी समाप्त जाहली ॥ ८ ॥ स्वदेशीचा शक सवत्सर । दडकारण्य श्रीरामक्षेत्र । प्रतिष्ठान गोदावरी तीर । येथील उच्चार तो ऐका ॥ ९ ॥ शालिवाहन शक वैभव । सख्या चौदाशें पचाणव । श्रीमुख सवत्सराचें नाव । टीका अपूर्व तें जाहलीं ॥ १० ॥ एव एकादशाची टीका । जनार्दन कृपा करी एका । ते हे उभय देश आवाका । बोलिला नेटका शकसंवत्सर ॥ ११ ॥ पंधरा शतें श्लोक सुरस । एकतीस अध्याय ज्ञानरहस्य । स्वमुखें बोलिला हृषी-केश । एकाकी एकादश दुर्जेनिविण ॥ १२ ॥ एकादश म्हणिजे एकएक । तेथ दुजेपणाचा न रिघे अक ॥ तेचि एकादश इद्रियीं सुख । एकत्वें अलौकिक निडारलें पूर्ण ॥ १३ ॥ त्या एकादशाची टीका । एक रस करी एका । ते एकत्वाच्या निजसुखा । फळेल साधका जनार्दनकृपा ॥ १४ ॥ हा ज्ञानगर्भ चिद्रत्न । यथार्थ अर्थविला सपूर्ण । मार्जेनि नावें श्रीजनार्दन । ग्रथकर्ता आपण स्वयें जाहला ॥ १५ ॥ एका जनार्दना शरण । जनार्दना पढिये एक पण । जेवीं का सूर्याचे किरण । सूर्यतेजें पूर्ण निरसी तम ॥ १६ ॥ तेवीं

जनार्दनतेजें जाग। प्रकाशलें एकपण। तेणें प्रकाशें ग्रंथ संपूर्ण। जनार्दनार्पण एकपणसीं ॥ १७ ॥ जनी जनार्दन एक। जाणे तो सुख्ल नि शेख। हेंचि जाणोनिया लोक। गुंतले अनेक भवचक्रीं ॥ १८ ॥

— भागवत, अध्याय एकतिसावा, ओव्या ५४६–५६३

## १२

### रामविलाप

ऐसेनि न भेटे निजकांता। वृक्षवल्लीतें होय पुसता। पशुपक्ष्यादि समस्तां। पुसे सीता श्रीराम ॥ १ ॥ तुम्हीं न बोला सकोपता। तुमचे चरणीं माझा माथा। कउती आहे माझी सीता। मज तत्त्वतां सांगावी ॥ २ ॥ देखोनि पर्वत पाषाण। श्रीराम घाली लोटांगण। तुम्ही तरी कृपा करून। सांगावी आपण सीताशुद्धी ॥ ३ ॥ ऐसी न देखतां सीता। श्रीरामासी परम चिंता। लक्ष्मणासी होय सांगता। गतां मृता जानकी ॥ ४ ॥ श्रीराम म्हणे सीता एकली। राक्षसभयें पळोन गेली। किंवा आपभयें निमाली। अथवा मारिली राक्षसीं ॥ ५ ॥ राक्षसी सीता मारून। स्वेच्छा केलें भक्षण। ऐसें बोलोनि रघुनंदन। मूर्च्छापन्न अति दु खी ॥ ६ ॥ सीता सीता म्हणतां वेळोवेळां। वाळले ओठ सुकला गळा। अश्रुपूर्ण आले डोळां। जनकबाळा केउती आहे ॥ ७ ॥ मूर्च्छापन्न मूर्छेआंत। हाय हाय सीता म्हणत। सीताविरहें श्री रघुनाथ। दु खाभिभूत अतिदु खी ॥ ८ ॥ पडे अडखळे उठे बैसे। सीता सीता म्हणे आवेशें। सीताविरहें लागलें पिसें। क्षणक्षणां पुसे जानकी ॥ ९॥ आतां काय सीतेची आशा। म्हणोनि धांवे दाही दिशा। सीतेलागीं झाला पिसा। अति आक्रोशें विलपत ॥ १० ॥ हा, हा, सीते, हा हा सीते। म्हणोनि पाहे सभोंवतें। न देखोनिया सीतेतें। वना वनांतें परिभ्रमे ॥ ११ ॥ कोठें अडखळे, कोठें उडे। कोठें रडे, कोठें पडे। सीताविरहें जालें वेडें। पाहे चहूंकडे जानकी ॥ १२ ॥ सीता सीता म्हणोनि देखा। अति आक्रोशें मारी हाका। लक्ष्मणा तूं माझा सखा। उगाचि तूं कां पाहतोसी ॥ १३ ॥ सीते वेगीं

तू धाव पाव। अति सभ्रमेसीं देईं दॆव। मी गर्जोनि घेतों नाव। माझी करुणा का हो नुपजेची ॥ १४॥ का रुसलीस सागातिणी। म्हणोनि आग टाकी धरणीं। सर्वेचि धावे उन्मत्तपणीं। वनीं काननीं गिनसित ॥ १५ ॥ दऱ्या दर-कुटें पर्वतशिखरें। गिरिगव्हरें गुहा कदरें। शोधिता श्रीराम सौमित्रें। सीता सर्वत्र दिसेना ॥ १६ ॥ श्रीराम म्हणे सौमित्रासीं। शोधिता पर्वत देशोदेशीं। सीता न भेटे आम्हासी। शुद्धी कोणासी पुसावी ॥ १७ ॥ शुद्धि पुसावया जाण। हें केवळ वन विजन। शोधिता न भेटे जन। काय आपण करावें ॥ १८ ॥ ऐसे बोल्ता श्रीरघुनाथा। सीताविरहें सभ्रातता। पुसा धावे तो पर्वता। पर्वतमाथा वृक्षासी ॥ १९ ॥ पर्वताग्रीं वृक्ष हो। तुम्ही दुरीं देखता पहा हो। तरी माझ्या हृदयींचा संदेहो। नि सदेहो तुम्ही करा ॥ २० ॥ म्हणाल तू कोण कोणाचा। तरी मी राम दशरथाचा। सीतावियोगविरहाचा। अति दु खाचा पर्वत ॥ २१ ॥ सीता म्हणेल आहे कैसी। तिचिया निजस्वरूपासी। मीं सागेन तुम्हापाशीं। यथार्थेंसीं सुचिन्हें ॥ २२ ॥ आरक्त नेत्र आरक्त अधर। सुदर सुनासिका सुकुमार। कटीं रत्नाढ्य कटिसूत्र। पीताबरधर जानकी ॥ २३ ॥ ऐसिया लावण्याची खाणी। तुम्हामाजीं देखिली कोणीं। ते सागावी मजलागोनी। तिची धावणी मी करीन ॥ २४ ॥ वायूनें वृक्षपल्लव डोल्ती। श्रीराम म्हणे मज वृक्ष बोलाविती ॥ ऐसे म्हणोनिया तयाप्रती। धावोनि वेगवृत्तीं स्वयें जाय ॥२५॥ तेथें न भेटता सीता। परमदु ख श्रीरघुनाथा। मूर्च्छित पडे मागुता। हा हा सीता विलपत ॥ २६ ॥

—भावार्थरामायण, अरण्यकाड अध्याय एकोणिसावा, ओव्या ८२–१०७

# जनी जनार्दन

## मिथिलेतील उद्यानांत बाल राम-लक्ष्मणांचे आगमन

किं तो तेज प्रकाशु। शंकराचा कैलासु। विदेह शिवमानसु। रामु प्रवेशु करील ॥ १ ॥ राजतुराचे निनाद। नाना ध्वनी दशभेद। मंगळ भेरीचे परमशब्द। परमानंद जनार्दनाचे ॥ २ ॥ नगराबाह्य उपवनें। वसंताचें रीगवणें। मळयानिळाचें विंजणें। रामाकारणें प्रकटलें ॥ ३ ॥ रामु आला वन्हाडें। फळीं फुलीं वर्षति झाडें। पल्लविं डोल्लाति कोडें। रामापुढें पाचा रीती ॥ ४ ॥ कि ते तरु डोलमिसीं। नमस्कारिताति रामासी। कर्पुरकदलि पत्रमिसीं। गुढि यासी उभारीलें ॥ ५ ॥ श्रीरामु सैवरा पातले। ताड तमाळ हुंपेले। गगना वरीया उभारले। जाणो उर्मीलें ध्वजास्तंभ ॥ ६ ॥ रामा शकुन तिये वेळिं। खजुरि नारेळी पोफळी। वाणें देति निजफळीं। पैं सोनकेळी नारंगी ॥ ७ ॥ चंपक सुमन कळियातें। केतकी उभारुनि हातें। ध्यावें म्हणति रामातें। पं पुस्पातें सुजाति ॥ ८ ॥ रामु आरूढ रहंवरी। सुरनर तरु दोहि हारीं। वरुपति निज सुमनभारी। रामावरी आनंदें ॥ ९ ॥ स्फटीक निबंधा पोखरणीं। वाहाति राहाट पाटसारणी। आत्मया रामा देखोनी। पाद क्षाळणीं गीळती ॥ १० ॥ स्फटिक निबंधा वावि। आळहाद जिवन भावि। उचंबळति रामा खेविं। पै अरावि वाहति ॥ ११ ॥ नानापरीच्या पक्षयाति। स्वशब्दिं आलापु करीती। जाणो श्रीरामा स्तविति। मुरींचि फळें दाखीति। प्रीति पें बोपीति, रघुराया ॥ १२ ॥ निनें केलें श्रीरामचंद्रे। पक्षी गाताति सुस्वरें। शडज बोलति मयुरे। रुषभें वरें चातक ॥ १३ ॥ अजा वदताति गांधारें। मध्यमें रुणझु-णीति मधुकरें। कोकिळ कुजति पंचमस्वरें। अश्वहि सारे धैवत ॥ १४ ॥ बोलति निषादें कुंजर। ऐसे सुरस सप्तस्वर। अनंत स्वरीं पक्षी ईतर। पैं रघु विर तोखविती ॥ १५ ॥

—रामकथामृत, प्रसंग पाचवा, ओंव्या ५३-६७

# दासोपंत

[इ. स. १५५१–१६१५]

## १

## मराठीचे श्रेष्ठत्व

संसारनगर पेठें। नाना भाषाचे नाणवटे। येका खरें, तें खोटें। आना येका ॥ १ ॥ येथें संस्कृतचि केवळ। न सरे नाणें सकळ। कोण्ही येक स्थळ। ऐसे आहे ॥ २ ॥ संस्कृतें घटु म्हणती। आता तयाचे भेद किती?। करणा घटाची प्राप्ती। पावावी तेणें? ॥ ३ ॥ हारा, डेरा, राजणु। मुढा, पडगा, आनु। सुगड, तौली सुजाणु। कैसी बोलेल? ॥ ४ ॥ घडी घागरी घडौली। अलदे गाचिकें वौळी। चिटकी मोरञा पातली। साजरणें तें ॥ ५ ॥ ऐसे प्रतिभाषे वेगळाले। घट असती नामाथिले। एके संस्कृतें सर्व कळे। ऐसें कैसेन? ॥ ६ ॥ मनवट चौपण गव्हाळी। चिकणी पन्हवट, मळी। चुनवट मळवट खळी। खळगा खात ॥ ७ ॥ उतें गोटल खडाळ। पाढरी सेड्ड, मुरु चाळ। तारट काळी करळ। भेद मृत्तिकेचे ॥ ८ ॥ नदु नदी वोहळ। झोति, झिरपें खळाळ। धार, घाळणीपीळ। भवरा धोंधि ॥ ९ ॥ टाकें, बावी, पोख रणी। बारव, विहिरी भडु धरणी। विहिरा तळें रानी। इळता, घुमें ॥ १० ॥ ऐसे भेद जळस्थानाचें। येक येक बहुता नामाचे। सारी प्रयोजन तयाचें। संस्कृत कैसें? ॥ ११ ॥ जाडी, धांगडें, चवाळें। कंबळ शब्दे कैसें कळे?। काचळा आसन गवाळे। खोगीर जैन ॥ १२ ॥ चोंगा, आगडें, दुताई। कडा गर्डेट कोचा पाहीं। ऐसे भेद ठायीं ठायीं। नामें वेगळाली ॥ १३ ॥ येणेंचि निचारें पाहें। पदार्थभेदा मिति आहे?। आता तयाचें नाम काये। येरुचि सर्वत्र ॥ १४ ॥ कोठें कोठें पुरवावें। संस्कृतें भेद प्रकाशावे। व्यवहारायोग्य नव्हे। म्हणौनिया हे ॥ १५ ॥ चौपाळा जेन घातले। चौधरिये मुरख केलें। इतुकेचि बोल बोलें। संस्कृतें तू ॥ १६ ॥ पार्सी तिवासी जरस्वाना। चौग ल्या पाल आसना। ऐसे बोले तो ब्राह्मणा। अभिधानपूर्वक ॥ १७ ॥ सांडगं

तागडी नेती । आटाल्यापासीं ठेविती । कुठें नकम घाल्गिती । ऐसे बोल पा ॥ १८ ॥ तोंडी घालूनिया फोडी । घेइजे विडीपाठीं विडी । ऐशी विड्याची परवडी । म्हणौन बोल ॥ १९ ॥ जुग तारू की होडें ? । ऐसा संदेहो पडे । तैं संस्कृत निवाडें । कैसे बोलेल ? ॥ २० ॥ सिटे मासिटें कापलग । साराउ झुणें हुरग । सेला पासोडी साग । पातळ म्हणिजे ॥ २१ ॥ पडदा पडम पडवणी । झिळ विरळ सागरवानी । कसीदे विणकरीचें म्हणौनि । काय म्हणसी ? ॥ २२ ॥ देशोपाधि नाममेद । क्रियाभेद बहुविध । पट्ट म्हणता नैकविध । ते जाणावे कैसे ? ॥ २३ ॥ ऐसे शब्द बोलता । जन्मु न पुरे सर्वथा । न प्रकाशवती संस्कृता । पाषाणही परी ॥ २४ ॥ गोटा गोटलि घोंटाळा । चिरा नवा सिरसाळा । कोदवा क्निरी म्हैसाळा । रत्ननीळू ॥ २५ ॥ सवला, मुरनाळ, कुरुंदु । सेलू, गारगोटी, हेड्र । ऐसा पाषाणाचा भेदु । बोल बोल पा ॥ २६ ॥ आता असो हें बहु भाषण । किती करावें वाग्पीन्ण ? । व्यवहार येणकरून । न चले तुझा ॥ २७ ॥

—गीतार्णव, अध्याय दुसरा, ओव्या २६७१–२६९७

## २

## पुराणिकाचे वर्णन

पीतगंध ललाटीं । वरि कस्तुरिची द्विरोटी । आरक्ताक्षता निटीं । रेखिल्या जाणों ॥ १ ॥ श्वेतचंदनें डवरिले । सर्वांग उदं धूपिलें । मस्तक भरूनि फुलें । चपकाचीं ॥ २ ॥ केतकीदळ ठाई ठाई । आरोपित कपोलीं दोहीं । पुष्पघोस तें जें हीं । श्रीमुख शोभे ॥ ३ ॥ नाना वर्णा पुष्पमाळा । तिया घालूनिया गळा । चुवा सर्वांगीं उधळिला । श्रोत्री गधगनु ॥ ४ ॥ कडेनु पीतांबरु सोनेसळा । कडेनु श्वेतु वरि पांघुरला । मध्यें मुक्ताफळें अक्षमाळा । शोभती कठीं ॥ ५ ॥ मुद्रा कोंदणाचे सिळे । प्रतिरत्नीं वेगळाले । बोलु बोलता आगळे । झळकती बीजुडुनी ॥ ६ ॥ कर्णमाना झळकती । मुखावरी पडे ते दीप्ती । तेणें शोभे गौरकांती । तया मुखाची ॥ ७ ॥ श्रोत्राचे तेज आगळ ।

दशनाचिया तेजा मिनलें । उभय तेज फाकलें । मुखावरी ॥ ८ ॥ तेणें मुखाचा गौरवर्णु । दिसो लागे शोभायमानु । वरि सुंदरतेचा गुणु । तारुण्य आगळें ॥ ९ ॥ पार्शी झारी सुवर्णवर्णा । वरी चोख घडी उपरणा । नाना वर्णाचिया वेष्टना । उपमा नाथी ॥ १० ॥ वामदक्षिणभागीं ग्रंथ । वेष्टणीं दिसती सुशोभित । मध्यें पुस्तक घवघवित । चित्रे पानें ॥ ११ ॥ पुढें सभा श्रोतयाची । मागें तया विद्यार्थियाची । मग प्रारंभणा कथेची । तेची कैसी ? ॥ १२ ॥ मृदांगु येकु वाजूनि । आणि टाळु वीणा तये स्थानीं । उपांग आणी श्रुति दोन्ही । लाविलिया तत्काळें ॥ १३ ॥ मग ते पाहोनि सुवेळा । क्रमेंचि आलापु केला । तदगन्यास केला । सपादी कुशलत्वें ॥ १४ ॥ हृदयीं आणी ठेव । दावी स्वरानुसार करपल्लव । तेणेंचि अंगे बरव । दिसो लागे ॥ १५ ॥ कर्णभूषणें झळकती । दंत तेजकीळ फाकती । हस्त मानां-चिया पत्ती । दावी प्रेत्नें ॥ १६ ॥ कराचें माधुर्यपण । तेथें लोधले येकजण । जया नाहीं ज्ञान । रागमालेचें ॥ १७ ॥ आलापाचे जाणते । ते लोधले जन तेथें । विश्राति पावले चित्ते । तितुलेनिचि ॥ १८ ॥ दोन्हीं विषयीं अज्ञान । ते मुखनि पाहती जन । रुपले नुपढती नयन । कांहीं करिता ॥ १९ ॥ अधरोष्ठ येक लक्षिनी । कर्णभूषणें येक पाहती । करपल्लववेलीं जाती । तेचि येक ॥ २० ॥ मग आलापाच्या अवसानी । प्रवर्ते मंगलाचरणीं । आलापरूपेंचि माडणी । तयाची करी ॥ २१ ॥ मगलाचरण सपादलें । क्षणेकु नयन लाविले । जैसे गुरुध्यानीं गुंतले । सुभक्तजन ॥ २२ ॥ तैसेचि भाव आणून । सजल करी नयन । मग क्षणा येका सावरुन । श्लोकु आरंभी ॥ २३ ॥ आलापानि वरी घोळितु । श्लोकु बोले समस्तु । मग पदमोडी करितु । तें वैयाकरण शुद्ध ॥ २४ ॥ पदान्वयें बोले अर्थु । परि आलापाची वरी समस्तु । आला शब्दु प्राकृतु । तानेंचि संपादी ॥ २५ ॥ अर्थी घालुनि अंतःकरण । शरीर करी दोलायमान । लावी, उघडी नयन, । प्रेम आणी ॥ २६ ॥ अर्थानुसार देहभाव । अर्थानुसार न्यासमुद्रा अंगपल्लव । अर्थानुसार गौरव । आणी शरीरीं ॥ २७ ॥ अर्थानुसार हास्यरंजन । अर्थानुसार लावी नयन । अर्थानुसार मान । मस्तक हालवी ॥ २८ ॥ 'बापु, बापु, कैसा कैसा?' । क्षणाक्षणा शब्दु ऐसा । अनुवादे माणुसा । लावी वेधु ॥ २९ ॥ प्रसगु निघे युद्धाचा ।

तरि आवेशु आणी वीराचा । रोपावेशु तेथिंचा । सपादुनि दावी ॥ ३० ॥ भुजा दड पीटितु । मागें पुढें अवलोकितु । घ्याघ्याकारें गर्जतु । मुंद्रा दावगी ॥ ३१ ॥ श्रोतया अर्थाची अचाड । वाचाचि लागे त्याची गोड । देहचार उदड । तेचि आवडनी ॥ ३२ ॥ विरावें आणूनि दावी । तें श्रोतया आर्गी खेळवी । धडातें वेड लावी । आवेशाचें ॥ ३३ ॥ येथेंचि जाणो वैरी । होईल जाणो मारामारी । ऐसा आवेशु शरीरीं । सचरे श्रोतया ॥ ३४ ॥ वैराग्याचा निवे प्रसगु । तें न्यासे दावी वीतरागु । विसरवी ससारमार्गु । श्रोतयातें ॥ ३५ ॥

—गीतार्णव, अध्याय दुसरा, ओव्या ३५२०–३५५४

२

धावा

बहु दिवस जाहाले, भेटि नाहीं, वो । अनतियोगें व्याकूळ, करू काई! वो । दोन्ही स्पदति वाहिया, दत्ता येई, रे ! । भेटि देउनि घेउनी सर्वे जाई, रे ॥ १ ॥ ध्रु० ॥ अरे सख्या सद्गुरू देवराया, रे । प्रीति लागली न सुटे दत्तात्रेया रे । मायेंरूपा साडिसी क्षणें माया रे । तुजवाचुनि सकळ अर्थु वाया रे । दाउ हृदय फोडुनि कवणातें । दत्तेंवाचूनि न सवे मायें मातें । भेटि करावो जा तुम्हीं तेणें पथें, वो । दिगबर स्वजनु वसे जेथे ॥ २ ॥

## रामा जनार्दन

### आरती ज्ञानराजा

आरती ज्ञानराजा महाकैवल्यतेजा । सेविती साधुसत मनु वेधिला माझा ॥
लोपलें ज्ञान जर्गी हित नेणती कोणी । अवतार पाडुरग नाम ठेविलें ज्ञानी ॥
कनकाचें ताट करीं उभ्या गोपिका नारी । नारद तुम्बरु हो सामगायन करी ॥
प्रगट गुह्य बोले विश्व ब्रह्मचि केलें । रामा जनार्दनीं पार्यी टकचि ठेलें ॥

# जिनदास
## रोहिणीचे डोहाळे

वसुदेव म्हणे राणियेसी । अलंकार ढिले जाले रोडलीसी । काय असे तुझे मानसीं । ते तूं साग मज पा ॥ १ ॥ राणी म्हणे प्राणेश्वरा । जीविचे डोहळे अवधारा । तीर्थयात्रा गा मज सुंदरा । करावी असे होये मनी ॥ २ ॥ जिनयान करोनिया । जिन चैत्याले उद्धरावया । मग प्रतिष्ठा करोनियां । ते जिनमूर्ति भरावी ॥ ३ ॥ ते जिनमूर्ति पूजोनि । असावे शुक्ल ध्यान धरोनि । पंच नमस्कार जपोनि । पुस्तक दान द्यावे ॥ ४ ॥ राये डोहळे आइकोनि । देव्हारे आरंभित ततक्षणीं । शिल्पशास्त्र पाहोनि । चित्र पाडियेले ॥ ५ ॥ पाटँसरियाची कुसरी । शोभती आहेत खांबावरी । उथाळे हि रागणाचिया परि । ते मी काय सांगो ॥ ६ ॥ सपिंड दांड्यावरी । किल्चा पसरोनिया जरी । पेंड घालोनि तयावरी । चुनेगची केली असे ॥ ७ ॥ भींतो भींती बरवी चित्रे । नाना दिर्पाचे विचित्रे । लिहिली सिद्धयंत्रे । इंद्रपुरी कैलास ॥ ८ ॥ देवाचि बैसका गंधकुटी । बांधली सूर्यकांता नेटकी । तेथें प्रतिबिंब द्रिष्टि । पाहतां दिसे ॥ ९ ॥ वरि रत्नखचित सिंहासन । ते तेजःपुंज दिव्यमान । जैसे हे प्रत्यक्ष समवशरण । रत्नाचि प्रतिमा बिंब ॥ १० ॥ वरि तीर्थंकराचिया मूर्ती । मांडीलिया असंख्याती । अतिशयादिक बहुती । रत्नत्रय गुणाचिया ॥ ११ ॥ वरी चांदवे नानापरिचे । कुशरी सारंगाचे । बरवे पत्रवेलिचे । बांधिले रत्नोखनी ॥ १२ ॥ करुनिया अनुक्रमे वेदि । जेथें होय प्रतिष्ठाविधि । आचार्य गुरुमंत्र सिद्धि । पूजा पंडित करीतसे ॥ १३ ॥ कळश जळवटे जंत्रे । झारी घंटा जगट अर्घपात्रे । घातली देव्हारा विचित्रे । पंचारतिया धूपदहनी ॥ १४ ॥ ठानवया बाजवट चौकिया । बहुते पुस्तके कवळिया । वादि बहुश्रुत आचार्या । व्याख्यान करीत असे ॥ १५ ॥ ऐसे चतुर्मुख देव्हारे । समवसरणाचिया आकारे । सिखरबद्ध वर्तुळाकारे । वरी कळश झळकती ॥ १६ ॥ करि घेवोनिया अक्षता । घालिति वसुदेवाचिया माथा । श्रीसंवा देखता । तिलकु नेला श्रीगुरुनें ॥ १७ ॥ पूजा आनंद देखुनी । थोर संतोषली मनी । राया वसुदेवाचि राणी । रोहिणी हरिखे न माये ॥ १८ ॥

—हरिवंश पुराण, ओव्या १५–३०, ३६–३७

# पंडित दिवाकर

## हा ज्ञानयोग पुरातन ऐका

तुझिये गुण वर्णिता कीर्ति । नेति नेति म्हणोनि परतलेया श्रुती । तेथें मज करावेया स्तुती । पवाड कवणु ॥ १ ॥ जयातें सुरवर ब्रह्मादिक । आगम निगमादि तारकिक । सहस्रवदन पन्नग । वरुण नेणती ॥ २ ॥ पर मी तुझ्या कृपादानें । श्रीदत्त परामृतवचनें । ऊर्धमती विस्तारु जाला तेणें । स्तवन करावया ॥ ३ ॥ हे श्रीदत्तस्वरूपस्तवन । जे ऐका देऊन अवधान । तया जन्ममरण नाहीं अशन । आर्तजनासी ॥ ४ ॥ हा ज्ञानयोग पुरातन ऐका । पूर्वी ब्रह्मयासी निरोपिला निका । तयानंतरें उद्धवार्जुनादिका । बोलिला देव ॥ ५ ॥ तेचि बोलिजे गुणातीत ज्ञान । जें मोक्षप्रापक परामृत जीवन । तें लाधलया कहीं नाहीं पतन । एक गर्भवासु ॥ ६ ॥ जो देव आम्नाय साधना आणिता । तो तापहरणीं भेटला आरळका । तयानंतरें नागार्जुनादिका जोडिला देव ॥ ७ ॥ जो मायातीत निराकारू । करावया परोपकारू । मनुष्यवेष साकारू । तो झाला असे ॥ ८ ॥ तया नमन करूं सर्वे भावीं । तेणें दिवाळी केली नित्य नवी । जो या परमार्गाचा गोसावी । आनंदकंदु ॥ ९ ॥ करावया जीवोद्धारण । नागार्जुना केलें अधिकरण । तया साष्टांगीं करूं नमन । परात्पुरुषा ॥ १० ॥ आता उपकारका सकळा । मार्गवेधीया आदरूनि गुरुकुळा । तापसा ज्ञानीया अनुष्ठानशीळा । प्रणिपात माझा ॥ ११ ॥ हें बोलिलें वाक्य कर्दम टीका । सिद्धांतसौरभ्याची कळिका । नातरी प्रमयरत्नमालिका । वाग्विलासिया ॥ १२ ॥ हा ग्रंथ सकळ वादिया त्रासु । कुतर्क ठाव गजांकुश । गुरुग्राहिया निर्मळ उपदेशु । मतीप्रगतु हा ॥ १३ ॥ सकळ मतरत्नाचा व्यापारू । करिती तेही सेवाना हा रत्नाकरू । येणें अज्ञान दुर्भाग्य निवारू । होईल जाण ॥ १४ ॥ अथवा मती होरानया सर्वार्थी । हा गुरु सेवावा सुपथीं । तेणें सिद्धी होईल सर्वार्थी । सत्यार्थ जाण ॥ १५ ॥ नागींद्र शिष्य मुरारमल्लपळीका । दैवयोगें जोडिला निका । तेणें वचनें मार्गप्रबंध अधिका । म्हणे मुनि दिवाकरू ॥ १६ ॥ वेदश्रुति वचन । पांडवगीता एक । राम नारद गीता एक । एक शिवपुराणीचा ॥ १७ ॥

गीता सोळा श्लोक । भागवत जाण अष्टक । स्मृती श्रुति एक । सेचाळीस गगना ॥ १८ ॥ शके पधरारों एकोनीस अवधारी । पिंगल संवत्सरे पूर्णावली नगरी । भाद्रपद शुद्ध द्वादश गुरुवारी । ग्रंथ संपूर्ण ॥ १९ ॥

— मतिरत्नाकर (इ. स. १५९९), ओव्या ८०३–८२१

## मन्मथस्वामी

### ब्रह्मनिरूपण

जैसे जागृती ना स्वप्न । सुषुप्ती ही जाय जिरून । कीं प्रळयतेजें ग्रासिलें रात्रदिन । तों आवघा प्रकाशमय ॥ १ ॥ तेवीं पुरुष प्रकृति मिळून । ओहं सोहं जाय निमून । मागे जे उरे तो घनानंद पूर्ण । तें निजस्वरूप माझें ॥ २ ॥ तिन्हीं देवा उत्पन्न विश्राम । माझेंच सत्यें सृष्टिकर्म । चालविता परब्रह्म । मीच वर्ते सर्वांठायीं ॥ ३ ॥ त्या माझे मूळस्वरूपा । विसरूनिया जन्मखेपा । अज्ञान जीवाचिया पापा । माझें नाम भस्म करी ॥ ४ ॥ मज मुळीं नाम ना रेखा । रूप ना शब्द दिवस एका । रात्रीचा नाहीं ठाव देखा । प्रकाशमय पूर्ण असे ॥ ५ ॥ तेंची ध्येय ध्याता ध्यान । नसे ज्ञेय ज्ञाता ज्ञान । कर्ता म्हणविता कवण । असाक्ष जाण तेथींचे ॥ ६ ॥ एक माझी स्फूर्ति जाण । जागृत असे अनुदिन । तीचे शब्दें हें गगन । उत्पन्न झालीं तत्त्वें पें ॥ ७ ॥ तया कारणें मी सगुण । रूपा आलों देवी जाण । मागुती तू शक्ति आणि गण । उत्पन्न केलें ब्रह्मा विष्णु ॥ ८ ॥ मी भोक्ता भोग्य भोगातीत । मायामोहविरहित । साध्यसाधन जाणत । तोच वेद जाण पा ॥ ९ ॥ जेथें विवेक शब्द बुडाला । अनुभव ज्ञानासी झगटला । श्रोता वक्ता स्तब्ध झाला । तेथें कोण कोणा देखें ॥ १० ॥ देखणारा देखावयासी । भाव भाविता भावनेसी । गुरुशिष्यातें उपदेशी । ब्रह्मानंद तेथींचा ॥ ११ ॥ तया ज्ञानेंच जाणणें । जाणताच विरझणें । तें रूप आपण होणें । तोच स्वयें ब्रह्म ॥ १२ ॥ म्हणून भेदच अभेद जाणिजे । सगुण ते निर्गुण ओळखिजे । येणें परब्रह्म पाविजे । तद्रुपता

हीच पैं ॥ १३ ॥ घ्राणीं पुष्पामाझारीं । परिमल न दिसे जरी । तरी नाहीं म्हणता न ये गौरी । स्वादेंद्रिया सुख होय ॥ १४ ॥ तैसें परवस्तु जाण । चराचर असे व्यापुन । त्याची जाणावया खूण । गुरुसी शरण रिघावें ॥ १५ ॥.

— परमरहस्यसारामृत ( इ. स. १६१० ), अध्याय चवथा

## शांतलिंग

### १

### नीलकंठस्तुति

तो श्रीगुरु शंभू नीलकंठ नित्य निर्मळ । निरावर्ग निर्भय निश्चळ । निर्गुण निष्कर्म निर्मळ । निष्प्रपंच ॥ १ ॥ निरागम निर्लेप । निरामय निर्दोष । निर्वेद्य निष्कंप । निःसंग निर्द्वंद्व ॥ २ ॥ निराकुळ निरांतक । निस्तत्व निष्कळंक । निराश्रय निर्विशेख । निरावधी निरोपम ॥ ३ ॥ निरांतिशय नित्यमुक्त । चिन्मयस्वरूपछत्र । आनंदरूपे संततोदित । विराजत असे ॥ ४ ॥ ऐसे प्रकारिचे लिंग आठवण । केलिया आयुरारोग्यरूप यौवन । लावण्यलक्षण । सकळकळा सहज भरित ॥ ५ ॥ वनितादी ,सकळ पुत्रपौत्रजन । बंधुबांधव धनधान्य । बळ पराक्रम विद्याविवरण । नयनविनयादि ॥ ६ ॥ सकळ सौभाग्यादी सामग्रीसहित । सप्तसमुद्रमुद्रित । वसुधा अधिपत्य । होऊनिया ॥ ७ ॥ संतोषगंजनित । सुखस्वरूपें अत्यंत । सूक्ष्मे इहीलोकात । अनुभव होय ॥ ८ ॥ वरि सर्वोत्कर्षे । सर्वाधारीं अनेष । श्रीगुरुशंभू नीलकंठास । तद्युक्त होय ॥ ९ ॥ सर्वजन्यसहित । सर्वकर्तृत्वेसी सत्य । आनंदस्वरूपवंत । होऊनि असे ॥ १० ॥ भोगमोक्षादि अनेक सुखशांति । जे येकाग्र ऐकोनी जागती । तयासी सर्वथा होय प्राप्ती । म्हणोनी अशिर्वाद ॥ ११ ॥ लक्षण मंगळाचरणे करूनी । विवेक चिंतामणी । म्हणिजे प्रकरण सिद्धवचनी । संपूर्ण जालें ॥ १२ ॥ श्रीमदनेक मुखरादिक । सन्मतानें शोभे विवेक । चिंतामणी म्हणिजे तारक । संस्कृत

शास्त्र ॥ १३ ॥ ऐसें तियासी लभ्य होऊनी । सर्वसंशयो निरसुनी । भिन्न बहुशास्त्राभ्यास आठणी । बाधा निरसें ॥ १४ ॥ तत्प्रेमातु लीन होऊनि इष्ट । सिध्यर्थ पुरेल यथेष्ट । सिद्ध होय सर्वोत्कृष्ट । श्रीशंभूनीळकंठी ॥ १५ ॥ हे शास्त्र विचारपूर्वक । जाणींतलया भोगमोक्षादि अनेक । सुग्रसिद्धी संतान प्रत्यक्ष । प्राप्ति होय ॥ १६ ॥ स्वस्तिसंमत सुरगंगी । विसुरमुगुटमणी । गण किरणी । प्रचुरप्रवाहतरंगी ॥ १७ ॥ तटविराजित पादराजित । युग्म श्रीशंभू सत्कृपा कटाक्ष । सांद्रचंद्रिकाग्रजातु निरस्त । निखिल संसार ॥ १८ ॥ अश्रमनिस्फूर्जित । निजानंद स्वानंदशक्त । चित्तोपित शातलिंग शिवयोगी विरचित । विवेक चिंतामणी ॥ १९ ॥

—विवेकचिंतामणी ( इ. स.१६१४ ), परिच्छेद दहावा,
ओव्या १२८–१४६

## २

## बोलिला कर्णहंसकी

जयजगाजी नीलकंठा । आचार्या अत्युत्कृष्टा । दयाबुद्धिनिधी स्वधर्मिष्ठा । सद्गुरुराया ॥ १ ॥ तूं भवाग्नी निरविता जलधरू । कीं अज्ञान–तम फेडिता दिनकरू । ससारसमुद्रीं तारितां ईश्वरू । ब्रम्हाडनायका ॥ २ ॥ तूं विद्या अविद्या नासकु । तत्त्वभ्रम विध्वसकु । प्रेमपददायकु । ऐसीं ब्रीदें तुझीं ॥ ३ ॥ तू मोक्षापेक्षिया निज दीक्षिकु । बंध–मुक्ती विच्छेदकु । सजीवन्मुक्ति सप्रदायिकु । नाहे उभयदनी ॥ ४ ॥ सृजी–स्थिति–सहारू । तिळोधान अनुग्रहो व्यापारू । करावया समर्थ तूं ईश्वरू । म्हणउनि स्वामी ॥ ५ ॥ जो निःशब्द निर्गुण वृसाचे । तो बोल तुझीय वाचे । तुझीय निद्रेमाजीं समाधीचें । विश्राम–धाम ॥ ६ ॥ तुझीय वाचेचिए वोसगळा । वेद–श्रुति तिष्ठती स्वलीळा । मुक्ती पुरविती दिव्य भोगसोहळा । दासत्वपणें ॥ ७ ॥ तुझीय स्वासोस्वासा अंतरीं । आनंदें केलें निश्रामंमंदिरीं । होउनि सेवक अष्टोप्रहरीं । वोळगत असे ॥ ८ ॥ तुझीय निमिष्योनिमिष्यात वेस्ती । निजसुखें केली विश्राती । ज्ञानें ज्ञानपणा सुखोनि

आलें शाती । तुझीय सर्वे ॥ ९ ॥ तुझीय स्फूर्तीचा समती । विवेक-विचार जाहली समाप्ती । समता-क्षमा दया शाती । हृद्भुवनीं विसावली ॥ १० ॥ आता असो तू सच्चिदानद प्रभु । अखडदडायमान स्वयभु । व्योममूर्ति अविल नविभु । पूर्ण चैतन्य तू ॥ ११ ॥ जय जय निर्गुण गुणात्मने । अमूर्तमूर्ति चिद्घने । सत्तामात्र ब्रह्मणे । सद्गुरुदेवा ॥ १२ ॥ स्तवन ऐकोनि श्रवर्णी । बोले कैवल्यदानी । कवण अवस्था अत करणीं । शिष्यराजा ॥ १३ ॥ मग साता विज्ञप्ति करी । जी ब्रह्मादि प्रथम नाम्यातरी । चेनब्रह्मेश्वरे गर्भातरीं । नोल्लिला कर्णहसकी ॥ १४ ॥ तें सागिजेल जी यथाविध । महाराष्ट्र-भाषाविशद । मग कीजे अनुभवसिद्ध । गुरुमूर्ती ॥ १५ ॥ ऐकोनि बोले करुणासिंधु । होय निश्चळ सावधु । बोलिजेल यथाविधु । तें धरी अत करणीं ॥ १६ ॥

— कर्णहस, ओव्या १-१६

## फादर स्टीफन्स

[ इ. स १५४९-१६१९ ]

१

होता सर्वेश्वरू। विश्वजनातें ॥ ६ ॥ तें येणें देवें सांगतां। पात्रिआर्की आणी प्रोफेतां । संसारु रचिला तेथोनि भक्तां। प्रगट केलें ॥ ७ ॥ येतुकें तेयां प्रोफेतानीं । पवित्र पुस्तकीं लिहुनी । दाविलें प्रगट करुनी। जगन-जनातें ॥ ८ ॥ मग तो फुडारु पाळावेया। पाप दोषु निरसावेया । देव-नंदनु जल्मोनियां।. संसारी आला ॥ ९ ॥ ते सांगावेयां कारणें आतां। प्रगट करावेया समस्तां । थोरि उठिली उत्कंठा। माजां जीवीं ॥ १० ॥ परमशास्त्र जगीं प्रगटावेया । बहुतजनां फळसिद्धी होवावेया । भाषा बांधोनी मराठिया। कथा निरोपीली ॥ ११ ॥ *जैसी हरळामाजी रत्नकिळा। कीं रत्नामाजी हिरा निळा। तैशी भाषांमाजी चोखळा। भाषा मराठी ॥ १२ ॥ जैशी पुष्पांमाजी पुष्पमोगरी। कीं परिमळामाजी कस्तुरी। तैशी भाषामाजी साजिरी। मराठिया ॥ १३ ॥ पखिआंमधें मयुरु। वृखियांमधें कल्पतरु। भाषामधें मानू थोरु। मराठियेसीं ॥ १४ ॥ तारांमधें बारा राशी। सप्त वारामाजि रविशशी। या दीपिंचेआ भाषामधें तैशी। बोली मराठिया ॥ १५ ॥

— खिस्तपुराण ( लेखनकाल इ. स. १६१४ ), अवस्वरु पहिला,
ओव्या १११–१२५

## २

### विश्वनिर्मिती

आता श्रोतेयां अवधारिजे। तो तारकु आमां पाहिजे। तेणें तैसें संसारीं केलें बिजें। तें सागैन तुमा ॥ १ ॥ वर्णावेया तुझी कथा। देवा कृपादान देइजो आता। ज्ञानमति होए समर्थी। ऐसें करि कां मज ॥ २ ॥ तुवा स्वर्गु ससारु रचिला। सर्वत्राचा अंधारू फेडिला। सर्वांठायीं उजुवाडु केला। स्वर्गीचिआ राया ॥ ३ ॥ चंद्रु आणी सूर्यु परमेश्वरा। हे तुवा रचिले गा दातारा। ज्योति प्रझळली अंबरा। तारागणांची ॥ ४ ॥ पृथ्विसी दिधले

* ज्ञानेश्वरकृत योगवासिष्ठ पाहा.

शृगार । नाना परिचे तरूवर । पुष्पा कमळाचे अल्कार । भरिले सृष्टीतें ॥ ५ ॥ भेदोनिया पर्वतगिरी । सरिता रचिलेआ भूमिउदरीं । तेथा प्रसवलिया जळ झरी । पृथिवीमाजी ॥ ६ ॥ ससारीं नदींचा विस्तारु । वेडा मोंवडिला अपारु । शिंपणे विजस्तासि आधारु । प्रसविला तुवा ॥ ७ ॥ येतुकी नदींची सारवणी । सिपणेआ न पुरे देखोनि । कूपामाजि भरोनि पाणी । पर्जेन्यु रचिला ॥ ८ ॥ जें पाणी आहे कूपातरीं । तें पेरिलेया शेतावरी । वरुपण करावेया अबरीं । भरोनी ठेले ॥ ९ ॥ भूमडळी चालती मीनजाति । सागरीं मछे कुळ भोंवति । पखिये पासुरुवें उडती । अतराळीं ॥ १० ॥ आणि ये उत्तम स्थान । रचिले भूमि वैकुठ निधान । तेथें आदिपुरुषाचें स्थान । केलें तुवा ॥ ११ ॥ तेआचि बरिची अरित काढिली । प्रतिस्वरूपीं स्त्री घडिली । ऐसी रचना थोरि केली । विश्वकर्ते ॥ १२ ॥ रचिलें वैकुठ झळाळ । केले भोडुवे सकळ । करोनी राहाती सदा काळ । स्तवन देवाच ॥ १३ ॥ तिये सर्व रचणे होउनी । आता रचना होताए गहनि । ती सांगेन आइका चित्त देउनि । कवणे परीची ॥ १४ ॥

—खिरस्तपुराण, पुराण दुसरें, अवस्वरु पाचवा, ओव्या १–१४

## ३

## ऐसी कथेची निरपत्ती

आता करितो स्वामियाचें स्तवन । जेयाचेनि कृपें शास्त्रकथन । पुराण होउनि सपूर्ण । पातले सिद्धी ॥ १ ॥ तेया स्वमियाचा दिनें दिनीं । उपेगु मानिते मनीं ॥ जेआचेनी धर्मे पुराणें दोनी । समाप्त जालीं ॥ २ ॥ जेणें होइजे परम ज्ञानी । तो प्रबधु दाविला पुराणस्थानीं ॥ वैकुठिचा निज पथु दाउनी । केला प्रघट ॥ ३ ॥ जो ससारदोषाचा सहारु । भवसागराच तारू । जेणें पाविजे पैल पारू । तो येतु विश्वतारकू ॥ ४ ॥ जो मोक्षराजा वैकुठपती । देवें धाप जेआच्या हातीं ॥ दिधली असे सर्व प्राप्ती । त्रिभुवनींची ॥ ५ ॥ जेयाची न करिता भक्ती । सर्वथा न मेळे मुक्ती ॥ तेआ जेसु स्वामियाची कथा

विलत्ती । निरोपिली मिया ॥ जे तेयाधे सत्य मानिती । ते प्राणिये वैकुंठीं निगती ॥ ६ ॥ आणि जे सत्य न मानिती । ते पडती येमपुरीं ॥ ७ ॥ जेसुची कृपा लाधली अत ऋणीं । तेणें साता प्रोफेताची ओळणीं । आणी वाजेल्सिीं चौगई जणीं । लिहिले ग्रथी ॥ ८ ॥ येतुवेयाचे ससार वेंचुनु । काडिली टीका गाठुनु ॥ भापा मराठी मिसळुनु । केला ग्रथु ॥ ९ ॥ जेसु स्वामी भक्ताचा कैवारी। जदीं जन्मु घेतला ससारीं ॥ वरुप सोळा शत चोतदंशेवरी । तें लागोनि जाहाली ॥ १० ॥ ते सखु चालते वरुसीं । वसत काळीं वेशाखमासीं ॥ देवग्रथु मराठियेसी । अभगु केला ॥ ११ ॥ या दा पुराणाभितुरि । काहीं चुकी देखाल जरी । तरी क्षमा करोनी माझेररी । न कीजे कोपु ॥ १२ ॥ आणि बरवें देखाल जें । तेआचा उपेगु देवासि मानिजे ॥ कथा अमृतु रसु सेविजे । देवकृपेस्तीं ॥ १३ ॥ ऐसी कथेची विलत्ती । आदका जे सागितले अल्पमती ॥ ते क्रिस्तदासु करी विनती । खेमा कीजे अग्न्यानातें ॥ १४ ॥

— खिस्तपुराण, पुराण दुसरें, अवसरु एकूणसाठावा, ओव्या ११०-१२३

## लोलिंबराज

### रत्नकलाचरित्र

अमृत मधुर ज्याचे श्लोक भूपाळनारी।
पडत पडत कैसे कौतुकं कीर सारी ॥
हरि हृदय तो हा रूपविद्याविलासी ।
उठ सखि मजपासी आणि लोलीमकासी ॥ १ ॥

ज्यासी कीर्ति जगत्रया प्रकटली मन्दाकिनीचे परी।
जो येकें घटिकेंत शभर नवीं पद्य विनोद करी ॥
ज्याला ही कविपातशाह पदवी विद्वज्जनी दीधली ।
तो हा रत्नकले तुला विनविलो लोलीमराज कवी ॥ २ ॥

चटपट सुटलीसे जीव कोठें न राहे।
वदन धरुनि हस्तीं एकली वाट पाहे।
करुनि सकल शोभा दर्पणीं रूप पाहे।
पति अजुनि न ये का हेचि चिंतीत आहे॥ ३॥
विषय विषय कर्ता सर्व संसार गेला।
क्षणभरि परि नाहीं मुक्तिचा यत्न केला॥
अजुणु तरिहि आता कृष्ण तू सेवि आधीं।
अभिनव सुरा साधी लाली लोलीमराज ॥ ४॥

## विठ्ठल ( कळूपूरकर )

### १

### नमन

जय जय गणनाथा हस्त देऊनि माथा। झडकरि कवियूथा दाखवी ज्ञानपथा॥
मुनिवर परमार्था सिद्धि द्यावी समर्था। रसिकपदपदार्था देइजे याचि अर्था॥ १॥
जनक तू जननी द्विरदानना। तुजविणें दुसऱ्यास भजेचि ना॥
हरिकथा वदता हरि विठ्ठल। करि कृपा शरणागतवत्सल॥ २॥
करस्पर्श होता अहता जळाली। अकारादि बीजें सकारादि जाली॥
मना वामनाचे पदाब्जीं वसावें। अभिप्राय होऊनि सौरस्य घ्यावें॥ ३॥
कृपाळू बुद्धी मजलागिं व्हावें। महत्त्व प्रथार्थरसीं नसावें॥
वर्णीन राधा हरि आदरेंसी। सतोपती सर्व गुणाराशी॥ ४॥

## २

### ग्रंथसमाप्ति

नारायणाची अगणित नामें । नि काम घ्यावीं अथवा सकामें ॥
आहे असा निश्चय विठ्ठलाचा । हा ग्रंथ केला हरिराधिकेचा ॥ ४ ॥
गणपति वरदानें स्फूर्ति अद्भूत आहे । मृदुपदरचनेचें श्लोकसाहित्य पाहे ॥
कुज म्हणतिल वाचा काय भाषा म्हाटी । परि सुरस जनातें प्रीति होईल मोटी ॥ ५ ॥
रानदिवा वामनमूर्ति चिंती । तेणें अविद्या वसती दिगंती ॥
दृष्टीस दूजें अणुही न भासे । सर्वास्थळीं ईश्वर एक भासे ॥ ६ ॥
गोत्र श्रीवत्स ज्याचें श्रुति तरि दुसरी जीवनस्तंभ शाखा ।
व्यापारी वृत्ति ज्याची द्विरद गुरु असे त्यासि संतुष्ट देखा ॥
आचारें शुद्ध आहे सकळ कळपुरीं सर्वदा वस्ति ज्याची ।
तेणें हा ग्रंथ केला प्रकट तरि असे विठ्ठल ख्याति ज्याची ॥ ७ ॥
चतुर देश वऱ्हाड महीतळीं । जवळि गाव असे तये मडळीं ।
फणिलताभव भीजति त्या जळीं । वसतसे कवि विठ्ठल त्या स्थळीं ॥ ८ ॥
कुमारवक्त्राग्निशरेंदुयोगें । शकें गणावी विपरीत मार्गें ॥
आनंद संवत्सर माघमासीं । निशीशवारीं तिथि पौर्णिमेसीं ॥ ९ ॥
शर्वत्राक्ष आदरी । योग शोभनारयही ।
वाक्पतीच वृश्चिकीं । सूर्य मकरीं तयी ॥ १० ॥
असे योग होते तईं ग्रंथ केला । गणेशप्रसादेंच संपूर्ण जाला ॥
जना ! लोभमोहादिकातें त्यजावें । अनेके परीं वासुदेवा भजावें ॥ ११ ॥
शब्द मऱ्हाष्ट काहीं घडेना जना । हें पुराणींच बोलेति आणा मना ॥
बोलती मूर्ख वाक्यें अशी सर्वथा । याचिलागीं मिया बोलिली हे कथा ॥ १२ ॥
दर्शनाग्निनयन स्थिर पाहे । सर्व पद्यरचना इतुकी हे ॥
जाणती चतुर ते रसवाचा । ईश्वरार्पण वदे कविवाचा ॥ १३ ॥

—रासक्रीडा (इ. स. १६१४), श्लोक १–४, २२८–२३७

# अभयकीर्ति

## १

## अनंतव्रतकथा

### प्रस्तावना

श्री जिनेंद्र देवासि नमस्कार करिन । चरण कमल हृदई ध्याइन । अनंताचि कथा सांगता होईन । महाराष्ट्र भाषा ॥ १ ॥ मग तीर्थंकरासि नमस्कार करिन । जयाचें शास्त्र आहे पुराण । तिहीं लोकिमाजि प्रवीण । श्रीवर्धमानाचें ॥ २ ॥ आता शारदेसी नमस्कार करिन । निर्मळ मागेन मतिज्ञान । स्फुट जरी होय प्रसन्न । तरि धन्य जन्म ॥ ३ ॥ तीर्थंकराचे मुखि उत्पन्न जालि । तेहि त्रिलोकीं प्रगट जाली । सनकादिकीं नमस्कारिली । सरस्वती ॥ ४ ॥ आता गौतमासि नमस्कार करिन । चरणकमल हृदई ध्याइन । अनंतानि कथा सांगता होइन । तयाचे गुण देखोनि ॥ ५ ॥ मग विनति मनि भावें धरुनि । श्री सद्‌गुरूची आज्ञा घेईजे । कदतरि चिंता धरि होई । मग कथा प्रबुद्धि रचिजे । तरि पुण्य होय ॥ ६ ॥ आता साक्षापे प्रसंग करून । मग केला नमस्कार करिन । ग्रंथ होइजे विस्तारि । तरि साक्षापे करून ॥ ७ ॥

### कथामुख – मगध देश

कथा सांगेन अल्पबुद्धि । जंबुद्वीप आहे प्रसिद्ध । वेष्टित लवणार समुद्रा- । मध्य कुंडलाकार ॥ ८ ॥ जंबुद्वीपामाझारि । भरत क्षेत्र जाणिजे सचराचरि । देसु आहे त्यामाझारी । मगध नाम ॥ ९ ॥ त्या देसियाचियामध्यें । तीर्थंकराचा ठाऊ । देसा प्रसिद्ध गिरि पर्वतु । आहे विख्यात श्रीसम्मेदगिरि ॥ १० ॥ आंबुनांबुची बहुत थोली । दिसति वेलराच्या जाळीं । सहज वनि लागल्या सोनकेळि । फणस देखा ॥ ११ ॥ उत्तमतिया नारेळि । लागलिया आइत पोफळि । विस्तारि गेल्या द्राक्षाच्या वेली । दिसे मंडपा ॥ १२ ॥ वन लागलीं चाफ्याचीं । मन गुंजरीं मधुकराची । जाळिया लागलीं केतकीची ।

नागचपा ॥ १३ ॥ जाई जुई शेवति । आंबेयाचि वन बहुत दिसति । पारिजातक शोभति । तया वनामध्यें ॥ १४ ॥

### राजग्राम

आता असो हे वनाचि रचना । वन साक्षेप वर्णना । सागेन ग्रामाचि माण्डणा । राजग्रामाचि ॥ १५ ॥ प्रथम शोभति पोवळि । पाचि पेरोजाचि अराळि । पंचवर्ण रत्न जडविली । शोभति सुर्या तेज ॥ १६ ॥ तया नगरा भितरि । बरवि वसयाचि परि । ध्यान धरिले मुनीश्वरी । आत्महिताकारणें ॥ १७ ॥ येक शास्त्र पढति । आगम पुराण सागति ॥ येक उपवासि राहति । मुनीश्वर देखा ॥ १८ ॥ तेथे जैन लोक येति । पूजा प्रभावना करिती । येक सामाइक पढति । भव्य लोक ॥ १९ ॥ ऐसि हे रचना म्हणात । मुनिजा नगरा राहति । होइल प्रचुर ज्ञान । राहे कथा प्रसग ॥ २० ॥

### राजकुल

सागेन राउलगणाचि परि । वर्णावि राजसभा जरि । साक्षापे आइका वाचा तरी । क्षमा करूनिया ॥ २१ ॥ रचिले पाढे टागठे । वरि बैसलि मर्कटें । सिद्धि घाटिति मनकटे । कोकडिया द्रिष्टि ॥ २२ ॥ रचिली हे सुवर्ण माणिकाचे । तयावरि टिका शोभति हिरियाचि । शोभा दिसे जे रत्नासि । रगमडपु ॥ २३ ॥ तया सिंहासनासि रत्न जडविलि । नीलवर्ण जडविलि । हीरेजडित माणिक मिरवलि । लोपे सूर्या तेज ॥ २४ ॥

### राजा श्रेणिक

असिया परि श्रेणिक राजाकरि । अर्धांगी शोभे चेल्ना राणि । जैसे गोडि लगे सम्यक्तावरि । जैसी शोभे जिनवाणि ॥ २५ ॥ राउल गजरथासहितु । राजा श्रेणिक मार्ग जातु । हा पृथविचे राज्य करतु । भूपति जैनधर्म जैसा ॥ २६ ॥ श्रोते म्हणति सागा कथेचि उत्पत्ति । आमचि मन देखा चचल वृत्ति । बरवि गोडि लागलि आमुचे चित्तीं । श्री अनतासि ॥ २७ ॥

### तीर्थंकर वर्धमान

आता सागता होइन कथा । श्रोता आयकिजे येकचित्ता ॥ तीर्थंकर आहे ज्ञाता । श्रीवर्धमान ॥ २८ ॥ निपुल अचल पर्वताशिखरि । आहे तीर्थंकरचि

चरवि परि ॥ जैसि असे अंबरीं । सूर्यमंडल ॥ २९ ॥ ऐसा उत्तम दाऊ देखिला । जिन ध्यान धरुनि बैसला ॥ केवळ ज्ञान धरुनि प्रवेसु केला । उसाळलि देवध्वनि ॥ ३० ॥ अभ्यंतरि द्रिष्ट गेलि । बाहितकार राहेलि । प्रत्यक्ष देखिलि । ब्रम्हांड देखा ॥ ३१ ॥ अधर आन राहेलि । अंगुल चारि प्रमाण केलि । घातिकर्म जिंकिली । श्रीवर्धमान ॥ ३२ ॥

— *अनंतव्रतकथा* ( इ. स. १६१६ ), ओव्या १-३२

## २

## प्रशस्ति

*मग माझा जन्मु सफल जाले । अजितकीर्ति भेटले । भवसागरि तारिले ।* श्रीवर्धमानदेवा नमस्कार करिन ॥ १ ॥ सरस्वतीची वाचा दिधली । श्रीगुरुचि कनवा थोर जालि । मग कवित केलें ॥ २ ॥ श्रीअनंताचि कथा । तुम्ही आइका येकचित्ता । श्रीगुरु होईल सांगता । तरि भ्रांति फिटली ॥ ३ ॥ माझे कवित जाले खोटे । बोल्तां नये गोमट । सुज्ञा करावे अति गोमट । अक्षर सोधून घालिजे गोमट । तरि पुण्य होइल ॥ ४ ॥ ऐसा अनंत कथेचा विस्तार । जे आचरति नरनारि । ते उत्तरि भवसागरि । पुण्याच्या गुण ॥ ५ ॥ अनंत व्रताविना । जन्म गेला सुना । जे पुरुष आणि नारिजन । ते फल पापाचे ॥ ६ ॥ जे गा जैनधर्म पाळति । ते मोक्षपद पावती । भाव मनि धरति । धर्मावरि ॥ ७ ॥ नित देवदर्शना कीजे । जन्म सफल पाविजे । ......... । जिनदर्शनें ॥ ८ ॥ श्रीमूलसंघ बालात्कार गण । श्रीसरस्वती गच्छ प्रविण । श्री अभयकीर्ति मति अजाण । कथा केलि अनंताचि ॥ ९ ॥ जाव जिनधर्म राहति । मरुम ( ? ) विनयमत । तव ग्रंथ विजय होति । भव्य जनासी ॥ १० ॥ संवत्सर पंधराशे अडतिसु । शुक्लपक्ष श्रावणमास । ग्रंथु केला सोत्तर जाला सेस । दिन शुक्रवार ॥ ११ ॥ दीवसि चांद्रणे तिथ पंचमिचि । कथा सपंलि अनंताचि । भावना पुरलि भक्ताचि । म्हणे अभयकीर्ति ॥ १२ ॥ जे पढति जे आइकति । जे लेहति जे लेहविती दान

करिति । ते भावे व्रत करिति । फल होइल सत्समस्तु सत (?) जाण ॥ १३ ॥ इति अनंतव्रत कथा । श्रोता परिसावे उभयता । भावें धरुनि व्रत । करावे मज्ना ॥ १४ ॥ दोनसें पचावन वोवि हे समर्थिलि । भाद्वा कृष्णपक्ष नारसि दिने । वाचितो विनय होति । पुण्य जीवा ॥ १५ ॥ इति अनय कथा समाप्ता ॥

— ओव्या २४२–२५६

## कृष्णयाज्ञवल्की व मधुकर

### हा संपूर्ण प्रथमणी

त्या ब्रह्रिरामाचे सभें आत । चतु शास्त्रवेत्ते पडित । धर्मचर्चा अखडित । सिद्धातस्रणीं ॥ १ ॥ तया समक्ष सकळीक । कथा कल्पतरूचें स्तबक । म्या संपूर्ण केलें सम्यक । शोधोनीया ॥ २ ॥ अनेक ग्रथीं ऋषी बोलिले । जे कल्पपरत्वें भेद पडिले । तेचि मतातरें सग्रहिले । इये ग्रथीं ॥ ३ ॥ म्हणोनि कथाकल्पतरुनाम । यासी ठेविलें उत्तम । हा चतुर्दश स्तबकी द्रुम । विस्तारलासे ॥ ४ ॥ त्याची मुख्य शाखा सुन्दरा । अध्याय उपशाखा विस्तारा । आनिया पद प्रसग अपार । तीं पर्णे ययाची ॥ ५ ॥ ऐसा कल्पतरू सासिनला । कथाफळ भारीं पाडासि आला । भवदवतप्ता विश्राम जाहला । ज्याचियें छायें ॥ ६ ॥ ना तरी ही चवदा भुवनें । निर्माण केली नारायणे । जेथें सतमहतांची मनें । आनदती सर्वकाळ ॥ ७ ॥ आता असो हे स्तुतिस्तवन । उपसवे कवीं सिंधु जीवन । चतुर्दशस्तबक आहला सपूर्ण । श्रोतीं जाणिजे ॥ ८ ॥ मज उपसता शब्दसिंधु । राहिला असेल परबिंदु । तरी तो सज्जनीं अपराधु । क्षमा कीजे ॥ ८ ॥ गुणग्राहिकीं सज्जनीं । प्रेमभावें कृपा करोनी । परमोपयोगी निवडोनी । सार घ्यावें येथिचें ॥ १० ॥ ग्रयार्ति स्यानवर्णन । केलें जाणोनि कार्यकारण । तेथ न ठेवावें दूषण । सर्वार्थवेत्तीं ॥ ११ ॥ जो वर्माक असे शाहाणा । तोचि जाणे येथिच्या खुणा । मूर्ख छादसाचिये मना । उपजे परिताप ॥ १२ ॥

# पाद्र एतियेन द ला क्रुवा

[ इ. स. १५७९ १६४३ ]

## नमन

नमो स्वामिया विश्वकर्ता । मुक्तिनायका विश्वभरिता । आदिमध्यअंतरहिता । वर्तसी तू ॥ १ ॥ नमो अनंता मतिज्ञाना । नमो अव्यक्त असेपणा । नमो ज्ञाननिधाना । आदिवस्तु सुफळी ॥ २ ॥ नमो असेपणीं एक । नमो जनीं त्रिनाक । गुणीं तत्त्वीं वेगळिक । नाहीं तुज ॥ ३ ॥ तू असेपणा सिंधु होसी । तुझें भरतें रचनाराशी । तरु मिसळी तुज त्यासी । नोहे कवीं ॥ ४ ॥ नमो करुणा सागरा । नीति चाग करुणाग । भक्ति मित्र वाइटी वशरा । सर्वोत्तमा ॥ ५ ॥ नमो स्वामिया जेझु क्रिस्ता । साक्षात् देवसुता । देवपणीं मातेविरहिता । अनादिसिद्धी ॥ ६ ॥ नमो नमो देवज्ञाना । नमो रिपरित साता पावना । कृपा दानाच्या निधाना । नमो नमो ॥ ७ ॥ माझी कोटी नमना । हो स्वामी तुझ्या चरणा । देई मज वरदाना । कथा रिघु सुफळी ॥ ८ ॥ तुझे कृपे ज्ञानशरणे । निरसोनि अज्ञान तमे । वरु दिने कये रिघणें । करावया मिया ॥ ९ ॥ पेद्रु तुझा भक्तु गहनु । जुदेआ देश सोडुनु । इंतिया करायालागुनु । निघाला वेगा ॥ १० ॥ त्याचें कुढे भक्तिमनन । कैस नेलें खडण । कैस दाविलें मुढेपण । त्याच्या देवा सैतानाचे ॥ ११ ॥ तुझे शास्त्रकथनेंकरुनु । अभाव त्याचा निरसुनु । तुझे ओळखी आणुनु । इश्रने जोडिले कैसें ॥ १२ ॥ इतुसाच सत्यार्थु । लोका निगेपाया प्रघटु । कृपा किने आवार दृष्टु । देउनी मज ॥ १३ ॥ आता तुम्ही श्रुतेजन । कथसी लावुनी मन । विवेकगर्भी श्रवण । करा सकळ ॥ १४॥ सा पेद्रु म्हणे जुदेआ देशीं । मिया शास्त्र कथिलें लाकासी । अद्यापि परदेशीं । नाहीं केलें पठण ॥ १५ ॥ आता निघोनी अनेक स्थाना । शास्त्र सांगन अर्थुनी । इतुकी अपेक्षा मनीं । व्हावी मज ॥ १६ ॥ क्षतियाचे देशीं । शुरेआ हातीं धरण्यासी । शास्त्र सांगायासी । निवेन तेथ ॥ १७ ॥ ऐसा सा पेद्रु बोलत । झेरु झालेआ होउनु निगा । इंतिया देशीं प्रवेशत । शास्त्र कथनलागीं ॥ १८॥ गिनाया द्रव्यधन । मुक्ताफळें हिरारत्न । माहेर

माझी केतुलेती मती । कीं साभिमानें बोलावे ग्रंथीं । परिश्रवणमात्रें हरिभक्ती। उपजे ज्ञान वैराग्य ॥ १३ ॥ जेवि मधुमक्षिका भ्रमोन । मधु संग्रहीं कणकण। तेवीं श्रुतदृष्ट तें शोधोन । केला ग्रंथसंग्रही ॥ १४ ॥ अनंतशास्त्रें पुराण मतें। वेदाधारें ऋषिप्रणीते । कोण त्यांचिया आद्यंतातें । पावों शकेल ॥ १५ ॥ परि अंतःकरणपूर्वक मुमनी । जया परमेश्वरीं भक्ती । तो मुख्य तात्पर्य सर्वार्थी । पावे सद्भावें ॥ १६ ॥ तेचि भक्ताकारणे सर्वथा । अनुभवोपयोग्य ग्रथा । म्या निर्मिलेसे प्राकृता । महाराष्ट्रभाषें ॥ १७ ॥ कवि मधुकरें कृपाळा । प्रेमें स्तवोनी श्रीगोपाळा । कथाकल्पतरूसी चढविला । लीळा कळस ॥ १८ ॥ कृष्ण याज्ञवल्की हो कां मधुकर । ही बाहुली करोनी निमित्तमात्र । स्वयें बोलिला लीलाचरित्र । आपुलें आपण परमात्मा ॥ १९ ॥ विक्रमार्कसमयासी । संवत् जाणिजे सोळाशेंएंशी । कीं शालिवाहन शकासी । पंधराशेंपंचेचाळीस ॥ २० ॥ रुधिरोद्गारी संवत्सर । विजयादशमी सोमवार । पुनर्वसु नक्षत्र परिकर । सिद्धियोग जाणिजे ॥ २१ ॥ बालवकरण चद्र मकरस्थ । ऐसा योग असतां प्राप्त । तैं पूर्ण जाहला ग्रंथ । राजसनिधानीं ॥ २२ ॥ इये ग्रंथाची फलश्रुती । सांगतां भागेल सरस्वती । संपूर्ण ग्रंथातें वदिती । ते पावती सायुज्यता ॥ २३ ॥ हा संपूर्ण ग्रंथमणी । वाहिला श्रीगोविंदचरणीं । तेणें कृतकृत्य होवोनी । निवाला कवी मधुकर ॥ २९ ॥ इतिश्री कथाकल्पतरू । चतुर्दशस्तबक मनोहर । ग्रंथ समाप्ति कथाप्रकार । द्वात्रिंशोध्यायीं कथियेला ॥ २५ ॥

—कथाकल्पतरू (इ. स. १६२३), स्तबक चवदावा, ओव्या १८७–२११

# पाद्र एतियेन द ला क्रुवा

## [ इ. स. १५७९-१६४३ ]

### नमन

नमो स्वामिया विश्वकर्ता। मुक्तिनायका विश्वभरिता। आदिमध्यअंतरहिता। वर्तेसी तू ॥ १ ॥ नमो अनंता मतिज्ञाना। नमो अव्यक्त असेपणा। नमो ज्ञाननिधाना। आदिवस्तु सुफळी ॥ २ ॥ नमो असेपणीं एक। नमो जनीं त्रिनाक। गुणीं तत्वीं वेगळिक। नाहीं तुज ॥ ३ ॥ तू असेपणा सिंधु होसी। तुझें भरतें रचनाराशी। तत्व मिसळी तुज त्यासी। नोहे कधीं ॥ ४ ॥ नमो वरवट सागरा। नीति न्याय करणारा। भक्ति मित्र वाईटी वदात्रा। सर्वोत्तमा ॥ ५ ॥ नमो स्वामिया जेझु क्रिस्ता। साक्षात् देवसुता। देवपणीं मातेविरहिता। अनादिसिद्धी ॥ ६ ॥ नमो नमो देवज्ञाना। नमो स्पिरित साता पावना। कृपादानाच्या निधाना। नमो नमो ॥ ७ ॥ माझी कोटी नमना। हो स्वामी तुझ्या चरणा। देईं मज वरदाना। कथा रिघु सुफळी ॥ ८ ॥ तुझे कृपे ज्ञानकारणें। निरसोनि अज्ञान तमें। वरु दिजे कथे रिघणें। करावया मिया ॥ ९ ॥ पेद्रु तुझा भक्तु गहनु। जुदेअ देश सोडुनु। क्षेंतिया करायालागुनु। निघाला कैसा ॥ १० ॥ त्याचें कुडें भक्तिभजन। केसे नेलें खडण। कैसे दाविलें कुडेपण। त्याच्या देवा सैतानाचे ॥ ११ ॥ तुझे शास्त्रस्थनेस्तु। अभाव त्याचा निरसुनु। तुझे ओळखी आणुनु। ह्यजे जोडिले कैसे ॥ १२ ॥ इतुकाच सत्यार्थु। तेरा निरोपाया प्रवर्तु। कृपा किजे आधार हस्तु। देउनी मज ॥ १३ ॥ आता तुम्ही श्रोतेजन। कथेसी लावुनी मन। विवेककर्णीं श्रवण। करा सकळ ॥ १४॥ सा पेद्रु म्हणे जुदेआ देशीं। मिया शास्त्र कथिलें लोकासी। अद्यापि परदेशीं। नाहीं केलें पठण ॥ १५ ॥ आता निघोनी अनेर स्थानीं। शास्त्र सांगेन अर्थुनी। इतुकी अपेक्षा मनीं। व्हावी मज ॥ १६ ॥ क्षेंतियाचे देशीं। जुदेआ हातीं धरण्यासी। शास्त्र सांगावयासी। निघेन तेथ ॥ १७ ॥ ऐसा सा पेद्रु बोलत। शेरु झालेआ होउनु निरत। क्षेंतिया देशीं प्रवेशत। शास्त्र कथनेलागीं ॥ १८ ॥ गिनसाचा द्रव्यधन। मुक्ताफळें हिरारत्न। माहेर

सोडुनी स्वार्थी जन । किती करिती उपाय ॥ १९ ॥ त्यास्तव कष्ट घेती । प्राग जोरें कष्टती । सृष्टीभ्रमण करिती । कठिती छंदु ॥ २० ॥ किती साठवलें आपणातें । अपुरें होय स्वार्थातें । द्रव्य जोडणें स्वार्थियार्थे । चढतसे अथ स्वार्थ ॥ २१ ॥ ऐस नव्हतें सा पेद्रुमन । त्यासी नावडे कनस्तन । मुक्तिपथ आणावया जाण । हीच अपेक्षा तया ॥ २२ ॥ सुखत्याग करोनी सा पेद्रु । चरणतळीं घालोनी अहंकारू । प्राणशुद्धी करणारु । दोपियाची ॥ २३ ॥ सैतान भाडी आतुनु । कथणें लोकासी फेडुनु । देव ओळखी आणाया लागुनु । निवे जुदेया देशींचा ॥ २४ ॥

— पुराण इ स १६२९/१६३४, दुसरें पुराण, पहिलें काड, अवस्वरू पहिला, ओव्या १–२४

प्रथमखंड समाप्त

# मुक्तेश्वर

## १

### दुष्यताख्यान

पौरववशीं प्रख्यातकीर्ति । दुष्यत नामा गुणैकमूर्ती । श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती । वीर्यें शौर्यें आगळा ॥ १ ॥ प्राची प्रतीची दक्षिणोत्तर । चारी दिशा चतु समुद्र । आक्रमूनि मही महींद्र । सुरेंद्र तैसा भूलोकीं ॥ २ ॥ वर्णव्यवस्था जये देशीं । कुमारी खड म्हणिजे त्यासी । म्लेच्छमडळें सिंधुप्रदेशीं । येकवर्ग नर तेथें ॥ ३ ॥ चत्वारी अष्टादश बावन । उत्तम मध्यम कनिष्ठ वर्ण । इहीं वसविले देश सपूर्ण । भोक्ता तो येक नरनाथ ॥ ४ ॥ यावेगळें येकवर्णी । सिंधुपरिसरीं पश्चिमस्थानीं । मडळें भरलीं अविध यवनीं । तेथेंही स्वामित्व तयाचें ॥ ५ ॥ जावी जगी फिरगी क्रूर । नाइते इगरेज महेमार । कावे काठे कक्मखर । जळतस्कर मासाशी ॥ ६ ॥ रुमशाम खुरासन । मुल्तान हबशान अर्मस्थान । उजनख पठाण तुरकमान । बदक्सान मेवात ॥ ७ ॥ घोडमुख धेनुमुख । शूकरमुख गर्दभमुख । वानरमुख रुक्षमुख । मानवाहार जयातें ॥ ८ ॥ केशवसन रोमवसन । कर्णधारी कर्णवसन । पादहीन अपादहीन । येकचरण भाळाक्ष ॥ ९ ॥ जळमाणसे वनमाणसे । सिंदुरवर्ण विकारवेषें । अन्नविरहित मेदमासें । अतिकर्कशें वाढिनलीं ॥ १० ॥ तेही देश आपुल्या आज्ञा । सत्ता नेमिली परमप्राज्ञा । गोवध ब्राह्मणदेव अवज्ञा । करित्या करी शूळदड ॥ ११ ॥ सवेद अवेद देशमडळें । द्वीपें उपद्वीपें जागळें । वनें पर्वत नानास्थळें । येरीं आज्ञा चाळितु ॥ १२ ॥ नवखड सप्तद्वीपावर्ती । सप्तार्णवीं सप्त पर्वती । आज्ञायश व्यापिलें जगतीं । जैवि चैतन्य सर्वत्र ॥ १३ ॥ देशविदेश वदावे येथ । तरी सहज सभापर्वाआत । बोलणें असे समयोचित । राजसूयप्रसगीं ॥ १४ ॥ याचिलागीं या अवसरा । विशाळ वक्तृत्व वाग्दोरा । सावरुनि जव माघारा । केला उन्मेष तुरग ॥ १५ ॥ असो दुष्यत राजनृपति । उभय वनिता कीर्ति जगतीं । भोगिता ब्रम्हाड

एकातीं । उपमा लाजोनि माघारे ॥ १६ ॥ रत्नभरित रत्नीं । रत्नमाइुसा रत्न खाणी । रत्नाकरात हे मेदिनी । गुणरत्न पाळी प्रतापें ॥ १७ ॥ हिंसाकारी अधर्मकारी । अथवा वणसंकरकारी । दुष्यतराज्यीं अनाचारी । स्वप्नींही परि असेना ॥ १८ ॥ धर्मरति धर्मधन । सेवूनि सतुष्ट सर्वजन । स्वकर्मी सकळ वर्णे । विहिताचारें वर्तती ॥ १९ ॥ रोग दरिद्र का नधन । दु ख दुर्भिक्ष अकालमरण । सर्प वृश्चिक तस्कर जाण । दुष्यतराज्यीं असेना ॥ २० ॥ दर्शनें ग्रहस्ताभयकारी । नार्हीच जाले ते भिकारी । ब्राम्हण निरतर सदाचारी । असत्यदर्में साडिले ॥ २१ ॥ विषयविष्टेंत बुडाली मनें । शरीर वैराग्य सुचदने । चर्चूनि मिरवती शब्दज्ञानें । ते गोसावी त नव्हते ॥ २२ ॥ स्वकाळीं पर्जन्य वोपी उदका । रत्नधान्यसमृद्धि पिका । पृथ्वी प्रसवे ह्रो मानिसा । फळे जैसी श्री विया ॥ २३ ॥ विष्णुसमान सत्तानळ । प्रतापें तेजें सर्व तेजाळ । धरातुल्य सहनसीळ । अक्षोभ जैसा सागरू ॥ २४ ॥ पृथ्वीपासूनि मन्दराचळ । उपडू शके ऐसा सबळ । दुष्टदडनीं जैसा काळ । चद्रातुल्य उप कारी ॥ २५ ॥ निपुण शस्त्रास्त्रप्रहरणीं । आरूढों जाणे सव वहनीं । ऐसा भूपाळ चूडामणी । दुष्यत राजा भूलोकीं ॥ २६ ॥ सप्तसमुद्रींचे लोट । धरामडळीं येकवाट । तैसे सेनेचे सघाट । घेवूनि वना चालला ॥ २७ ॥ वाजी वारण रथ पदाति । संख्या करिता न धरे गणती । सेना वसनें सर्व जगतीं । पाखुरविलीं समर्थें ॥ २८ ॥ अनेक शस्त्रधराची वृंद । अनेक वाद्य अनेक शब्द । गर्जती तेणें विचित्र नादें । नागरलें अबर ॥ २९ ॥ कनक रत्नीं निर्वाळिलीं । गोपुरें गगन भेदीत गेलीं । तेथें वळघोनि पाहों ठेलीं । कामिनीवृंदें आवडी ॥ ३० ॥ चद्रमण्डळीं पिसली धरणीं । तैसा श्वेत उभारल्या उभरणी । रत्नकळसाचिये किरणीं । कविगुरु दोन्ही लोपल ॥ ३१ ॥ क्षीरसमुद्रीं तरग उठती । तैसीं दिव्य चामरें ढळतीं । वीर श्रियसीं राजनृपति । लक्ष्मी चद्र अनगमे ॥ ३२ ॥ सेनेसहित सेनानाथ । नगरमार्गी जात मिरवत । देखता नारा शतानुशत । माडिया गोपुरीं वळघल्या ॥ ३३ ॥ कनक कुसुमें कनकताटीं । आवडी धरूनि करसपुटीं । अवलोकूनि राजमुकुटीं । पुष्पा ञ्जुळीं साडिती ॥ ३४ ॥

— महाभारत, आदिपर्व, अध्याय पधरावा, ओव्या ४–३७

# २

## भीमप्रयाण

भीमसेन पाहे दृष्टी । तंव अंधकार कोंदला सृष्टीं । गुल्मलता वृक्षदाटीं । तृणें मार्ग लक्षेना ॥ १ ॥ निशाचरी श्वापद पक्षी । घोर गर्जना करिती कक्षीं । वोळकंबले महावृक्षीं । अश्वल आणि वाघुळा ॥ २ ॥ वनदेवता यक्षिणीपाळे । धुमश्चु घालिती गदारोळें । दीपिका दाऊनि बचाळें । गुप्त होती अप्सरा ॥ ३ ॥ प्रेतगण स्मशानवासी । रूपें धरूनि भ्यासुरवेशीं । छळिती अशुची मानवासी । रक्तमांसभक्षणा ॥ ४ ॥ दिवाभीतांचे थुवाट । पिंगळे करिती किलकिलाट । भाल्लू भुंकती सैराट । टिटवे थोर टिवटिविती ॥ ५ ॥ चक्रवाकांचे आर्तस्वर । कुमुदीं भ्रमराचे झुंकार । मस्तकमणितेजें विखार । जीवा आहारा शोधिती ॥६॥ चारया निघालीं निधानें । धगधगित प्रकाशमानें । ईश्वरकृपेस्तव पूर्वपुण्यें । येवों म्हणती सभाग्या ॥ ७ ॥ असो हे निशा दाटली काळी । जेवी काळपुरुषाची कांबळी । ब्रह्मांडदेवतेवरी सगळी । पांघुरविली आप्तत्वें ॥ ८ ॥ ऐसें देखोनि तये काळीं । भीमसेन बळिया बळी । धैर्य कास घालूनि कवळी । पांचांतेंही येकला ॥ ९ ॥ स्कदीं वाहूनियां जननी । कडिये माद्रीकुमर दोन्ही । धर्मार्जुन बाहुस्थानीं । पाणितळीं कवळिले ॥ १० ॥ पाठी देऊनि ध्रुवमंडळा । अगस्तिचक्र लक्षूनि डोळा । वाम कृत्तिकांचा मेळा । याम्य दिशे निघाला ॥११॥ पवनवेगें पवनात्मजु । त्वरें चालिला दक्षिणे उजू । जैसा पातला महागजु । कर्दळीवना विखंडी ॥१२॥ झाडपाआड मोडी झाडे । तळवा चूर्ण करीत धोंडे । श्वापदसर्पांचीं झुंबाडें । पायातळीं रगडीत ॥ १३ ॥ भीमसेनाचा अंग वायो । वाजतां सिंहशार्दूळा प्रळयो । म्हणती वना करावया क्षयो । काय अद्भुत पातलें ॥ १४ ॥ नेत्र वेचिता अठरा घटिका । पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा । कुंकुम रेखिलें त्या टिळका । अरुणोदयो बोलती ॥ १५ ॥ भार्गवाचार्य उदया येतु । तंव अपार क्रमूनि साडिला पंथु । पुढें जान्हवीजळाचा वातु । सुसीतळ पातला ॥ १६ ॥ हस्त आवरितां कुमुदीं । अवमान मानिला पद्मपदीं । त्यातें आदरें कोकनदीं । पाचारिलें जवळिकें ॥ १७ ॥ कुक्कुटें चेइरें करितां वाचा । भयें

आदरिलें अन्न । उपचारेंशीं स्वादिष्ट ॥ ६ ॥ हांक ऐकोनि कठोर । कोपें धाविन्नला निशाचर । अन्न भक्षितां देखोनि क्रूर । प्रलयानळ धडकला ॥ ७ ॥ म्हणे महीप दवडूनि दूरीं । आणि मासिया आहारातें स्वीकारी । कोण हा मूर्ख आपुले करीं । शीर छेदी आपुलें ॥ ८ ॥ प्रत्योत्तर नेदूनि मुखें । भोजन करी यथासुखें । जेंवीं निंदेनें वाजतां मुखें । साधु नेम न संडी ॥ ९ ॥ राक्षस शोभला दुर्धर । विक्राळ तुंड पर्वताकार । घर्घरारटें गगनोदर । प्रतिशब्दातें परिसवी ॥ १० ॥ दांत खाऊन करकराटीं । दोन्ही वळोनी वज्रमुष्टी । भीमसेन ताडिला पाठीं । सिंह जैसा कुंजरें ॥ ११ ॥ तेही नाणूनियां लक्षां । भीम स्वस्थ भक्षी भक्षा । मग उपडुनि चंडवृक्षा । पुढती भीमा ताडिला ॥ १२ ॥ घायें वृक्ष झाला चूर्ण । भोजनीं न चळे भीमसेन । मग घेउनी शत पाषाण । पाठोपाठीं ताडितु ॥ १३ ॥ तेही पुष्पाचिये परी । न मनूनि मौन्यें भोजन करी । संतापला उभय करीं । हस्त दोन्ही कवळिले ॥ १४ ॥ भीमें धरूनि वामपाणी । राक्षसहस्त धरिले दोन्ही । भोजन सारोनी चळवाणी । उभा ठेला सन्मुख ॥ १५ ॥ म्हणे आता मजसीं भिडे । पाहों सामर्थ्य केतुलें गाढें । नगर पीडिलें त्याचें वोढें । आजि काढीन येकदा ॥ १६ ॥ राक्षस चढोनिया तवका । भीमा हृदयीं मारी धडका । लत्ताप्रहारें ताडितां खडका । वरुता पडे सन्मुख ॥ १७ ॥ पुढती उठोनी सहस्र झाडें । भवडूनि मारी शिळा धोंडे । तितुकीं साहुनी झुंबाडे । जटा मुष्टी कवळिल्या ॥ १८ ॥ वामहस्तें धरूनि केशीं । सव्य नेमिला कंठप्रदेशीं । मान मोडितां कासाविसी । हाक मारी आक्रोशें ॥ १९ ॥ मध्यें तोडिजे युक्षदंड । त्यापरी केला तो दुखंड । नानानरूपधारी प्रचंड । गरुड रडी सर्पातें ॥ २० ॥ वज्र हाणितां निघातें । दुखंड होइजे पर्वतें । तेविं मारूनि राक्षसातें । भीम जाला जयस्त्री ॥ २१ ॥ चूर्ण जालीं अस्तिजाळें । बाहेर पडलीं नेत्रबुबुळें । मुखीं नासिकीं कर्णबिळें । रक्त वाहे भडभडा ॥ २२ ॥ यापरी असुर पावला मरणा । भयें सकंप राक्षससेना । नमस्कारुनी भीमसेना । प्राणदाना मागती ॥ २३ ॥

— आदिपर्व, अध्याय अट्ठतिसावा, ओव्या ६६–८८

फुल्याची । मध्येचि मालती कळ्याची । कृष्णपाचूचीं सावळीं ॥ १८ ॥ नोट धारिया दुधारें । निमिर दुतारे शेलारें । कळवीसुत दहातारें । वैरागराचीं वरी तोर्डे ॥ १९ ॥ गंगासागरी चंद्रकळा । तेजें लोपवी सुवर्णकमळा । नव विध रत्नाचिया कीळा । एकएका सुवस्त्रीं ॥ २० ॥ तैलंग त्रिगुण मल्याळींचीं । सिंहल कोशल वैदर्भाचीं । गौड गुर्जर बंगालींचीं । बहुवर्णाचीं साखुलीं ॥ २१ ॥ सप्तद्वीपवतीचीं वस्त्रें । छप्पन्न देशींचीं विचित्रें । कृष्णहस्तींचीं पवित्रें । पर्वतप्राय पडियेलीं ॥ २२ ॥

— सभापर्व, अध्याय पंधरावा, ओव्या २०५–२२६

## ५

## शाल्व-प्रद्युम्न युद्ध

ते वेळीं सांब गद अक्रूर । रुक्मिणी सत्यभामेचे कुमर । प्रद्युम्नादि महावीर । सिद्ध झाले संग्रामा ॥ १ ॥ हस्ती पदाती रथ । भार चालिले असंख्यात । वीर वाद्य गर्जना करीत । हृदय भेदे असुराचें ॥ २ ॥ उग्रसेनें पाळिली धुरा । यंत्रें औषधें शस्त्रीं अस्त्रीं । मध्यें गुल्मीं द्वारोद्वारीं । भार अपार कोंदले ॥ ३ ॥ असंख्य यादवांचे कुमर । गृहीं ठेवुनी वडील नर । तरुण निवडिले झुंजार । वीरश्री संभ्रमे ॥ ४ ॥ तैशीच सौभाची ही सेना । लोहोपजरें गुडिली जाणा । पराक्रमें करिती गर्जना । नरकदना पेटले ॥ ५ ॥ उभयदळीं मिळोनिया भुजा । शस्त्रें घेउनिया ओजा । नेमें घालुनिया पैजा । परस्परां हाणिती ॥ ६ ॥ वणवा लावतां श्वापदें भग्न । तेवीं असुरसेना पलायमान । होतां देखोनी मग प्रधान । क्षेमवृद्धी या नावें ॥ ७ ॥ मोकली बाणाचा जलधरु । तेणें त्रासला यादवभारु । देखोनी जांबुवतीचा कुमरु । सांब नामा धाविन्नला ॥ ८ ॥ रथ लोटुनिया पुढारा । असंख्य बाणीं भेदिलें असुरा । खेद पावोनी माघारा । पाठी देउनी पळाला ॥ ९ ॥ हें देखूनी वेगवान । सौभसेना अतिदारुण । घेऊनिया धनुष्य बाण । सांबा उजू पातले ॥ १० ॥ ते साहोनी बाणवृष्टी । गदा पडताळुनि मुष्टी । दैत्य ताडिला भूतळवटीं । प्रेत होवोनि पाडिला ॥ ११ ॥ जीर्ण वृक्ष मोडूनी

४

## द्रौपदीवस्त्रहरण

रागें फेडिलें तें अंशुक। तंव माझारीं देखे क्षीरोदक। तेंही फेडितां कौतुक। जासवन तयातळीं॥ १॥ तेंहीं आवुडितां वेगीं। देखे डाळिंबी कुसुमरंगीं। तयां आंतूनि झगमगी। शुद्ध रजत पायाऊं॥ २॥ तेंही फेडी अपवित्र। तंव माझारी देखे तगटीवस्त्र। जडीत पाल्वी विचित्र। हंस मयूरें रेखिलें॥ ३॥ ह्यावें फेडी दुःशासन। रागें अधर चावी दशन। उमयदत्तें प्रसादवन। ल्याइगी आंसूडीत॥ ४॥ सभा झाली लिखितचित्र। पार्ती टाई विसरले नेत्र। देखतीं वस्त्राहूनि वस्त्र। मोलागळें आमासा॥ ५॥ एक पल्याशकुसुमवर्णी। सेंदूर कन्हेर गुंजावर्णी। रातोत्पळें कमलवर्णी। माणीकवर्णी पट्टकूळें॥ ६॥ पंचकेशर पाजणीचें। सुवर्ण केंतकी दळ रंगाचे। तमाळ रसदळ-वर्णाचे। पंचपद्राचीं पाटलीं॥ ७॥ नीलोत्पल शुकरंगाचे। दुर्वा अतसीपुष्प-रंगाचे। ऐसे नाना पुष्पयातींचे। कारले अपार निघाले॥ ८॥ एक मधुकरवर्णाचें काळें। कंठीं कडल्या सोनसळें। पाल्वी खिळिलीं मुक्ताफळें। वाटोगरासा-रिखीं॥ ९॥ इंद्रनील जांबूळवर्णी। काळें कोकिळ कस्तूरीवर्णी। पदरीं पद्मरागाचे मणी। रत्नकिरणीं माणिकें॥ १०॥ दुग्धसमुद्रीं ओप दिधली। चंद्रमंडळें सावन केली। तारकाचूर्णे वरी घोळिलीं। जेवीं अभ्रकें झळ-कती॥ ११॥ काश्मीरवर्णे कल्हाइत। कर्दळीगर्भा ऐसे श्वेत। क्षीरवर्णी शंके रहित। वस्त्रें अपार निघालीं॥ १२॥ धत्तूरवर्णी पुंडरीकें। शंखवर्णी रुद्र अंशुकें। रौप्यतटा ऐसी चोखें। हंसदवळीं घमघमती॥ १३॥ सुवर्ण तगटी इंद्रगोप। माणिक्यरंगीं रंगलीं अमूप। अष्टदळें दाविती ओप। मौल्या आगळीं वरौतें॥ १४॥ चित्रवन खुली कुन्डिया। कारले कल्हारे चौकुडिया। मर्रात साडी चुनडिया। नवसाडिया कुसुंबी॥ १५॥ मांजिष्ठ भोजिष्ट धारि-वट। गेटम जातींचे पटनिघोट। गोदातटींचे शुद्धवट। चंद्रकिरणासारिखे॥ १६॥ मुगी पोफळी लाजीवळें। सेवंती चोळाणी सोज्वळें। निर्दोष तापेचीं पातळें। अनिमवाळें शोमती॥ १७॥ अनर्घ्ये कनक पत्रवेलीचीं। चित्रिन त्रिवटी

कुल्याची । मध्येंचि माल्ती कळ्याची । कृष्णपाचूचीं सावळीं ॥ १८ ॥ नोट धारिया दुधारें । तिमिर दुतारे शेलारें । कळवीमुत दहातारें । वैरागराचीं वरी तडिं ॥ १९ ॥ गगासागरी चद्रकळा । तेजें लोपवी सुवर्णकमळा । नव विध रत्नाचिया कीळा । एकएका सुवस्त्रीं ॥ २० ॥ तैलग त्रिगुण मल्याळींचीं । सिंहल कोशल वैदर्भाचीं । गौड गुर्जर नगालींचीं । बहुवर्णांची सावुलीं ॥ २१ ॥ सप्तद्वीपवतीची वस्त्रें । छपन्न देशींची विचित्रें । कृष्णहस्तींचीं पवित्रें । पर्वतप्राय पडियेलीं ॥ २२ ॥

— सभापर्व, अध्याय पधरावा, ओव्या २०५–२२६

## ५

## शाल्व-प्रद्युम्न युद्ध

ते वेळीं साब गद अक्रूर । रुक्मिणी सत्यभामेचे कुमर । प्रद्युम्नादि महावीर । सिद्ध झाले सग्रामा ॥ १ ॥ हस्ती पदाती रथ । भार चालिले असख्यात । वीर वाद्य गर्जना करात । हृदय भेदे असुराचे ॥ २ ॥ उग्रसेनें पाळिली धुरी । यत्रं औषधं शस्त्रीं अस्त्रीं । मध्यें गुल्मीं द्वारोद्वारीं । भार अपार कोंन्लें ॥ ३ ॥ असख्य यादवाचे कुमर । गृहीं ठेवुनी वडील नर । तरुण निवडिले हुजार । वीरश्री सभ्रमे ॥ ४ ॥ तैशीच सौभाची ही सेना । लोहोपजरे गुडिली जाणा । पराक्रमे करिती गर्जना । नरकदना पेटले ॥ ५ ॥ उभयदळीं मिळोनिया हुजा । शस्त्र घेउनिया ओजा । नेम घाटुनिया पैजा । परस्परा हाणिती ॥ ६ ॥ वणवा लावता श्वापदें भग्न । तेवीं असुरसेना पलायमान । होता देखोनी मग प्रधान । क्षेमवृद्धी या नांवें ॥ ७ ॥ मोकली नाणाचा जलधरु । तेणें त्रासला यादवभारु । देखोनी जावुवतीचा कुमरु । साब नामा धाविन्ला ॥ ८ ॥ रथ लोटुनिया पुढारा । असख्य बाणीं भेदिलें असुरा । खेद पावोनी माघारा । पाठी देउनी पळाला ॥ ९ ॥ हें देखूनी वेगवान । सौभसेना अतिदारुण । घेऊनिया धनुष्य बाण । साब उजू पातले ॥ १० ॥ ते साहोनी आणदृष्टी । गदा पडताळुनि मुष्टी । दैत्य ताडिला भूतळवरीं । प्रेत होवोनि पाडिला ॥ ११ ॥ जीर्ण वृक्ष मोडूनी

पडे । तेंवीं दानव प्राणें विघडे । हें देखता धादन होडे । विविध नामा धाविन्नला ॥ १२ ॥ चारुदेष्ण रुक्मिणीकुमर । तेणें विविध तोडिला थोर । जैसा शक्रें वृत्रासुर । भाडणीं तैसे मिळाले ॥ १३ ॥ तीक्ष्ण सोडूनिया बाण जाळ । छेदिलें निविधाचें मौळ । जैसा भगिजे शैल । वज्राघातें सुरेंद्रें ॥ १४ ॥ विविध मारिला चारुदेष्णें । हें देखोनी शाल्वे तेणें । प्रेरूनिया असख्य सैन्यें । आपण युद्धा पातला ॥ १५ ॥ नाकुडी घालिजे महाघनीं । तेंवी वर्षाव बाणीं । माडिला देखोनी द्वारकाजना । महाकल्पांत मानिला ॥ १६ ॥ जेष्ठ भीमकीचा नदन । मदन कामेश्वर प्रद्युम्न । कुसुमशराच सधान । साहों न शके हरब्रह्मा ॥ १७ ॥ त्रैलोक्य भेदिलें एक बाणें । त्यात झुजोनी जिंकिजे कोणें ? । यापरातें धैर्यरचनें । गर्जोनिया बोलत ॥ १८ ॥ आजि कौतुका पहा हो ! नयनीं । शाल्व निश्चयें मारीन रणीं । जैसा त्रिपुरात भेदूनी । शिव कल्याण पावला ॥ १९ ॥ *दिव्यवाजी कनकरथू । ध्वजीं मिरवे मकरकेतू । चक्रीं चद्रमा आदित्यू ।* जडिले तैसे भासती ॥ २० ॥ दारुकाचा पुत्र सुमति । प्रद्युम्नाचा तो सारथी । युद्धी नाना परीच्या युक्ती । गती विगती रथाच्या ॥ २१ ॥ शाल्वबाणाचिया कोटी । तोडूनी आपुली बाणवृष्टी । दाविता सौभाचिये दृष्टी । अधकारू पातला ॥ २२ ॥ शाल्व म्हणे हो कौतुक । म्हणत होता हा बाळक । होय कृष्णाहूनी अधिक । कृष्णपुत्र निर्धारें ॥ २३ ॥ तव शत्रूचीं गात्रें गात्र । बाणीं भेदिती कृष्णपुत्र । झाकूनिया उभय नेत्रें । मूर्च्छित पडे रथाग्रीं ॥ २४ ॥ पडता देखोनी मुख्य धुर । दैत्य करिती हाहा कार । भयें भेदुनी अबर । दाही दिशा लघिती ॥ २५ ॥ मुहूर्त लोटलिया सौभपती । सावध होऊनी बैसला रथीं । धनुष्यबाण घेऊन हातीं । प्रद्युम्न दृष्टी लक्षिला ॥ २६ ॥ लक्षामाजीं लक्ष बाण । सोडिता हस्त लाघवीं निपुण । निवारिताही प्रद्युम्न । हृदयमर्मा भेदला ॥ २७ ॥ जळी शशाचिये परी । दावे झुजता महामारी । घावो घालुनी घायानळीं । कृष्णकुमर ताडिला ॥ २८ ॥ तेणे मूर्च्छना आली थोरा । पहुडला रथाचिये गुढारीं । हें देखोनिया यादवभारीं । हाहा कार माजला ॥ २९ ॥

— वनपर्व, अध्याय तिसरा, ओव्या ९–३७

## ६

## दमयंतीविलाप

यापरी साडुनी दमयंती । नैषध गेला अरण्यपथीं । स्वल्प उरली असता रात्री । प्रबोधली पतिव्रता ॥ १ ॥ निकट न देखे भ्रतार । भीमकी करी हाहाकार । सबळ दाटला अंधकार । भरतें कांहीं दिसेना ॥ २ ॥ धावरेपणीं धांवोनि चरणीं । अडखळोनी पडे धरणीं । मस्तकी लागोनी पाषाणीं । रक्त वाहे भड भडा ॥ ३ ॥ हाक मारी दीर्घस्वरें । म्हणे वल्लभा ! धाव का त्वरें । मातें साडोनी पुढारे । पाय कैसे चालती ! ॥ ४ ॥ तुज न देखता प्राण । देहीं न राहे अर्ध क्षण । येई सत्वर धांवोन । आलिंगन मज देईं ॥ ५ ॥ माझा करूनिया घात । काय तो साधिशी पुरुषार्थ ? । मजवेगळें तुझें चित्त । काय विश्रांती पावेल ? ॥ ६ ॥ क्षुधित वनीं मी गोरटी । अर्धवसनें होय कष्टी । पडलिया वनसंकटीं । प्राण कोठीं पातला ॥ ७ ॥ तुजवेगळी करूं काय । कवणातें मी मोकलूं धाय ? । नाहीं बाप अथवा माय । ईश्वर तोही दिसेना ॥ ८ ॥ भयें झोंबू कवणाचे कंठीं । साग रिघों कवणापोटीं । तुजवेगळीं सर्व सृष्टी । वोस वाटे वल्लभा ॥ ९ ॥ स्नेहें धांवोनी लवलाहीं । मात कवळी दोन्हीं बाहीं । तुजवेगळा मज नाहीं । सोडविता रक्षिता ॥ १० ॥ तुजवरी ठेवूनिया दृष्टी । मी विसरलें दु:खकोटी । तुझ्या संगीं सर्व सृष्टी । सुखभरित मज वाटे ॥ ११ ॥ धाव धाव नैषधराया । केशीं झाडीन तुझ्या पाया । झाडणें करुनी साडीन काया । तुजवरूनी आवडी ॥ १२ ॥ पडे उठी मागुती पडे । दिशा अवलोकुनी चहूंकडे । नळा ! नळा ! म्हणउनी रडे । आकांतली याननीं ॥ १३ ॥ प्राणेश्वरा ! नळ नरेशा ! । मुख गाजवी हाचि घोष । ऊर्ध्व अवलोकी आकाश । रिघों पाहे पाताळीं ॥ १४ ॥ नमन माझे म्हणे अनिला । माझी वार्ता जाणवी नळा । लोटुनी आणी मजजवळा । श्रेय घेईं जीवाचें ॥ १५ ॥ नमन करितसे तुझिया चित्ता । उपजों नेदीं निष्ठुरता । चर हो ! तुम्हातें वाहातसे माथा । परतोनि आणा नळातें ॥ १६ ॥ पक्षी हो ! तुम्ही पक्षबळ । उडोनि शोधा माझा नळ । वार्ता सांगोन उतावीळ । शीघ्र आणा मजपाशीं ॥ १७ ॥ चक्र

वाकाचिया युग्मा । म्हणे वेदना ठाउकी तुम्हा । नळातें शोधुनिया श्रमा । माझिया हो! परिहरीं ॥१८॥ मधुकरातें बोले शब्द । तुम्हा प्रिय पुष्पाब्द । नळाचा मुखाब्जमकरद । सेवुनी सांगा शुद्धीतें ॥ १९ ॥ दु खसमुद्रामाजीं मग्न । सकळीं गला वर साडून । परा मुख तुचारी अवगुण । निगा काहीं न बोले ॥ २० ॥ आठवुनी नळाचे कष्ट । दुखें होतसे हृदयस्फोट ॥ नाठवी आपुलें सकट । वनिता श्रेष्ठ दमयंती ॥ २१ ॥ हा महाराज! नळ नरेशा! मातें होत का तुझ क्लेश । तुवा असावें सुखमताप । तुझ अग्रिष्ट मज लागा ॥ २२ ॥ माझा पतिव्रताधर्म । तूतें सवत्र करू क्षेम । तुझे अवदसेचा श्रम । सर्व हो का मजलागीं ॥ २३ ॥ ऐशी मुखीं गाजवा ध्वनी । अश्रुधारा गळती नयनीं । मार्गरहित वनोपवनीं । कोमल पायीं चामके ॥ २४ ॥ बाहळ बोहळ टरे टरकुटे । विवरें कुहर गिरिकपाटे । वनें भयानक कष्टें । लघनिया जातसे ॥ २५ ॥ उच्चनीच महादरडी । वाट अत्यंत निसरडी । कासळोनी पल्ली तांडीं । अजगराच ते काळीं ॥ २६ ॥ तो क्षुधित विशाल व्याळू । मुखें कवळूनी लागला गिळू । येरी आक्रंदे नळा स्नेहाळू । फउता गला ये काळीं ॥ २७ ॥ धाव धाव नैषधराया! । सर्पे गिळिली माझी काया । तुजविण मज सोडवावया । आन कोणी दिसेना ॥ २८ ॥ तिची एकानी रुदितध्वनी । मृग पारधी विचरे वनीं । धावोनी पातला तव नयनीं । देखे सर्पें धरिलीसे ॥ २९ ॥ मुखीं घालुनी लोहखाडें । हातंची चिरिलीं जाभाडें । उभयहस्तीं धरुनी फडे । ओढुनिया कडे काढिली ॥ ३० ॥ उदकें प्रक्षाळूनिया काया । म्हणे तू कवणाची जाया । कोठुनियां कवणा ठाया । येकटी जासी काननीं ॥ ३१ ॥ येरा म्हणे, मी वैदर्भकुमरी । नैषधरायाची अतुरी । कांतें सांडिलें वनातरीं । त्याच शोधन करीतसें ॥ ३२ ॥ तिच अवलोकिता वदन । व्याधाहृदयीं धडकला मदन । म्हणे,

॥ ३७ ॥ विशाल देखोनि पर्वत । तया करूनिया प्रणिपात । पुसे नैषध प्राण नाथ । येणें मार्गे देखिला ॥ ३८ ॥ अशोकवृक्ष देखूनि त्यातें । प्रार्थूनी पुसे जोडिल्या हस्तें । नळाची शुद्धि सांगोनि मातें । अशोक करीं अशोका ! ॥ ३९ ॥ अनेक श्वापदांचिया थार्टीं । भयें कोणीं न येतीं निकटीं । म्हणती पतिव्रता दृष्टी । भस्म करील आमुतें ॥ ४० ॥ पुढें प्रचंड वनकेसरी । त्यातें विनवी जोडुनी करीं । म्हणे, कृपा करोनी माझ शिरीं । नैषध सांग नेउता ? ॥ ४१ ॥ सव्य घालुनी पद्मनयना । केसरी गेला विशाल वना । पुढें जातां तापसारण्या। देखती झाली ती वनीं ॥ ४२ ॥ अमृतोदकें देव नदिनी । तैशी सरिता प्रवाहे जीवनीं । माजीं विकासल्या नलिनी । श्वेत रक्त बहुवर्ण ॥ ४३ ॥ तेथें हंस कारंडक । चकोर मयूर चक्रवाक । सदा फळीं फुलले रुख । आम्रजंबू पनसादी ॥ ४४ ॥

— वनपर्व, अध्याय सातवा, ओव्या १२०–१६३

७

## वर्षाकाळ

यानंतरी पातला वर्षाकाळ । पंचम ऋतु झाला प्रबळ । सुटला पश्चिमेचा अनिळ । मेघमाला मोकली ॥ १ ॥ पृथ्वी मंथ्लीचा जलराशी । पारधी पातला आकाशीं । पिटित मृगाचे पाठिशीं । सैरा गगनीं धावत ॥ २ ॥ इंद्रचाप घरूनि मुष्टी । रोहिणी मृगाचिया पाठीं । मेघधारा जीवन वृष्टी । करित वेग पातला ॥ ३ ॥ सूर्यकिरण मृगसमुदाय । निस्तेज होउनी पावले भय । लपावया शोधीत ठाय । अभ्रें आड करूनिया ॥ ४ ॥ किं पृथ्वीरूप त्या शाळुंका । अनेक पर्वत शिवपिंडिका । इंद्रें मांडिलें अभिषेका । गगनपात्रीं बहुधारा ॥ ५ ॥ मयूर चातक कपोतक । दर्दुर करिती महाघोष । मेघ जगाचा पालक । सर्व लोकां जाणविती ॥ ६ ॥ विद्युल्लताचे कडकडाट । घनगर्जना गडगडाट । गंगादि सरितांचे सघाट । महापूर माजले ॥ ७ ॥ अठराभार वनस्पती* । अकुर वसनें

* अठराभार वनस्पतींचा लेखणा । समुद्र भरला मषीकरुनी । माझे अवगुण लिहितां धरणी । तरी लिहिले न जाती गोविंदा ॥ — देवादास, व्यंकटेशस्तोत्र

वाकाचिया युग्मा । म्हणे वेदना ठाउकी तुम्हा । नळातें शोधुनिया श्रमा. माझिया हो! परिहरीं ॥१८॥ मधुकरातें बोले शब्द । तुम्हा प्रिय पुष्पगंध । नळाचा मुखाब्जमकरंद । सेवुनी सागा शुद्धीतें ॥ १९ ॥ दु:खसमुद्रामाजीं मग्न । सकटीं गेला वर सांडून । परी मुखें मुचारी अवगुण । निंदा काहीं न बोले ॥ २० ॥ आठवुनी नळाचे कष्ट । दुखें होतसे हृदयस्फोट । नाठवी आपुलें संकट । वनिता श्रेष्ठ दमयंती ॥ २१ ॥ हा महाराज! नळ नरेशा! मातें होत का तुझे क्लेश । तुवा असावें सुखसतोष । तुझें अरिष्ट मज लागो ॥ २२ ॥ माझा पतिव्रताधर्म । तूतें सर्वदा करू क्षेम । तुझे अवदसेचा श्रम । सर्व हो का मजलागीं ॥ २३ ॥ ऐशी मुखीं गाजवी ध्वनी । अश्रुधारा गळती नयनीं । मार्गरहित वनोपवनीं । कोमल पायीं चामके ॥ २४ ॥ वाहळ नोहळ दरे दरकुटे । विवरें कुहरें गिरिकपाटे । वनें भयानकें कष्टें । लघूनिया जातसे ॥ २५ ॥ उचनीच महादरडी । वाट अत्यंत निसरडी । कोसळोनी पडली तोंडीं । अजगराचे ते काळीं ॥ २६ ॥ तो क्षुधित विशाल व्याळू । मुखें कवळूनी लागला गिळू । येरी आक्रंदे नळा स्नेहाळू । चेउता गेला ये वाळीं ॥ २७ ॥ धाव धाव नैषधराया! । सर्पें गिळिली माझी काया । तुजविण मज सोडवावया । आन कोणी दिसेना ॥ २८ ॥ तिची ऐकोनी रुदितध्वनी । मग

॥ ३७ ॥ विशाल देखोनि पर्वत । तया करूनिया प्रणिपात । पुसे नैषध प्राण नाथ । येणें मार्गें देखिला ॥ ३८ ॥ अशोकवृक्ष देखूनि त्यातें । प्रार्थूनी पुसे जोडिल्या हस्तें । नळाची शुद्धि सांगोनि मातें । अशोक करी अशोका ! ॥ ३९ ॥ अनेक श्वापदांचिया थाटीं । भयें कोणीं न येती निकटीं । म्हणती पतिव्रता दृष्टी । भस्म करील आमुतें ॥ ४० ॥ पुढें प्रचंड वनकेसरी । त्यातें विनवी जोडुनी करीं । म्हणे, कृपा करोनी माझें शिरीं । नैषध सांग केउता ? ॥ ४१ ॥ सन्न घालूनी पद्मनयना । केसरी गेला विशाल वना । पुढें जातां तापसारण्या । देखतां जाली ती वनीं ॥ ४२ ॥ अमृतोदकें देव नदिनी । तैशी सरिता प्रवाहे जीवनीं । माजीं विकासल्या नलिनी । श्वेत रक्त बहुवर्णें ॥ ४३ ॥ तेथें हंस कारंडक । चकोर मयूर चक्रवाक । सदा फळीं फुलले रुख । आम्रजंबू पनसादी ॥ ४४ ॥

— वनपर्व, अध्याय सातवा, ओव्या १२०-१६३

## ७

## वर्षाकाळ

यावरी पातला वर्षाकाळ । पंचम ऋतु झाला प्रबळ । सुटला पश्चिमेचा अनिळ । मेघमाला मोकली ॥ १ ॥ पृथ्वी मंडळीचा जलराशी । पारधी पातला आकाशीं । पिटित मृगाचे पाठिशीं । सैरा गगनीं धावत ॥ २ ॥ इंद्रचाप धरूनि मुष्टी । रोहिणी मृगाचिया पाठीं । मेघधारा जीवन वृष्टी । करित वेगें पातला ॥ ३ ॥ सूर्यकिरण मृगसमुदाय । निस्तेज होउनी पावले भय । लपावया शोधीत ठाय । अभ्रे आड करूनिया ॥ ४ ॥ किं पृथ्वीखंड त्या शाळुंका । अनेक पर्वत शिवपिंडिका । इंद्रें मांडिलें अभिषेका । गगनपात्रीं बहुधारा ॥ ५ ॥ मयूर चातक कपोतक । दर्दुर करिती महाघोष । मेघ जगाचा पालक । सर्व लोकां जाणविती ॥ ६ ॥ विद्युल्लताचे कडकडाट । घनगर्जना गडगडाट । गंगादि सरिताचे सघाट । महापूर माजले ॥ ७ ॥ अठराभार वनस्पती* । अंकुर वसनें

* अठराभार वनस्पतांची लेखणी । समुद्र भरला मषाकरुनी । माझे अवगुण लिहितां धरणीं । तरी लिहिले न जाती गोविंदा ॥ — देवादास, व्यंकटेशस्तोत्र

९

## वनश्रीवर्णन

वनश्री वर्णावी कवणें । उपमें नंदनवन उणें । नानावृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटलीं ॥ १ ॥ एक सरळ शाखाविहीन । एक ते शाखामंडित पूर्ण । तया ग्रीवा लतिका वेष्टन । करुनी जाली सुरवाडें ॥ २ ॥ कर्पूर कर्दळीं, नारी-केळी । चूतवृक्ष लवले फळीं । कटकीं फळाची नव्हाळी । लागलीं मुळीं असंख्य ॥ ३ ॥ द्राक्षीमंडपातळीं दाट । वाहती अमृतरसाचे पाट । फणसफळें त्यागुनी देंट । दाविती वाट सिंधूची ॥ ४ ॥ जाई, जुई, चंपक मालती । बकुळ मोगरे कांचन शेवंती । केतकीवनें मघमघिती । पराग क्षिती सुगंध ॥५॥ अगरचंदन देवदारु । हरिचंदन, मैलागरु । वृक्षवेष्टित विषधरू । भूतें जैशी निधाना ॥ ६ ॥ न्यग्रोध, पालाश पिप्पलतरु । जे देवत्रयाचे अवतारू । बिल्व, तुळसी, हरिहरू । ज्यांचे पत्रें तोषती ॥ ७ ॥ अनेक वृक्षांचिया जाती- । माजी पशुपक्षी क्रीडती । कनककल्हारीं शोभती । पूर्ण जीवनीं तडाग ॥ ८ ॥ ऐसी सिद्धाश्रमाची वाटिका । देखोनी रायें वारिलें कटका । आपण प्रधान पट्ट-नायिका- । वांचुनी आणिका येऊं नेदी ॥ ९ ॥ प्रवेश करिता तये वनीं । राजा आश्चर्य देखे नयनी । धेनु व्याघ्र एके स्थानीं । एकमेकां चारिती ॥ १० ॥ नकुळ सर्प क्रीडती सुखें । मार्जारीस्तना लागती मूषकें । सिंह करिण करीत कौतुकें । वनामाजी विचरती ॥ ११ ॥ उलूक मिरवूनी पिलीयांसी । वायस जाती चारियासी । विश्वामित्र माया ऐसी । सहसा न कळे मानवा ॥ १२ ॥ निर्वैर श्वापदांचे गण । देखोनि विस्मित रायाचें मन । पुढें जाता सुगंध जीवन । पूर्ण देखिलें ॥ १३ ॥ तया कासार जीवनें स्नान । करोनि विश्रांति लाहिजे मनें । परिधान करुनी दिव्य वसनें । देवालया निघाला ॥ १४ ॥ कर्दळद्रोणीं हेमकमळें । नानापुष्पे सुपरिमळें । कनकपात्रीं भरूनि जळें । शिवागारीं प्रवेशे ॥ १५ ॥ सोमकांत श्वेत शिखर । मार्जी विराजे कर्पूरगौर । द्वारीं ढवळा नंदिकेश्वर । मनोहर शोभत ॥ १६ ॥

— हरिश्चंद्राख्यान, अध्याय पहिला, ओव्या १०६–१२१

पालटें ॥ २८ ॥ नवनीत साजूक सद्यस्तप्तें । वाटिया उचंबळती घृतें । येकें शोधिलीं नवनीतें । येकें थिजली सुवासें ॥ २९ ॥ दधिसारें दुग्धसारें । पयें आटिली तवक्षीरें । परमभाग्याचे जेवणारे । जे जेविती तें पंक्ति ॥ ३० ॥ गाळूनि चंद्रकळाचा रस । माजि मेळविल्यां सुवास । ते कथिकेचा घेतां वास । परतें म्हणती आमृता ॥ ३१ ॥ समुद्रमथनिचें अमृत । गोडी देऊनि अमर करित । तेथिच्या उदका न घालवे हात । खारवणि म्हणुनि ॥ ३२ ॥ तेवि कामधेनुच्या तक्रें । कथिका शेविता देवशक्रें । अमृतातें म्हणें वक्त्रें । कळकटलें बहुंकाळिचें ॥ ३३ ॥ तक्र तिथणि अमळकि । वोदनसारि जंबीरनिंकि । अडकि मुग्दली कुलथकी । उपचार केलें सुस्वादें ॥ ३४ ॥ बदरि अम्र कपित्य चुणें । अंबुसोल अंबुस रसनें । मरिचसारें पित्तशमनें । दक्षिण देसी जन सेविती ॥ ३५ ॥ ऐसिया नाना विधा कथिका । भीन्न जाल्या ज्या पांका । अश्वादिता मूखा । वोदन चाले द्विगुणी ॥ ३६ ॥ नाना शाकरसांचीं सारें । वोदनसंगि अत्यंत मधुरें । जें सेवितां कुपिथ्यवारे । कदाकाळीं बाधीना ॥ ३७ ॥ सांडया कुरवड्या पापडवडे । आळणे सांबरि स्वादिष्ट गोडें । कोशिंबिरी रायीती मिरगुंडे । मिथ्याकुटें मघमघती ॥ ३८ ॥ कृष्ण भोक्ता जिये पंक्ति । भोजन करी परम प्रीति । तया पंक्तिकाराचे किति । भाग्य मुखें वर्णावें ॥ ३९ ॥ अम्रस रायकेळें । पिकोनि उललीं गंगाफळें । पेंडाळु रताळु गुळगुळें । कपित्थ सारें सुवासें ॥ ४० ॥ ऐसिया फळाचिया सीखरणी । जेविल्या जाहाली चंद्रधणी । शाखाचेनि सुवासें गगनिं । वेधु उपजवी नीर्जरा ॥ ४१ ॥ फळमूळ शाखा पत्रशाखा । खंदशाखा पुष्पशाखा । त्याचा स्वादु सेविता मुखा । शाकंभरि स्वयें जावें ॥ ४२ ॥ लवण शाखाचिया श्रेणि । दध्योधनाच्या सांघातिणि दधितक्राचिये मिळणी । ब्रह्मानंदु भोक्तया ॥ ४३ ॥

— विराटपर्व, अध्याय आठवा, ओव्या ५१-९३

# ९

## वनश्रीवर्णन

वनश्री वर्णावी कवणें । उपमे नंदनवन उणें । नानावृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटली ॥ १ ॥ एक सरळ शाखाविहीन । एक ते शाखामंडित पूर्ण । तया ग्रीवा लतिका वेष्टन । करुनी जाती सुरवाडें ॥ २ ॥ कर्पूर कर्दळी, नारी केळी । चूतवृक्ष ल्वले फळीं । कटकी फळांची नव्हाळी । लागलीं मुळीं असंख्य ॥ ३ ॥ द्राक्षीमंडपातळीं दाट । वाहती अमृतरसाचे पाट । फणसफळें त्यागुनी देंट । दाविती वाट सिंधूची ॥ ४ ॥ जाई, जुई, चंपक मालती । बकुळ मोगरे कांचन शेवती । केतकीगंधें मघमघिती । पराग क्षिती सुगंध ॥५॥ अगरचंदन देवदारु । हरिचंदन, मैलागरु । वृक्षवेष्टित विषधरू । भूत जैशी निधाना ॥ ६ ॥ न्यग्रोध, पालाश पिप्पलतरु । जे देवनराचे अवतारू । बिल्व, तुळसी, हरिहरू । ज्याचे पत्र तोषती ॥ ७ ॥ अनेक वृक्षांचिया जाती । माजी पशुपक्षी क्रीडती । कनककल्हारीं शोभती । पूर्ण जीवनीं तडाग ॥ ८ ॥ ऐसी सिद्धाश्रमाची वाटिका । देखोनी रायें वारिलें कटका । आपण प्रधान पट्टनायिका- । वाचुनी आणिका येऊं नेदी ॥ ९ ॥ प्रवेश करिता तये वनीं । राजा आश्चर्य देखे नयनी । धेनु व्याघ्र एके स्थानीं । एकमेका चारिती ॥ १० ॥ नकुळ सर्प क्रीडती सुखें । मार्जारीस्तना लागती मूषकें । सिंह करिण करीत कौतुकें । वनामाजी विचरती ॥ ११ ॥ उलूका मिरवूनी पिलीयासी । वायस जाती चारियासी । विश्वामित्र माया ऐसी । सहसा न कळे मानवा ॥ १२ ॥ निर्वैर श्वापदाचे गण । देखोनि विस्मित रायाचें मन । पुढे जाता सुगंध जीवन । पूर्ण देखिलें ॥ १३ ॥ तया कासार जीवनें स्नान । करोनि विश्रांति लाहिजे मनें । परिधान करुनी दिव्य वसनें । देवालया निघाला ॥ १४ ॥ कर्दळद्रोणीं हेमकमळें । नानापुष्पें सुपरिमळे । कनकपात्रीं भरूनि जळें । शिवागारीं प्रवेशे ॥ १५ ॥ सोमकांत श्वेत शिखर । माजीं विराजे कर्पूरगौर । द्वारीं दवळा नंदिकेश्वर । मनोहर शोभत ॥ १६ ॥

— हरिश्चंद्राख्यान, अध्याय पहिला, ओव्या १०६–१२१

पाल्टें ॥ २८॥ नवनीत साजुक सद्यस्तें। वाटिया उच्चळती घृतें। येणें शोधिलीं नवनीतें। येणें थिजलीं सुवासें ॥ २९ ॥ दधिसारें दुग्धसारें। पयें आटिली तवक्षीरें। परमभाग्याचे जेवणारे। जे जेविती तें पत्ति ॥ ३० ॥ गाळूनि चद्रकळाचा रसु। माजि मेळविल्या सुवासू। ते कथिकेचा घेता वासू। परतं म्हणती आमृता ॥ ३१ ॥ समुद्रमथनिचें अमृत। गोडी देऊनि अमर करित। तेथिच्या उदका न घालवे हात। सारवणि म्हणुनि ॥ ३२ ॥ तेवि कामधेनुच्या तर्के। कथिका शेविता देवशक्रें। अमृताते म्हणें वक्रें। कळ कर्लें ऋतुकाळिचें ॥ ३३ ॥ तक्र तिथणि अमळकि। वोदनसारि जबीरनिंकि। अडकि मुग्दली कुल्थकी। उपचार केलें सुस्वादें ॥ ३४ ॥ बदरि अम्र कपित्थ चुर्णें। अम्रुसोल अम्रुस रसनें। मरिचसारें पित्तशमनें। दक्षिण देसी जन सेविती ॥ ३५ ॥ ऐसिया नाना विधा कथिका। भीन जाल्या ज्या पाका। अश्वादिता मूसा। वोदन चाले द्विगुणी ॥ ३६ ॥ नाना शाकरसाचीं सारें। वोदनसगि अत्यत मधुरें। जें सेविता कुपिथ्यवारें। क्दाकाळीं नाधीना ॥ ३७ ॥ साडया कुरवड्या पापडवडे। आळणे सारारि स्वादिष्ट गोडें। कोशिंबिरी रायीतीं मिरगुडे। मिष्याकुटें मघमघती ॥ ३८ ॥ कृष्ण भोक्ता जिये पत्ति। भोजन करी परम अर्ति। तया पत्तिकाराचे कित्ति। भाग्य मुखें वर्णावें ॥ ३९ ॥ अम्ररस रायनेळ। पिकोनि उत्ल्टीं गगाफळें। पेडाळु रताळु गुळगुळे कपित्थ सारें सुवासे ॥ ४० ॥ ऐसिया फळाचिया सीखरणी। जेविल्या आहार्ळ चद्रघणी। शाखाचेनि सुवासें गगनि। वेधु उपजवी नीर्जरा ॥ ४१ ॥ फळमूळ शाखा पत्रशाखा। कदशाखा पुष्पशाखा। त्याचा स्वादु सेविता मुखा। शाक भरि स्वयें जावें ॥ ४२ ॥ लवण शाखाचिया श्रेणि। दध्योधनाच्या साधातिणि दधितक्राचिये मिळणी। ब्रह्मानदु भोक्त्या ॥ ४३ ॥

— विराटपर्व, अध्याय आठवा, ओव्या ५१-९३

## ९

## वन श्रीवर्णन

वनश्री वर्णावी कवणें । उपमे नंदनवन उणें । नानावृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटलीं ॥ १ ॥ एक सरळ शाखाविहीन । एक ते शाखामंडित पूर्ण । तया ग्रीवा लतिका वेष्टन । करुनी जाती सुरवाडें ॥ २ ॥ कर्पूर कर्दळीं, नारी केळी । चूतवृक्ष लवले फळीं । कटकी फळांची नव्हाळी । लागली मुळीं असंख्य ॥ ३ ॥ द्राक्षीमंडपातळीं दाट । वाहती अमृतरसाचे पाट । फणसफळें त्यागुनी देंट । दाविती वाट सिंधूची ॥ ४ ॥ जाई, जुई, चंपक माल्ती । बकुळ मोगरे कांचन शेवती । केतकीवनें मघमघिती । पराग भिती सुगंध ॥५॥ अगरचंदन देवदारु । हरिचंदन, मैलागरु । वृक्षवेष्टित विषधरू । मूर्त जेशी निधाना ॥ ६ ॥ न्यग्रोध, पालाश पिप्पलतरु । जे देवनयांचे अवतारू । बिल्व, तुळसी, हरिहरू । ज्यांचे पत्रें तोषती ॥ ७ ॥ अनेक वृक्षांचिया जाती । माजी पशुपक्षी क्रीडती । कनककल्हारीं शोभती । पूर्ण जीवनीं तडाग ॥ ८ ॥ ऐसी सिद्धाश्रमाची वाटिका । देखोनी रायें वारिलें कटका । आपण प्रधान पट्ट नायिका- । वांचुनी आणिका येऊं नेदी ॥ ९ ॥ प्रवेश करितां तये वनीं । राजा आश्चर्य देखे नयनीं । धेनु व्याघ्र एके स्थानीं । एकमेकां चारिती ॥ १० ॥ नकुळ सर्प क्रीडती सुखें । मार्जारीस्तना लागती मूषकें । सिंह करिण करीत कौतुकें । वनामाजी विचरती ॥ ११ ॥ उलूक मिरवूनी पिलीयासी । वायस जाती चारियासी । विश्वामित्र माया ऐसी । सहसा न कळे मानवा ॥ १२ ॥ निर्वैर श्वापदांचे गण । देखोनि विस्मित रायाचें मन । पुढें जातां सुगंध जीवन । पूर्ण देखिलें ॥ १३ ॥ तया कासार जीवनें स्नान । करोनि विश्रांति लाहिजे मनें । परिधान करुनी दिव्य वसनें । देवाल्या निघाला ॥ १४ ॥ कर्दळद्रोणीं हेमकमळें । नानापुष्पें सुपरिमळें । कनकपात्रीं भरुनि जळें । शिवागारीं प्रवेशे ॥ १५ ॥ सोमकांत श्वेत शिखर । माजीं विराजे कर्पूरगौर । द्वारीं ढवळा नंदिकेश्वर । मनोहर शोभत ॥ १६ ॥

— हरिश्चंद्राख्यान, अध्याय पहिला, ओव्या १०६–१२१

हरिहरपद पद्मीं भृंगभृंगी विनोदें । प्रगटित मुखवाणी जागवी जीव बोधें ।
भवनिधि जलपारा पाविजे एकनामें । न कळत बहु पंथें भ्रांतले भ्रांत कामीं ॥११॥
विरस विषय पाहें रोहिणी तोय जैसें । निरस धन दुराशा दर्पणीं बिंब जैसें ।
सुरस रघुपतीचें नाम पीयूष वाचे । परिसपद सरोजें लोह लागे मनाचे ॥१२॥
धनुष पुरहराचें भंगिलें विश्वमान्या । अवनिभुज सिंहाची लाधली दिव्य कन्या ।
मिथुन वधुवरांचें शोभलें हेमधामी । हवनपुजन तोषें तोषला मेघगामी ॥१३॥
प्रबळ मकरमीनीं माजले कर्क मोठे । भरुनि दगड सिंधू लंघिला पायवाटे ।
निवटुनि दशमुंडें कुंभकर्णादि सर्गी । अतुळबळ तुलाया नाठवे आन वेगीं ॥१४॥
तनू चिंतितां त्या रघुराजयाची । हरे वेधना या भवावृश्चिकाची ।
स्मरा सादरें सर्वदा रामवाचें । रुळे अंकणा क्रूर तो काळ साचें ॥ १५ ॥

— रामायण, युद्धकांड, ओव्या ४६१–४७५

## तुकाराम

### १

### आत्मनिवेदनपर अभंग

नामदेवें केलें स्वप्नामाजि जागें । सवें पांडुरंगें येऊनिया ॥
सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥
माप टाकी सळे धरिली विठ्ठलें । थापटुनी केलें समाधान ॥
प्रमाणाचि संख्या सांगे शतकोटी । उरलें तें शेवटीं लावी तुका ॥

#### पत्नीची तक्रार

मजचि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥
चालोनिया घरा सर्व सुखें येती । माझी तो फजिती चुकेचि ना ॥
कोणाची बाईल होउनिया बोहू । संवसारीं काहूं आपदा किती ॥
काय तरी देऊं तोंडतील पोरें । मरते बरें होतें आता ॥

काहीं नेदि यांचों धोइयेलें घर । सारवाया दोरशेण नाहीं ॥
तुका म्हणे राडे न करिता विचार । वाहुनिया भार कुथे माथा ॥ २ ॥

* * * * *

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥
उठिते तें कुटिते टाळ । अवघा माडिला कोल्हाळ ॥
जीवतुचि मेलें । लाजा वाटोनिया प्यालें ॥
ससाराकडे । न पाहाती वोस पडे ॥
तळमळती यांच्या राडा । घालिनी जीवा नावें धोंडा ॥
तुका म्हणे बरें झालें । घे गे बाइले लिहिलें ॥ ३ ॥

* * * * *

### रामेश्वर भट्टाच्या तक्रारीमुळें आलेला गांवांतील प्रसंग

काय खावें आता कोणीकडे जावें । गावात राहावें कोण्या बळें ॥
कोपला पाटील गावचे हे लोक । आता घाली भीक कोण मज ॥
आता येणें चवी साडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणात ॥
भल्या लोकीं यास सागितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥
तुका म्हणे याचा सग नव्हे भला । शोधित विठ्ठला जाऊ चला ॥ ४ ॥

### संसार–विपत्ती

बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । झाला हा वमन ससार ॥
बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥
बरें झालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥
बरें झालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥
बरें झालें तुझें केलें देवाईल । लेकुरें बाईल उपेक्षिली ॥
*तुका म्हणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासी जागरण ॥ ५ ॥*

बाप मेला न कळता । नव्हती संसाराची चिंता ॥
विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥

बाईल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥
पोर मेलें बरें झालें । देवें मायेविरहित केलें ॥
माता मेली मज देखता । तुका म्हणे हरली चिंता ॥ ६ ॥

* * *

संसारत्याग

बरें झालें आली ज्याची त्याच्या घरा । चुकल्या पाल्हेरा वोढाळांचा ॥
बहु केलें दुःखी त्याचिये साभाळें । आता तोंड काळें तेणें लोभें ॥
त्याचिया अन्यायें भोगा माझें अंग । सकळही लाग घ्यावा लागे ॥
नाहीं कोठें स्थिर राहो दिल्हें क्षण । आजीवरी शीण पावलों तो ॥
वेगळाल्या खोडी केल्या तडातोडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥
निरळूनि तुका चालिला गोवार । देवापाशीं भार साडूनि ॥ ७ ॥

* * * *

लोहोगांवीं अंगावर कढत पाणी ओतलें तेव्हां

जळो माझी काया लागला वोणवा । धाव रे केशवा मायबापा ॥
पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन झालें ॥
फुटोनिया दोन्ही भाग होऊं पाहे । पाहतोसि काय हृदय माझें ॥
घेउनी जीवन धावे लवलाही । कवणाचें कांहीं न चले येथें ॥
तुका म्हणे माझी तू होसी जननी । आणिक निर्वाणीं कोण राखे ॥ ८ ॥

अभंगाच्या वह्या डोहांत बुडवल्यावर

अनन्यासीं ठाव येक सर्व काज । येकावीण दुजें नेणें चित्त ॥
न पुरता आळी देशधडी व्हावें । त काय बरवे दिसतसे ॥
लेंकराचा भार माउलीचे शिरीं निढळ ते दूरी धरिलिया ॥
तुका म्हणे किती घालती लांबणी । समर्थ होउनी केवढ्यासाठीं ॥ ९ ॥

तेरा दिवस झाले निश्चक्र करिता । न पवसी अनंता मायबापा ॥
बोधाची हे खोळ घेउनि बैसलासी । काय हृषीकेशी झालें तुज ॥

तुजवरी आता प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥
फार निठाराई धरिली तुझी आस । करीन जिवा नाश पांडुरंगा ॥
तुका म्हणे आता मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन तुजवरी ॥ १० ॥

थोर अन्याय केला । तुझा अंत म्या पाहिला ॥
जनाचिया बोला- । साठीं चित्त क्षोभविलें ॥
भागविलासी केला शीण । अधम मी यातिहीन ॥
झाडुनि लोचन । तेरा दिवस ते राहिलें ॥
अवघें घालुनी कोडें । तहानभूकेचें सांकडें ॥
योगक्षेम पुढें । तुज करणें लागेल ॥
उदकीं राखिलें कागद । चुकविला जनवाद ॥
तुका म्हणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥ ११ ॥

करूं कवित्व काय नाहीं आता लाज । मज भक्तराज हासतील ॥
आता आला येरा निवाड्याचा दीस । सत्याविण रस विरसला ॥
अनुभवाविण कोण करी पाप । तरीच सकळ लाज लवे ॥
तुका म्हणे आता न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ १२ ॥

लोकांत मान्यता मिळाल्यानंतर

कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतों दीन होतों तरी ॥
साधन ते सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाइजे तें ॥
न पुसे ते कोण्ही कोठेंही असता । समाधान चित्ताचिया सुखें ॥
तुका म्हणे जन अव्हेरीतें मज । तरि केशिराज सांभाळीता ॥ १३ ॥

ज्ञानेश्वरांच्या दृष्टांतानें आलेल्या ब्राह्मणास

नाहीं देवापाशीं मोक्षाचें गाठोळें । आणोनि निराळें द्यावें हातीं ॥
इंद्रियांचा जय साधोनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥
उपास पारणीं अक्षराची आटी । सत्कर्मा शेवटीं असें फळ ॥
आदरें सकल्प वारी अतिशय । सहज ते काय दुःख जाणें ॥
स्वप्नींचिये घायें विव्हळसी वाया । रडे रडतियासवें मिथ्या ॥
तुका म्हणे फळ आहे मुळापाशीं । शरण देवासी जाय वेगीं ॥ १५ ॥

ब्राह्मण गेल्यानंतर ज्ञानेश्वरांना उद्देशून

ज्ञानीयांचा राजा गुरुमहाराज । म्हणती ज्ञानदेव तुम्हा ऐसे ॥
मज पामरा हें काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ॥
ब्रह्मादिक जेथें तुम्हा वोळगणें । इतर तुळणें काय पुरें ॥
तुका म्हणे नेणे मुक्तीची ते सोय । म्हणोनि ठेविलीं पायीं डोई ॥ १६ ॥

विरक्ति

दिवस्या छत्री घोडे । हें तों बऱ्यात न पडे ॥
आता येथें पंढरिराया । मज गोविसी कासया ॥
मान दंभ चेष्टा । हें तो सूकराची विष्टा ॥
तुका म्हणे देवा । माझें सोडवणें धावा ॥ १७ ॥

नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरवीता ॥
का रे पुरविली पाठी । माझी केली जीवें साटी ॥
न करावा संग । वाटे दुरावें जग ॥
सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥
जन धन तन । वाटें लेखावें वमन ॥
तुका म्हणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ १८ ॥

आपलें मरण पाहिलें म्या डोळा । तो झाला सोहळा अनुपम्य ॥
आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥
येक देशीं होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥

फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझे सकोचे दूरी झालो ॥
नारायणें दिला वसतिसी ठावो । ठेऊनिया भावो ठेलों पायीं ॥
तुका म्हणे दिल्हें उमटुनी जगीं । घेतलें तें अंगीं लाउनीया ॥ १९ ॥

शेवटींची विनवणी । सतजनीं परिसावी ॥
विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हासी ॥
पुढे फार बोलों काई । अवघें पायीं निदित ॥
तुका म्हणे पडिलो पाया । करा छाया कृपेची ॥ २० ॥

सकळिकाच्या पाया माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥
अहो श्रोते वक्ते सकळहि जन । बरे पारखून बाधा गाठीं ॥
फोडिलें भाडार धन्याचा हा माल । मी तव हमाल भारवाही ॥
तुका म्हणे चाली झाली चहूदेशीं । उतरला कसीं खरा माल ॥ २१ ॥

सकळहि माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुम्हीं ॥
कर्मधर्मे तुम्हा असावें कल्याण । घ्या माझें वचन आशीर्वाद ॥
वाढवूनि दिल्हें येकाचिये हातीं । सकळ निश्चिंती झाली तेथें ॥
आता मज जाणें प्राणेश्वरासवें । मी माझिये भावें अनुसरलों ॥
वाढविता लोभ होईल उसीर । अवघींच स्थिर करा ठाईं ॥
धर्म अर्थ काम झाला येके ठाई । मेळविला जीहीं हातोहात ॥
तुका म्हणे आता झाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ २२ ॥

## कान्होबाचा अभग

### तुकोबाच्या निधनाचें दु ख

दु खे दुभगलें हृदयसपुट । गहिवरें कठ दाटताहे ॥
ऐसे काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनिया वनामाजीं ॥
आक्रदितीं बाळें करुणवचनीं । त्या शोकें मेदिनी फुटों पाहे ॥
काय हें सामर्थ्य नव्हते तुजपाशीं । सग न्यावयासी अगभूता ॥

तुज ठावें आम्हा कोणी नाहीं सखा । उभय लोकीं तुका तुजवीण ॥
कान्हा म्हणे तुझ्या वियोगें पोरटीं । झाला दे रे भेटी बंधुराया ॥ १ ॥

### बहिणाबाईचा अभंग

संत कृपा झाली । इमारत फळा आली ॥
ज्ञानदेवें रचिला पाया । रचियलें देवालया ॥
नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥
जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥
भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ॥
बहिणि म्हणे फडकती ध्वजा । निरूपणा केलें वोजा ॥ १ ॥

## २

## दभांवर कोरडे

मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अभिमान ॥
ऐसियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ॥
पोटासाठी संत । झाले कलींत बहुत ॥
विरळा ऐसा कोण्ही । तुका त्यासी लोटांगणी ॥ १ ॥

डोई वाढऊनी केश । भुतें आणिती अंगास ॥
तरी नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥
मेळऊनी नरनारी । शकुन सांगे नानापरी ॥
तुका म्हणे मैंद । नाहीं त्यापाशीं गोविंद ॥ २ ॥

घरोघरीं झाले कवी । नेणें प्रमादाची चवी ॥
लडा भूपणाची चाड । पुढें न विचारी नाड ॥
काढावें आईतें । तेंचि जोडावें स्वहितें ॥
तुका म्हणे कळे । आहाच झाकतील डोळे ॥ ३ ॥

आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरि वरि बोडी डोई दाढी ॥
बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥
पाप गेल्याचि काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥
भक्तिभावेंवीण । तुका म्हणे अवघा शीण ॥ ४ ॥

जाऊनियां तीर्था तुवा काय केलें । चर्म प्रक्षाळिलें वरि वरि ॥
अंतरीचें शुद्ध कासियानें झालें । भूषण त्वा केलें आपणया ॥
वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरिल थारा मोडेचि ना ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदा तुम्ही ॥ ५ ॥

होऊनी जंगम विभूति लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥
शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ॥
तुका म्हणे त्यासी नाहीं शिवभक्ती । व्यापार करिती संसाराचा ॥ ६ ॥

लावोनिया मुद्रा नाचोनिया कटीं । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥
नेसोनिया कौपीन शुभ्र वस्त्र जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रीचें तें ॥
तुका म्हणे ऐसे मावेचे मईंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ७ ॥

ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करुनी म्हणती साधू ॥
अंगा लाउनिया राख । डोळे झाकुनि करिती पाप ॥
दाउनि वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ॥
तुका म्हणे सांगों किती । जळो तयाची संगती ॥ ८ ॥

गाजराची पुंगी । तैसे नव्हे झाले जोगी ॥
काय करुनी पठण । केली अहंता जतन ॥
अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥
तुका म्हणे लंड । त्याचें हाणुनि फोडा तोंड ॥ ९ ॥

ऐसे संत झाले कळीं । तोंडीं तमाखुची नळी ॥
स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोढवली ॥

भांग भुर्की हें साधन । पचीं पडे मद्यपान ॥
तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ १० ॥

उभ्या बाजारांत कथा । हें तो नावडे पंढरिनाथा ॥
अवघें पोटासाठीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥
लावी अनुसंधान । कांहीं देईल म्हणवून ॥
काय केलें रांडलेका । तुला राजी नाहीं तुका ॥ ११ ॥

## ३

## संतमहिमा

धन्य आजी दिन । झालें संतांचें दर्शन ॥
झाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठी ॥
झालें समाधान । पाईं विसरलें मन ॥
तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥ १ ॥

काय वाणूं आतां न पुरे ही वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥
थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणें सीवो कैसें लोखंडासी ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टवीती उपकारें ॥
भूतांचि हे दया भांडवल संता । आपुली ममता नाहीं देहीं ॥
तुका म्हणे सूख पराचिया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ २ ॥

दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥
पावे धांवोनिया घरा । राहे धरूनिया थारा ॥
कीर्तनाचे थाटे । बराडिया ऐसे लोटे ॥
तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥ ३ ॥

जे का रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुले ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥
ज्यासि आपंगीता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥

दया करणें जे पुत्रासी । तेची दासा आणी दासी ॥
तुका म्हणे सांगों किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ४ ॥

मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥
मेले जित असों निजोनियां जागें । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥
भले तरी देऊं गांठींची लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथां ॥
मायबापाहुनी बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनी ॥
अमृत तें काय गोड आम्हापुढें । विष तें बापुडें कडू किती ।
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचे परी ॥ ५ ॥

हिरा ठेविता ऐरणीं । वांचे मारीता जो घणीं ॥
तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥
मोहरा तोची अंगें । सूत न जळे ज्याच्या संगें ॥
तुका म्हणे तोची संत । सोसी जगाचे आघात ॥ ६ ॥

शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥
मुखीं अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ॥
सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥
तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ७ ॥

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळां माळ असो नसो ॥
आत्मा अनुभवीं चोखाळिल्या वाटा । त्याचे माथा जटा असो नसो ॥
परस्त्रीचे ठायीं जो का नपूसक । त्याचे अंगा राख असो नसो ॥
परद्रव्या अंध, निंदेसी जो मुका । तोचि संत देखा तुका म्हणे ॥ ८ ॥

बोलें तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥
अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥
त्याचा होईल किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥
तुका म्हणे देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ९ ॥

४

## उपदेशपर स्फुट अभंग

अधिकार तैसा करू उपदेश । साहे ओझें त्यास तेंची द्यावें ॥
मुंगिवरि भार गजाचें पालाण । घालितां तें कोण कार्यसिद्धी ॥
तुका म्हणे फासे वागुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं ते काढी पारधी तो ॥ १ ॥

बोलिलों ते कांहीं तुमचीया हिता । वचन नेणता क्षमा कीजे ॥
वाट दावी तया न लगे शिणावें । आंधळ्याई जीव नाश पावे ॥
निंब दिल्हा रोग तुटाया अंतरीं । पोमाळिता वरी आंत चरे ॥
तुका म्हणे हित देखण्यासी कळे । पडती आंधळे कूपामाजीं ॥ २ ॥

आंधळ्यासी जन अवघेचि आंधळे । आपणासी डोळे दृष्टी नाहीं ॥
रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासी कारण चवी नाहीं ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन सर्व खोटें ॥ ३ ॥

मुंगियाच्या घरा कोण जाय मूळ । देखोनिया गूळ धांव घाली ॥
याचकाविणें काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥
उदक अन्न म्हणे काय मज खाय । भुकेला तो जाय चोजवीत ॥
व्याधी पीडिला तो धांवे वैद्याचिया घरा । दु:खाच्या परिहारा आपुलिया ॥
तुका म्हणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥ ४ ॥

जोडोनिया धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेंच करी ॥
उत्तमचि गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥
परउपकार नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥
भूतदया गाई पशूचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥
शांतिरूप नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडीलांचें ॥
तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥५ ॥

सासरेच्या गोण्या त्रैलोकिचिये पाठीं । तयासी शेवटीं कडबा रे ॥
मालाचे पैं पेठे वाहातातीं उंटें । तयालागिं कांटे भक्षावया ॥

वाउगा हा धंदा आशा वाढवी ती । बांधोनिया देती यमाहातीं ॥
जयासि असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं बापुडीं शिणलीं वाया ॥
तुका म्हणे शहाणा होइ रे गव्हारा । चौऱ्यांशीचा फेरा फिरूं नको ॥ ६ ॥

ज्याचे गावीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥
तरीच जोडिले ते भोग । काहीं आघात न लगे ॥
धाढवावी थोरी । मुखें म्हणे तुझे हरी ॥
तुका म्हणे हे गोष्टी । दासा न घालावी तुटी ॥ ७ ॥

तरीच जन्मा यावें । दास विठोबाचे व्हावें ॥
नाहींतरी काय थोडी । श्वान सुकर बापुडीं ॥
जन्मल्याचें तें फळ । आगीं लागो नेदी मळ ॥
तुका म्हणे भले । ज्याच्या नावें मानवले ॥ ८ ॥

भिक्षापात्र अवलंवणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥
ऐसीयासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥
देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरीवरी वाव ॥
समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥
जगा घालावें साकडें । दीन होउनी बापुडे ॥
हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि अविश्वास ॥
काय न करी विश्वंभर । सत्य करिता निर्धार ॥
तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥ ९ ॥

नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥
तैसी चित्तशुद्धी नाहीं । तेथें बोध करिल काई ॥
वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करिल वसंतकाळ ॥
वांझे होतीं न लेकुरें । काय करावें भ्रतारें ॥
नपुंसका पुरुषासी । काय बाइल करील त्यासी ॥
प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार
तुका म्हणे जीवनेविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ १० ॥

बरा देवा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥
भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पाया ॥
विद्या असती काही । तरि पडतों अपाईं ॥
सेवा चुकतों संताची । नागवण हे फुकाची ॥
गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥
तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥ ११ ॥

रासभ धूतला महातीर्थामाजी । नव्हे ऐसा तेजी शामकर्ण ॥
तेवीं खळा काय केल्या उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥
सर्पासी पाजिलें शर्करा पीयूष । अंतरींचें विष जाऊ नेणें ॥
तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन । सवेंचि वमन जेवीं तया ॥ १२ ॥

गाढवाचें तान्हें । पालटलें क्षणक्षणे ॥
तैसे अधमाचे गुण । येकचीच नाहीं मन ॥
उपजता बरें दीसे । रुप वाढता ते नासे ॥
तुका म्हणे भुंकते वेळें । वेळ अवेळ न कळे ॥ १३ ॥

समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरि कोणा हासे जन देवा ॥
अवगुणी जरी झालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥
तुका म्हणे तैसा येक मी पतित । परी मुद्रांकित झालों तुझा ॥ १४ ॥

वसणें थिल्लरीं । बेडुक सागरा धि:कारी ॥
नाहीं देखिला ना ठावा । तोंड पीटीं करी दावा ॥
फुगतें काउळे । म्हणे मी राजहंस आगळे ॥
गजाहुनी खर । म्हणे चांगला मी फार ॥
मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥ १५ ॥

दुधाचे घागरीं मद्याचा हा बिंदु । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥
तैसे खळामुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥
काय करावीं तीं भक्तिस लक्षणें । नाक नाहीं तेणें वाया गेलें ॥
तुका म्हणे अन्न जिरों नेदी मासी । आपुलिया जैसी संसर्गें ॥ १६ ॥

ढेकणाच्या सगें हिरा तो भगला। कुसंगें नाडला तैसा साधु ॥
वोढाळाचे सगें सात्विक नासती। क्षण येक नाडलीं समागमें ॥
डाकाचे संगतीं सोनें हीन झालें। मोल तें तूटलें लक्ष कोडी ॥
विषानें पक्वान्नें गोड कडू झालीं। कुसंगानें येली तैसी परि ॥
भावें तुका म्हणे सत्संग हा बरा। कुसंगा हा फेरा चौऱ्यायशींचा ॥ १७ ॥

गाढव श्रृंगारिलें कोडें। काहीं केल्या नव्हे घोडें ॥
त्याचें भुंकणें न राहे। स्वभावासी करील काय ॥
श्वान शिबिकें बैसविलें। भुंकता न राहे तें उगलें ॥
तुका म्हणे स्वभावधर्म। काहीं केल्या न सुटे वर्म ॥ १८ ॥

येक ब्रह्मचारी गाढवा झोंबता। पळालें तें लाता हाणोनिया ॥
*गाढवहि गेलें ब्रह्मचर्य गेलें। तोंड काळें झालें जगामाजीं ॥*
हें ना तैसें झालें हें ना तैसें झालें। तुका म्हणे गेलें वायावीण ॥ १९ ॥

वाझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण। चिरगुटें घालून वाथायाला ॥
तेचि शब्द ज्ञानी करिती चावटी। ज्ञान पोटासाठीं विकूनीया ॥
बोलाचाचि कढी बोलाचाचि भात। जेउनिया तृप्त कोण झाला ॥
कागदीं लिहिता नामाची साखर। चाटिता मधुर गोडी नेदी ॥
तुका म्हणे जळो ते महती। नाहीं लाज चित्तीं निसुगाला ॥ २० ॥

वाघे उपदेशिला कोल्हा। सुख खाऊ द्यावें मला ॥
अंतरीं मरसी तें न चुके। मज का मारीतोसी भुकें ॥
येरु म्हणे भला भला। निवाडा तुझ्या तोंडें झाला।
देहे तो जाणार। घडेल हा उपकार ॥
येरु म्हणे मनीं। ऐसे जावें समजुनी ॥
गाठी पडली ठकाठका। त्याचि वर्में बोले तुका ॥ २१ ॥

जळो प्रेमा तैसा रंग। जाय भूलोनि पतंग ॥
सासूसाठीं रडे सून। भाव अंतरींचा भिन्न ॥
मैंद मुखींचा कोवळा। भाव अंतरीं निराळा ॥
जैसी वृंदावन कातीं। उत्तम धरू नये हातीं ॥

बक ध्यान धरी । सोंग करुनी मासे मारी ॥
तुका म्हणे सर्प डोले । तैसा कथेमाजीं खुले ॥ २२ ॥

परिसें गे सूनबाई । नको वेंचूं दूध दहीं ॥
आवा चालिली पंढरपुरा । वेसीपासूनि आली घरा ॥
ऐके गोष्टी सादर बाळे । करि जतन फुटकें पाळे ॥
माझें हातींचा कलवडू । मजवांचून नको फोडूं ॥
बळवट क्षीरीचें लिंपण । नको फोडूं मजवांचून ॥
उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥
भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥
भक्षी परिमीत आहारू । नको फारसीं बरो सारूं ॥
सून म्हणे बहुत निकें । तुम्ही यात्रेस जावें सुखें ॥
सासुबाई स्वहित जोडा । सर्व मागील आस सोडा ॥
सुनमुखीचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥
सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥
आतां कासया यात्रे जाऊं । काय जाऊनि तेथें पाहूं ॥
मुलें लेंकरें घरदार । माझें येथ पंढरपूर ॥
तुका म्हणे ऐसे जन । गोवियेले मायेंकरून ॥ २३ ॥

सोनियाचें ताट क्षीरीनें भरीलें । भक्षावया दिल्हें श्वानालागीं ॥
मुक्ताफळ हार खरासी घातला । कस्तूरी सूकराला चोजविली ॥
वेदपारायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण काय जाणे ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि येक जाणें । भक्तिचें महिमान साधु जाणे ॥ २४ ॥

मांडे पुऱ्या मुखें सांगो जाणे मात । तोंडी लाळ हात चोळी रिते ॥
ऐसीयाच्या गोष्टी फिक्या मिठेंवीण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥
बोलों जाणें अंगी नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥
तुका म्हणे बहू तोंडिं जे वाचाळ । तें गे तेचि मूळ लटिक्याचें ॥ २५ ॥

न लगे चंदनाचा पुसावा परिमळ । वनस्पती मेळ हाकारोनी ॥
अंतरीचें धांवें स्वभावें बाहेरी । धरिताही परी आवरेना ॥

सूर्य नाहीं जागें करित या जना । प्रकाशकिरणा कर म्हूण ॥
तुका म्हणे मेघ नाचती मयूर । लपवितां खरें येत नाहीं ॥ २६ ॥
चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोण्ही अंग ॥
दीपा नाहीं पाठींपोटीं अंधकार । सर्वांगे साखर अवघी गोड ॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहतां अवगुण मिळेचिना ॥ २७ ॥
मायबाप जरी सर्पीण कीं बोका । त्याचे संगे सुखा न पवे बाळ ॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुखा नेदी फोडी प्राण नाशी ॥
तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ २८ ॥
साधुनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकां ते डोळां न पाहावे ॥
साधुनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥
असाध्य तें साध्ये करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ २९ ॥
नका दंतकथा येथे सांगो कोण्ही । कोरडे ते मानी बोल कोण ॥
अनुभव येथें पाहिजे साचार । न चलति चार आम्हांपुढें ॥
वरि कोण मानी रसाळ बोलणें । नाही झाली मनें बोळखीतो ॥
निवडे वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोनी वेगळालीं ॥
तुका म्हणे तेथें पाहिजे जातीचें । येरा गबाळाचें काम नये ॥ ३० ॥
हालऊनि खुंट । आधि करावा बळकट ॥
मग तयाच्या आधारें । करणें तें अवघे बरें ॥
सुखदुःख साहे । हर्षामर्ष भंगा नये ॥
तुका म्हणे जीवें । आधि मरोनि राहावें ॥ ३१ ॥
मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥
भाग्यवंत घेती वेंचोनिया मोल । भारवाही मेले वाहातां ओझें ॥
चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥
अधिकारी येथें घेती हातवटी । परिक्षवंता दृष्टि रत्न जैसें ॥
तुका म्हणे काय आंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वायां जाय ॥ ३२ ॥
ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥
संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥

आचार करिता म्हणती हा पसारा । न करि त्या नरा निंदिताती ॥
संतसंग करिता म्हणती हा उपदेशी । येर अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥
धन नाहीं त्यासी ठाईंचा करंटा । समर्थाशीं ताठा करिताती ॥
बहु बोलों जाता म्हणती हा वाचाळ । न बोलता सकळ म्हणती गर्वी ॥
भेटिसी न जाता म्हणति हा निष्ठुर । येता जाता घर बुडवीलें ॥
लग्न करूं जाता म्हणती हा मातला । न करिता झाला नपुंसक ॥
निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥
लोक जैसा वोक धरिता धरवेना । अभक्ता जिरेना संतसंग ॥
तुका म्हणे आता आईका वचन । त्यजूनिया जन भक्ति करा ॥ ३३ ॥

मोलें घातलें रडाया । नाहीं आसु आणि माया ॥
तैसा भक्तिवाद काय । रंग वेगडीचा न्याय ॥
वेठिं धरिल्या दावि भाव । मागें पळायाचा पाव ॥
काजव्याचे ज्योती । तुका म्हणे न लगे वाती ॥ ३४ ॥

धनवंतालागीं । सर्वमान्यता हे जगीं ॥
माता पिता बंधू जन । सर्व मानिती वचन ॥
जंव मोठा चाले धंदा । तंव बहिण म्हणे दादा ॥
सदा शृंगार भूषणें । कांता लवे बहुमानें ॥
तुका म्हणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥ ३५ ॥

शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंचि दुःख ॥
म्हणउनी शांती धरा । उतराल पैलतीरा ॥
खवळिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥
तुका म्हणे त्रिविध ताप । जाती मग आपाआप ॥ ३६ ॥

नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही हेवा ॥
महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहाती ॥
येती सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥
तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ३७ ॥

लहानपण दे गा देवा । मुगी साखरेचा रवा ॥
ऐरावती रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ॥
ज्याचें अंगीं मोठपण । तया यातना कठीण ॥
तुका म्हणे जाण । व्हावें ल्हानाहूनी ल्हान ॥ ३८ ॥

सुख पाहाता जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥
धरि धरि आठवण । मानी संतांचें वचन ॥
नेलें रात्रिनें तें अर्धें । बाळपण जरा व्याधें ॥
तुका म्हणे पुढा । घाणा जुंपिजेसी मूढा ॥ ३९ ॥

क्षमाशस्त्र जया नराचिये हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥
तृण नाहीं तेथें पडला दावाग्नि । जाय तो विझोनी आपसया ॥
तुका म्हणे क्षमा सर्वांच स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥ ४० ॥

स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवापती ॥
हेचि विष्णूची महापुजा । अनुभव नाहीं दुजा ॥
सत्य बोले मुखें । दुखावे आणिकाच्या दुःखें ॥
निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ ४१ ॥

धन मेळउनी कोटी । सवें न ये रे लंगोटी ॥
पानें खाशील उदंड । अंतीं जाशी सुकल्यातोंड ॥
पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गवऱ्या सागातीं ॥
तुका म्हणे राम । येक विसरता श्रम ॥ ४२ ॥

सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥
येथ अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥
अंतरींचें बीज जाणें कळवळा । प्राप्त काळ घडी आल्याविण ॥ ४३ ॥

हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥
ठेविलें अनंत तैसेचि राहावें । चित्तीं असो द्यावें समाधान ॥
वाहील्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहू हा संसार देवापायीं ॥ ४४ ॥

आले देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥
हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबाघरीं पाणी ॥
पांडवांचा साह्यकारी । राज्यावरुनी केलें दुरी ॥
तुका म्हणे उगेंचि राहा । होईल तें सहज पाहा ॥ ४५ ॥

सद्गुरूवांचूनी सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं त्याचे ॥
आपणासारिखे करिती तात्काळ । काहीं काळ वेळ न लगे त्यासी ॥
लोह परिसासी न साहे उपमा । सद्गुरुमहिमा अगाधचि ॥
तुका म्हणे ऐसे आंधळे हे जन । गेले विसरून खऱ्या देवा ॥ ४६ ॥

ब्रह्मज्ञान नव्हे लेंकराच्या गोष्टी । तेथें व्हावा पोटीं अनुताप ॥
दगडाहूनि जीव करावा कठीण । अंतरींचा शीण तेव्हां जाय ॥
मेल्या मनुष्याची न धरिती आस । तैसा हो उदास संसारासी ॥
तुका म्हणे येथें करारांचें काम । मग आहे राम जवळींच ॥ ४७ ॥

जरी झाला भाग्यवंत । तरि का भेटेल भगवंत ॥
उंच वाढला एरंड । तरि का होइल इक्षुदंड ॥
जरी गर्दभ वेगीं धांवे । तरि का अश्वमोल पावे ॥
तुका म्हणे तोचि थोर । ज्याचे मुखीं रघुवीर ॥ ४८ ॥

आधीं होता वाण्या । दैवयोगें झाला पाण्या ॥
त्याचे येळकोट राहीना । मूळस्वभाव जाईना ॥
आधीं होता ग्रामजोशी । राज्यपद आलें त्यासी ॥
त्याचें पंचांग राहीना । मूळस्वभाव जाईना ॥
आधीं होती दासी । पट्टराणी केलें तिसी ॥
तिचे हिंडणें राहिना । मूळ स्वभाव जाईना ॥
आधीं होता सतसंग । तुका झाला पांडुरंग ॥
त्याचें भजन राहीना । मूळ स्वभाव जाईना ॥ ४९ ॥

पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥
पोटा भेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥

जपतप अनुष्ठान । पोटासाठीं जाले दीन ॥
पोटें साडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥
पोट काशियानें भरे । तुका म्हणे झुरुझुरु मरे ॥ ५० ॥

कोणी निंदा कोणी वंदा । आम्हा स्वहिताचा धंदा ॥
काय तुम्हासी गरज । आम्ही भजू पंढरिराज ॥
तुम्हासारिखें चालावें । तेव्हा स्वहिता मुकावें ॥
तुका म्हणे हो का कांहीं । गळ दिला विठ्ठलपायीं ॥ ५१ ॥

एकएका साह्य करू । अवघे धरू सुपंथ ॥
कोण जाणे कैसी परी । पुढें उरी ठेविता ॥
अवघे धन्य होऊ आता । स्मरविता स्मरण ॥
तुका म्हणे अवघी जोडी । ते आवडी चरणाची ॥ ५२ ॥

## ५

## भक्तिपर अभंग

उंच निंच कांहीं नेणे भगवंत । तिष्ठे भावभक्ति देखोनिया ॥
दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरीं रक्षी प्रल्हादासी ॥
चर्म रंगु लागे रोहिदासासंगें । कबीराचे मागीं विणी शेले ॥
सजन कसाया विकूं लागे मांस । माळी सावत्यास खुरपूं लागे ॥
नरहरी सोनारा घडूं फुंकूं लागे । चोखा मेळ्यासंगें ढोरें ओढी ॥
नामयाची जनी सवें वेंची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥
नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥
अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीती सुदाम्याचे ॥
गवळियाचे घरीं अंगें गाई वळी । द्वारपाळ बळीद्वारीं झाला ॥
येकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । अंबऋषीचे सोशी गर्भवास ॥
मीराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा झाला पाडेवार ॥ १ ॥

कानडीनें केला मराठी भ्रतार । येकाचें उत्तर येका न ये ॥
तैसें मज नको करु कमलपती । देई त्या सगती सज्जनाची ॥
तिनें पाचारिलें इत्त या म्हणोन । येरु पळे आन झाली आता ॥
तुका म्हणे येरयेरा जे निच्छिन्न । तेथे वाढे शीण सुखापोटीं ॥ २ ॥

कन्या सासुरासी जाये । मागे परतोनिया पाहे ॥
तैसे झालें माझ्या जीवा । केव्हां भेटसी केशवा ॥
चुकलिया माये । बाळ हुरहुरू पाहे ॥
जीवनावेगळी मासोळी । तुका तैसा तळमळी ॥ ३ ॥

घेईं घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥
तुम्ही ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥
तुम्ही घ्या रे, डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥
मना तेथें धाव घेईं । राहे विठोबाचे पायीं ॥
तुका म्हणे जीवा । नको सांडू या केशवा ॥ ४ ॥

हेंचि दान दे गा देवा । तुझा वीसर न व्हावा ॥
गुण गाईन आवडी । हेंचि माझी सर्व जोडी ॥
न लगे मुक्ति आणि सपदा । सतसग देईं सदा ॥
तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हासी ॥ ५ ॥

गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥
आनदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥
तुका म्हणे आळी । जेवीं नुरेची वेगळी ॥ ६ ॥

भले लोक नाहीं सांडित वोळखी । हे तो झाली देखी दुसऱ्याची ॥
असो आता यासी चाले काय बळ । आपुलें कपाळ वोडवलें ॥
समर्थासी काय कोणें हें म्हणावें । आपुलिया जावें भोगावरी ॥
तुका म्हणे तुम्हा जोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥ ७ ॥

समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आलियाची लागे चिंता ॥
न पाहे त्याचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचें ॥
मात मर्लेपण नाहीं कृपासाठीं । जयावरी गाठीं झीज साहे ॥
तुका म्हणे हे तू सर्वही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥ ८ ॥

भाग्यवंत आम्हीं विष्णुदास जगीं । अभंग प्रसगीं धैर्यवंत ॥
नाहीं ते पुरवित आणोनि जवळी । गाउनि माउली गीत सुखें ॥
प्रीति अगीं असे सदा सर्वकाळ । बोळली सकळ सुख ठाईं ॥
आपुल्या स्वभावें जेथें जैसें असों । तेथें तैसें दिसों साजिरेंचि ॥
वासनेचा छेद उपडिलें फळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥
तुका म्हणे भक्तजनाची माउली । करील साउली विठ्ठल आम्हां ॥ ९ ॥

आपुलिया बळें नाही बोलवत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शीकविता धणी वेगळाची ॥
काय म्या पामरें बोलावी उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायावीण ॥ १० ॥

तू माझी माउली तू माझी साउली । पाहातो वाटोली पांडुरंगे ॥
तू मज येकुला वडील धाकुला । तू मज आपुला सोयरा जीव ॥
तुका म्हणे जीव तुजपाशीं असे । तुजवीण ओस सर्व दिशा ॥ ११ ॥

का रे नाठवीसी कृपाळू देवासी । पोशीतो जगासी येकला तो ॥
बाळा दूध कोण करितो उत्पत्ति । वाढवी श्रीपति सर्व दोन्हीं ॥
फुटती तरुवर उष्ण काळ मासीं । जीवन तयासी कोण घाली ॥
तेणें तुझी काय केली नाहीं चिंता । राहे त्या अनंता आठवुनी ॥
तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ १२ ॥

आलीया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालोनिया ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥
भयाचिया पोटीं दुःखाचिया राशी । शरण देवासी जाता भलें ॥
तुका म्हणे नव्हे काय त्या करिता । चिंतावा तो आता विश्वंभर ॥ १३ ॥

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेऊनिया ॥
तुळसी गळा हार कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥
मकर कुंडलें तळपती श्रवणीं । कंठा कौस्तुभ मणि विराजित ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ १४ ॥

सदा माझे डोळा जडो तुझी मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्वकाळ ॥
विठो माउलीये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजि ॥
तुका म्हणे कांहीं न मागे आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ १५ ॥

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनिया ॥
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सर्व माझा ॥
बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ १६ ॥

शिणलों दातारा करितां येरझारा । सोडवीं संसारापासोनिया ॥
न सुटचि यानी नव्हे झाडापाला । घातलेंसे खोडा दाढांचिया ॥
मायबापें माझीं जिवाचीं सांगाती । तें देतिल हातीं काळाचिया ॥
पडताळुनी सुरी बैसला शेजारी । यम पाश करी घेऊनिया ॥
पाठीं पोटीं येते लागली सरसी । नेती नरकापासीं वोढूनिया ॥
जन साह्यभूत असे या सकळा । मी येक निराळा परदेशी ॥
कोणा काकुळती नाहीं कोणेपरी । तुजविण हरी कृपाळु त्या ॥
तुका म्हणे मज तुझाचि भरवसा । म्हणवोनि आशा मोकलिली ॥ १७ ॥

जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । या अंतकाळींचें नाहीं कोण्ही ॥
झाल्या हीन शक्ती नाक डोळे गळती । सांडोनिया पळती रांडापोरें ॥
नाइल म्हणे सर मरतां तरी बरें । नाशीलें हें घर थुंकोनिया ॥
तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी । एका चक्रपाणीवाचूनिया ॥ १८ ॥

नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळीं ग्रासावया ॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥
सोडवीना कोणी पाठीची बहीण । शेजेची कामिन दूर राहे ॥

सोडवीना राजा देशीचा चौधरी । आणिक सोयरीं भलींभलीं ॥
तुका म्हणे तूज सोडवीना कोणी । येका चक्रपाणीवाचूनिया ॥ १९ ॥

बा रे पांडुरंगा केव्हा येशी भेटी । जाह्यलो हिंपुटी तुजवीण ॥
तुजवीण सखे न वरे मज कोणी । यावतें चरणीं घालूं मिठी ॥
ओवाळावी काया चरणावरोनी । केव्हा चक्रपाणी भेटशील ॥
तुका म्हणे माझी पुरवीं आवडी । वेगीं घाली उडी नारायणा ॥ २० ॥

## शेख महंमद

### १

### गायका

हरि गाई तुझ्या बारगळा । मज नाटोपती गोपाळा ॥
जरि तू सांभाळिसी वेळोंवेळा । तरीच वळीन गा बापा ॥ १ ॥
सप्तरंग औट हात कांबळा । मज पांघरविला रे गोपाळा ॥
आत्मज्ञान काठी दिधली राउळा । हातीं माझे ॥ २ ॥
थोडी आयुष्याची दोरी । निर्गुणा बांधली जन्मपदरीं ॥
गाई घालोनि माझिया भारीं । धणीपणें मिरविसी ॥ ३ ॥
अनुहातें वाजतसे वेणुनाद । तेणें गाई करितसे सावध ॥
सेवावया सत्राविचें दूध । गोविंदें मज कपिला दिधली ॥ ४ ॥
अव्यक्त कृपेचा कनवळा । स्वारीस बैल दिधला मनपोवळा ॥
तो वैराग्य वळल्या करी वेळोंवेळा । चित्त सावधपणें ॥ ५ ॥
तुझ्या ठाईंच्या चवदाळ गाई । त्या सांग पां कैशा लावाव्या सोई ॥
कोठें रिती नाहीं भोई । उभ्या करावयालागीं ॥ ६ ॥
तुझें ब्रम्हसेत पिकलें गा मुऱ्हारी । चौदा भुवनाची येकचि वोवरी ॥
तुझे मज मारिती शेतकरी । रोडके गाय गायके दातारा ॥ ७ ॥
अष्टधा प्रकृतीचें दळवाडें । मी वेणतें गायके वेडें ॥
तू सावध मागें पुढें । मज रक्षिता देवा ॥ ८ ॥

आशा मनसा कल्पना । तिन्ही गाई महा दारुणा ॥
त्या वेगळाल्याच नारायणा । नावरती मज ॥ ९ ॥
आशा मारी मुसंडी । तिजमागें धावे कल्पना मुंडी ॥
मनसाचारी रानें धुंडी । परी पोट न भरे ॥ १० ॥
तिखट शिंगाची गाय वासना । तिनें शिंगाटलें त्या विश्वजना ॥
ती मज ( न ) वधर ती गा निर्गुणा । तूं दटावी वेगीं ॥ ११ ॥
माया गाई बहुत निवर । ती बैसल्या चारेना आदरें ॥
तिचा देव करिती अंगिकार । ती वळवे ना माझेनी ॥ १२ ॥
तिचे आढान मोठे भार न शुद्ध । नरावरी पिळिल्यान निघे दूध ॥
तिनें बहुतांस लाविला वेध । ब्रह्मादिका ना गवे ॥ १३ ॥
ममता संगे निंदा गाई हुली । ती मागेंच राहे एकली ॥
चरूं अविधा सोकली । या लागीं कळपींच ना मिळे ॥ १४ ॥
काम क्रोध मद मत्सर । हे खोंड अपेट चार ॥
गाईमधें वावडती शिरजोर । शिम्र मातलेपणें ॥ १५ ॥
मोह खोंड बहु मादा । तो गाई चाटितसे सदा ॥
भ्रांत गाई गोळा करितसे गोविंदा । मिसकिरपणें ॥ १६ ॥
दंभ क्रोध वैरा कुंचर । तो अडवाच उडे अविचारें ॥
द्वैत उकरड्याचा करी केर । तो ठकारें डुल्लतसे ॥ १७ ॥
शेख महंमद निजगायका । शरण आलों सद्गुरुनायका ॥
गोफण मागितली टिका । गुज निर्धारेंची ॥ १८ ॥

* * *

अभाव स्वभाव तर्क धोका । हे लाडगे पिसाळले ऐका ॥
गाई समजो घोलाविती मरण भुका । आतां किती द्वेग करूं ॥ १९ ॥
संकल्प विकल्प मानापमान । प्रपंच व्याघ्राचा घरटा व्याहन ॥
आळस अंगमोडा श्वान । ते मज पाठीं लागती ॥ २० ॥
पाटील ब्रह्मा विष्णु महेश । ते मजसी नित्य करिती घसघस ॥
आवरा सेत करा ( व ) यास । आता किती प्रार्थू ॥ २१ ॥

शंका लज्जा लांसी । त्या मजसी जपती दिननिसीं ॥
येकला येकांग मी परदेसी । वनीं वेढलो देवा ॥ २२ ॥
मग विवेक गोफणीचे गुंडे झुगारून । दापिलें प्रपंचाचें रान ॥
सावजें पळालीं जीव घेऊन । शीघ्र देशधडी ॥ २३ ॥
सम पाणी दिधलें सत्त्व कुऱ्हाडी । रजोगुण दांडा जडिला आवडी ॥
अठरा भारांची केली तडातोडी । आंत किल्ला बाहेर कोट ॥ २४ ॥
मग पूर्वीहून गाई चारीत चालविल्या । पश्चम विहंगम मार्गे लोटल्या ॥
त्रिकूट गोरहाट भेदून उभ्या केल्या । उन्मनी आखरामधें ॥ २५ ॥
इडा पिंगळा सुषुम्ना तिन्हीं वाट । तिकून गाई घोळाऊन कोंडिल्या निकट ॥
शांति सोंपा लावून बळकट । विज्ञानें कोंडिल्या ॥ २६ ॥
निळारंभ कळंबाची साउली । तेथें कुळवाडी आनंदली ॥
नांव सांगोन ह्वाला केली । ह्या श्री धण्याच्या ॥ २७ ॥
ऐशा गाई वळूं नेणती ते अति नष्ट । तेही लक्ष चौऱ्यासींचा केला बोभाट ॥
तो काढी घाली गा निकट । धन्य धनीपण ॥ २८ ॥
बोभाटाची फजिती सोसिली । तो घरीं घरधण्यानें अधिक फजिती केली ॥
ऐसी गायकेपणासीं लाज लाविली । मूर्खा अभाग्यानें ॥ २९ ॥
तंत वितंत घन सुस्वर । चौ मोहऱ्यांचा येकचि झणत्कार ॥
सोऽहं वोधें घाली हुंबर । ब्रम्हानंद जालों ॥ ३० ॥
बुद्धि चकमक हेतु गार । सद्गुरु वचनें फुले अपार ॥
येक फूल पिंवलें हृदयां भीतर । मात्र कफालागीं ॥ ३१ ॥
पाकुळ का गाईची वांसरें । तेही हुंबरडा करिती येकसरें ॥
तीं कोंडितसे विचारें । गहीन गोधनामधें ॥ ३२ ॥
स्वानंद क्षीरसागर । चार डेरे होता उदार ।
तें भरोनियां येतसे साचार । चार मुद्रा चार वारा ॥ ३३ ॥
राग संताप तुझे येसकर । तेणें मज लाविलें घाय कावरें ॥
बोलें मले तुलें उत्तर । पोटास घास मागे ॥ ३४ ॥
गाईके म्हणविले साहीं जनीं । शून्यें चळा शर्णे विग्ळा कोणी ॥
देर वेशधारी होवोनी । मांदु जन टकिती ॥ ३५ ॥

संतुष्ट भावें कृपा केली । गाइकेपणाची असामी मोडली ॥
शेख महंमदा दिधली । मूळपीठ ॥ ३६ ॥

* *

अहंकार उन्मत्त अज्ञान । हे दोन्ही पोळ महादारुण ॥
घेऊन पळती गाये लागून । सत्वर मोहोपणें ॥ ३७ ॥
गाय सांभाळू जाय सामोरा । तों अहंकार पाठीं लागो होवोन खरा ॥
मग मी पळतांचि दातारा । तुझा धांवा पुकारीं ॥ ३८ ॥
अहंकार पोळ बहुत बावरा । त्यानें शिंगाटलें त्या दशनीरा ॥
तैसाच मज मारील पैं दातारा । मग हंसे होईल तुझें ॥ ३९ ॥
पोळ दंभ...कुर । त्यानें थडकिले असंख्य अवतार ।
ते तूं वळविसी कवण्या विचारें । कैसा निष्ठूर झालासी ॥ ४० ॥
हरी काढी रे आपुल्या पोळाचें अंड । मजसी बोलों नको बहु उदंड ॥
नाहीं तरी तुजसी दाखवीना तोंड । पळोन जाईन निज घरा ॥ ४१ ॥
हरि तुझ्या मनबळें । मज नाना परी रे छळिलें ॥
परि पाहिजे म्यां काय केलें । सांग वेगीं मजला ॥ ४२ ॥
हुकमें घेताति विकल्पाचें रान । विषय सराटे रुतती मजलागून ॥
मन बैल ........... । आतां बांध आपुले पांई ॥ ४३ ॥
चेतना तृष्णा अहंता म्हैसी । हरि मजकून वोळविसी ॥
मदन मस्त टोणगा ऋषीकेशी । तो मज पाठीं लागे ॥ ४४ ॥
मदन टोणग्याची धडक मोठी । यालागीं सुखें घेतला कासोटी ॥
स्वामि कार्तिकासी केलें हिंपुष्टी । भेणें कपाटीं रिघाला ॥ ४५ ॥
मग बोलिले श्रीपती । सद्गुरु कृपा घ्यावी पूर्ती ॥
अहिक्य गाई वळलियाविना वळती । सत्य जाण बापा ॥ ३६ ॥
कांबळा हिरोनि मोडली काठी । दिवस पुरवितां जीवित्वा जाली साटी ॥
पुढें गाई वळीना धूर्जटी । मन समचरणीं राखावें ॥ ४७ ॥
मग हंसोनियां श्रीअविनाश । हृदयीं आळंगी महाहर्षे ॥
जो गाई वळितो सर्वस्वें । प्रेमभक्त म्हणोनियां ॥ ४८ ॥

हें ऐकोन श्रीवचन । शेख महमद परम उन्मन ॥
म्हणे नलगे-नलगे वैकुंठभुवन । मज तद्रूप करावें ॥ ४९ ॥

* * *

ऐकोनि निश्चय निर्धारें । समदृष्टि न्याहाळिलें ईश्वरें ॥
आता तो पहा तदाकारें । मूळ कूळ ग्रासोनिया ॥ ५० ॥
सद्गुरुकृपेचा उद्बोध । मीन पथें चढलों ऊर्ध्व सिद्ध ॥
ब्रह्मानंदें सद्चिद । ते विरोनि गलें ॥ ५१ ॥
दृश्यादृश्य भावना । तेचि तदाकार लोपली जाणा ॥
तेथें शेख महमदपणा । ठावचि नाहीं ॥ ५२ ॥

॥ इति गायका संपूर्णमस्तु ॥

## २

### अभंग

ऐसें केलें या गोपाळें । नाहीं सोंवळें ओंवळें ॥
काटे केतकीच्या झाडा । आत जन्मला केवडा ॥
फणसा अंगीं काटे । आत अमृताचे साठे ॥
नारळ वरुता कठिण । परी अंतरीं जीवन ॥
शेख महमद अविंध । त्याचे हृदयीं गोविंद ॥ १ ॥

एसे केलें या गोपाळ । नाहीं सावळ ओंवळ ॥
फणसाअंग करड काटे । आत साखरेचे गोटे ॥
मधमाशाची घांगाणी । आत अमृताची खाणी ॥
शेख महमद विलासी । झाला हरिभक्तीचा रहिवासी ॥ २ ॥

मागें शून्य पुढें शून्य । तेथें कैचें पापपुण्य ॥
काळ कडू आनंदाचा । मुखीं घोष हरिनामाचा ॥
जनीं वनीं अवघा देव । त्याविण नाहीं दुजा भाव ॥
शेख महमद सोऽहं बोध । हरला भेद झाला सिद्ध ॥ ३ ॥

अतरीं तत्त्वकळा वाचें निजनाम । ते संत उत्तम धर्मराज ॥
जळती पापरासी ऐशाच्या दर्शनें । पतिता उद्धरणें नामें त्याच्या ॥
भवनदीचे तारु ऐसे साधुसंत । शेख महमद नित्य वंदी त्यांसी ॥ ४ ॥

राम नव्हे दाशरथी । कृष्ण, नाथाचा पिता ॥
तो राम तत्त्वता । धरा मानसीं ॥
असख्य ब्रह्माडाची कोडीं । क्षणामाजीं घडी मोडी ॥
तो राम धराडी । अतर बाहे ॥
असें साक्षात् भूते । जीत नामरत ॥
शेख महमद पूजी । ते तत्त्वज्ञानी ॥ ५ ॥

आधळियानें सगती डोळसाची धरावी । दैना चुकवावी पडापडीचीं ॥
आधळे लागले आधळ्याचे पाठीं । ते पडले शेवटीं भवाडामध्यें ॥
गुरु शिष्य आधळे । नेणती साधू कळे ॥
उद्धरी भाविक भोळे । शेख महमद ॥ ६ ॥

## ३

## आरती

आरतें आरती सद्गुरुनभा । पचतत्त्वें वाती प्रेमें प्रकाशल्या प्रभा ॥
चाहुल्या ऊर्ध्व नयनीं तटस्थ तन्मयें ।
लागली तत्त्व मुद्रा मन अ मन होयें ॥
सहज समाधी बोधें विजयें अरुण उदये ।
अनत लोचनिं शाति शेख महमद होय ॥

## विप्रनारायण

### १

पुढे कैसि जाहाली कथा । मेगी होईल धर्मपार्था । नगरामध्ये प्रवेषता । थोर समारंभ होइल ॥ १ ॥ ते कथा संतोपाची लहरी । जे वदली जयमुनीची वैखरी । तेचि मराष्ट्रपत्रोत्तरीं । सागल विप्रनारायेण ॥ २ ॥ मराष्ट्र काव्यकृत वाणी । म्हणोनि पंडित हो उपेक्षाल झनि । हरीभजनावाचोनि काहाणी । वदले नाहीं परियेसा ॥ ३ ॥ कोण्ही यक समथाकारणें । दुर्बळें पाहुनेर केला तेणें । स्त्रीयेसि प्रार्थुनि नाना अन्नें । करविली जी प्रयत्नें ॥ ४ ॥ माझ्या घरा येतो समर्थ । मी आज भाग्याचा होईन सनाथ । तो मग नयेचि अव्हेरू व्यर्थ । अन्न नासीलें चाडाळें ॥ ५ ॥ त्या ग्रहस्वामीचा मनोरथ । भग्न होवोनी जाय व्यर्थ । दुर्बळ सखा देखोनी समथ । आळींगण नेदी तयातें ॥ ६ ॥ तैसा मी मतीचा अतिदुर्बळ । हरीनाममंत्र वोवीली माळ । तुम्हा सज्जनाचे पुजेस्तव निर्मळ । सद्भावें सीद्ध केलि ॥ ७ ॥ सुर्यासी दाखविजे दर्पण । कल्पद्रुमासी नैवेद्य तुळसीपण । तैसे तुमचे स्तवनि नीर्माण । म्या पुष्पहार केला येथ हा ॥ ८ ॥ तो जरा अव्हेराल अप्रीति । मग माझेया भाग्या नाहीं गती । म्या तरी पदोपदा मगळमूर्ति । वर्णिला आहे ऋषिरचना ॥ ९ ॥ जयमुनीकृत वीरहीत । म्या कर्लें नाहा आपूल मत । उपमासाही त्यासी तां कोचीत । दुर्गीलं नाहीं रुपेश्वरीं ॥ १० ॥ ऐसे जाणोनी दानार्त । महत्त्व दावी प्रेम बहुतें । तरी माझ्या आनंद त्यामार्ते । न माय कवण काळीं ॥ ११ ॥ संतोषोनी श्रोते म्हणती । तुझ्या कवित्वावरी आमुची प्रीती । पुढील कथा सागावी श्रीपति । कथाश्रवण करावें ॥ १२ ॥ इति श्रीअश्वमेधकथा । ते ऐकावी कृष्णवता । नारायण जाहाला वीनविता । संत सज्जन श्रोतेया ॥ १३ ॥

— अश्वमेध, प्रसंग त्रेपनावा

### २

हा जयमुनीचा वाग्वीलासु । परीक्षीतीसुताचे सगती सौरबु । तणे घरणी जाहाली अयेत्रासु । पातकापासुनी ॥ १ ॥ त्या जयमुनिसाव्याची टीका ।

माहाराष्ट्रें केली ऐका । वीप्रनारायण कुलदीपक । गोपीनाथाचा ॥ २ ॥ गोपजी दामोदराचा सुत । नामाजी नामे विख्यात । प्रार्थुन यदुनाथ । केली माहाराष्ट्र टीका ॥ ३ ॥ तापी माहानदीचे दक्षणपारी । तीनि क्रोश ग्राम माहाक्षेत्र । हत्यातीर्थ पवित्र । जाहाला ग्रथु हा ॥ ४ ॥ सगेवर नाम हत्याहरण । हाताळे नाम ग्रामाभिधान । तेथ स्नान केलीया पतीत पावन । पावती पुण्यात्मा ॥ ५ ॥ जेथ सुर्यवंशाचे नृपती । दशरथ नामें पुण्यकीर्ती । तो स्नानमात्रें हत्यानिवृत्ति । जाहाली ब्रह्महत्येची ॥ ६ ॥ ऐसी पुण्यक्षेत्रीं वास । पुर्वजाराहित निवास । प्रपितानाम पुण्याश । दादाजी नागनाथ ॥ ७ ॥ तो माहाधर्माचारासी । ज्याचि विस्तारली स्वदेशीं । त्याचा पुत्र गुणज्ञ परियसी । गोपजी दामोदर तो ॥ ८ ॥ तो देवतार्चनीं माहासीळ । ज्याचे हृदयीं सदा गोपाळ । त्याच्या पुत्रें हे वाग्रत्नमाळ । वोविली कथाप्रमग ॥ ९ ॥ यजुर्वेद माध्याजनी शाखा । वशीष्ठ गोत्र प्रत्यक्ष देखा । तेथ जन्म जाहला ऐका । नारायणातें ॥ १० ॥ जोडूनिया दोनी पाणी । श्रोतयाची करी तो वीनवणी । म्या हें कौतुक केलें रचनीं । ग्रथ आश्वमेधाचे ॥ ११ ॥ म्या प्रसगोप्रसगीं तुम्हालागोनी । पहिलेची केली विनवणी । कि आगाध्य आणी आशास्त मनी । बुद्धी दुर्बळ माझी ॥ १२ ॥ कोइ आसेल आशुद्ध बोल । तो तुम्ही शुद्ध कराल ज्ञानशीळ । माझा अवगुण प्रगट तात्काळ । न करावा तुम्ही ॥ १३ ॥ तुम्ही माहाधैर्याचे सागर । तमचे उदर सखोल प्रचर । जाणोनि शरणागत सत्वर । जाहाले

# शाहीर अज्ञानदास

## शिवाजी महाराजाचा पोवाडा

सकळ देव आदीदेवू शिवनमन धरूनी भावू । जैसा शिवाजीचा भावू कलिमधी प्रसन्न महादेवू । साबाचा अवतार छत्रपती राजा शिवू । शिवाजीच्या तळ्यात पाणी पिती सव जीवू । पाणी पूर्ण पीकले ह्मावू मार्कत गुतला महादेवू । राजगडासारिखा जैसा देवें दिला ठावू । रगतगड रोयला जावली प्रतापगड मडण । सोनरा सहील्या राजगडावरी सुवर्ण । गड हुडा दुर्ग चागले । भाग मी राज्याचे गाईन । ॥ १ ॥ सागन शिवाजीच्या हिकमती । किल्ले दुर्ग झुलती । भले दुणेदार जाणती । मराठे राजकुमर ऐक्ती । मोऱ्या चद्रराव धरिला । गड पण जावली घेतली । पावनगड पनाळा प्रभळगड हे सगीन । मतगड घोसाळा राहिऱ्या अनतवाड्या दान । कुनळघर वेढिलें काबिज केलें तळकोंकण । पावला चवली घेऊन मुल्क काबिज चला महाराजान । घाड पाताळ कोकण घाटचे । किल्ले मी गाईन । सिरवळ सुपळ देश घेतले । जैसे इंदापुरापासून । कुणबीस्तान कोंकण । शेकसल पीर पाहन । घेतली चाराहि नगर । भाग मी राज्याचे गाईन ॥ २ ॥ कल्याण भिवडी मारून नेली । फिर्याद विजापुराला गेली । बाच्छाई क्रोध झाला । जैसी अग्न प्रजळली । जिता धरा शिवाजीला । कुल वजिराशी बोलला । बोलना बाजी घोरपड्याला । सगे म्हादजी भोसल्याला । घाण्ग्या झुझार रायाला । देवक्या जिवाजीला । सडग त्रिमुरा रायाला । बेट्या पिलाजीला । करन्यावन्या संभाजीला । निंगळ्या सुभानाला । राजेखान बडेखान । सिद्दीजा अबदुलखान । अवघ्या वजीराचा कोट । सद्रे बैसले दिवाण । विडा उचलिला पैजेचा । खान विज्यापुरात बोलिला । जो बाछाई नाबाजरा । घोडा फिरगी सद्रे दिला । सातशें उंट भरले बाणाचे । करडे लष्कर खानाचें । लष्कर चवदा हजार घोडा । तांवर धराया चालिला । भाड सर्व देती । कर्नाहि विलोकिती । खान दरमजली कुच नेलें । *चालून तोरब्याशि आला । मिर फत्तेमारीच्या ब्रिनीच्या* । खाली आला । ब्राह्मण कृष्णानी बोलिला । सादेम झाला आपशकून । भाग मी राज्याचे

गाईन ॥ ३ ॥ खान दरमजली कुच केले। चालुनी तुळजापुराला गेले। फोडिलिच भोवानीला। माडिला देवीला । खान दरमजली कुच केले। चालुनी पढरपुराला गेला। पढरीच्या निटोवाला। भिवरेंत बुडविला। मसुद बाधली देवाला। मग खानाचा भोग पुरला। खान दरमजली कुच केला। चालुनी पालीशरणें गेला। पालीचा खडोबा। अज्यामत दावी मोंगलाला। न्हाटो न्हाटो रे भाई बोलिला। तीन कोस मोड केला। दिपमाळ बाधिली देवाला। मग खानाचा भोग पुरला। खान दरमजली कुच केला। चालुनी आवुदाला गेला। आवुदाची येमाई। प्रचीत दावी खानाला। गोधळ घातला देविला। मग खानाचा भोग पुरला। पाढऱ्या सभूला घेतला। खान दरमजली कुच केला। चालुनी वाईकारणें गेला। आपुल्या मुल्कात राहिला। बरवेपणाचे कागद लिहिले। ब्राम्हण कृष्णाजी पाठविला। हेजीम बोले शिवाजी राजाला। आला भेटायाला खान। भाग मी राज्याचे गाईन ॥ ४ ॥ शिवाजी जरि तू भेटसी। उदड दवल्त देईल तुशी। शिवाजी हेजीमासी बोलतो। खान मजला काय देतो। चद्र आगळे चाळिस गड। मी खानाला देतो। मजवरी कृपा आहे खानाची। जावळी सदर सवारितो। तेथें यावे भेटायाला। मी खानाची वाट पाहातो। तमल्लिना दिल्या बामणाला। बामण खानाजवळी आला। शिवाजी राजाचा हेजीम जिवाजी। म्हालदार धाडिला। खानापाशी येऊन। धडन बोले अबदुल्याला। चौदा हजार घोडा। तुम्ही आणिला कशाला। अबूत याया जगदेला। हेजीम बोलताच अबदुलखान खवळला। जिवाजी म्हालदार शिवाजी। राजाजवळी आला। खान दरमजली कुच केला। चालून रडतोंडीची घाटाला। चद्रन गड वेढा दिला। चवदा दिवस मोड केला। खबर कळली महाराजाला। राजा न गुपित राहिला। शामराजा बोलाविला। रघुनाथ पेशव्याला। धातोंड्या माणकोजीला। विंगळ्या सुभानाला। महिकुलमाजी राजा सद्रेला बैसुन। भाग मी राज्याचे गाईन ॥ ५ ॥ सरदार बैसले बूद। पुसे सुभेदाराला। भाईनु अबदुलखान आला। त्याचा धाक तो रे देवाला। कसा जाऊ भेटायाला। बुद्धि सागावि आम्हाला। गाईकवाड कृष्णाजी बोलिला। शिवबा सील चढवा अंगाला। घातली पोलाद घातली मळा। कबर बस्ता बेढा केला। पटा जिरा म्हाल्यापाशीं दिला। दोनी वाघनखे रायाच्या पंज्याला।

वरुनी नारीक झगा त्याला । भगवताची दया त्याला । गाठाई स्नान करुनी आला । जिजाबाई भेटी गेला । जिजा आली भेटायाला । पाल्खीत बैसुन । भाग मी राज्याचे गाईन ॥ ६ ॥ जीजावा घेती अलाई बलाई । चढती दवलत येउ दे तुला । घे येशाचा विडा । आपुल्या स्मरवें महादेवाला । तसलीम माझी जिजा येवू तुला । शिवबा बोले जिजाना । सर्वे येवढी प्रात झाली । नाही भेटलों दिवानाला । बारे बुद्धिने कार्य साधावें । उसनें सभाजीचें घ्यावें । बये येथुनि सलाम । साग शाहाजी राजाला । गड दिले गडकऱ्याला । राज्य दिले नेतोजीला । पुतण्या उमाजीला । राजाला पाचशें लोक दिले ह्याला । रणतोडीच्या घाटाला । तुक्या मिराजीन वेढा दिला । राजानी सदरा शृंगराल्या । गाद्या पडगाद्या घातल्या । आतल्दा कुमासा वस्ता । दरयातल्या जोडिल्या । सुरत ग्यान जडताचे । वरा घोस पोवळीयाचे । माणीकाच्या नरव्या हारा । लावील्या मोत्याच्या हो वरी । तिणव्या सदरे माडणी । सूर्य लक्लक्ता गगनीं । साळस वर्ण नाचे पाणी । चादव जन्ताचे चौकोनी । पलंग सोनेरी टाकिला । मस्तानी पडदा चिठादत घातला । नाना परीचीं चित्र त्याला । घोस हिऱ्याच्या जोडिल्या माळा । चौघे बळी बाधुनी फळी चालले एक वळीन । भाग मी राज्याचे गाईन ॥ ७ ॥ पहिल्या सदरेला गेले । गडकऱ्यानी दगविले । दुसरे सद्रेला गले । कारकुन अबदुल्याला बोलले । तिसऱ्या सदरेला गले । कचर्णीत बुडविले । अबदुल्ला सन्पदा हासीत । जिनाजी म्हालदार शिवाजी आले सदरेला । पहिला सलाम महादेवाला । दुसरा सलाम शाहजीला । तिसरा सलाम जगदंबेला । चवथा सलाम गडकऱ्याला । माझा पाचवा सलाम । येतो अबदुल्या तुला । तू रे कुणबीका छोरा, । बनाया दिवाणका सदरा । ऐशा सदरा नाहीं आल्या । इदल्शा बाळाबाला । तू रे कुणबीका छोरा । खेतबाडी करकर भरना दिवाणका सारा । खाना त्याची करणी । काय भ्यावे रघुनाथाला । जाणता आम्ही । खाना तुम्ही । जातिचे कोण । भाग मी राज्याचे गाइन ॥ ८ ॥ अबदुल्ला जातीक भटारा । मिया करना दुकानदारी । विजापुरम दुकान तेरा । लड्डु जिल्बी वेचहारा । तु रे भटारणीका छोरा । मज राजापर लिया तोरा । अबदुल्याने कव घातली । शिवाजी गवसुन धरला सारा । चलवि कटार शिल्यावरी मारा न चाले जरा । राजान बिचवा लावून दिला । वागनख्याचा मारा केला ।

त्याचें फाडिले उदरा । खानाची चरबी आली दारा । अब्दुलखान लष्करी भला । पटका कमरेचा सोडिला । खचुन हात फिरंगी घातला । मारिला फिरंगीचा गुडाळा । राजाचा शिरटोप तोडिला । पाच वेडे मंदीलाचे । चवदा वेडे हो तोड्याचे । तुट्न जरासा लागला । अंगम चढली महाराजाला । मारिला शिवाजीनें गुडाळा । मान खाली गवसून केला । जानव्याचा दोरा देखिला । पडलासा खान सैद बड्डु उठावला । त्यानें पट्टा मारिला । पण त्याचा शिवाजीनें । वरचेवर तोल्ला । सैद जो मारिला । खाद्यापासुन वेगे मारा । सैद बड्डु पडलेसे देखिला । त्याचा नामण म्होरे झाला । परत रे माघारा । सरजा शिवाजी बोलीला । ब्राम्हण मारू नये तुला । क्रिया देवाची आम्हाला । महाराज खदखदा हासिला । हातिचा पण टाकुन दिला । शिवाजीचा जिवाजी म्हालदार । त्याणें शिम उडी घातली । काढिला बराणपुरी बरचा । त्याणें अचाट फेकुन दिला । नाभीकमळी बैसला । बरचा पाठीला फुटला । ब्राम्हण हरहर बोल्लिा । त्याचा प्राण निघुनी गेला । कावजी राजाचा लक । घ्या घ्या करात आला । भोयाच्या पाया वार केला । खगारा धरणीवर पाडिला । शिवाजी आले घेऊन गले । खानाचं शिर कापुन । भाग मी राज्याचे गाईन ॥ १० ॥ प्रतापगडाची भोवानी । शिर वाहिले जगदंबेला । मातला गे होता जो बोकड बत्तीस दाती । अबदुल्याची आहुती द्यावी । येथुनी इशारत कुल राजाच्या लोकाला । बारा तोफा मारा केल्या । आवाज प्रतापगडावर होती । कडका पायदळ येती । पल्ले घडाधडा । बोळले निशाणाचे हत्ती । निमुण कागड्या सुरेराव । लोटल्या रणतोडीची धाणी । तुरया भिवाजी भिडला । साठ अरबाच्या घोड्या पाठाव केला । त्या क्षणी हनुमताला । पायीचे पायदळ शिवाजी राजाला । महाराज पनाळ्यावरी गले । पनाळा चौफेर बांधिला । कै दीन भाढण पनाळा । नहीं देई मऱ्हाठ्याला । सरदार मिळाले सदरेला । बाईन शाहीर बोलाविला । अग्नीनगास कवेश्वर । त्याणे कडाका गाइला । दिला एक इनाम गाव बत्तीस त्याला । चढविले हाताला ॥ लगर सोन्याचे दोन ॥ भाग मी राज्याचे गाईन ॥ ११ ॥

## शाहीर तुळशीदास

### शूर मर्दाचा पोवाडा । शूर मर्दानं ऐकावा ॥

ज्याचा सूर्याबा तो बधु । शेलारमामाला बोलला । चल जाऊ दादाच्या भेटीला । चला जाऊ दादाच्या भेटीला । शेलारमामानें सूर्याबा बधूचे । पटे घेतले आपल्या हातामधी । गेले मुर्धाचे जवळ । वरुन शेला उघडिला । मुर्दा दादाचा पाहिला । मुर्दा सुभेदाराचा पाहिला । माझ्या सुभेदार दादा लग्न रायबाचें राहिल । ह्याचें लग्न करील कोण । बारा गेटाचे ( मेटाचे ) कोळी निघाले । आले सुभेदाराजवळ । आमचा सुभेदार धनी । आम्हाला तैनात देईल कोण । आम्हाला हवाला देईल कोण । सुभेदार बोलायाला लागला । भिऊ नका रे दादानो । ह्या दादाच वचन पुरें करीन । जातो रायगड किल्ल्याल । सागतों शिवाजी महाराजाला । सिंहगडचा हवाला देता तुम्हाला ॥ अबिर गुलाल । ज्याचे मुर्धांत भरला ॥ दोरा रेशमाचा घातला । मुर्दा पाल्खींत ठेवला । पचवीस कमी नारा हजार लोक सगळे घेतले । वाजतगाजत मुर्दा गेला रायगड किल्ल्याला ॥ १ ॥

आले किल्ल्याचे पोटाला । पाचकर्णाचा वाजा केला । आवाज महाराजानें घेतला । सुभेदार किल्ला घेऊन आला । सुभेदाराची पालखी । नेली राजाचे सदरेला । शिवाजी महाराजानें । मुर्दा पाहिला सुभेदाराचा । शिवाजीचे राज्यात ऐसा । उमराव होणें नाहीं सुभेदारासारखा । जिजाबाई धांवत आली । पालखी पाहिली । गर्व आला सुभेदाराला । नाहीं आला भेटायाला । बाई पालखीपाशीं आली । बाईनें शेला उघडिला । मुर्दा सुभेदाराचा पाहिला । आग धरणिला टाकिलें ॥ सुभेदारासारखा । ऐसा क्षत्रीं होणार नाहीं ॥ बाजू गली महाराजाची । बाजू गेली शिवाजीची ॥ मग त्या शिवाजीनें चाकराचे साठीं । डोइला रुमाल बाधला ॥ बारा भोयाचे पाल्खींत । सुभेदाराचा मुर्दा जो घातला । वाजत गाजत आगला उमराठ्या गावाला । ह्याचे लेकाचे भेटीला ॥ पाचकर्णाचा आवाज । रायाबा वेड्यानें केला ( ऐकला ? ) ॥ रायाबा बोलतो । बाबा आले माझे लग्नाला । पाल्खीपाशीं धावत आला । मुर्दा बाबाचा पाहिला ॥ साता दिवसाची

मुदत । केली माझे लग्नाला ।। बाबा माझें लगीन करिल कोण । यजमान होईल बाबा कोण । मंडपांत मिरवेल कोण ? । आग लागो त्या लग्नाला । कां माझा *बाबा निघून गेला ।। शिवाजी राजानें । मुलगा पोटासंगं धरिला ।। भिऊं नको* माझे बेटा । शिवाजी महाराज तो गेला, तान्हाजी सुभेदार आहे तुला । बारा दिवसाचें सुतक धरलें । शिवाजी महाराजांनी सुभेदाराचें ॥ २ ॥

मग त्या तेराव्या दिवसांत । स्वयंवर बाळाचें माडिलें । ज्यानें मंडप घातला । मंडपाळा तोरण बांधिलें ।। पहिली नवरी रद्द केली । कडाशीचे दरकराची केली रायाबा बेस्थाला । स्वयंवर केलें रायाबाचे । रायाबापुढें तो बसविला ।। बापाची सरदारी । दिली रायाबा बेस्थाला । दिवस्याबुद्लीची जहागिर । *दिली रायाबा बेस्थाला ।। डोणज ते गाव दिलें पानसुपारीला ।।* माळु-सन्याचा दंड । दिला इनाम रायाला ।। रायाबा तो बेटा ज्यानें संगतिला घेतला । आले रायगड किल्ल्याला ।। ज्याने पतोजी तो काका । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ।। पंतोजी तो काका । जावें पुण्याचे शहराला ।। मंडईच्या बाजारीं । आहे तुळशीदास शाहिर ।। घेऊन यावें त्याला । रायगड किल्ल्याला ।। तुळशीदास शाहिर । ज्यानें सदरेला आणिला ।। डफ तुणतुणें घेऊन । मग त्या तान्हाजी सुभेदाराला ।। शिवाजी महाराजांचा । पोवाडा कटिबंध केला ।। हजार रुपयांचा तोडा । हातामधीं घातला त्या रे तुळशीदास शाहिराच्या ।। शूर मर्दाचा पोवाडा । शूर मर्दानें ऐकावा ।। शिवाजीचें राज्यांत । ऐसा उमराव होणें नाहीं ।। पोवाडा गात्याला । उद्राण ऐकत्याला घडो पुण्य । सत्ययुगींचा पोवाडा कल्युगीं वर्तला । सत्तावीस किल्ल्याचा सरदार निघूनशानी गेला । ऐसा पुनः होणें नाहीं ॥ ३ ॥

— सिंहगडाचा पोवाडा, चौक ५३–५५

## कृष्णमुनि विराटदेश

रुक्मिणी सभेंत येते —

उपजाति

ऐशा सभेतें नृपभीमबाळी । येताय कैसी सखियासमेळी ॥
तें छत्र शोभे रविपत्रकेसीं । त्या चामरें ढाळिति अष्टदासी ॥ १ ॥

चंपकलतिका

कर्ण विभूषित कुंडल झळका । त्यातळिं शोभति चंपककळिका ॥
नासिकिं बेसरि वज्रककणिका । गंडकमंडळ शोभत रुचिका ॥ २ ॥

सभोगवृत्त

माजी वेष्टित कनकसुवसना । शोभे त्यावरी मणिमय रसना ॥
क्षुद्राकिंकिणि कलरवरचना । मंद्रा वाजति जनमनहरणा ॥ ३ ॥

चित्रकला

चित्रकळाविद रमणी । पंच सुरंगित सुमणी ॥
गुंफित बोलिसि तरुणी । ओढिलि मन्मथ जननी ॥ ४ ॥

भुजगललिता

ठाकति ठमकति सखिजनमेळे । चालति गजगति हलुहलु ढाळे ॥
बाहुसि झगटिति ल्युरळिखेळें । हासति खुदखुद मुरडुनि डोळे ॥ ५ ॥

मनोहरा

मंदमंद बोलती । जीवभाव सांगती ॥
चाहुका निवारिती । धैर्यभाव दाविती ॥ ६ ॥

पंक्ति

पाडुनि लोथा । मन्मथनाथा ॥ हर्षितचित्त । देत नळीतें ॥ ७ ॥
रागिणिमाळा । आळवि बाळा ॥ श्रीहरिलीळा । चित्ररसाळा ॥ ८ ॥

मगधराजा भीमकाच्या भेटीला येतो —

सुंदरवृत्त

मागध आला मंडपरवणी । त्यक्त सुरासन चालत चरणीं ॥

मान्य धुरा त्या सादर करुनी । बोलत भाषा चित्र सुवदनी ॥ ९ ॥

भाट कृष्णवर्णन सांगतात—

संगीत चंद्रशेखर ध्रुवक ताल

सद्धन चिद्घननायक जो । संसृतिसागरतारक वा ॥
तद्गुणकीर्तनगायक जो । तोचि जना शिवकारक वा ॥ १० ॥

भाट मागधाबद्दल सांगतात —

तरंगिणी

भुज फडगेरें बहुतानर्ने । नयन निमिषान्मिषताहिने ॥
विसडत तनुगधि सदा असे । नृपति तव सुतेसरि हे नसे ॥ ११ ॥

भाट कृष्णचरित्र सांगतात त्यांत पूतना नंदास म्हणते —

कल्हारवृत्त

हासत हासत बोले ऐसे । भाग्य फळागत तूझे कैसे ॥
वृद्धपणीं तुज पुत्रभेटी । सौख्य महा मज दाटत पोटीं ॥ १२ ॥

कृष्णवर्णन —

गौरवृत्त

घननीळ मुरारी बल्लववेषी । स्थिर गोपजनासी रंगरसेसी ॥
निजकार्यबळाते स्फारत वैसी । जन देखति मूर्ति ज्या मति जैसी ॥ १३ ॥

रसनधानतर —

चंपकमाळा

दीर्घ विलापी जाउनि देशा । सांगति बापा मागधईशा ॥
बोलति कैशा निष्ठुर भाषा । पीटिति वक्षा तोडिति केशा ॥ १४ ॥

कृष्णवर्णन —

ज्वाला छंद

चरणयुगुळ सुंदर गोजिरे । मृदु-कुवलयरंगित साजिरे ॥
जलधिकुमरि वाछित अंतरें । मुनिजन हृदि चिंतित आदरें ॥ १५ ॥

घनवल्ली

रुक्मिणि सुंदरि खेळे जेथें । त वन मगळ राहे तेथें ॥
ध्यान करी परशास्त्रें युक्तें । श्रीहरिपल्कज चिंती चित्तें ॥ १६ ॥

रुक्मिणीची विरहव्यथा —

दोधकवृत्त

भावकळा सखि ऊठुनि वेगें । बोल्त मजुळ रुक्मिणिसंगें ॥
का तव हा ज्वर ज्वाळित अगें । घेत उपगाळि हस्तकल गे ॥ १७ ॥

स्रग्विणी

भावचद्रा सखी संपवी राहणा । बोलवी सुंदरा भीमजेतें खुणा ॥
कोण हें धैर्यता साग पा साजणी । जीविता वेचिसी आमतें वचुनी ॥ १८ ॥

तूणि छंद

जीव भाव सागसी कहीं मला न वचिसी ।
रूसता बुझाविसी सखी म्हणौनि मानसी ॥
आजि दूरि का मसी धरूनि तू न बोलसी ।
जे असेल मानसीं करीन लाज कइसी ॥ १९ ॥

रुक्मिणी सखीला म्हणते —

वनमाळा छंद

देखता नृपसभाजन वेधले । चित्रलेपसम होउनि राहिले ॥
अष्टभाव शरिरीं मम कोंदले । तत्पदीं हृदयपकज रातलें ॥ २० ॥

ब्राह्मण द्वारकेला निरोप घेऊन जातो —

सुरतिवृत्त

घनदाट सभा यदुनदन जेथे । हरिकीर्तन मगळ गायन तेथें ॥
सुर वोळग साधनि दीसत जाता । हरिपल्कजरेणु सुशोभित माथा ॥ २१ ॥

सुरमावृत्त

सरसीं सरसे पावक रगें । सरजीं फिरतें दीसति भृगें ॥
हरिता सपिता सारसजाळीं । सुरतं रमतें हसमराळी ॥ २२ ॥

प्रमाणिका

करुनि पान वारुणी । सकाम गोध कामिनी ॥
पराग धूळि खेळनी । करीति सिंपनें वनीं ॥ २३ ॥

सानदवृत्त

गौरा श्यामल सुदर गौरी । मदारातळिं बैसुनि गौरी ॥
नेत्रा चदनकापुर गौरी । मेळे पूजिति मगळ गौरी ॥ २४ ॥

चैद्यावरोवर ठरविलेल्या लग्नाच्या पहाटेस —

मुक्तवली

रानिया मनियानतरें पाहटेची । मगळे ते तुरे लागलीं यादवाची ॥
शुद्ध शाळाक सकीर्ण या गायनाची । दाटताये घ्वनी सुस्वरा हसकाची ॥२५॥

चद्रकळा

रुक्मिणि सुदरि नयनविशाळा । तारस कोरस तरळित लीळा ॥
लोकित दृष्टिस नृपदळ मेळा । लाउनि मानस हरि घननीळा ॥ २६ ॥

कृष्णप्रार्थना —

फणिभद्रवृत्त

अयि तुज नेणति वेदपुराण जपागम साधन मायपरे ।
सकळ सुरोरग चारण किंनर गुह्यक वदिति वर्णिति तूज वरे ।
ऋषिवर वेदपरायण तूचि जनार्दति मानुनि चिंतिति वेदपरे ।
तुजविण आणिक नास्ति समर्थ जनी तरि पूरवि काम वरे ॥ २७ ॥

पादाकुलक

हस्तकयुगुळें जोडुनि दोन्ही । लाउनि दृष्टी हरितनुचरणीं ॥
तारस कोरस चचळ तरळा । लक्षित बाळा वल्लभडोळा ॥ २८ ॥

कृष्ण रुक्मिणीस नेतो —

रामावृत्त

घालित खेवी माळाकठी । किन्नरदेहा जाली सृष्टी ॥
ब्राह्मणरूपें देवा भेटी । येउनि मागे शना पीठी ॥ २९ ॥

रमणवृत्त

रुक्मिणी पावलि मगळ मूर्तिवरा । वंदुनि बैसलि वामभुजे चतुरा ॥
श्रीमुख सुंदर लोकित कामभरा । प्रेमकळा तिसि सचरिलि प्रवरा ॥ ३० ।

सुमुखवृत्त

इति मगळ रुक्मिणी सेंवर सुंदर कल्पनग ।
कवि डिंभयतींद्रकृते चतुरप्रवर सुभगे ॥
हरि रुक्मिणि माळ समर्पित पल्लव नामकळ ।
भवकल्मषनाशक खडमिद किल षष्ठमल ॥ ३१ ॥

विमळावृत्त

भीमसुता–हरणा–मळ कल्पनगे । श्रीहरि दैत्य–विनाश कृते सुभगे ॥
रुक्मिणि–मानस–हर्षे सुगधभर । सौमन–सक्ति सततखडमल ॥ ३२ ॥

कृष्ण रुक्मिणी विवाहावेळीं —

चौबालामात्रावृत्त

सर्व नरामर–पन्नग–सदृपि । वर्णित वेदसुधावचनीं ॥
तत्पदपकज रुक्मिणि सेवित । भीमक भूपति धन्य जनीं ॥ ३३ ॥

ललितमित्र

श्रीहरि सुंदर वल्लभ लाहुनि परमसुख विदर्भे ।
पूर्वकृतामळ जोडिस मागत हरिपदफळ लेभे ॥
भीमकिशोभन कल्पनगामळ विरचित कवि डिंभे ।
सत्फळसक्ति खडमुताष्टमिति कळतर शोभे ॥ ३४ ॥

द्वारकेंत —

गधानकवृत्त

रुक्मिणि पाहे सुंदरी । निजपति हरि नयनीं ॥
अष्टहि भावें कोंदटली । सुखगत बहुत मनीं ॥
जपतपतीर्थें दानें । सकळहि करणें जनीं ॥
ज्यातें न पवति तोचि हा । परमपुरुष शयनीं ॥ ३५ ॥

मात्रागणयुत हीरकछंद

कर्म जनित अघ महुत तोडि करित तत्क्षणीं ।
ज्ञान भरित कृत्य चरित मोक्ष सुपथ लाहुनी ॥
सर्व वरट दिव्य सुभट सौख्य सुपिठ पाउनी ।
प्रेम सुरत भावसहित नित्य, रमत रुक्मिणी ॥ ३६ ॥

स्रग्धरा

श्रीकृष्णे सेजरंगे रतिरमण कळास्वादन तृप्त भैमी ।
नांदे सानंदपूर्णा भवभयरहिता श्रीहरी प्रेम सद्मीं ॥
रुक्मिण्युद्वाह मंत्रामृतरस सुफळें कल्पवृक्षीं सुहावें ।
वैराटे कृष्णडिंभे विरचित कुशळे सड प हें नवावें ॥ ३७ ॥

समाप्ति

अहो पद्द्वय छंदसामाजि वृत्ते । नरी सुंदरे कर्णगील्ये प्रशस्ते ॥
विराटोपनामांकिते कृष्ण येते । करी रुक्मिणीसंवरी रचनाते ॥ १ ॥
सुललितरवमाळा मंजुळा पं रसाळा । न पडत रमनेसी याचिता आइसोळा ॥
अति चतुर जनाचा मानसी हर्षमेळा । अमृत सुजन घेती प्रेमचाद्री गळाळा ॥ २ ॥

—रुक्मिणीस्वयंवर ( इ. स १६६२ )

## भट्टारक महीचंद्र

### कल्पवृक्षाचा लोप झाला

तव मेघ वर्षति थोर । विजा झमकिति अपार ॥ मेघ गर्जति घनघोर । नादें अंबर गाजे ॥ १ ॥ मग तये अवसरी जाना । कल्पवृक्ष गेले मालउन ॥ आनिक उगवले जान । वृक्ष पें ॥ २ ॥ मग वाढली अठरा धान्य । त्याचि नावें मि सांगीन ॥ वेगळी वेगळी करून । आयका तुम्ही ॥ ३ ॥ सालि गहू ज्वारी मसूर । चना चवला मुग तुर ॥ वाल उडिद सात्र प्रचुर । तिल जव

पै ॥ ४ ॥ कोद्र हुलहुले द्रक । मोडराले मिळोन आइक ॥ आठरा जाले सुरेक । धान्य पै ॥ ५ ॥ आनिक उपधान्याचि । गति नाहि तयाचि ॥ मजप्रति सागायाचि । अवृत थोडी ॥ ६ ॥ इक्षुदड पिकले भारी । मधुर रस तया भीतरी ॥ सर्करा होय नानापरी । तयाचे पोटी ॥ ७ ॥ आता सागन वृक्षाचा प्रकार । आघा जाबु फणस जबीर । असोक वृक्ष गभीर । नारिकेर पै ॥ ८ ॥ सुपारी ताल तमाल । दोडि सागोरी करवदे कर ॥ नोर महू निंब जायफल । आखोट जाना ॥ ९ ॥ द्राक्षी दालिंबि नागवली । ल्वग केतकी पोफली ॥ करुना चपक परी । मल्ली महकति पै ॥ १० ॥ वालुक काकडि खरबुजीं । दोडके आनिक तरुजी ॥ कुसमाड बिजोरे सहजि । पिकले पै ॥ ११ ॥ कल्पवृक्ष मालगल्यावरी । वृक्ष दिसो लागले नानापरी ॥ लोका भेद न कळे जरी । खाद्य अखाद्य ॥ १२ ॥ मग उपदेशानाचुनि । जाने भेद न कळे म्हणउनि ॥ गेले अवघे मिळोनि । रायापासि ॥ १३ ॥ राया कल्पवृक्ष गेल्यावरी । वृक्ष दिसति नानापरी ॥ बापा क्षुधा पीडले भारी । काय खावे ॥ १४ ॥ स्वामी तुम्ही आहेत जानोनि । उपाय सागा आम्हालागुनि । पुण्यास्तव म्हणउनि । माहाराजा ॥ १५ ॥ नाभिराजा बोले जान । प्रजावरी दया करुन । तुम्ही काय चिंता करण । आम्ही असता ॥ १६ ॥ मग राये लोकाकारण । वोळखी केली जान । पृथक पृथक करुन । वृक्षा फळाचि ॥ १७ ॥ आनि इक्षुदडाचा रसु । आहार करावा सावकासु । प्रजासि जाला सतोसु । आरत गली ॥ १८ ॥ हा माधिग दड सार । कुल राखिले साचार । इक्ष्वाकवश थोर । नाम जाले ॥ १९ ॥ नाभिराजा महाभला । इक्षुरसाचा उपदेश केला । सुखि जाले प्रजालोकाला । सुख असति ॥ २० ॥

—आदिपुराण(इ स १६९६) अध्याय पहिला,ओव्या २१९ २२९ व २३२ २४०

# रामदास

[इ स. १६०८–१६८१]

## १

### परचक्रनिरूपण

पदार्थमान तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ॥ येणे करिता बहुताला । सकट जालें ॥ १ ॥ लोकें स्थानभ्रष्ट झालीं । कितेक तेयेंचि मेलीं । उरलीं ते मराया आलीं । गावावरी ॥ २ ॥ काहीं रेडेपाडे उरले । ते लोक गावावरी आले । रगाकरिता मरोनि गेले । रेडेपाडे ॥ ३ ॥ माणसा खावया अन्न नाहीं । आथरुण पांघरुण तेंही नाहीं । घर कराया सामग्री नाहीं । काय करिती ॥ ४ ॥ पुढें आला पर्जन्य काळ । धान्य महर्घ दुष्काळ ॥ शाकार नाहीं भळभळ । रिचवे पाणी ॥ ५ ॥ कितेक अनाचारीं पडिलीं । कितेक यातीं भ्रष्ट जालीं ॥ कितेक ते आक्रदलीं । मुलें नालें ॥ ६ ॥ कितेकीं विषें घेतलीं । कितेक जळीं बुडालीं ॥ जाळिलीं ना पुरिलीं । कितीयेक ॥ ७ ॥ ऐसे जालें वर्तमान । पुढेंहि अवघा अनमान ॥ सदा दुश्चीत अवघ जन । उद्वेगरूपी ॥ ८ ॥ अद्यापि दुश्चिन्हें दिसती । दुष्ट ग्रह आडळती ॥ पुढेंही वाईट सागती । किती येक ॥ ९ ॥ काहींच पाहता घर नाहीं । विचार सुचेना काहीं ॥ अखंड चिंतेच्या प्रवाहीं । पडले लोक ॥ १० ॥ येक म्हणती कोठें जावें । येक म्हणती काय करावें ॥ विदेशा जाउनी काय खावें । वेंच नाहीं ॥ ११ ॥ तथापि मार्गचि चालेना । भिक्षा मागता मिळेना ॥ अवघे भिकारीच जना । काय म्हणावें ॥ १२ ॥ प्राणिमात्र जाले दुखी । पाहता कोण्ही नाहीं सुखी ॥ कठिण काळें वोळखी । धरीनात कोण्ही ॥ १३ ॥ लोक बहुत प्रस्तावले । किती येक जाजावले ॥ कितीयेक ते कावले । उद्वेगरूपी ॥ १४ ॥

— ओव्या २८–४१

## अस्मानी सुलतानी

### प्रबंध पहिला

बहूसाल कल्पांत लोकांसि आला। महर्गें बहू धाडि पेली जनाला॥
कितीयेक मृत्यासि ते योग्य जाले। कितीयेक ते देश त्यागूनि गेले॥ १॥
कितीयेक ग्रामेंचि ते वोस जाली। पिकें कर्म धान्यें च नाना बुडालीं॥
कितीयेक धाडीवरी धाडि येती। दुज्या सैन्यसाचेनि संहार होती॥ २॥
कितीयेक ते मेघही मंद जाले। अनावृष्टि स्थळोस्थळीं लोक मेले॥
कितीयेक अन्नाविसी भ्रष्ट जाले। कितीयेक लोकीं जळीं प्राण दिल्हे॥ ३॥
कितीयेक ते ताम्रनदीच गेले। कितीयेक मार्‍हाष्ट्रबंदीं निमाले॥
कितीयेक ते छंद ना बंद काहीं। कितीयेक बेबंद ते ठाईंठाईं॥४॥
कितीयेक ते धान्य लूटूनि नेती। कितीयेक ते पेव खाणोनि नेती।
किती ते पुरिले अर्थ नेती। कितीयेक पुरिलीं अर्थपात्रेंचि नेती॥५॥
कितीयेक पंथ देशांत ते नासले हो। किती पंथांत ते मारिले हो॥
कितीयेक पंथांत ते लूटिले हो। किती दाडगी ते बहू कूटिले हो॥ ६॥
कितीयेक ते भागवर्गेंचि घेती। किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती॥
किती मोट बांधूनि ते बुडवीती। पिटोंडेचि बांधोनि हिरोनि नेती॥७॥
किती पोट फाडूनि ते मारिताती। वृथा चोर अर्थाविषीं प्राण घेती॥
कितीयेक सौदागर बूडवीती। कितीयेक ते काफिले लूटिताती॥ ८॥
किती गुज्रिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या। किती शामुखी जाहजीं फाकवील्या॥
कितीयेक देशांतरीं त्या विकील्या। किती सुंदरा हाल होऊनि मेल्या॥९॥
किती कोंकणामाजि ते लोक गेले। फळें फाकड्या भक्षितां रोग जाले॥
पिंडा पाचले पोट फूगोनि मेले। किती कीर्र म्हणोनि फीरोनि आले॥१०॥

### प्रबंध २ रा

उदक बुडाले, तुटाले, पोटेंविण मेले। बहु कष्टले, कष्टले, कितीयेक मेले।
वीसा लोकांत लोकांत, येकचि राहिले। तेणें उदंड, उदंड, दुःखचि साहिलें॥धृ०॥

कांहीं मिळेना, मिळेना, मिळेना खायाला । ठाव नाहीं रे, नाहीं रे, नाहीं रे जायाला ।
होय कैची रे, कैची रे, कैची रे गायाला । कोठें जावें रे, जावें रे, जावें मागायाला ॥१॥
शेत पिकेना, पिकेना, पिकेना उदंड । कष्ट करूनि करूनि होत आहे भंड ।
अवघे जाहाले, जाहाले, जाहाले थोतांड । दुनिया पाहाता पाहातां उदंड झाली लंड ॥२॥
देश नासला, नासला, उठे तोचि कुटी । पिकें होतांचि होताची, होते लुटालुटी ॥
काळाकरितां जीवलगा झाली तुटातुटी । अवघ्या कुटुंबा कुटुंबा होते फुटाफुटी ॥३॥
कैचा आधार, आधार नाहीं सौदागर । कांहीं चालेना, चालेना उदीम व्यापार ।
सर्व सारिखे सारिखे जाला येकंकार । काळ कठीण कठीण कैसा पावे पार ॥४॥
न लगे हांसावें हांसावें सगट सारीखेची । लोक तूटले, तूटले संसाराचि चीची ॥
जनीं इंजती हुरमती पाहो जाता कैची । दुनिया जाली रे, जाली रे, जालि रे चळाची ॥५॥
धान्य माहाग, माहाग, तैसे ही मिळेना । कैसें होईल, होईल, होइल कळेना ॥
काय होणार, होणार, होणार टळेना । पुण्य गेलें रे, गेलें रे, कांहींच कळेना ॥६॥
पाउस पडतो, पडतो, उदंड पडतो । नाही तरी उघडे, उघडे, अवघा उघडतो ॥
पीळ पैंचाचा पैंचाचा प्रसग घडतो । लोक उधवेना, उधवेना, अवघाच दडतो ॥७॥
मुडकें पटकर पटकर न मिळे पाघराया । शक्ति नाहीं रे नाहीं रे कोपट कराया ॥
याम फुटेना, फुटेना, वीदेसीं भराया । ओघीं बैसले, बैसलों, बैसलो मराया ॥८॥
आयेला लेंकुरें लेकुरें साडुनिया जाती । भीक मागर्ना मागती तिकडेचि मरती ॥
राडा पोराच्या, पोरांच्या तारांबळी होती । मोल मजुरी भीकारी होउनी वांचती ॥९॥
बरें होईल होईल लागलीसे आस । बरे होईना होईना आशेची निरास ॥
काळ आला रे आला रे जाहाले उदास । काहीं केल्यानें केल्यानें मिळेना पोटास ॥१०॥
नदी भरतां भरतां घालुनिया घेती । वीस घेउनी घेउनी उदंड मरती ॥
अग्नी लाऊनी लाउनी जळोनियां जाती । मोठी फजीती फजीती सांगावें तें किती ॥११॥

येक पळाले, पळाले, दुरी देशा गले । बहु कष्टले कष्टले तेथ नागवले ॥
फिरोनि आले रे, आले रे, घरिच लोक मेले । काहें उपाये न्सिना कासावीस जाले ॥१२॥
उदड चाकरा चाकरी मीळेना भाकरी । लोक नीलड नीलड काढुनि नेती पोरा॥
न्याये बुडाला, बुडाला, जहाली सिर्नोरा । पैक्याकारणें कारणें होते मारामारी॥१३॥
कोणी वाचला, वाचला, तो सर्वेचि नागवला । उदीमा गला रे गला रे जाम येचि मारीला ॥
काहीं कळेना, कळेना कोण्हाचे कोण्हाला । येता एकाकी एकाकीं अस्मात घाला ॥१४॥
येतो पाहुणा पाहुणा ल्वकरी जाईना । अन्न खातो रे खातो रे थोडेहि खाईना ॥
उन्ड वाढिले वाढिले तन्ही तो धाइना । गर्जे बोलतो बोलतो काठचि माईना ॥१५॥
लोक झिजले, झिजले, झडेशिच आले । दारी बैसले बैसले, उठेनासे झाले ॥
इरे नाही रे, नाही रे, बुधीनें सोडीले । अन्नाकारणे कागणे उदड धादावले॥१६॥
लोक खाती रे खाती रे तेथची हागती । रात्रीं उठती उठती भडभडा वोकिती ॥
उदड घेतले, घेतले, अखड उचक्या देती । कर्पट ढकरे ढेकरें गऊन सोन्डिती ॥१७॥
राहे वस्तीस, वस्तीस चारितो वस्तास । खाण अभ्यास, अभ्यास, हाणी महाराग॥
परि ता साडेना, साडना, ठकी ता लोकास । पुढें ठके रे, ठके रे, ठके अवेयास ॥१८॥
लाक भलेसे दासती खेण्रें चारीती । वस्त्रें धातर पानर लपवुनी पळती ॥
काठ धरीती, मागीनी, महत्त्व हारातीं । काये करातीं, करातीं वाईट सगती॥१९॥
दास म्हणे रे भगवता कीनी पाहसी सत्व । काय वाचानी वाचोनी वाचानी न परतें जीवित्व ॥
कीती धरावें, धरावें, धरावें त सत्व । नाली शरार, शरार, शरीर निसत्व॥२०॥

### प्रबंध तिसरा

पनाळगडीं फार महर्ग जाळें । बहु वीग्र तेणें गुणें खाज्य अ लें ॥
कधीं देव पावेल कांहीं कळेना । कदा धुडल्या येक दाणा मिळेना ॥१॥
गुरे वीक्रिली सर्व वस्त्रेच पानें । भटीं वीक्रिली गोवळी चोळी धोतरे ॥२॥
किती वीक्रिली जैन झारे चवाळी । क्रिती धानळा माळ चवु गवाळी ॥३॥
क्रिती ऊखळे मूखळे सूप पाट्या । क्रिती वीक्रिले झाडुनी रुप काट्या ॥४॥
कितीयेक जाती किती वल्लने । तन्ही तें नव्हें काम काहींच फत्ते ॥५॥
क्रितीयेक तरवार ढाला कटारा । क्रितेकीं सुन्या कातन्या त्या अपार ॥६॥
कितेकींच सीलेधि भाले विक्रीले । क्रितेकीं किती उट घोडे विक्रीले ॥७॥
कितेकीं मुद्रा कुडक्या त्या विक्रील्या । क्रितेकीं क्रिती आगड्या त्या विक्रील्या ॥८॥
स्त्रियाचे अलंकार नानापरीचे । क्रिती थोरथोराचि त्या सुंदरीचे ॥९॥
असे सर्व्हां रक्षिले ता दिनासी । क्रिती आठऊ प्रत्ययों तो मनासी ॥
धरुनी करीं ऊतरीलें अनाथा । लिळें पहता पाववीले समर्था ॥ १० ॥

## ३

### स्फुट अभंग व पदे

वेळें पाऊस पडेना । नासकरणी उघडेना ॥
ऐसे कुळवाड्याचे भड । दु:ख जाहलें उदड ॥
बहु पडी आले शेत । रेड्यापाड्याचें आऊत ॥
काहीं वेल्यानें पिकेना । धान्य वेळेसि विकेना ॥
फाळा लाविला उदड । अवघे जाहलें थोताड ॥
वारीं रोगाचीं वाजतीं । नाना आभाळें फिरतीं ॥
टोळ पक्षी मूषकादिक । रानीं श्वापदें अनेक ॥
दावेदाराची यातना । चोर चोरटे राहेना ॥
नित्य पोटाचा मजूर । वेठीखालीं नित्ये बूर ॥
घर सोपट मोडकें । एक फटकुर फाटकें ॥

वैराग्यानें गुरें गेलीं । धारणेनें मुलें मेलीं ॥
सर्व संसार बुडाला । दास म्हणे जोगी जाला ॥ १ ॥

येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥ ध्रु० ॥
काय केलें धनुष्यबाण । करतटावरि ठेऊन ॥
काय केली सीताबाई । येथें राही रखुमाई ॥
काय केलें वानरदळ । येथें मेळविलें गोपाळ ॥
काय केली अयोध्यापुरी । येथें वसविली पंढरी ॥
काय केली शरयू गंगा । येथें आणिली चंद्रभागा ॥
रामदासीं जैसा भाव । तैसा झाला पंढरिराव ॥ २ ॥

धनुष्यबाण काय केलें । कां कर कटावरी ठेविलें ॥
हो कां धरिला अबोला । दिसे वेष पालटिला ॥
किलकिलाट वानरांचे । थवे दिसेना तयांचे ॥
पंढरिस जहालें येणें । येक्या हनुमंताकारणें ॥
दिसे हनुमंत एकला । सैन्यामधुनी फुटला ॥ ३ ॥

मुंगुसाचे कानीं नाळी । मुंगुस हिंडे आळोआळीं ॥
तरि ते पाळिलें जाणावें । पराधीनचि स्वभावें ॥
वेडे आलेसे पाहुणे । तरि ते जगाचे मेहुणे ॥
कार्यकर्ता कीर्तिवंत । त्यासि जाणती समस्त ॥
कार्यकर्ता तो जाणना । वेध लावी विश्वजना ॥
दास म्हणे कुटुंबाचा । तोचि पुरुष दैवाचा ॥ ४ ॥

वाजे पाऊल आपुलें । म्हणे मागें कोण आलें ॥
काय धावतसे आड । पाहों जातां झालें झाड ॥
भावितसे अभ्यंतरीं । कोण चाले बरोबरी ॥
शब्दपडसाद उठीला । म्हणे कोण रे बोलीला ॥
रामीरामदास म्हणे । ऐसीं भ्रांतीचीं लक्षणें ॥ ५ ॥

जया प्रपंच दुश्चित । हेत नाहीं परमार्थात ॥
दोहींकडे अंतरला । घोरपणें भांबावला ॥

गेली अवघी नि स्पृहता । नाहीं स्वार्थचि पुरता ॥
पूर्ण झाली नाहीं आस । इकडे बुडाला अभ्यास ॥
दास म्हणे क्रोध केलें । अवघें लाजिरवाणें झालें ॥ ६ ॥

ऐसें कैसें रे सोवळें । शिवता होतसे ओवळें ॥
स्नानसंध्या टिळेमाळा । पोटीं क्रोधाचा उमाळा ॥
नित्य दंडितोसि देह । तरी फिटेना संदेह ॥
बाह्य केली झळफळ । देहबुद्धीचा विटाळ ॥
नित्यनेम सटाटोप । मनीं विषयाचा ताप ॥
रामदासीं दृढभाव । तेणेंविण सर्व वाव ॥ ७ ॥

छाया देखोनि आपुली । जीव झाला दिशाभुली ॥
ऐसें भ्रमाचें लक्षण । भुलें आपणा आपण ॥
मुखें बोलता उत्तर । तेथें झालें प्रत्युत्तर ॥
डोळा घालिता आंगोळी । एकाचीं तीं दोन जालीं ॥
पोटीं आपण कल्पिलें । तेंच आलेंसें वाटलें ॥
दास म्हणे उपाधी । शंका धरिता अधिक बाधी ॥ ८ ॥

पोतें आहे खांद्यावरी । गेलें म्हणोनि हाका मारी ॥
ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥
नेणोनिया जन पुसे । पाहों जाता हातीं असे ॥
सोनें जाहलें विकळ । पाहों जाता कंठीं माळ ॥
वस्तु ठाथोनि पदरीं । पुसतसे दारोदारीं ॥
रामदास म्हणे जना । जवळी असोनी कळेना ॥ ९ ॥

*काहीं दिसे अकस्मात । तेथें आलें वाटे भूत ॥*
बाधा पडावें संदेहीं । मुळीं तेथें काहीं नाहीं ॥
पुढे देखता अंधारें । तेथें आलें वाटे भेंर ॥
झाडझुडूप देखिलें । जिवीं वाटे कोणी आले ॥
पुढे रोविलासे हंडा । भ्रांत्या म्हणे कोण उभा ॥
रामदास सांगे खूण । भितो आपणा आपण ॥ १० ॥

स्वार्थ केला जन्मवरी । लोभें राहिला श्रीहरी ॥
धनधान्य अहर्निशीं । गाई म्हैशी घोडे दासी ॥
शेतवाडे घर ठावो । प्राणी जीवीं धरा हावा ॥
मातापिता नहिंग भ्राता । कन्या पुत्र आणि कांता ॥
व्याही जावई आपुले । इष्टमित्र सुखी केले ॥
दास म्हणे हो सेवटीं । प्राप्त झाली मसणवटी ॥ ११ ॥

जन्मवरी शीण केला । अंत काळीं व्यर्थ गेला ॥
काया स्मशानीं घातली । कन्यापुत्र मुरडली ॥
घर वाडा तो राहिला । प्राणी जातसे एकला ॥
धनधान्य तें राहिलें । प्राणी चरफडत गेले ॥
इष्टमित्र आणि सांगाती । आपुलाल्या घरा जाती ॥
दास म्हणे प्राणी मेले । काहीं पुण्य नाहीं केलें ॥ १२ ॥

दैन्यवाणा जाला प्राणी । चद्री लागली नयनीं ॥
म्हणती ऊचला ऊचला । आता भूमिभार जाला ॥
घोर लागला अमूप । प्राणी जाला प्रेतरूप ॥
दातखीळ बैसली वदनीं । ताठा भरला करचरणीं ॥
डोळे निश्चळ दिसती । झाका झाका मुलें मिती ॥
रामरामीदास म्हणे । अवघीं सुखाचीं सुणें ॥ १३ ॥

बहुसाल दासदासी । नाना पशु गाई महिषी ॥
धन धान्याचें संचित । कांहीं होत कांहीं जात ॥
रामीरामदास म्हणे । संसारासीं येणें जाणें ॥ १५ ॥

कोणें कोणासी रडावें । एका मागें एकें जावें
एक वेळ गेली माता । एक वेळ गेला पिता ॥
द्रव्य दारा जाती पुत्र । जिवलगें आणी मित्र ॥
प्राणी संसारासी आला । तितुका मृत्युपंथें गेला ॥
पूर्वज गेले देवापासीं । तेचि वाट आपणासी ॥
रामदास म्हणे लोक । करी गेलियांचा शोक ॥ १६ ॥

रावणासारिखी कोणाची संपत्ति । तोहि गेला अंतीं एकलाचि ॥
एकलाचि गेला वाली तो वानर । कपि थोर थोर तेही गेले ॥
गेले चक्रवर्ती थोरा वैभवाचे । फार आयुष्याचे ऋषेश्वर ॥
ऋषेश्वर गेले मार्कंडासारिखे । इतरांचे लेखे कोण करी ॥
कोण करी सर्व शाश्वत आपुलें । सर्व राज्य गेलें कौरवांचें ॥
कौरव निमाले पाडव गळाले । यादवहि गेले एकसरें ॥
एकसरें गेले राजे थोर थोर । आणिक श्रीधर भाग्यवंत ॥
भाग्यवंत गेले एकामागें एक । हरिश्चंद्रादिक पुण्यशील ॥
पुण्यशील गेले कीर्ति ठेवूनिया । पापी गेले वायां अधोगती ॥
अधोगती गेलें देवा न भजता । संसारीं म्हणतां माझें माझें ॥
माझें माझें करी साचाचियेपरी । अंतीं दुराचारी एकलाचि ॥
एकलाचि येता एकलाचि जातां । मध्येंचि दुश्चिता मायाजाळ ॥
मायाजाळीं पापी जन गुडाळले । पुण्यशील गेले सुटोनियां ॥
सुटोनिया गेले सायुज्यपदासी । रामी रामदास चिरंजीव ॥ १७ ॥

आलें भगवताच्या मना । तेथें कोणाचें चालेना ॥
जैसा कलि राजा आला । धर्म अवघाचि बुडाला ॥
नीति मर्यादा उडाली । भक्ति देवाची चुकली ॥
दास म्हणे पाप जालें । पुण्य अवघेंचि बुडालें ॥ १८ ॥

## प्रार्थनागीत

कल्याण करी देवराया । जनहित विवरीं ॥ ध्रु० ॥
तळमळ तळमळ होतचि आहे । हे जन हातीं धरी ॥ १ ॥
अपराधी जन चुकतचि गेले । तुझा तूचि सावरी ॥ २ ॥
कठिण त्यावरि कठीण जालें । आता न दिसे उरी ॥ ३ ॥
कोटें जावें काय करावें । आरंभिली बोहरी ॥ ४ ॥
दास म्हणे आम्हीं येलें पावलों । दयेसि नाहीं सरी ॥ ५ ॥
कल्याण करी देवराया । जनहित विवरीं ॥ ध्रु० ॥

## ४

## मनोबोधाचे श्लोक

गणाधीश जो ईश सर्वां गुणाचा । मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ॥
नमू शारदा मूळ चत्वार वाचा । नमू पंथ आनंत या राघवाचा ॥ १ ॥
मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें । जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ २ ॥
प्रभातें मनीं राम चिंतीत जावा । पुढे वैखरीं राम आधीं वदावा ॥
सदाचार हा थोर सांडू नये तो । जनीं तोचि तो मानवी धन्य होतो ॥ ३ ॥
मना वासना दुष्ट कामा नये रे । मना सर्वथा पापबुद्धी नको रे ॥
मना सर्वथा नीति सोडू नको हो । मना अंतरीं सार वीचार राहो ॥ ४ ॥
मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें । मना बोलणें नीच सोशीत जावें ॥
स्वयें सर्वदा नम्र वाचें वदावें । मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥ ५ ॥
देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचेपरी त्वां झिजावें । परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ६ ॥
जनीं सर्वसुखी असा कोण आहे । विचारें मना तूंचि शोधूनि पाहे ॥
मना त्वांचि रे पूर्वसंचित केलें । तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ ७ ॥

मना सांग पा रावणा काय जालें । अकस्मात तें राज्य सर्वे बुडालें ॥
म्हणोनी कुडी वासना सांडि वेगी । बळे लागला काळ हा पाठिलागीं ॥ ८ ॥
जिवा कर्मयोगें जनीं जन्म झाला । परी सेवटीं काळमूखीं निमाला ॥
महा थोर ते मृत्युपंथेंचि गेले । कितीयेक ते जन्मले आणि मेले ॥ ९ ॥
मना पाहतां सत्य हे मृत्युभूमि । जितां बोलती सर्वही जीव मी मी ॥
चिरंजीव हे सर्वही मानिताती । अकस्मात सांडूनियां सर्व जाती ॥ १० ॥
मरे येक त्याचा दुजा शोक वाहे । अकस्मात तोही पुढें जात आहे ॥
पुरेना जनीं लोभ रे क्षोभ त्यातें । म्हणोनी जनीं मागुता जन्म घेते ॥ ११ ॥
मनीं मानव व्यर्थ चिंता वाहाते । अकस्मात होणार होऊनि जाते ॥
घडे भोगणें सर्वही कर्मयोगें । मतीमंद तें खेद मानी वियोगें ॥ १२ ॥
समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ १३ ॥
सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं । सदा सर्वदा सत्यवादी विवेकी ॥
न बोले कदा मिथ्यवाचा त्रिवाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥१४॥
दिनाचा दयाळु मनाचा मवाळु । स्नेहाळु कृपाळु जनीं दासपाळु ॥
तया अंतरीं क्रोध संताप कैचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १५ ॥
न वेचे कदा ग्रंथिचे अर्थ कांहीं । मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ॥
महाघोर संसार शत्रू जिणावा । प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥ १६ ॥
जनीं वादवेवाद सोडूनि द्यावा । जनीं सुखसंवाद सूखें करावा ॥
जनीं तोचि तो शोकसंतापहारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ १७ ॥
फुकाचें मुखीं बोलतां काय वेचें । दिसंदीस अभ्यंतरीं गर्व साचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । विचारें तुझा तूंचि शोधून पाहे ॥ १८ ॥
मना सर्वही संग मोडूनि द्यावा । अती आदरें सज्जनाचा धरावा ॥
जयाचेनि संगें महादुःख भंगे । जगीं साधनेंवीण सन्मार्ग लाभे ॥ १९ ॥

## ५

## करुणाष्टकें

अनुदिन अनुतापें तापलों रामराया ।
परम दिनदयाळा नीरसीं मोहमाया ॥
अचपळ मन माझें नावरे आवरीता ।
*तुजविण शिण होतो धाव रे धाव आता* ॥ १ ॥
भजनरहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजन जनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति मति माझी आपुलीशी करावी ।
*सकळ त्यजुनि भावें कास तूझी धरावी* ॥ २ ॥
विषयजनित सूखें सौख्य होणार नाहीं ।
तुजविण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं ॥
रविकुळटिळका रे हीत माझें करावें ।
दुरित दुरि हरावें स्वस्वरूपीं भरावें ॥ ३ ॥
तनु मनु धनु माझें राघवा रूप तुझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें ॥
प्रचळित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचळ भजन लीळा लागली आस तुझी ॥ ४ ॥
चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ।
*सकळ स्वजन माया तोडितां तोडवेना* ॥
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरीचा ।
म्हणउनि करुणा हे बोलतो दीन वाचा ॥ ५ ॥
जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटीं ॥
*तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधु* ।
षड्रिपुकुळ माझें तोडि याचा विरोधु ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ।
सिणत सिणत पोटीं पाहिली वाट तुझी ॥
झडकरि झड घाली धांव पंचानना रे ।
तुजविण मज नेते जंबुकी वासना रे ॥ ७ ॥
सकळ जनक माझा राम लावण्यपेटी ।
म्हणउनि मज पोटीं लागली आस मोठी ।
दिवस गणित बोटीं प्राण ठेऊनि कंठीं ।
अवचित मज भेटी होत घालीन मीठी ॥ ८ ॥
जननिजनकमाया लेंकरूं काय जाणें ।
पय न लगत मूखें हाणतां वत्स नेणें ।
जळधरकणआशा लागली चातकासी ।
*हिमकर अवलोकी पक्षिया भूमिकासी* ॥ ९ ॥
तुजविण मज तैसें जाहलें देवराया ।
विलग विषमकाळीं तूटली सर्व माया ।
सकळजनसखा तूं स्वामि आणीक नाहीं ।
वमकवमन जैसें त्यागिलें सर्व कांहीं ॥ १० ॥
स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आता चित्त कोठें न राहे ।
जिवलग जिव घेती प्रेत साडूनि देती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ११ ॥
सकळ जन भवाचे आखिले वैभवाचे ।
जिवलग मग कैचें चालतें हेंचि सांचे ।
विलग विषम काळीं सांडिती सर्व माळीं ।
रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥ १२ ॥
सुखसुख म्हणतां हें दुःख ठाकूनि आलें ।
भजन सकळ गेलें चित्त दुश्चित्त जालें ।
भ्रमित मन कळेना हीत तें आकळेना ।
परम कठिण देहीं देहबुद्धी वळेना ॥ १३ ॥

उपरति मज रामीं जाहली पूर्ण कामीं ।
सकळभ्रम विरामीं रामविश्राम धामीं ।
घडिघडि मन आता रामरूपीं भरावें ।
रविकुळटिळका रे आपुलेंसे करावें ॥ १४ ॥
जळचर जळवासी नेणती त्या जळासी ।
निशिदिन तुजपासी चूकलो गुणरासी ।
भुमिधर निगमासी वर्णवेना जयासी ।
सकळ भुवनवासी भेटि हे रामदासीं ॥ १५ ॥

## ६

## पुतण्याना उपदेश

बरें सत्य बोला यथातथ्य चाला । बहू मानिती लोक येणें तुम्हाला ॥
धरा बुद्धि पोटीं विवेकें मुलें हो । बरा गुण तो अतरामाजि राहो ॥ १ ॥
सदा दात घासोनि तोंडा धुवावें । कळाहीन तें शूद्रमूखी नसावें ॥
सदा सर्वदा यत्न सोडू नये रे । बहूसाळ हा खेळ कामा नये रे ॥ २ ॥
दिसामाजि काहीं तरी तें लिहावें । प्रसगीं अखडीत वाचीत जावें ॥
गुणश्रेष्ठ उपास्य त्याचें करावें । बरें बोलणें सत्य जीवीं धरावें ॥ ३ ॥
बहू खेळ खोटा सदालस्य खोटा । समस्तासि भाडेल तोची करटा ॥
बहूता जनालागिं जीवीं भजावें । भल्यासगती न्याय तेथें भजावें ॥ ४ ॥
हिशोबीं सदा न्याय साडू नये रे । कदाचीत अन्याय होता धना रे ॥
जनीं साहिता न्याय रे दु ख होतें । महासूख तेंही अकस्मात जातें ॥ ५
प्रचीतीविणें बोलणें व्यर्थ वाया । विवेकविणें सर्वही दभ जाया ॥
बहू सजला नेटका साज केला । विचाराविणें सर्वही व्यर्थ गेला ॥ ६ ॥
वरी चागला अतरीं गोड नाहीं । तया मानवाचें जिणें व्यर्थ पाहीं ॥
वरी चागला अतरीं गोड आहे । तयालागिं कोणी तरी शोधिताहे ॥ ७
सदा अतरीं गोड तें साडवेना । कदा अतरीं ओंगटें देखवेना ॥
म्हणूनी बरा गूण आधीं धरावा । महाघोर ससार हा नीरसावा ॥ ८ ॥

भला रे भला बोलनी तें करावें । बहुता जनाचे मुखें येश घ्यावें ॥
परा शेवटीं सर्व सोडोनी ध्यावें । मरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥ ९ ॥
नरा चोरटा सर्व ससार जाला । अकस्मात येईल रे काळ घाला ॥
म्हणोनी भले सगतीं सत्य चाला । जनीं दास तो बोधिताहे मुलाला ॥ १० ॥

* * * *

७

## शारदास्तवन

आता वदीन वेदमाता । श्रीशारदा ब्रह्मसुता ॥ शब्दमूळ वाग्देवता । महामाया ॥ १ ॥ जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार ॥ जे शब्दाचें अभ्यंतर । उकलून दावी ॥ २ ॥ जे योगियाची समाधी । जे धारिष्टाची कृतबुद्धी । जे विद्या अविद्या उपाधी । तोडून टाकी ॥ ३ ॥ जे महापुरुषाची भार्या । अति सलग्न अवस्था तुर्या ॥ जयेकरिता महत्कार्या । प्रवर्तले साधु ॥ ४ ॥ जे महताची शानी । जे इश्वराची निजशक्ती ॥ जे ज्ञानियाची विरक्ति । नैराश्य शोभा ॥ ५ ॥ जे अनत ब्रह्मांडें घडी । लीळाविनोदेंचि मोडी ॥ आपण आदि पुरुषीं दडी । मारून राहे ॥ ६ ॥ जे प्रत्यक्ष पाहता आढळे । विचार घेता तरी नाढळे ॥ जयेचा पार न कळे । ब्रह्मादिकांसी ॥ ७ ॥ जे सर्व नाटक अतर्कळा । प्राणीत स्फूर्ति निर्मळा ॥ जयेचेनि स्वानंदसोहळा । ज्ञानशक्ती ॥ ८ ॥ जे लावण्यरूपाची शोभा । जे परब्रह्मसूर्याची प्रभा ॥ जे शब्दीं बैसोनि उभा । ससार नासी ॥ ९ ॥ जे मोक्षश्रिया महामगळा । जे सत्रावी जीवनकळा ॥ जे सत्वलीला सुसीतळा । लावण्यखाणी ॥ १० ॥ जे अव्यक्त पुरुषाची व्यक्ती । विस्तारें वाढली इच्छाशक्ती ॥ जे कळि काळाची नियती । सद्गुरुकृपा ॥ ११ ॥ जे परमार्थ मार्गीचा विचार । निरवून दावी मागसार ॥ भवसिंधूचा पैल पार । पाववी शब्दबळें ॥ १२ ॥ ऐसी बहुवेषें नटली । माया शारदा येकली ॥ वेदचि अतरीं सचली । चतुर्विधा प्रकारें ॥ १३ ॥ तींही वाचा अतरीं आलें । वैखरिया प्रगट केले ॥ म्हणोन कर्तृत्व जितुकें जालें । तें शारदागुणें ॥ १४ ॥ ब्रह्मादिकाची जननी । हरिहर जयेपासुनी ॥ सृष्टिरचना लोक तिन्ही । विस्तार

जयेचा ॥ १५ ॥ जे परमार्थाचें मूळ । ना तरी सद्विद्याचि केवळ ॥ नि्रात निर्मळ निश्चळ । स्वरूपस्थिती ॥ १६ ॥ जे योगियाचे ध्यानीं । जे साधकाचे चिंतनीं ॥ जे सिद्धाचे अंतःकरणीं । समाधिरूप ॥ १७ ॥ जे निर्गुणाची ओळखण । जें अनुभवाची खूण ॥ जे व्यापकपणें संपूर्ण । सर्वां घटीं ॥ १८ ॥ शास्त्रें पुराणें वेद श्रुती । अखंड जयचें स्तवन करिती ॥ नानारूपीं जयेस भजती । प्राणिमात्र ॥ १९ ॥ जे वेदशास्त्राची महिमा । जे निरुपमाची उपमा ॥ जयेकरिता परमात्मा । ऐसें बोलिजे ॥ २० ॥ नाना विद्या कळा सिद्धी । नाना निश्चयाची बुद्धी ॥ जे सूक्ष्म वस्तूची शुद्धी । शक्तिमान ॥ २१ ॥ जे हरिभक्ताची निजभक्ती । अंतरनिष्ठाची अंतरस्थिती ॥ जे जीवन्मुक्ताची मुक्ती । सायुज्यता ते ॥ २२ ॥ जे अनंत माया वैष्णवी । न कळे नाटक लाघवी ॥ जे थोर थोरासी गोवी । जाणपणें ॥ २३ ॥ जें जें दृष्टीनें देखिलें । जें जें शब्दें बोलविलें ॥ जें जें मनास भासलें । तितुकें रूप जयेचें ॥ २४ ॥ स्तवन भजन भक्तिभाव । मायेवांचून नाहीं ठाव ॥ ऐसिया वचनाचा अभिप्राव । अनुभवी जाणती ॥ २५ ॥ म्हणोनि थोराहूनि थोर । ईश्वराचा ईश्वर ॥ तयेसी माझा नमस्कार । तदरूपेंचि आता ॥ २६ ॥

— दासबोध, दशक पहिला, समास तिसरा

## ८

### कवेश्वरस्तवन

आता वंदू कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर । ना तरी हे परमेश्वर । वेदावतारी ॥ १ ॥ कीं हें सरस्वतीचें निजस्थान । कीं हें नाना कळांचें जीवन ॥ नाना शब्दांचें भुवन । यथार्थ होय ॥ २ ॥ कीं हें पुरुषार्थाचें वैभव । कीं हे जगदीश्वराचें महत्व । नाना लाघवें सत्कीर्तिस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्दरत्नाचे सागर । कीं हे मुक्ताचें मुक्तसरोवर । नाना बुद्धीचे वैरागर । निर्माण जाले ॥ ४ ॥ अध्यात्म ग्रंथाची खाणी । कीं हे बोलके चिंतामणी । नाना कामधेनूचीं दुभणीं । वोळलीं श्रोतयासी ॥ ५ ॥ कीं हे कल्पनेचे कल्पतरु ।

र्की हे मोक्षाचे मुख्य पडिभरु । नाना सायुज्यतेचे विस्तारु । विस्तारले ॥ ६ ॥ कीं हा परलोकींचा निजस्वार्थु । कीं हा योगियाचा गुप्त पथु । नाना ज्ञानियाचा परमार्थु । रूपासि आला ॥ ७ ॥ कीं हे निरञ्जनाची खूण । कीं हे निर्गुणाची ओळखण । माया विलक्षणाचें लक्षण । ते हे कवी ॥ ८ ॥ कीं हा श्रुतीचा भावगर्भ । कीं हा परमेश्वराचा अलभ्य लाभ । ना तरी होये सुलभ । निजबोध कविरूपें ॥ ९ ॥ कवि मुमुक्षाचें अंजन । कवि साधकाचें साधन । कवि सिद्धाचें समाधान । निश्चयात्मक ॥ १० ॥ कवि स्वधर्माचा आश्रयो । कवि मनाचा मनोमयो । कवि धार्मिकाचा विनयो । विनयकर्ते ॥ ११ ॥ कवि वैराग्याचे संरक्षण । कवि भक्ताचें भूषण । नाना स्वधर्म रक्षण । ते हे कवी ॥ १२ ॥ कवि प्रेमळाची प्रेमळ स्थिती । कवि ध्यानस्थाची ध्यानमूर्ती । कवि उपासकाची वाढकीर्ती । विस्तारली ॥ १३ ॥ नाना साधनाचें मूळ । कवि नाना प्रयत्नाचें फळ । नाना कार्य सिद्धी केवळ । कविचेनि प्रसादें ॥ १४ ॥ आधीं कवीचा वाग्विलास । तरी मग श्रवणीं तुटले रस । कवीचेनि मति प्रकाश । कवित्वास होय ॥ १५ ॥ कवि व्युत्पन्नाची योग्यता । कवि सामर्थ्य वंताची सत्ता । कवि विचक्षणाची कुशळता । नाना प्रकारें ॥ १६ ॥ कवि कवित्वाचा प्रबंद । कवि नाना धाटी मुद्रा छंद । कवि गद्यपद्य भेदाभेद । पदासकर्ते ॥ १७ ॥ कवि सृष्टीचा अळंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार । सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवी ॥ १८ ॥ कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण । नाना सुखाचें संरक्षण । ते हे कवी ॥ १९ ॥ कवि देवाचे रूपकर्ते । कवी ऋषींचे महत्त्ववर्णिते । नाना शास्त्रांचें सामर्थ्य ते । कवि वाखाणिती ॥ २० ॥ नस्ता कवींचा व्यापार । तरी कैचा अस्ता जगोद्धार । म्हणोनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी ॥ २१ ॥ नाना विद्या ज्ञातृत्व काहीं । कवेश्वरेंविण तों नाहीं । कवीपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ २२ ॥ मागा वाल्मीक व्यासादिक । जाले कवेश्वर अनेक । तयापासून विवेक । सकळ लोकांसी ॥ २३ ॥ पूर्वी काव्यें होतीं केलीं । तरीच व्युत्पत्ती प्राप्त जाली । तेणें पडिता आंगीं आगली । परम योग्यता ॥ २४ ॥ ऐसे पूर्वी थोर थोर । झाले कवेश्वर अपार । आता आहेत पुढें होणार । नमन त्यासी ॥ २५ ॥ नाना चातुर्याच्या मूर्ती । कीं हे साक्षात् बृहस्पती । वेदश्रुती बोला म्हणती । ज्यांच्या मुखें ॥ २६ ॥ परोपकारा कारणें

निश्चयेंसी ॥ ८ ॥ पिसोळे म्हणती आमुचें घर। गावेलें म्हणती आमुचें घर॥ सोट म्हणती आमुचें घर। आणी गोंनी ॥ ९ ॥ बहुत किड्याचा जोजार। किती सागावा विस्तार ॥ समस्त म्हणती आमुचें घर। निश्चयेंसी ॥ १० ॥ पशु म्हणती आमुचें घर। दासी म्हणती आमुचें घर ॥ घरीचीं म्हणती आमुचें घर। निश्चयेंसी ॥ ११ ॥ पाहुणे म्हणती आमुचें घर। मित्र म्हणती आमुचें घर॥ ग्रामस्थ म्हणती आमुचें घर। निश्चयेंसी ॥ १२ ॥ तस्कर म्हणती आमुचें घर। राजकी म्हणती आमुचें घर ॥ अग्नि म्हणे आमुचें घर। भस्म करू ॥ १३ ॥ समस्त म्हणती घर माझें। हें मूर्खही म्हणे माझें माझें ॥ सेवट जड जालें ओझें। टाकिला देश ॥ १४ ॥ अवघीं घरें भगलीं। गानाची पाढरी पडिली ॥ मग ते गृहीं राहिलीं। अरण्यश्वापदें ॥ १५ ॥ क्रिडा मुगी वाळवी मूषक। त्याचेंच घर हें निश्चयात्मक ॥ हे प्राणी बापुडें मूर्ख। निघोन गेले ॥ १६ ॥

—दासबोध, दशक पहिला, समास दहावा, ओव्या ३४–४९

## १०

## मूर्खलक्षण

ॐ नमोजि गजानना। येकदंता त्रिनयना ॥ कृपादृष्टी भक्तजना। अवलोकावें ॥ १ ॥ तुज नमू वेदमाते। श्रीशारदे ब्रह्मसुते ॥ अतरीं वसे कृपावते। स्फूर्तिरूपें ॥ २ ॥ वदुनी सद्गुरुचरण। करुनी रघुनाथस्मरण ॥ त्यागार्थ मूर्खलक्षण। बोलिजेल ॥ ३ ॥ येक मूर्ख येक पढतमूर्ख। उभयलक्षणीं कौतुक ॥ श्रोतीं सादर विवेक। केला पाहिजे ॥ ४ ॥ पढतमूर्खाचें लक्षण। पुढिलें समासीं निरूपण ॥ सावध होऊनि विचक्षण। परिसोत पुढें ॥ ५ ॥ आता प्रस्तुत विचार। लक्षणें सागता अपार ॥ परी काहींयेक तत्पर। होऊन ऐका ॥ ६ ॥ जे प्रापचिक जन। जयास नाहीं आत्मज्ञान ॥ जे केवळ अज्ञान। त्याचीं लक्षणें ॥ ७ ॥ जन्मला जयाचे उदरीं। तयासी जो विरोध करी ॥ सखी मानिली अतुरी। तो येक मूर्ख ॥ ८ ॥ साडुनी सर्वही गोत। स्त्रीआधीन जीवित ॥ सागे अतरींची मात। तो येक मूर्ख ॥ ९ ॥ परस्त्रीसीं प्रेमा धरी।

नाना निश्चय अनुवाद । सेखी बोलिलें पूर्णपणें संशयातीत ॥ २७ ॥ कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसाचे वोघ लोटले । नाना सुखाचे उचंबळले । सरोवर हे ॥ २८ ॥ कीं हे विवेकनिधीचीं भांडारें । प्रगट जालीं मनुष्याकारें । नाना वस्तूचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ २९ ॥ कीं हे आदिशक्तीचें ठेवणें । नाना पदार्थास आणी उणें । लाधलें पूर्व संचिताच्या गुणें विश्वजनासी ॥ ३० ॥ कीं हे सुखाचीं तारुवें लोटलीं । आणि आनंदे उतटलीं । विश्वजनास उपयोगा आलीं । नाना प्रयोगाकारणें ॥ ३१ ॥ कीं हे निरंजनाची संपत्ती । कीं हे निराटाची योगस्थिती । ना तरी भक्तांची फळश्रुती । फळास आली ॥ ३२ ॥ कीं हा ईश्वराचा पवाड । पाहतां गगनाहून वाड । ब्रह्मांड रचनेहून जाड । कविप्रबंधरचना ॥ ३३ ॥ आतां असो हा विचार । जगास आधार कवेश्वर । तयासी माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३४ ॥

— दासबोध, दशक पहिला, समास सातवा

## ९

## माझे घर

मृत्तिका खाणोन घर केलें । तें माझें ऐसें दृढ कल्पिलें ॥ परी तें बहुतांचें हें कळलें । नाहींच तयासी ॥ १ ॥ मूषक म्हणती घर आमुचें । पाली म्हणती घर आमुचें ॥ मक्षिका म्हणती घर आमुचें । निश्चयेंसी ॥ २ ॥ कातण्या म्हणती घर आमुचें । मुंगळे म्हणती घर आमुचें ॥ मुंग्या म्हणती घर आमुचें । निश्चयेंसी ॥ ३ ॥ विंचू म्हणती आमुचें घर । सर्प म्हणती आमुचें घर ॥ झुरळें म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ४ ॥ भ्रमर म्हणती आमुचें घर । भिंगोर्‍या म्हणती आमुचें घर ॥ आळिका म्हणती आमुचें घर । काष्ठामध्यें ॥ ५ ॥ मार्जरें म्हणती आमुचें घर । श्वानें म्हणती आमुचें घर ॥ मुंगसें म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ६ ॥ पुंगळ म्हणती आमुचें घर । वाळव्या म्हणती आमुचें घर ॥ पिसुवा म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ७ ॥ ढेंकुण म्हणती आमुचें घर । चांचण्या म्हणती आमुचें घर ॥ घुगर्‍या म्हणती आमुचें घर ।

निश्चयेंसी ॥ ८ ॥ पिसोळे म्हणती आमुचें घर । गायेलें म्हणती आमुचें घर॥ सोट म्हणती आमुचे घर । आणी गांधी ॥ ९ ॥ नहुत किड्याचा जोजार । किती सागावा विस्तार ॥ समस्त म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ १० ॥ पशु म्हणती आमुचें घर । दासी म्हणती आमुचें घर ॥ घरीचीं म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ ११ ॥ पाहुणे म्हणती आमुचें घर। मित्र म्हणती आमुचें घर॥ ग्रामस्थ म्हणती आमुचें घर । निश्चयेंसी ॥ १२ ॥ तस्कर म्हणती आमुचें घर । राजकी म्हणती आमुचें घर ॥ अग्नि म्हणे आमुचें घर । भस्म करूं ॥ १३ ॥ समस्त म्हणती घर माझें । हें मूर्खही म्हणे माझें माझें ॥ सेवट जड जालें ओझें । टाकिला देश ॥ १४ ॥ अवघीं घरें भगलीं । गावाची पाढरी पडिली ॥ मग ते गृहीं राहिलीं । अरण्यश्वापदें ॥ १५ ॥ किडा मुगी वाळवी मूषक । त्यांचेंच घर हें निश्चयात्मक ॥ हे प्राणी बापुडे मूर्ख । निघोन गेले ॥ १६ ॥

—दासबोध, दशक पहिला, समास दहावा, ओव्या ३४–४९

## १०

## मूर्खलक्षण

ॐ नमोजि गजानना । येकदंता त्रिनयना ॥ कृपादृष्टी भक्तजना । अवलोकावें ॥ १ ॥ तुज नमू वेदमाते । श्रीशारदे ब्रह्मसुते ॥ अतरीं वसे कृपावते । स्फूर्तिरूपें ॥ २ ॥ वदुनी सद्गुरुचरण । करुनी रघुनाथस्मरण ॥ त्यागार्थ मूर्खलक्षण । बोलिजेल ॥ ३ ॥ येक मूर्ख येक पढतमूर्ख । उभयलक्षणीं कौतुक ॥ श्रोतीं सादर विवेक । केला पाहिजे ॥ ४ ॥ पढतमूर्खाचें लक्षण । पुढिलें समासीं निरूपण ॥ सावध होऊनि विचक्षण । परिसोत पुढें ॥ ५ ॥ आता प्रस्तुत विचार । लक्षणें सागता अपार ॥ परी काहींयेक तत्पर । होऊन ऐका ॥ ६ ॥ जे प्रापंचिक जन । जयास नाहीं आत्मज्ञान ॥ जे केवळ अज्ञान । त्यांचीं लक्षणें ॥ ७ ॥ जन्मला जयाचे उदरीं । तयासी जो विरोध करी ॥ सखी मानिली अतुरी । तो येक मूर्ख ॥ ८ ॥ साडुनी सर्वही गोत । स्त्रीआधीन जीवित ॥ सागे अतरींची मात । तो येक मूर्ख ॥ ९ ॥ परस्त्रीसीं प्रेमा धरी ।

श्वशुरगृहीं वास करी ॥ कुळेंवीण कन्या वरी । तो येक मूर्ख ॥ १० ॥ समर्थावरी अहता । अतरीं मानी समता ॥ सामर्थ्येंवीण करी सत्ता । तो येक मूर्ख ॥ ११ ॥ आपली आपण करी स्तुती । स्वदेशीं भोगी विपत्ती ॥ सांगे वडिलांची कीर्ती । तो येक मूर्ख ॥ १२ ॥ अकारण हास्य करा । निवेक सागता न धरा। जो बहुताचा वैरी । तो येक मूर्ख ॥ १३ ॥ आपुलीं धरूनिया दुरी । पराव्यासीं करी मीत्री ॥ परन्यून बोले रात्रीं । तो येक मूर्ख ॥ १४ ॥ बहुत जागते जन । तयामध्यें करी शयन ॥ परस्थळीं बहु भोजन । करी तो येक मूर्ख ॥ १५ ॥ मान अथवा अपमान । स्वयें करी परिच्छिन्न ॥ सप्त व्यसनीं जयाचें मन । तो येक मूर्ख ॥ १६ ॥ धरून परावी आस । प्रेत्न साडी सानकास । निसुगाईचा सतोष । मानी तो येक मूर्ख ॥ १७ ॥ घरीं विवेक उमजे । आणि सभेमध्यें लाजे ॥ शब्द बोलता निर्बुजे । तो येक मूर्ख ॥ १८ ॥ आपणाहून जो श्रेष्ठ। तयासीं अत्यत निकट ॥ सिकवणेचा मानी वीट । तो येक मूर्ख ॥ १९ ॥ नायकें त्यासी शिकवी । वडिलासी जाणीव दावी ॥ जो आरजास गोवी तो येक मूर्ख ॥ २० ॥

— दासबोध, दशक दुसरा, समास पहिला, ओव्या १–२०

## ११

### ससारस्थिति

लेंकुरें उदड झाली । तों लक्ष्मी निघोन गेली ॥ बापडीं भिकेसी लागलीं खावया अन्न मिळेना ॥ १ ॥ लेंकुरें खेळती धाकुटीं । येकें रागती येकें पोटीं ॥ ऐसी घरभरी जाली दाटी । कन्या आणि पुत्राची ॥ २ ॥ दिवसेंदिवस खर्च वाढला । यावा होता तो खुटोन गेला ॥ कन्या उपवरा जाल्या त्याला उजवावया द्रव्य नाहीं ॥ ३ ॥ मायें बापें होतीं संपन्न । त्याचें उदड होतें धन तेणेंकरिता प्रतिष्ठा मान । जनीं जाला होता ॥ ४ ॥ भरम आहे लोकाचारीं पहिली नादणूक नाहीं घरीं ॥ दिवसेंदिवस अभ्यतरीं । दरिद्र आलें ॥ ५ ॥ ऐसी घरवात वाढली । खातीं तोंडें मिळालीं ॥ तेणें प्राणिग्रास लागली

काळजी उद्वेगाची ॥ ६ ॥ कन्या उपवरी जाल्या । पुत्रास नोवऱ्या आल्या ॥ आता उजवणा केल्या । पाहिजेत की ॥ ७ ॥ जरी मुले तैसींच राहिलीं । तरी पुन्हा लोकलाज जाली ॥ म्हणती कासया व्याली । जन्मदारिद्य ॥ ८ ॥ ऐसी लोकलाज होईल । वडिलाचें नांव जाईल ॥ आता रुण कोण देईल । लग्नापुरतें ॥ ९ ॥ मागें रुण ज्याचें घेतलें । त्याचें परतोन नाहीं दिल्हें ॥ ऐसे आभाळ कोसळलें । उद्वेगाचें ॥ १० ॥ आपण खातों अन्नासी । अन्न खातें आपणासी ॥ सर्व काळ मानसीं । चिंतातुर ॥ ११ ॥ पती अवघीच मोडली । वस्तभाव गाहाण पडिली ॥ अहा देवा वेळ आली । आता दिवाळ्याची ॥ १२ ॥ काहीं घेला ताह्यामोडा । विकिला घरींचा पाडारेडा ॥ काहीं पैका रोकडा । कळांतरें काढिला ॥ १३ ॥ ऐसें रुण घेतलें । लौकिकीं दंभ केले ॥ सकळ म्हणती नाव राखिलें । वडिलाचें ॥ १४ ॥ ऐसें रुण उदंड जालें । रिणाइतीं वेढून घेतलें ॥ मग प्रयाण आरंभिलें । विदेशाप्रती ॥ १५ ॥ दोनी वरुषें बुडी मारिली । नीच सेवा अंगिकारिली ॥ शरीरें आपदा भोगिली । अतिशयेंसीं ॥ १६ ॥ काहीं मेळविलें विदेशीं । जीव लागला मनुष्यापासीं ॥ मग पुसोनिया स्वामीसी । मुरडता जाला ॥ १७ ॥ तव तें अत्यंत पीडावलीं । वाट पाहों बैसलीं ॥ म्हणती दिवसगती का लागली । काय करणें देवा ॥ १८ ॥ आता आम्ही काये खावें । किती उपवासी मरावें ॥ ऐसियाचे मनतीस देवें । का पा घातलें आम्हासी ॥ १९ ॥ ऐसें आपुलें सुख पाहाती । परी त्याचें दुःख नेणती ॥ आणी शक्ति गेलिया अंतीं । कोणीच कामा न येती ॥ २० ॥

— दासबोध, दशक तिसरा, समास चौथा, ओव्या १–२०

## १२

### आधिभौतिक ताप

दरवडे घालूनिया जना । तस्कर करिती यातना ॥ तेणें दुःख होये मना । या नाव आधिभौतिक ॥ १ ॥ अग्नीचेनि ज्वाळें पोळे । तेणें दुःख प्राणी हरबळे ॥ हानी जालिया विवळे । या नाव आधिभौतिक ॥ २ ॥ नाना मंदिरें सुंदरें ।

नाना रत्नाचीं भाडारें ॥ दिव्याबरें मनोहरें । दग्ध होती ॥ ३ ॥ नाना धान्यें नाना पदार्थ । नाना पशु नाना स्वार्थ ॥ नाना पात्रे नाना अर्थ । मनुष्यें भस्म होती ॥ ४ ॥ अग्नि लागला सेतीं । धान्यें बणव्या आणी खडकुनी ॥ इक्षुन्ड जळोन जाती । अकस्मात ॥ ५ ॥ ऐसा अग्नि लागला । अथवा कोणी लाविला ॥ हानी जाली का पोळला । या नाव आधिभौतिक ॥ ६ ॥ ऐसे सागता बहुत । होती वन्हीचे आघात ॥ तेणें दु खें दुखवे चित्त । या नाव आधिभौतिक ॥ ७ ॥ हारपे विसरे आणी साडे । नासे गाहाळे फुटे पडे ॥ असाध्य होये कोणीकडे । या नाव आधिभौतिक ॥ ८ ॥ प्राणी स्थानभ्रष्ट जालें । नाना पशूतें चुकलें ॥ कन्यापुत्र गाहाळलें । या नाव आधिभौतिक ॥ ९ ॥ तस्कर अथवा दावेदार । अवचिता करिती सहार ॥ लुटिती घरें नेती खिल्लार । या नाव आधिभौतिक ॥ १० ॥ नाना धान्यें चेळी कापिती । पानमळा मीठ घालिती ॥ ऐसे नाना आघात करिती । या नाव आधिभौतिक ॥ ११ ॥ मेंट उचले खाणोरी । सुवर्णपथी भुरेकरी ॥ ठकु सितरु वरपेकरी । वरपा घालती ॥ १२ ॥ गठीछोडे द्रव्य सोडिती । नाना आळकार काढिती ॥ नाना वस्तु मूषक नेती । या नाव आधिभौतिक ॥ १३ ॥ वीज पडे हिंव पडे । प्राणी प्रभजनीं सापडे ॥ का तो महापुरीं बुडे । या नाव आधिभौतिक ॥ १४ ॥ भोंवरे वळणें आणि धार । वोसाणें लागा अपार ॥ वृश्चिक गोंबी आजगर । वाहोन जाती ॥ १५ ॥ तयामधें प्राणी सापडला । खडकीं बेटीं आडकला ॥ बुडत बुडत वाचला । या नाव आधिभौतिक ॥ १६ ॥ मनासारिखा नसे ससार । कुरूप कर्कश स्त्री नर ॥ *विधवा कन्या मूर्ख पुत्र । या नाव आधिभौतिक ॥ १७ ॥* भूत पिशाच्य लागलं । आगावरून वारें गेलें ॥ अबद्ध मत्र प्राणी चळलं । या नाव आधिभौतिक ॥ १८ ॥ ब्राह्मणसमध शरारीं । बहुसाल पीडा करा ॥ शनेश्वराचा धोका धरी ॥ *या नाव आधिभौतिक ॥ १९ ॥ नाना ग्रहें काळवार । काळतिथी घातचद्र ॥* काळवेळ घातनक्षत्र । या नाव आधिभौतिक ॥ २० ॥ सिक पिंगळा आणी पाली ॥ वोखटें होला काक कलाली । चिंता काजळी लागली । या नाव आधिभौतिक ॥ २१ ॥ दिवगा सरवदा भाकून गला । अतरीं धोका लागला ॥ दु स्वप्न जाजावला । या नाव आधिभौतिक ॥ २२ ॥ भाट भुके स्वान रडे । पाली आगाधरी पडे ॥ नाना चिन्हे चिंता पवाडे । या नाव आधिभौतिक ॥ २३ ॥ जाहरी

निघतां अपशकुन । नानाप्रकारें विच्छिन्न ॥ तेणें गुणें भगे मन । या नाव आधिभौतिक ॥ २४॥ प्राणी बंदीं सांपडला । यातने वरपडा जाला। नाना दुःखें दुःखवला। या नांव आधिभौतिक॥ २५ ॥ प्राणी राजदंड पावत। जेरबंद चाबुक वेत॥ दरेमार तळवेमार होत । या नांव आधिभौतिक ॥ २६ ॥ कोरडे पारंब्या फोक। बहु प्रकारें अनेक ॥ बहु ताडिती आधिभौतिक । या नाव बोलिजे ॥ २७ ॥ मोघरीमार बुधलेमार । चौखरून डंगारणेमार ॥ बुक्या गच्चाड्या गुद्दगेमार । या नाव आधिभौतिक ॥ २८ ॥ लाता चपराखा सेणमार । कानखडे दगडमार ॥ नाना प्रकारींचे मार । या नांव आधिभौतिक ॥ २९ ॥ टांगणें टिपऱ्या पिछोडे । बेडी बुधनाल कोलदाडे ॥ रक्षण निग्रह चहूंकडे । या नांव आधिभौतिक ॥ ३० ॥ नाकवणी चुनवणी । मीठवणी गायवणी ॥ गुळवण्याची जाचणी । या नांव आधिभौतिक ॥ ३१ ॥ जळामध्यें बुचकळिती । हस्तीपुढें बांधोन टाकिती ॥ हाकिती छळिती यातायाती । या नाव आधिभौतिक ॥ ३२ ॥ कर्णछेद घ्राणछेद । हस्तछेद पादछेद ॥ जिव्हाछेद अधरछेद । या नांव आधिभौतिक ॥ ३३ ॥ तीरमार सुळीं देती । नेत्र वृषण काढिती । नखोनखीं सुया मारिती । या नाव आधिभौतिक ॥ ३४ ॥ पारड्यामध्यें घालणें । कां कडेलोट करणें ॥ कां भांड्यामुखें उडवणें । या नांव आधिभौतिक ॥ ३५ ॥ कानीं खुट्या आटळिती । अपानीं मेखा मारिती ॥ साल काढून टाकिती । या नांव आधिभौतिक ॥ ३६ ॥ मोत आणी चोट चोटी । अथवा गळ घालणें कंठीं ॥ सांडस लाऊन आटाटी । या नाव आधिभौतिक ॥ ३७ ॥ सिसे पाजणें वीष देणें । अथवा सिरछेद करणें ॥ का पायातळीं घालणें । या नांव आधिभौतिक ॥ ३८ ॥ सरड मांजरें भरिती । अथवा फासीं नेऊन देती ॥ नानापरी पीडा करिती । या नाव आधिभौतिक ॥ ३९ ॥ स्वानप्रळये व्याघ्रप्रळये । भूतप्रळये सुसरीप्रळये ॥ शस्त्रप्रळये विझप्रळये । या नाव आधिभौतिक ॥ ४० ॥ सीरा वोढून घेती । टेंभे लाऊन भाजिती ॥ ऐशा नाना विपत्ती । या नाव आधिभौतिक ॥ ४१ ॥ मनुष्यहानी वित्तहानी । वैभवहानी महत्वहानी ॥ पशुहानी पदार्थहानी । या नाव आधिभौतिक ॥ ४२ ॥ बाळपणीं मरे माता । तारुण्यपणीं मरे कांता ॥ वृद्धपणीं मृत्य सुता । या नांव आधिभौतिक ॥ ४३ ॥ दुःख दारिद्र आणी रुण। विदेशपळणी नागवण। आपदा अनुपत्ति कदान्न। या नाव आधिभौतिक ॥ ४४ ॥

आकांत वाखा प्रळय । युद्ध होता पराजय ॥ जिवलगाचा होय क्षय । या नाव आधिभौतिक ॥ ४५ ॥ कठीण काळ आणी दुष्काळ । साशक आणी वोखटी वेळ ॥ उद्वेग चिंतेचे हळहळ । या नाव आधिभौतिक ॥ ४६ ॥ घाणा चरखी सिरकला । चाकाखालें सापडला ॥ नाना वर्हींत पडिला । या नाव आधिभौतिक ॥ ४७ ॥ नाना शस्त्रें भेदिला । नाना स्वापदीं भक्षिला । नाना नदीं पडिला । या नाव आधिभौतिक ॥ ४८ ॥ नाना कुवासे निर्बुजे । नाना अपमानें लाजे । नाना शोकें प्राणी झिजे । या नाव आधिभौतिक ॥ ४९ ॥ ऐसे सागता अपार । आहेत दुःखाचे डोंगर । श्रोतीं जाणावा विचार । आधिभौतिकाचा ॥ ५० ॥

— दासबोध, दशक तिसरा, समास सातवा, श्लोव्या ३८–८७

## १३

## कल्पनेचा केला देव

कल्पनेचा केला देव । तेथें दृढ जाला भाव ॥ देवालागीं येता खेव । भक्त दुःखे दुखावला ॥ १ ॥ पाषाणाचा देव केला । येके दिवशीं भंगोन गेला ॥ तेणें भक्त दुखवला । रडे पडे आक्रंदे ॥ २ ॥ येक देव हरपला घरीं । येक देव नेला चोरीं । येक देव दुराचारी । फोडिला बळें ॥ ३ ॥ येक देव जापाणिला । येक देव उत्की टाकिला ॥ येक देव नेउन घातला । पायातळीं ॥ ४ ॥ काय सागों तीथमहिमा । मोडूनि गला दुरात्मा ॥ थोर सत्व होतें तें मा । काय जालें कळेचिना ॥ ५ ॥ देव घडिला सोनारीं । देव वोतिला वोतारीं ॥ येक देव घडिला पाथरीं । पाषाणाचा ॥ ६ ॥ नर्मदागंडिका तीरीं । देव पडिले लक्षवरी । त्याची सख्या कोण करी । असख्यात गोटे ॥ ७ ॥ चक्रतीर्थी चक्राकित । देव असती असख्यात ॥ नाहीं मर्ना निश्चिताथ । येक देव ॥ ८ ॥ बाण तान्ळें ताम्रनाणें । स्फटिक देव्हारा पूजणें ॥ ऐसे देव कोण जाणे । खरे कीं खोटे ॥ ९ ॥ देव रेसिमाचा केला । तोहि तुटोनिया गला । आता नवा नेम धरिला । मृत्तिकेचा ॥ १० ॥ आमचा देव बहु

सत्य। आम्हां आकांतीं पावत ॥ पूर्ण करी मनोरथ । सर्वकाळ ॥ ११ ॥ आतां याचें सत्व गेलें । प्राप्त होतें तें जालें ॥ प्राप्त न वचें पालटिलें । ईश्वराचेनी ॥ १२ ॥ धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा । तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥ १३ ॥ हे आपुली कल्पना । प्रासाऐसीं फळें जाणा ॥ परी त्या देवाचिया खुणा । वेगळ्याची ॥ १४ ॥ म्हणोनि हें मायाभ्रमणें । सृष्टि मिथ्या कोटिगुणें ॥ वेदशास्त्रें पुराणें । ऐसें बोलती ॥ १५ ॥ साधुसंत महानुभाव । त्यांचा हा ऐसा अनुभव ॥ पंचभूतातीत देव । सृष्टि मिथ्या ॥ १६ ॥

— दासबोध, दशक सहावा, समास सहावा, ओव्या ३२–४७

## १४

### मतामतांचा गलबला

नाना मतें निर्माण झालीं । नाना पाषांडें वाढलीं ॥ नाना प्रकारींचीं उठिलीं । नाना बंडें ॥ १ ॥ जैसा प्रवाहो पडिला । तैसाच लोक चालिला ॥ कोण वारील कोणाला । येक नाहीं ॥ २ ॥ पृथ्वीचा जाला गलाठा । येकाहून येक मोठा ॥ कोण खरा कोण खोटा । कोण जाणे ॥ ३ ॥ आचार बहुकचिंत पडला । कित्येक पोटासाठीं बुडाला ॥ अवघा धरवंगचि जाला । साभिमानें ॥ ४ ॥ देव जाले उदंड । देवांचें माडलें भंड ॥ भूत देवताचें थोतांड । येकचि जालें ॥ ५ ॥ मुख्य देव तो कळेना । काशास कांहींच मिळेना ॥ येकास येक वळेना । अनावर ॥ ६ ॥ ऐसा नासला विचार । कोण पाहातो सारासार ॥ कैंचा लहान कैंचा थोर । कळेचिना ॥ ७ ॥ शास्त्रांचा बाजार भरला । देवांचा गलबला जाला ॥ लोक कामनेच्या व्रताला । झोंबोन पडती ॥ ८ ॥ ऐसें अवघें नासलें । सत्यासत्य हारपलें ॥ अवघें अनावेक जालें । चहूंकडे ॥ ९ ॥ मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला ॥ जो जे मतीं सांपडला । तयास तें चि थोर ॥ १० ॥ असत्याचा अभिमान । तेणें पाविजे पतन ॥ म्हणोनिया ज्ञाते जन । सत्य शोधिती ॥ ११ ॥ लोक वर्तती सकळ । तें ज्ञात्यास करतळामळ ॥ आतां ऐका केवळ । विवेकी हो ॥ १२ ॥ लोक कोण्या

पंथें जाती । आणि कोण्या देवास भजती ।। ऐसी हे रोकडी प्रचिती । सावध ऐका ।। १३ ।। मृत्तिका धातु पाषाणादिक । ऐसिया प्रतिमा अनेक ।। बहुतेक लोकाचा दंडक । प्रतिमादेवीं ।। १४ ।। नाना देवाचे अवतार । चरित्रें ऐकती येक नर ।। जप ध्यान निरंतर । करिती पूजा ।। १५ ।। येक सकळांचा अंतरात्मा । विश्वीं वर्ते जो विश्वात्मा ।। द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा । मानिती येक ।। १६ ।। येक ते निर्मळ निश्चळ । कदापी नव्हेति चंचळ ।। अनन्यभावें केवळ । वस्तुच ते ।। १७ ।। येक नाना प्रतिमा । दुसरा अवतार महिमा ।। तिसरा तो अंतरात्मा । चौथा निर्विकारी ।। १८ ।। ऐसे हे च्यार देव । सृष्टीमधील स्वभाव ।। या वेगळा अंतर्भाव । कोठेंचि नाहीं ।। १९ ।। अवघें येकचि मानिती । ते साक्ष देव जाणती ।। परंतु अष्टधा प्रकृति । वोळखिली पाहिजे ।। २० ।।

— दासबोध, दशक अकरावा, समास दुसरा, ओव्या १६-३५

## १५

## आधीं प्रपंच करावा नेटका

आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ।। येथें आळस करूं नका । विवेकी हो ।। १ ।। प्रपंच साडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ।। २ ।। प्रपंच साडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।। मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ।। ३ ।। परमार्थ साडून प्रपंच करिसी । तरी तू यमयातना भोगिसी ।। अंतीं परम कष्टी होसी । यमयातना भोगिता ।। ४ ।। साहेब कामास नाहीं गेला । गृहींच सुरवाडून बैसला ।। तरी साहेब कुटिती तयाला । पाहाती लोक ।। ५ ।। तेव्हां महत्वचि गेलें । दुर्जनाचें हासें जालें ।। दुःख उदंड भोगिलें । आपुल्या जीवें ।। ६ ।। तैसेंचि होणार अंतीं । म्हणोन भजावें भगवंतीं ।। परमार्थाची प्रचीती । रोकडी घ्यावी ।। ७ ।। संसारीं असताच मुक्त । तोचि जाणावा संयुक्त ।। अखंड पाहे युक्तायुक्त । विचारणा हे ।। ८ ।। प्रपंचीं जो सावधान । तोचि परमार्थ

करील जाग ॥ प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ ९ ॥ म्हणोनी सावधानपणें । प्रपंच परमार्थ साधणें । ऐसें न करतां भोगणें । नाना दुःखें ॥ १० ॥ पर्णाळी पाहोन उचले । जीवसृष्टी विवेकें चाले । आणि पुरुष होऊन भ्रमले । यासी काय म्हणावे ॥ ११ ॥ म्हणोन असावी दीर्घ सूचना । अखंड करावी चाळणा ॥ पुढील होणार अनुमाना । आणून सोडावें ॥ १२ ॥ सुखी असतो खबर्दार । दुःखी होतो बेखबर ॥ ऐसा हा लौकिक विचार । दिसतचि आहे ॥ १३ ॥ म्हणोन सर्वसावधान । धन्य तयाचें महिमान ॥ जनीं राखे समाधान । तोचि येक ॥ १४ ॥ चाळणेचा आळस केला । तरी अवचिता पडेल घाला ॥ ते वेळे सावरायाला । अवकाश कैंचा ॥ १५ ॥ म्हणोन दीर्घसूचनेचे लोक । त्यांचा पहावा विवेक ॥ लोकाकरितांचि लोक । शाहाणे होती ॥ १६ ॥ परी ते शाहाणे वोळखावे । गुणवंताचे गुण घ्यावे ॥ अवगुण देखोन साडावे । जनामध्यें ॥ १७ ॥ मनुष्य पारखुं राहेना । आणि कोणाचें मन तोडीना ॥ मनुष्यमात्र अनुमाना । जाणून पाहे ॥ १८ ॥ दिसे सकळासी सारिखा । पाहाता विवेकी नेटका ॥ कामी निकामी लोकां । बरें जाणें ॥ १९ ॥ जाणोन पाहिजेत सर्व । हेंचि तयाचें अपूर्व ॥ ज्याचें त्यापरी गौरव । राखों जाणे ॥ २० ॥

— दासबोध, दशक बारावा, समास पहिला, ओव्या १–२०

## १६

## देशस्थिति

पृथ्वीमध्यें नाना शरीरें । उदंड दाटलीं ल्हानथोरें ॥ पालटती मनोविकारें । क्षणक्षणा ॥ १ ॥ जितुक्या मूर्ती तितुक्या प्रकृती । सारिख्या नसती आदिअंतीं ॥ नेमचि नाहीं पाहावें किती । काय म्हणोनी ॥ २ ॥ कित्येक म्लेंछ होऊन गेले । कित्येक फिरंगाणांत आटले ॥ देशभाषानें रुधिले । कितीयेक ॥ ३ ॥ मऱ्हाष्ट्र देश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला ॥ अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥ कित्येक युद्धप्रसंगीं गुंतले । तेणें गुणें उन्मत्त जाले ॥ रात्रंदिवस करूं लागले । युद्धचर्चा ॥ ५ ॥ उदिम्यास व्यासग लागला ।

अनवाश नाहींसा जाला ॥ अनरा पोटधदाच लागला। निरंतर ॥ ६ ॥ पट्दर्शनें नाना मतें। पाखांडें वाढली बहुतें ॥ पृथ्वीमध्यें जेथ तेथें। उपदेसिती ॥ ७ ॥ स्मार्थी आणि वैष्णवीं। उर्की मुर्की नेर्गी आघवीं ॥ ऐसी पाहाता गोवी। उदंड जाली ॥ ८ ॥ कित्येक कामनेचे भक्त। ठाईं ठाईं जाले आसक्त ॥ युक्त अथवा अयुक्त। पाहातो कोण ॥ ९ ॥ या गल्लल्यामध्यें गल्बला। कोणी कोणी वाढविला ॥ त्यास देखों सर्वनाश जाला। वैदिक लोक ॥ १० ॥ त्याहीमध्यें हरिकीर्तन। तेथें वाढले कित्येक जन ॥ प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान। कोण पाहे ॥ ११ ॥ या कारणे ज्ञान दुर्लभ। पुण्यें घडे अलभ्य लाभ ॥ विचारवंता सुलभ। सकळ काहीं ॥ १२ ॥ विचार कळला सांगता नये। उदंड येती अंतराय ॥ उपाय योजिता अपाय। आडवे येती ॥ १३ ॥ त्याही मध्यें जो तीक्ष्ण। रिकामा जाऊं नेदी क्षण ॥ धूर्त तार्किक विचक्षण। सकळा माने ॥ १४ ॥ नाना जिनस उदंड पाठ। वदों लागला घडघडाट ॥ अव्हाटचि केली वाट। सामर्थ्यबळें ॥ १५ ॥ प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें। जाणे सकळांचीं अंतरें ॥ निस्पृहपणें तदनंतरें। चटक लागे ॥ १६ ॥ मतें मतांतरें सगट। प्रत्यय बोलोन करी सपाट ॥ दृढक सांडून नीट। वेधी जना ॥ १७ ॥ नेमकें भेदकें वचनें। अखंड पाहे प्रसंग मानें ॥ उदास वृत्तीच्या गुमानें। उठोन जातो ॥ १८ ॥ प्रत्यय बोलोन उठोन गेला। चटक लागली लोकाला ॥ नाना मार्ग सांडून त्याला। शरण येती ॥ १९ ॥ परी तो कोठें आडळेना। कोणें स्थळीं सापडेना ॥ वेष पाहाता हीन दीना —। सारिखा दिसे ॥ २० ॥ उदंड करी गुप्तरूपें। भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ॥ तेथें यश कीर्ति प्रतापें। सीमा सांडिली ॥ २१ ॥ ठाईं ठाईं भजन लावी। आपण तेथून चुकावी ॥ मत्सर मताची गोवी। लागोंच नेदी ॥ २२ ॥ रनाळामध्यें जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे ॥ सर्वत्रांची चिंता वाहे। सर्वकाळ ॥ २३ ॥ अवघड स्थळीं कठीण लोक। तेथें राहणें नेमक ॥ सृष्टीमध्यें सकळ लोक। धुंडीत येती ॥ २४ ॥ तेथें कोणाचें चालेना। अनुमान अनुमानेना ॥ हट्ट घालून राजकारणा। लोक लावी ॥ २५ ॥ लोकीं लोक वाढविले। तेणें अमर्याद जाले ॥ भूमंडळी सत्ता चाले। गुप्तरूपें ॥ २६ ॥ ठाईं ठाईं उदंड तावे। मनुष्यमात्र तितुके झोंबे ॥ चहूंकडे उदंड लावे। परमार्थ बुद्धी ॥ २७ ॥ उपासनेचा

गजर। स्थळोस्थळीं थोर थोर॥ प्रत्ययानें प्राणीमात्र। सोडविले ॥ २८ ॥ ऐसे कैवाड उदड जाणे। तेणें लोक होती शाहाणे॥ जेथें तेथ प्रत्यय बाणे। प्राणिमात्रासी ॥ २९ ॥ ऐसी कीर्ति करून जावें। तरीच ससारास यावें॥ दास म्हणे हें स्वभावें। सकेतें बोलिलें॥ ३० ॥

—दासबोध, दशक पधरावा, समास दुसरा

## १७

## शिवाजीस उपदेश

नाना वस्त्र नाना भूषणें। येणें शरीर शृगारणें॥ विवेकें विचारें राज कारणें। अतर शृगारिजे॥ १॥ शरीर सुदर सतेज। वस्त्रें भूषणें केलें सज्ज॥ अतरीं नस्ता चातुर्यबीज। कदापी शोभा न पवे॥ २॥ तुड हेंकाड कठोर वचनी। अन्याड तोले साभिमानी॥ न्यायनीति अत करणीं। घेणार नाहीं ॥ ३ ॥ तऱ्हे सीमकोपी सदा। कदापि न धरी मर्यादा॥ राजकारणाच्या संवादा। मिळाचि नेणे ॥ ४॥ ऐसे लेंद बेइमानी। कदापि सत्य नाहीं वचनीं॥ पापी अपस्मार जना। राक्षस जाणावे॥ ५ ॥ समयासारिखा समया येना। नेम सहसा चालेना॥ नेम धरिता राजकारणा। अतर पडे ॥ ६ ॥ अति सर्वत्र वर्जावें। प्रसग पाहोन चालावें॥ हट निग्रहीं न पडावें। विवेकी पुरुष॥ ७॥ बहुतचि करिता हट। तेथ येऊन पडिले तट॥ कोणी येकाचा सेवट। जाला पाहिजे ॥ ८ ॥ बरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजा भवानी॥ परतु विचार पाहोनी। कार्य करणें॥ ९॥ असडचि सावधाना। बहुत काय करावी सूचना॥ परतु कांहीं येक अनुमाना। आणिलें पाहिजे ॥ १० ॥ समर्थापासीं बहुत जन। राहिला पाहिजे साभिमान॥ निश्चळ करू निया मन। लोक असती ॥ ११ ॥ म्लेंच्छ दुर्जन उदड। बहुता दिवसाच माजलें बड॥ या कारणें अखड। सावधान असावें॥ १२॥ सकळकर्ता तो ईश्वरु। तेणें केला अगिकारु। तया पुरुषाचा विचारु। विरळा जाणे॥ १३॥ न्यायनीति विवेक विचार। नाना प्रसंग प्रकार॥ परीक्षणें परतर। देणें

काढावा । हळुहळू ॥ ९ ॥ या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हता कष्टी । राजकारण मंडळ वेष्टी । चहूंकडे ॥ १० ॥ नष्टासी नष्ट योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे ॥ आपणावरी विकल्पाचे गोंवे । पडोंच नेदी ॥ ११ ॥ काटीनें काटी झाडावी । झाडानी ते कळों नेदावी ॥ कळकटेपणाची पदवी । असों न द्यावी ॥ १२ ॥ न कळता करी कार्य जें तें । तें काम तत्काळचि होतें ॥ गचगचेंत पडता तें । चमत्कारें नव्हे ॥ १३ ॥ ऐकोनी आवडी लागावी । देखोन बळकटचि व्हावी ॥ सल्गीनें आपली पदवी । सेवकामध्यें ॥ १४ ॥ कोणी येक काम करिता होतें । न करिता तें मार्गे पडत ॥ या कारणें ढिलेंपण तें । असोंचि नये ॥ १५ ॥ जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ॥ जो आपणची कष्टत गेला । तोचि भला ॥ १६ ॥ अवघ्यास अवघें कळलें । तेव्हा तें रितें पडिलें ॥ या कारणें ऐसे घडलें । न पाहिजे कीं ॥ १७ ॥ मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकाकरवीं करवावें ॥ कितेक खल्क उगवावे । राजकारणामध्यें ॥ १८ ॥ बोलके पहिलवान कळकटे । तयासीच घ्यावे झटे ॥ दुर्जनें राजकारण दाटे । ऐसें न करावें ॥ १९ ॥ ग्रामण्य वर्मी सापडावें । रगडून पीठचि करावें ॥ करूनि मागुती सावरावें । बुडवूं नये ॥ २० ॥ खळ दुर्जनासी भ्याले । राजकारण नाहीं राखिलें ॥ तेणें अवघे प्रगट जालें । बरें वाईट ॥ २१ ॥ समुदाव पाहिजे मोठा । तरी तनावा असावा बळकटा ॥ मठ करुनी ताठा । धरू नये ॥ २२ ॥ दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे ॥ सज्जनापरीस आळवावे । महत्व देउनी ॥ २३ ॥ जनामध्यें दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटपट ॥ या कारणें ते वाट । बुझून टाकावी ॥ २४ ॥ गनीमाच्या देखता फौजा । रणशूराच्या फुरफुरिती भुजा ॥ ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्था ॥ २५ ॥ तयास देखता दुर्जन धाके । वैसवी प्रचितीचे तवके ॥ जड पाषाडाचे वाखे । सहजची होती ॥ २६ ॥ हीं धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ॥ ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७ ॥ कोठेंच पडेना दृष्टी । ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी ॥ वाग्विलासें सकळ सृष्टी । वेधिली तेणें ॥ २८ ॥ हुंब्यास हुंबा लावून द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ॥ लौंदापुढें उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥ धटासी आणावा धट । उद्धटासी पाहिजे उद्धट ॥ खटनटासी खटनट । अगत्य करी ॥ ३० ॥ जैसास तैसा

जेव्हा भेटे । तेव्हा मजालसी बरी थाटे ।। इतुकें होतें परी धणी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥

—दासबोध, दशक एकोणिसावा, समास नववा

## १९

### परंतु येथें भगवताचे । अधिष्ठान पाहिजे ॥

सकळ जनासी प्रार्थना । उगेंच उदास करवेना । निरूपण आणावें मना । प्रत्ययाच ।। १ ।। प्रत्यय राहिला येकेकडे । आपण धावतो भलतेकडे । तरी सारासाराचे निवाडे । कैसे होती ।। २ ।। उगीच पाहाता सृष्टी । गल्बला दिसतो दृष्टीं । परी ते राजसत्तेची गोष्टी । वेगळीच असे ॥ ३ ॥ पृथ्वीमध्य जितुकीं शरीर । तितुकीं भगवताचीं घरें । नाना सुखें येणें द्वारें । प्राप्त होती ।। ४ ।। त्याचा महिमा कळेल कोणाला । माता वाढून कृपाळु जाला । प्रत्यक्ष जगदीश जगाला । रक्षितसे ।। ५ ।। सत्ता पृथ्वीमध्यें वाटली । जेथें तेथें विभागली । कळेनें सृष्टि चालिलि । भगवताचे ॥ ६ ॥ मूळ जाण त्या पुरुषाची सत्ता । शरिरीं विभागली तत्वता । सकळ कळा चातुयता । तेथें वसे ॥ ७ ॥ सकळ पुराचा ईश । जगामध्य ता पुरुष । नाना शरीरीं साव काश । करू लागल ॥ ८ ॥ पाहाता सृष्टीची रचना । ते येकाचेन चालेना । येकचि चाल्वी नाना । देह धरूनी ॥ ९ ॥ नाही उच नीच विचारिलें । नाहीं बरे वाईट पाहिल । कार्यें चाला एसे जालें । भगवतासीं ।। १० ।। किंवा नेणणें आन्व कलें । किंवा अभ्यासीं घातलें । हें कैसकैस केलं । त्याचा तोचि जाणे ।। ११ ।। जगदतरीं अनुसधान । बर पाहाणें हेंचि ध्यान । ध्यान आणी तें ज्ञान । एकरूप ॥ १२ ॥ प्राणी ससारास आला । काहींयेक शाहणा जाला । मग तो विवरा लागला । भूमण्डळा ॥ १३ ॥ प्रगट रामाच निशाण । आत्माराम ज्ञानघन । विश्वभर विद्यमान । भाग्य कळे ॥ १४ ॥ उपासना बुडीनसी वासना धरिली । तरी ते लाभतची गती । महिमा न कळे बोली । यथार्थ आहे ।। १५ द्रष्टा म्हणिजे पाहता । साक्षी जाणिज जाणता ।

अनंतरूपी अनंता । वोळलावें ॥ १६ ॥ संगती असावी भल्यांची । धाटी कथा निरूपणाची । कांहीं येक मनाची । विश्राती आहे ॥ १७ ॥ त्याहीमध्यें प्रत्ययज्ञान । जाळून टाकिला अनुमान । प्रचीतीविण समाधान । पाविजेल कैंचें ॥ १८ ॥ मूळ सकल्प तो हरिसकल्प । मूळमायेमधील साक्षेप । जगदंतरीं तेंचि रूप । रक्षिजेतें ॥ १९ ॥ उपासना ज्ञानस्वरूपा । ज्ञानीं चौथा देह आरोप । या कारणें सर्व सकल्प । सोडून द्यावा ॥ २० ॥ पुढें परब्रह्म विशाळ । गगनासारिखें पोकळ । घन पातळ कोमल । काय म्हणावें ॥ २१ ॥ उपासना म्हणिजे ज्ञान । ज्ञानें पाविजे निरंजन । योगियाचे समाधान । येणें रीतीं ॥ २२ ॥ विचार नेहटूनसा पाहे । तरी उपासना आपणचि आहे । येक जाये येक राहे । देह धरूनी ॥ २३ ॥ अखंड ऐसी घालमेली । पूर्वापार होत आली । आताहि तैसीच चालिली । उत्पत्तिस्थिती ॥ २४ ॥ वनावरी वनचरांची सत्ता । जळावरीं जळचरांची सत्ता । भूमंडळीं भूपाळा समस्ता । येणेंचि न्यायें ॥ २५ ॥ सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २६ ॥

—दासबोध, दशक विसावा, समास चवथा, ओव्या १–२६

## २०

## शिवाजीस पत्र

निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ॥ अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥ परोपकाराचिया राशी । अखंड घडती जयासि ॥ तयाचे गुणमहत्त्वासी । तुळणा कैंची ॥ २ ॥ नरपति हयपति गजपति । गडपति भूपति जळपति ॥ पुरंदर आणि छत्रपति । शक्ति पृष्ठभागीं ॥ ३ ॥ यशवंत कीर्तीवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ॥ पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥ ४ ॥ आचारशील विचारशील । दानशील धर्मशील ॥ सर्वज्ञपणें सुशील । सकळा ठायीं ॥ ५ ॥ धीर उदार गंभीर । शूर क्रियेसी तत्पर ॥ सावधपणें नृपवर ।

तुच्छ केलें ॥ ६ ॥ तीर्थक्षेत्रे मोडिली । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट जालीं ॥ सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ७ ॥ देव धर्म गोब्राम्हण । करावया संरक्षण ॥ हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥ ८ ॥ उदंड पंडित पुराणिक । कवीश्वर याज्ञिक वैदिक ॥ धूर्त तार्किक सभानायक । तुमच्या ठायीं ॥ ९ ॥ या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ॥ महाराष्ट्र धर्म राहिला कांहीं । तुम्हाकरिता ॥ १० ॥ आणीकही धर्मकृत्यें चालती । आश्रित होउनी कित्येक राहती ॥ धन्यधन्य तुमची कीर्ति । विश्वीं विस्तारली ॥ ११ ॥ कित्येक दुष्ट संहारिले । कित्येकास धाक सुटले ॥ कित्येकास आश्रय जाले । शिव कल्याण राजा ॥ १२ ॥ तुमचें देशीं वास्तव्य केलें । परंतु वर्तमान नाहीं घेतलें ॥ ऋणानुबंधें विस्मरण जालें । काय नेणू ॥ १३ ॥ सर्वज्ञ मंडळीं धर्ममूर्ति । सांगणें काय तुम्हाप्रति ॥ धर्मस्थापनेची कीर्ति । संभाळली पाहिजे ॥ १४ ॥ उदंड राजकारण तटलें । तेणें चित्त विभागलें ॥ प्रसंग नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥

## २१

## शिवाजीस क्षात्रधर्माचा उपदेश

अल्पस्वल्प संसारधर्म । मागां बोलिले राजधर्म ॥ आतां ऐका क्षात्रधर्म । परम दुर्लभ जो ॥ १ ॥ जयास जिवाचें वाटे भयें । तेणें क्षात्रधर्म करूं नये ॥ कांहीं तरी करून उपायें । पोट भरावें ॥ २ ॥ विन्मुख मरणीं नरक होती । याचून येतां मोठी फजिती ॥ इहलोक परलोक जाती । पहाना कां ॥ ३ ॥ मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें ॥ फिरोन येतां भोगावें । महद्भाग्य ॥ ४ ॥ नजर करारी राखणें । कार्य पाहुनि गतल करणें ॥ तेणें रण शागारी अंत करणें । मरित होती ॥ ५ ॥ जैसा माड्याचा गलोला । निर्भय मारामध्यें शिरला ॥ तैसा धर्त्री रिचविला । परसैन्यामध्यें ॥ ६ ॥ निःशस्त्रणें भार पुरनी । परि मीराचे तवरें तुरनी ॥ जैसा बंडिया पाटुनि घेती । भेरी उडतां ॥ ७ ॥ ऐसे अवरेच उठतां । परदळाची कोण चिंता ! ॥ हरणें

लोळवी चित्ता। देखत जैसा ॥ ८ ॥ मर्दे तकवा सोडू नये। म्हणिजे प्राप्त होतो जय ॥ कार्यप्रसंग समय। वोळखावा ॥ ९ ॥ कार्य समजेना अंतरें। तें काय सुजेल विचारें ॥ युद्ध करावें खबरदारें। लोक राजी राखावा ॥ १० ॥ दोन्हीं दळें येकवटें। मिसळता लखलखाटें ॥ युद्ध करावें खणखणाटें। सीमा खाडूनी ॥ ११ ॥ देवमात्र उच्छेदिला। जित्यापरीस मृत्यु भला ॥ आपुला स्वधर्म बुडविला। ऐसे समजावें ॥ १२ ॥ मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥ येविषयीं न करिता तकवा। पूर्वज हासती ॥ १३ ॥ मरणहाक तो चुकेना। देह वाचविता वाचेना ॥ विवेकी होऊन समजाना। काय करावें ॥ १४ ॥ भलें कुळवंत म्हणावे। तेंहीं वेगीं हजीर व्हावें ॥ हजीर न होता कष्टावें। लागेल पुढें ॥ १५ ॥ एक जाती दोन जाती पावला। तो कैसा म्हणावा भला ॥ तुम्हा सकळांस कोप आला। तरी क्षमा केली पाहिजे ॥ १६ ॥ देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते। देवदास पावती फत्ते। यदर्थी सशय नाहीं ॥ १७ ॥ देव मस्तकीं धरावा। अवघा हल्लकल्लोळ करावा ॥ मुलुख बडवा का बुडवावा। धर्मस्थापनेसाठीं ॥ १८ ॥ विवेक विचार सावधपणें। दीर्घ प्रेत्न केलाचि करणें ॥ तुळजावराचेन गुणें। रामें रावण मारिला ॥ १९ ॥ अहो हे तुळजा भवानी। प्रसिद्ध रामवरदायिनी ॥ रामदास ध्यातो मनीं। यन्निमित्त ॥ २० ॥

## २२

### आनंदवनभुवन

स्वप्नीं जें देखिलें रात्रीं। तें तें तैसेचि होतसे।
हिंडता फिरता गेलो। आनंदवनभुवना ॥ १ ॥
हे साक्ष देखिली दृष्टी। न्हिती कल्लोळ उठिले।
विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों। आनंदवनभुवना ॥ २ ॥
स्वधर्माआड जें विघ्नें। तें तें सर्वत्र उठीलीं।
लाटिलीं कुटिलीं देवें। दापिलीं कापिलीं बहु ॥ ३ ॥

विमान्या उठिल्या फौजा। भीम त्यावरि लोटला।
घडिली चिर्डिली रागें। रडविलीं बडविलीं बळें ॥ ४ ॥
हाकिलीं टाकिलीं तेणें। आनदवनभुवनीं।
हाकबोंब बहू जाली। पुढे सतत्न माडिलें ॥ ५ ॥
सौळले लोक देवाचे। मुख्य देवचि उठील।
कळेना कायरे होतें। आनदवनभुवनी ॥ ६ ॥
स्वर्गीची लोटली जेथें। रामगगा महानदी।
तीर्थासि तुळणा नाहीं। आनदवनभुवनी ॥ ७ ॥
ग्रथीं जे वर्णिली मार्गे। गुप्तगगा महानदी।
जळात रोकडे प्राणी। आनदवनभुवनी ॥ ८ ॥
सकळ देवचि साक्षी। गुप्त ऊदड भूवनें।
सौख्यचि पावणें जाणें। आनदवनभुवना ॥ ९ ॥
त्रैलोक्य चालिलें तेथें। देव गधर्व मानवी।
ऋषी मुनी महायोगी। आनदवनभुवनीं ॥ १० ॥
अमा अन्ना बहु आन्ना। काय अन्ना कळेचिना।
गुप्त तें गुप्त जाणावें। आनदवनभुवनीं ॥ ११ ॥
त्रैलोक्य चालिल्या फौजा। सौख्य बदविमोचनें।
मोहीम माडली मोठी। आनदवनभुवर्नी ॥ १२ ॥
सुरेश उठिला आगें। शूरसेना परोपरी।
विकटें कर्कशें यानें। शस्त्रपाणी महाबळी ॥ १३ ॥
देव देव बहू देव। नाना देव परोपरीं।
दाटणी जाहाली मोठी। आनदवनभुवनीं ॥ १४ ॥
दिग्पती चालिले सर्वे। नाना सेना परोपरी।
वेष्टीत चालिले सकळै। आनदवनभुवनीं ॥ १५ ॥
मगळें वाजती वाद्यें। महागगासमागमें।
आरभीं चालिल्या पुढें। आनदवनभुवनीं ॥ १६ ॥
रागभें रागिलें माग। तेणें रागेंचि चालिल्या।
सर्वेन पाठीशीं फौजा। आनदवनभुवनीं ॥ १७ ॥

अनेक वाजती वाद्यें । ध्वनीकल्लोळ उठीला ।
छबीनें डोल्रती ढाला । आनंदवनभुवनीं ॥ १८ ॥
विजई दीस जो आहे । ते दिसीं सर्व ऊठती ।
अनर्थ मांडिला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ १९ ॥
देवचि तुष्टला होता । त्याचे भक्तीस भुलला ।
मागुता क्षोभला दुःखें । आनंदवनभुवनीं ॥ २० ॥
कल्पांत मांडला मोठा । म्लेंछदैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभुवनीं ॥ २१ ॥
बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभुवनीं ॥ २२ ॥
पूर्वी जे मारिले होते । तेचि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥ २३ ॥
त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाउकें विवेकीं जना ।
कैपक्ष घेतला रामें । आनंदवनभुवनीं ॥ २४ ॥
भीमची धाडिला देवें । वैभवें धांव घेतली ।
लांगूळ चालिलें पुढें । आनंदवनभूवनीं ॥ २५ ॥
ये भूत वाढला धर्मु । रमाधर्मसमागमें ।
संतोप मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ २६ ॥

— श्लोक ७-३२

## २३

### संभाजीस पत्र

अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ॥ तजवीजा करीत बसावें । एकांत स्थळीं ॥ १ ॥ कांहीं उग्र स्थिती सांडावी । कांहीं सौम्यता धरावी ॥ चिंता लागावी परावी । अंतर्यामीं ॥ २ ॥ मागील अपराध क्षमावे । कारभारी हातीं धरावे ॥ सुखी करूनि सोडावे । कामाकडे ॥ ३ ॥ पाटवणीं तुंब निघेना ।

तरी मग पाणी चालेना ॥ तैसे सज्जनाच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४ ॥ जनाचा प्रवाह चालिला । म्हणजे कार्यभाग आटोपला ॥ जन ठायीं ठायीं तुंबला । म्हणजे खोटें ॥ ५ ॥ श्रेष्ठीं जें जें मिळविलें । त्यासाठीं भांडत बसले ॥ मग जाणावें फावलें । गलिमासी ॥ ६ ॥ ऐसे सहसा करूं नये । दोघे भांडता तिसऱ्यासी जय ॥ धीर धरोन महत्कार्य । समजून करावें ॥ ७ ॥ आधींच पडला धास्ती । म्हणजे कार्यभाग होय नास्ती ॥ या कारणें समस्तीं । बुद्धि शोधावी ॥ ८ ॥ राजीं राखिता जग । मग कार्यभागाची लगबग ॥ ऐसे जाणोनिया सांग । समाधान राखावें ॥ ९ ॥ सकळ लोक एक करावे । गलीम निवटून काढावे ॥ ऐसे करिता कीर्ति धावे । दिगतरी ॥ १० ॥ आधी गाजवावे तडाखे । मग भूमंडळ धाके ॥ ऐसे न होता धक्के । राज्यास होती ॥ ११ ॥ समय प्रसंग ओळखावा । निपटून काढावा । आला तरी कळों न द्यावा । जनामध्यें ॥ १२ ॥ राज्यामध्यें सकळ लोक । सलगी होऊन करावे सेवक ॥ लोकांचें मनामध्यें धाक । उपजोंचि नये ॥ १३ ॥ बहुत लोक मिळवावे । एक विचारें भरावे ॥ कष्टें करोनी घसरावें । म्लेंछावरी ॥ १४ ॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें ॥ महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १५ ॥ लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तरवार करावी ॥ चढती वाढती पदवी । पावाल तेणें ॥ १६ ॥ शिवराजास आठवावें । जीवित्व तृणवत् मानावें ॥ इहलोकीं परलोकीं राहावें । कीर्तिरूप ॥ १७ ॥ शिवरायाचें आठवावें रूप । शिवरायाचा आठवावा प्रताप ॥ शिवरायाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥ १८ ॥ शिवरायाचें कैसें चालणें । शिवरायाचें कैसें बोलणें ॥ शिवरायाची सलगी देणें । कैसें असे ॥ १९ ॥ सकल सुखाचा त्याग । करूनि साधिजे तो योग ॥ राज्यसाधनाची लगबग । कैसी असे ॥ २० ॥ त्याहूनि करावें विशेष । तरीच म्हणावे पुरुष ॥ या उपरी आता विशेष । काय लिहावें ॥ २१ ॥

—इ स. १६८१

# वामन पंडित

## १

### गोपीगीत

प्रगटलासि तूं नंदगोकुळीं । म्हणुनि इंदिरा वास ये स्थळीं ॥
सकळही सुखी या व्रजीं हरी । विरहदुःखिता गोपसुंदरी ॥ १ ॥
प्रगट होइं तूं विश्वभूषणा । प्रियतमा त्वरें दाविं आपणा ॥
हुडकितों तुतें गोपकामिनी । तुजवरी हरी प्राण ठेवुनी ॥ २ ॥
कमळगर्भिचे श्रीस जे हरी । करिं कृपा तया दृष्टिनें हरी ॥
सुरतनाथ तूं भोगदायका । दासि गोपिका तूझिया फुका ॥ ३ ॥
विरह देउनी आस लावुनी । सकळही अडामाजि घालुनी ॥
तदुपरी हरी दोर कापणें । तरि मृतासही काय मारणें ॥ ४ ॥
विगतदर्प तो सर्प काळिया । करुनि रक्षिलें गोकुळासि या ॥
विषजळाचिया नासुनी भया । विरहसागरीं घातलें प्रिया ॥ ५ ॥
व्रज गिळूं म्हणे त्या अघासुरा । अजगराशि कारुण्यसागरा ॥
वधुनि रक्षिलें त्या तुला हरी । व्रजवधूंवरी कोप कां तरी ॥ ६ ॥
प्रळयमेघही वर्षतां वरी । गिरि धरोनियां रक्षिल्या हरी ॥
प्रलय तो स्वयें त्यावरी करी । कठिण चित्त हें आजि कां परी ॥ ७ ॥
पिउनि अग्नि तूं ज्यांसि रक्षिसी । विरहअग्निनें आजि जाळिसी ॥
हरुनि सर्वही आमुचीं भयें । विरह-संकटीं घालिसी स्वयें ॥ ८ ॥
नव्हसि गोपिकापुत्र निश्चयें । सकळ अंतरीं साक्षि तूं स्वयें ॥
यदुकुळीं विधिप्रार्थनामिसें । भुवन तारिसी या कथारसें ॥ ९ ॥
म्हणुनिया तुतें प्रार्थितों हरी । सफळ आमुची कामना करी ॥
प्रगट शीघ्र तूं होऊनी प्रिया । अभय देउनी छेदिजे भया ॥ १० ॥
भवभयासही दूर जो करी । निवति लागतां गोपसुंदरी ॥
अभय हस्त तो आमुचे शिरीं । करुनियां कृपा ठेविं गा हरी ॥ ११ ॥

प्रगटता रमा क्षीरसागरी । धरिसि तू तिचा हस्त ज्या करी ॥
अभयहस्त तो मस्तकावरी । निवर्वि ठेवुनी गोपसुंदरी ॥ १२ ॥
मजजनाचिया दु खनाशका । वदन दाविं का गोपनायका ॥
बटकि आपुल्या ज्या तयावरी । हृदयिं एवढा कोप का करी ॥ १३ ॥
सहज दावुनी भाव हासमी । तरि तु आमुचे गर्व नासिसी ॥
नख न लाविता छेदणें जया । हरि कुऱ्हाडि का हाणणें तया ॥ १४ ॥
तुझि कथा सुधा तापल्या जना । निववि अंतरीं विश्वजीवना ॥
अमृत निंदिती स्वर्गिचे मुनी । तव कथामृता वदिती जनीं ॥ १५ ॥
फिरसि गोधनें चारिता वनीं । पद तुझे मजीं आठवू मनीं ॥
दुखवतील कीं ते तृणांकुरीं । म्हणुनि बूडतो दु खसागरीं ॥ १६ ॥
दिवस मावळे येसि तू मजा । नयनिं दाविसी श्रीमुखांबुजा ॥
कुरळ केश जे भृंग ते जसे । वरि पराग ते धूळिही दिसे ॥ १७ ॥
परतसीं वनीं दैत्य मारुनी । दिससि थोर तू वीर लोचनीं ॥
वदनचंद्र साजेसि दावुनी । मदन सोडिसी आमुचे मनीं ॥ १८ ॥
ढकटुनी युगासारिख्या त्रुटी । दिवस कठुनी थोर सकटीं ॥
नयनिं पाहता श्रीमुखाप्रती । लवति पापण्या त्या न सोसती ॥ १९ ॥
पतिसुतादि हे बंधु बंधुता । त्यजुनि पातलों तूज अच्युता ॥
मुरलिच्या रवें मोहिलों मनीं । कपटि कोणसा याकि यामिनी ॥ २० ॥

सकलही अशा गोपसुंदरी । करिति गायनें त्या परोपरीं ॥
रडति सुस्वरें अश्रु लोचनीं । धरुनि लालसा कृष्णदर्शनीं ॥ २१ ॥
रडति तां तयामाजि ये हरी । प्रकट आपुलें रूप तो करी ॥
मदनमोहन श्रीपति स्वयें । पुसतसे तयालागिं विस्मयें ॥ २२ ॥

वसन पीवळें हार कंधरीं । नयनिं देखुनी गोपसुंदरी ॥
उठलिया जशा प्राण आलिया । सकळ शक्ति त्या येति इंद्रिया ॥ २३ ॥
धरिति धावुनी एकि त्या करीं । धरिति एकि त्या पीत अंबरीं ॥
भुज धरीति त्या एकि अगटीं । कितिक त्या गळा घालिती मिठी ॥ २४ ॥

हरिपदीं तया नित्य वामनें । त्रिभुवनीं मिठी घातली मनें ॥
अमन या मनें वृत्ति गोपिका । सफल झालिया चित्सुखात्मका ॥ २५ ॥

— श्लोक १–१४, २०, ३०, ३१, ३२, ३८, ४१, ४६–५०

## २

### करुणाष्टक

लोपोनि भास्कर जयद्रथ मारियेला । लज्जानळातुनि धनंजय वाचवीला ॥
लाक्षागृहीं विवरि पांडव रक्षियेलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ १ ॥
दुग्धार्मिषें द्विजसुतें स्तविला मुरारी । दुग्धार्णवीं अचल ठेविसि पूतनारी ॥
कुब्जेचि भक्ति तरि देखुनि क्षेम दीलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ २ ॥
आणोनि राजतनया अधमें सभेला । दुष्टोत्तरें करवि नग्न जरी सतीला ॥
तीकारणें स्वकरिं अंबर नेसवीलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ३ ॥
उत्तानपादनृप केवळ पुण्यराशी । तत्सुत तो ध्रुव तपोधन योगराशी ॥
त्याकारणें अचलधाम करून दीलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ४ ॥
नक्रें जळात चरणीं धरिलें गजेंद्रा । म्लानोत्तरें करुनिया स्तवि देव इंद्रा ॥
तें दीनबंधु ब्रिद सत्वर रक्षियेलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ५ ॥
वृत्रारि कोपुनि शिळाघन वर्षवीला । तेव्हा भयप्रलयकंप गमे जनाला ॥
घेवोनि त्या गिरि करीं व्रज रक्षियेलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ६ ॥
सिंधूजळात कनकापुर दूर गावें । तेयोनि शीघ्रगति मोक्षपुरीस यावें ॥
काष्ठाग्नि घे भरत दर्शन त्यासि दीलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ७ ॥
जे शापदग्ध पडली नहुना दिसाची । लावोनि पाय हरिली जडता तियेची ॥
त्या भक्तवत्सलपणाप्रति काय झालें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ८ ॥
दुर्योधनें ऋषिस धाडियले वनातें । धर्मा छळूनि मुनि मागति भोजनातें ॥
त्या कारणें परम अन्न निशींत दीलें । माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ ९ ॥

दारिद्रतेकरुनि पीडित तो सुदामा। मुष्टी भरूनि पृथु आणित कृष्णधामा ॥
देऊनि काचनपुरी द्विजराज केलें। माझेविशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ १० ॥

निकाळीं करा घोष या अष्टकाचा।
मनींचा पुरे अर्थ तेव्हांच साचा ॥
विनती असे भक्त हो वामनाची।
उपेक्षा न कीजे यया अष्टकाची ॥

## ३

## भर्तृहरीचें नीतिशतक : स्फुट श्लोक

करू ये समाधान जो मूर्ख त्याचें। धरू ये सुखें चित्त पैं जाणत्याचें ॥
न जाणे न नेणे अशा पामराला। बुझावू शकेना विधाता तयाला ॥ १ ॥
प्रयत्नें वाळूचे कण रगडिता तेलहि घडे। तृषार्तांची तृष्णा मृगजळ पिऊनीहि विघडे॥
ससाचेही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी। परंतू क्षुद्राचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ २ ॥

चंद्राला दिवसा प्रकाश नसणें ये कामिनीला जरा।
पद्मावीण तळें निरक्षर मुखीं जो साजिरा गोजिरा ॥
दात्याला धनलोभ, नित्य वसतें दारिद्र्य विद्वज्जनीं।
दुष्टाचा पगडा महीपतिगृहीं, हीं सात शल्यें मनीं ॥ ३ ॥
वानोत निंदोत सुनीतिमंत। चलो असो वा कमला गृहांत ॥
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं। सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥ ४ ॥
ज्यांचीं देहमनें तशींच वचनें पुण्यामृतें ओतिलीं।
कीं जेहीं स्वकृतोपकारविभवें सर्वत्र विस्तारिलीं ॥
लोकांचे परमाणुतुल्य गुण जे मेरूपरी वानिती।
चित्तीं तोषहि पावती, सुजन ते नेणों किती नांदती ॥ ५ ॥
पुष्पांपरी दों परिणींच साची। हे वृत्ति संभावित जे तयाची ॥
लोकांचिये एक शिरीं सजावें। वनींच कीं एक सुकोनि जावें ॥ ६ ॥

कांता–कटाक्ष–शर हे रुतती न ज्याला। तापी न कोपज हुताशनही जयाला॥
ज्याच्या मनीं न जडती विषयादि पाश। तो धीर जिंकित जगत्त्रय
सावकाश॥ ७॥

विद्या हें पुरुषास रूप बरवें कीं झाकलें द्रव्यही।
विद्या भोगसुकीर्तिदायक पहा ते मान्य मान्यासही॥
विद्या बंधु असे विदेशगमनीं विद्या महा देवता।
विद्या पूज्य नृपास हा नरपशू तीवेगळा तत्त्वता॥ ८॥

— श्लोक २, ४, ८, १२, १७, ३७, ७२, ८३

४

## भर्तृहरीचें वैराग्यशतक: स्फुट श्लोक

अभिज्ञास तों ग्रासिलें मत्सरानें। धनाढ्य प्रभू व्यापिले दुर्मदानें॥
शिरीं थोर मूर्खांस अज्ञान ओझें। जिरालें निजांगींच पांडित्य माझें॥ ९॥
वदना रदनावलिनें त्यजिलें। शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें॥
उठतां बसतां अणुशक्ति नसे। परि आश निरंतर माजतसे॥ १०॥

मोठें मंदिर, पुत्र पंडित बरे संपत्तिही फारसी।
भार्या हे गुणशालिनी वय नवें मूढासि माया अशी॥
मानीं शाश्वत विश्व हें, पडतसे संसारकारागृहीं।
ज्ञानी नश्वर दृश्य मानुनि मनीं संन्यास घे सत्वरीं॥ ११॥
फळें श्रमावाचुनि भूरुहाचीं। पदोपदीं शीत जलं नदींचीं॥
असोनिया कोमलपत्रशय्या। द्वारीं प्रभूच्या श्रमताति वाया॥ १२॥
गेला तो नृप ते प्रधान अवघे ते पंडितांची सभा।
गेली ते नगरीं तशा शशिमुखी त्या तप्तहेमप्रभा॥
गेला तो नृपपुत्र त्या शुभकथा म्या देखिलें सर्व जें।
तें जेणें स्मरणास योग्य रचिलें कालासि त्या वंदिजे॥ १३॥

येतो वासर तोच तेच रजनी व्यापार नानापरी ।
प्राणी हे करिताति आयु सरतें हें नेणवे अंतरीं ॥
तुच्छ चर्वित–चवणोपम सुखें जीं तींच तीं भोगिता ।
*ससारीं न तिरस्कृती उपजते ही कोण निर्लज्जता ॥ १४ ॥*
झालों जयापासुनि ते निमाले । ते आमुचे तुल्यवयस्क गेले ॥
आम्ही असा सप्रति जाण तैसे । नदीतटीं जर्जर वृक्ष जैसे ॥ १५ ॥
*एकदा तरुण बाल एकदा । भाग्यवतहि अभाग्य एकदा ॥*
*एकदा जरठ जाय सत्वरी । धर्मराजसदना नटापरी ॥ १६ ॥*
झाले जीर्ण मनीं मनोरथ पहा मीं वंचलों यौवना
होते जे गुण सर्वही विफल ते झाले गुणज्ञाविना ॥
युक्तायुक्त विचार काल न करी नि शक सर्वात्मना ।
*आता हें सुचलें दुजी गति नसे गौरीशपायाविना ॥ १७ ॥*

—श्लोक १, ८, २०, २७, ३८, ४१, ४५, ४७, ९७

## ५

## रासक्रीडा रासमडळ

माळाभार परस्परें कर गळा घालूनि गोपागना ।
*गाती नाचति पाहती अवघिया एका जगज्जीवना ॥*
सोन्याचे मणि ओविले भुजगुणीं गोऱ्या शशांकानना ।
पाचूचें पदकस्थळीं स्मर मना श्रीदेवकीनंदना ॥ १ ॥
कालिंदीतट वाळुवट गगनीं संपूर्ण तारापती ।
कल्हारीं कुमुदोत्पलीं अलि शरत्काळीं जळीं गुजती ॥
वारा मद सुगध शीतल फुलें नाना तरु शोभती ।
ऐशा यामिनि गोपिका हरिसवें रासोत्सवें मीरती ॥ २ ॥
*गोपीनायक इंद्रनील सिरवे मुक्ताफळाच्या कळा ।*
गोऱ्या गौळिणि रासमडळिं तशामध्यें हरी सावळा ॥

कस्तूरी निढळीं कलिंदतनया श्रीरासमाळा गळा ।
सौभाग्य व्रजभूमिचें पद्रजें त्याच्याचि आलें फळा ॥ ३ ॥
जे ते गोपिस आपणाचजवळी वाटे असावा हरी ।
जाणूनी जितुक्या स्त्रिया तितुकिया तत्काळ मूर्ती धरी ॥
सोन्याचे मणि इंद्रनील तितुके तो हार त्याचे परी ।
दों गोपींत मुकुंद कृष्णयुगुलीं एकेक ते सुंदरी ॥ ४ ॥
सर्वांचे हरि कंधरीं भुज तया रासक्रियामंडळीं ।
कृष्णाचे सकळा गळा भुज अशी झाली अहो सांखळी ॥
एका त्या अवघ्या स्थळीं प्रकृतिही नाना दिसे वेगळी
गोऱ्या गौळिणि त्यात एक मिरवे कृष्णप्रभा सावळी ॥ ५ ॥
त्या गोपी जितुक्या करूनि तितुक्या मूर्ती जरी नाचला ।
ज्या त्या मानिति आपणाचिजवळी आहे हरी एकला ॥
तीची तेथुनि दृष्टि ती न विघडे जो जो जिणें देखिला ।
मेघश्याम अनेक रूप रमतो ऐसें न भासे तिला ॥ ६ ॥
रूपें तीं स्मर कल्पवृक्ष हरिची गोपांगना त्या लता ।
कीं ते मेघसमूह त्या चमकती त्यामाजि विद्युल्लता ॥
कीं तारा युवती अनंत गगनीं मूर्ती मध्यें नीलता ।
जेव्हा एकचि तेधवा उडुगणीं भूचंद्रमा खाल्ता ॥ ७ ॥

— श्लोक १ – ७

## हरिपंडित

### भीष्मप्रतिज्ञा

पारिश्चिता मग शरासन पाडवानें । ओढूनिया हुतवहार्पित खाडवानें ॥
तो भीष्मदेह खचिला शरताडवानें । ज्याच्या क्रियें सकळ पद्मभवाड वाने ॥१॥

कलकल कलहंसें फार केला सुटाया । फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणिबंधीं टोचिता होय चंचू । धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ॥ ५ ॥
तदितर खग भेणें वेगळाले पळाले । उपवन जल केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला तो त्याजपाशीं नसे तो । कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ ६ ॥
न सोडी हा नळ भूमिपाळ मातें । असे जाणोनी हंस वदे त्यातें ॥
हंस-हिंसा नच घडो तुझ्या हातें । स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ ७ ॥
जागजागीं आहेत वीर कोटी । भले झुझारहि वाचित जया मोठी ॥
तयां माराया धैर्य धरी पोटीं । पाखरूं हे मारणें बुद्धि खोटी ॥ ८ ॥
वधुनि माझी हे कनकरूप काया । कटक-मुकुटादिक भूषणें कराया ॥
कशी आशा उपजली तूज राया । काय नाहीं तूजला दया माया ॥ ९ ॥

म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी ।
कांता काय वदों नवप्रसव ते सातां दिसांची तशी ॥
पाता त्या उभयांस मी मज विधी घातास योजीतसे ।
हातामाजिं नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥ १० ॥

हरहर सांपडलों, सांपडलों । कैसा फाशीं पडलो ॥ ध्रु ॥
इतर नदी जळटाकीं । टाकुनि आलो याच तटाकीं ॥
सोडुनि मानस-केली । कापुनि घ्याया आलों शेली ॥
ठेविन तव पदिं माथा । आतां सोडविं मज रघुनाथा ॥ ११ ॥

सखे माझे परतोनि घरा येतां । तुवां सजणे हा समाचार घेता ॥
तया शोकें घायाळ हृदय होतां । कशी होशिल तें आठवितों आता ॥ १२ ॥
थोर होतिल बालकें तुझीं बाळें । तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोकशाळे । मला आठवितां हृदय तिचें पोळे ॥ १३ ॥
सदय हृदय याचें भूप हा तापहारी । म्हणुनि परिसतां मी होय एथें विहारी ॥
मजहि वध कराया घातकी पातला जो । वरुनि पति असा ही भूमि कैशी न लाजो ॥ १४ ॥
एणेंपरी परिसतां अतिदीन वाचा । हेलावला नळ पयोधि दयारसाचा ॥
सोडी म्हणे विहर जा अथवा फिराया । राहें यथानिजमनोरथ हंसराया ॥ १५ ॥

चुडे, कगणिया, हातसरे, टोरे, । कटीं शोभति ते भव्य कडेदोरे ॥
फार साजे सौंदर्य दैत्यदारे । कामिलोकाचे चित्त जें विदारे ॥ २ ॥
भाळ्या, भोंकरें जडित ते काप कानीं । हार कठी दैदीप्य माणिकानीं ॥
करीं मुद्रा वीराजमान मानी । कोण ऐशी देखुनी धैर्य मानी? ॥ ३ ॥
वाकि, बाहुवटें, बाजुबद, बाळी । ल्यालि चोळी ते मोतियाचि जाळी ॥
हेमवसनाचा घोळ तळीं घोळी । मनीं कपटी, बाहेरि दिसे भोळी ॥ ४ ॥
पदीं साखलिया, नूपरादि वाळे । बिदीं चालतसे दासवीत चाळे ॥
डोळे मोडताचि गोपवृद भाळे । जो तो पाहे तल्लीन राजबाळे ॥ ५ ॥
ऐशि सुदरि ते मदहास चाली । नदरायाच्या मदिरासि आली ॥
द्वारपाळा टाकोनि तीव्र जाळी । मोह पाडोनी मदिरीं निघाली ॥ ६ ॥
पकजाक्षी निःशक शात बकी । रक्षपाला पाडुनी मोहपकीं ॥
जाति झाली कृष्णासि घेऊ अकीं । जो हा दाता आनदतनय रकी ॥ ७ ॥

— पूतनावध, पदें १० व १८

## रघुनाथ पंडित

### तुझा ऐसा उपकार मी न झाकीं

तया कासारीं राजहस पाहे । राजहसाचा कळप पोहताहे ॥
तयासाठीं हे वापिकाच पोहे । नळें केली हे कोण म्हणे नोहे ॥ १ ॥
तया हसाचे देह काचनाचे । पक्ष झळकती वीज जशी नाचे ॥
रग माणिकसे चचुचे पदाचे । जसे अधरींचे भीमकन्यकेचे ॥ २ ॥
त्यातील एक कलहस तटीं निजेला। जो भागला जलविहार विशेष केला ॥
पोटींच एक पद लाविला दुजा तो । पक्षीं तनू लपवि भूप तया पहातो ॥ ३ ॥
टाकी उपानह, पदें अतिमद ठेवी । केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उच अशा उपायीं । भूपें हळूच धरिला कलहस पायीं ॥ ४ ॥

कलकल कलहंसें फार केला सुटाया । फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणिबंधीं टोचिता होय चचू । धरि सुदृढ जया तो काय सोडील पचू ॥ ५ ॥
तदितर खग भेणें वेगळाले पळाले । उपवन जल केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला तो त्याजपाशीं नसे तो । कठिण समय येता कोण कामास येतो ॥ ६ ॥
न सोडी हा नळ भूमिपाळ मातें । असें जाणोनी हंस वदे त्यातें ॥
हंस-हिंसा नच घडो तुझ्या हातें । स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ ७ ॥
जागजागीं आहेत वीर कोटी । भले झुंझारहि शक्ति जया मोठी ॥
तया माराया धैर्य धरी पोटीं । पाखरू हे मारणें बुद्धि खोटी ॥ ८ ॥
वधुनि माझी हे कनकरूप काया । कटक-मुकुटादिक भूषणें कराया ॥
कशी आशा उपजली तूज राया । काय नाहीं तूजला दया माया ॥ ९ ॥
म्हातारी उडता नयेचि तिजला माता मदीया अशी ।
काता काय वटों नवप्रसव ते साता दिसाची तशी ॥
पाता त्या उभयास मी मज विधी घातास योजीतसे ।
हातामाजिं नृपा तुझ्या गवसलों आता करावें कसें ॥ १० ॥
हरहर सापडलो, सापडलों । कैसा फाशीं पडलो ॥ ध्रु ॥
इतर नदी जळटाकीं । टाकुनि आलो याच तटाकीं ॥
सोडुनि मानस गेली । कापुनि ध्याया आलों शेली ॥
ठेविन तव पदिं माथा । आता सोडविं मज रघुनाथा ॥ ११ ॥
सखे माझे परतोनि घरा येता । तुवा मरणे हा समाचार घेता ॥
तया शोकें घायाळ हृदय होता । कशी होशिल तें आठवितों आता ॥ १२ ॥
थोर होतिल बालकें तुझीं बाळे । तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोकशाळे । मला आठविता हृदय तिचें पोळे ॥ १३ ॥
सदय हृदय याचें भूप हा तापहारी । म्हणुनि परिसता मी होय एथें विहारी ॥
मजहि वध कराया घातकी पातला जो । वरुनि पति असा ही भूमि कैशी न लाजो ॥ १४ ॥
एणेंपरी परिसता अतिदीन वाचा । हेलावला नळ पयोधि दयारसाचा ॥
सोडी म्हणे विहर जा अथवा फिराया । राहें यथानिजमनोरथ हंसराया ॥ १५ ॥

सुटुनि खग पळाला बैसला शालशाखे। क्षणभरि निजदेहीं मुक्ति विश्रांति चाखे॥
स्वजन तव तयाचे भारताले मिळाले। क्वळिति निज बंधू बाष्पबिंदू गळाले॥ १६॥

विसावा घे कांहीं उडुनि त्वरलाही परतला।
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला॥
म्हणे हंस क्षोणीपतिस तुज कोणी सम नसे।
दयेचा हा ठेवा तुजजवळि देवा बहु वसे॥ १७॥

ऐक राया तू थोर दयासिंधू। नीतिसागरही तूच दीनबंधू॥
निरखदूनी बोलिलों नको निंदू। सकल वदसी तरि पाय तुझे वंदू॥ १८॥
पारधीमाजी खगा मृगा रानें। करिति हिंसा जी तीच बरी साजे॥
तुवा दिधली मज मोकळीक या जे। दया केली ही कीर्ति तुझी गाजे॥ १९
हंस मिळणें हें कठिण महीलोकीं। सोनियाचा तो नवल हें विलोकीं॥
तशा मजलाही सोडिलें तुवा कीं। तुझा ऐसा उपकार मी न झाकीं॥ २०।
तुझा करपंजर होय मला थारा। तुझ्या वचनाचा ओघ दुग्धधारा॥
तुझें मानस बहु थोर गा उदारा। सत्य लोकेशहि तूचि गुणागारा॥ २१॥
किती राने असतील तुझ्या धामीं। किती कोकीळा सारिका तसा मी॥
चित्त जडलें हें तूझिया ल्गामीं। नृपस्वामी मज योजि तुझ्या कामीं॥ २२।

हें पाखरूं मजसि येईल काय कामा।
ऐसे नृपा न वद पूरितलोककामा॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारी।
छाया करी तपनदीप्तिसही निवारी॥ २३॥

— नलदमयंती स्वयंवराख्यान, श्लोक ३५–५७

# सामराज

## रुक्मिणीची विरहव्यथा

वदत वदत ऐसे साज होयास आली। निकरकरलक्ष्मी सर्व सक्षीण झाली ॥
मुखकमल तयेचें म्लान अत्यंत देखे। म्हणवुनि कमलाचा मधु माधव्य राखे ॥ १ ॥
सहज दिनमणी हा अस्त होताच, पक्षी। प्रियतमविरहानें क्रदती चक्रवाकी ॥
विधिविहितनियोगें वारुणी आन्दाली। म्हणुनि चरम संध्या काय आरक्त झाली ॥ २ ॥
तदुपरि उगवे हा चंद्रमा पौर्णिमेचा। अनभिलषित अर्थी होय ये उत्तमेचा ॥
द्विजपति विसरेना सर्वथा स्वीय दीक्षा। कर पसरुन मागे वक्त्रलावण्यभीक्षा ॥ ३ ॥
हिमकरकर जैसे कांतिपूर स्रवेती। हळुच तसतसे ते चंद्रकांत द्रवेती ॥
क्षुधिततर चकोरा पारणें थोर जालें। मुकुलित कुमुदांला जन्मसाफल्य आलें ॥ ४ ॥
विलसित अवघे हे भीमकीला न सोसे। अविरत मग टाकी निःसहागी उसासे ॥
क्षणभरि सखियेचा हात घेऊन हातीं। समलिन मृदु बोलीं बोलता नेत्रपातीं ॥ ५ ॥
अमृतमयशरीरी बोलती लोक सारे। तदपि कुमुदबंधू, वतसी तू कसा रे ॥
सहज विमल तू ता बाल रत्नाकराचा। अमुनि धरिसि कैसें नाम दोषाकराचा ॥ ६ ॥
अंसेस चंद्रा गुरुदारगामी। प्राणास झालेंच उदार गा मी ॥
या पातकें होउन रायलक्ष्मी। गमाविली त्वां द्विजराजलक्ष्मी ॥ ७ ॥
जिवलग सखये तू होसि सर्वा अपेक्षा। तदपि करिसि कैशी आजि माझी उपेक्षा ॥
कळत कळत ता ही हातिचें सोडिजेतं। नियतच तरि काळें या मला वोढिजेतं ॥ ८ ॥
तुहिनकर नव्हे हे बीज चिंतालतेचें। विकसित अथवा हें पुष्प उद्वेगतेचें ॥
अभिनव मदनाचें छत्र किंवा उभारे। युवतिजन जयाच्या दर्शनें मात्र भारे ॥ ९ ॥
नभ धवलित केलें विश्व आनंदवीलें। परि विरहिजनाचें चित्त उन्मादवीलें ॥
क्षणभरि मन माझें याकडे पाहवेना। प्रलयदहनकल्प स्पर्श हा साहवेना ॥ १० ॥
मज निज नलगे, हे वैरिणी दोन झाली। तगमग सुटलीसे, राति मध्यास आली ॥
क्षणभरि सपनींही कृष्ण दृष्टीं पडेना। नयनसलिलयोग चित्रिंचा सापडेना ॥ ११ ॥

अवसर समजेना माग्कि फार बोले। शुकवचननिनादें चित्त अत्यंत गोले ॥
अजुनिहि न वचे हा चंद्र अस्ताचळासी। यदुपतिविरहाची वैसनीनी कळाशी ॥ १२ ॥

— रुक्मिणीहरण, सर्ग तिसरा, श्लोक ९९-११०

## विठ्ठलकवि

### १

### आत्मनिवेदन

कमलनयन कान्हा जो उभा कुंजशाई। मुरलिमधुरनादें जो वळी लक्ष गाई ॥
शतहिमरुचि लोपे गोपिकामध्यभागीं। हृदयि धरि मना तूं लुब्ध जो रासरंगीं ॥ १ ॥

हरित वसन कासें कोटिविद्युत्प्रकाशें। नटवरवपु भासे रासरंगीं उभासे ॥
गवळणि गुण वाचें वर्णिती माधवाचे। हरित मन जनाचें मालिनीमाजि साचे ॥ २ ॥

कर्णी रत्नमणी मृगांक तरणी तेजोप मोठे गणी।
केयूरें रमणीय कौस्तुभमणी कासे झणत्किंकिणी ॥
सौवर्णाभरणीं मनोहर मणी जो शोभला भूषणीं।
तो खेळे तरुणींसवें शिशुगणीं गोपाळ चूडामणी ॥ ३ ॥
माया पिच्छ जगीं विचित्र मुगुटीं रत्नें महा गोमटीं।
कामे पीत घटी मणी मगगटी मूर्ति-स्वयें धाकुटी ॥
वर्शी वीष्टपुटीं सुरेख मुकुटी खेळें कलिंदीतटीं।
भक्तीतें प्रगटी, अव्यक्त निवटी, स्वस्थान दे शेवटीं ॥ ४ ॥
कासे सोनसळा दिसे झळफळा रंगीत माळा गळा
भाळीं पीत टिळा नवीन निपुळा माळा गळा पुष्कळा ॥
कानीं पद्मकळा प्रफुल्ल सकळा गर्वें मुगधा गळा।
खेळे पद्मदलायताक्ष सकळा वेष्टीत कामाकुळा ॥ ५ ॥

सध्यारागपरागचर्चिंतवपू आरूढ जो उदिरीं।
भालीं चद्र विशाल वर्ण धवला चद्रार्क नेत्रोदरी ॥
चक्राभोजगदाङ्कुशादि धरिले हे आयुधे चौकरीं।
ध्याता नाभिलगाविचा गणपती निर्विघ्न भक्ता करी ॥ ६ ॥
पाशकार्मुकशराङ्कुशासनीं। जे धरी दुरित घोरशासना ॥
ते भजोनि शिखिवाहन शारदा। वेदशास्त्रजननी विशारदा ॥ ७ ॥
सद्गुरुसि शरणागत जावें। तो म्हणेल तितकें समजावें ॥
तेंचि बीज हृदयात जपावें। साधक मग तयात रुपावें ॥ ८ ॥
जो गोवर्धनपर्वतातळवटीं वेष्टीत गोपावळी।
ज्याच वेणुरवें हलाहल निवे, दुष्टासि जो निर्दळी ॥
ज्यातें नद्मयोषिता मधुवनीं आलिंगितीं चुबनी।
तो कल्याण कवींद्र विठ्ठल म्हणे हो श्रोतया श्रीपती ॥ ९ ॥
म्या पूर्वार्जित साधिले न तुमचे शास्त्रार्थ ना पाहिले।
श्रीसारस्वतकाव्यनाटकरसालकार ना देखिले ॥
छदोग्रथ निरीक्षिले न, यमकं चित्र विचित्रें तुर्के।
दोषा सर्व क्षमा करा चतुर हो! या धैर्य मातें निकें ॥ १० ॥
गर्वें ना फुगणें, न निंद्य करणें, निष्ठुर ना बोलणें।
युक्तायुक्त, उणें, मनी न धरणें, क्रोधे न सभाषणें ॥
पत्रा आदकणें, उगचि असणें, जाणोनि मूकेपणें।
दोषार्त चुरणे, स्तव न करणें, हीं साधुचीं लक्षणें ॥ ११ ॥
छन्दशाननिघण्नाटकरसालकारकाव्यक्रिया।
जो जाणे गुरुदेवतावर कृपा सारस्वतप्रक्रिया ॥
त्याच शुद्ध कवि च मान्य चतुरामध्यें सभामडळीं।
वर्णी विठ्ठलनाम तो कवि जगद्वद्य स्वय भूतळीं ॥ १२ ॥
वाग्देवी! उदरानिमित्त सकरा म्या पाहिल्या सुदरा।
पै नोहे जठराग्निशाति निधुरा आता कळे पाहरा ॥
गमाधा बधिरापुढें श्रम पुरा तू पावलीसी गिरा!।
हा माते! अपराध तो कविवरा सव क्षमाया मरा ॥ १३ ॥

माझी स्फूर्ति सरस्वती ! मज म्हणे बाळा क्वी विठ्ठला ! ।
मद्वत्सा ! श्रमलासि, ऐक सदया ! सांगेन जें मी तुला ॥
झाला ताप शमेल या हरिकथापीयूषपानें तुझा ।
भक्ताचे पुरवी मनोरथ हरी, संदेह नाहीं दुजा ॥ १४ ॥
श्रीसी गुप्त हरी सुधाब्धिजठरीं गेलासि मेरुदरीं ।
धाके शीत हरी हिमालयगिरी चंद्रप्रभा, अंबरीं ॥
झाला क्षीरसरित्पती शिव तरी दिग्वासलीलाधरी ।
दाते यापरि वैरवरी स्तुनि करी भूभार पृथ्वीवरी ॥ १५ ॥
जिव्हे ! तू नटवी, तुझे अनुभवीं श्रीमत सन्मानवी ।
होती लुब्ध परंतु एकहि तुला कोणीच ना गौरवी ॥
सत्कीर्ती बरवी जगात उरवी, व्युत्पन्नता बोलवी, ।
सत्संगें नटवी पवित्र पदवी देशील ऱ्या सत्कवी ॥ १६ ॥
निवे ताप देहीं असे सौख्य नाहीं । विचारूनि पाही करी हीत काहीं ॥
अदत्ता परीक्षित्य जाणो मृगाक्षी । भजे राजनाक्षी प्रभू सर्वसाक्षी ॥ १७ ॥
व्यर्थ का श्रमसि साधना मना । सोडि हे विषयभोगकामना ॥
द्रव्यलोलुप धरी जशा धना । तू करी हरिपदाब्जसाधना ॥ १८ ॥
यातें कल्पलते सुरायपुरिचें आळें नरें बांधिलें ।
साक्षेपें सुरधेनुच्या पयरसे म्या सर्वदा सिंचिलें ॥
ते बल्ली रुरचीं फुलें प्रसवली झाली निराशा मना ।
हे वाछा पुरवील कोण कविची श्री पांडुरंगाविना ॥ १९ ॥

—विद्वज्जीवन, उल्लास पहिला, श्लोक १–१९

## २

### हर्षें सती हरिस लुब्धलि माळ घाली

देशपरत्वें प्राकृतलेणें । भूषणि रत्नें द्योतत तेणें ॥
केवळ पद्मा भूभुजबाला । शोभित कंठीं चंपकमाळा ॥ १ ॥

अगुलीस नवरत्नमुद्रिका । शोभवी नृपसुता वितद्रिका ॥
भूषणें चरणिचीं कलस्वरें । गर्जनी मणियुतें घनस्वरें ॥ २ ॥
जावूनदलेणी ल्याली हरिणाक्षी । व्यजल्स्तन दोन्ही निंवाधरसाक्षी ॥
शोभे मदनाची माता नृपवाला । झागनलि कंठीं मध्यें मणिमाल ॥ ३ ॥
मुद रागडी प्रभुत मंडित वेणी । उभि राहिली जडित लेउनी लेणीं ॥
करकंकणादिरदाना विहरीणी । नृपनदिनी मधुर मञ्जुळ वाणी ॥ ४ ॥
अनग जाळिला भवें मग स्वभूमि वैभवें ।
सुतप्रदान शाभवें दिलें तया मनोभवें ॥
शरासनीं स्वसमवें क्षुरप्र योजिले जवें ।
प्रपञ्चचामरा जवें विजीति दूत लाघवें ॥ ५ ॥
मिटीमागें लागला शूळपाणी । वृंदारामें व्यापिला चक्रपाणी ॥
रंध्रें देहीं लाधला वज्रपाणी । ऐसा योद्धा पुष्पकोदण्डपाणी ॥ ६ ॥
सम्भारें भिनले परिसा रथी । गज तुरगम यापरि सारथी ॥
मदनमूर्च्छित ते जगतीतळीं । अज परात्परतेज गती तळीं ॥ ७ ॥
तुरे शख भेरी नफेन्या तुसारे । बळें गर्जती वाजवीती तुतारे ॥
दिशाचक्र धूमाधकारें दिसेना । भ्रमें भ्रांत निभ्रांत कैसा दिसेना ॥ ८ ॥
इदिरा सुनवरी नव गौरी । तो पुराण पुरुषोत्तम शौरी ॥
देखिला प्रकृतिनें परमात्मा । जो परावरजगीं जगदात्मा ॥ ९ ॥
निश्वासली विजुसमद्युति हेमकाती । उद्बोधली उडुधवप्रतिमा वसंतीं ॥
अग्रे निकी असि निरिक्षिलि नारि आली । हर्षे सती हरिस लुब्धलि माळ घाली ॥ १० ॥

—रुक्मिणीस्वयंवर, सर्ग चवथा, श्लोक २७–३६

## ३

## कूट श्लोक

कोणे एक वनी विचित्र पुतळा जेवावया बैसला ।
पात्रीं जेवण जेविता, अति बळें पात्रेंचि तो भक्षिला ॥

त्याची जे वनिता वनात फिरता सूर्यास प्रार्थी सदा।
बोले विठ्ठल हा पदार्थ उमगा षण्मासिचा वायदा॥

४

पाळणा

जो जो जो जो रे! कुळभुषणा। दशरथनंदना!॥
निद्रा करि बाळा! मनमोहना!। रामा! लक्ष्मणा!॥ ध्रु॥
पाळणा लांबविला, अयोध्येसीं। दशरथाचे वशीं।
पुन जन्मला, हृषिकेशी। कौशल्येचे कुशीं॥ बाळा जो जो रे!॥ १॥
रत्नजडित पालख। झळके अमोलिक।
वरती पहुडले कुळदीपक। त्रिभुवननायक॥ बाळा जो जो रे!॥ २॥
हालवी कौसल्या सुंदरी। धरून ज्ञानदोरी।
पुष्पे वर्षती सुरवरीं। गर्जति जयजयकारीं॥ बाळा जो जो रे!॥ ३॥
विश्वव्यापका! रघुराया!। निद्रा करि बा! सखया!।
तुजवर कुरवंडी करुनीया। सांडिन आपुली काया॥ बाळा जो जो रे॥ ४॥
येउनि वसिष्ठ सत्वर। सांगे जन्मांतर।
राम परब्रह्म साचार। सातवा अवतार॥ बाळा जो जो रे!॥ ५॥
याग रक्षुनिया अवधारा। मारुनि निशाचरा।
जाशी सीतेच्या सैंवरा। उद्धरि गौतमदारा॥ बाळा जो जो रे॥ ६॥
पर्णिल जानकी सुरूपा। भगुनिया शिवचापा।
रावण लज्जित महाकोपा। नव्हे पण हा सोपा॥ बाळा जो जो रे॥ ७॥
सिंधुजलडोहीं अवलीळा। नामें तरती शिळा।
त्यावर उतरोनी दयाळा। नेसी वानरमेळा॥ बाळा जो जो रे॥ ८॥
समूळ मर्दूनी रावण। स्थापिल विभीषण।
देव हे सोडवील सपूर्ण। आनंदेल त्रिभुवन॥ बाळा जो जो रे॥ ९॥
ऐसी चरित्रे अपार। करील मनोहर।
इतुकें ऐकूनी उत्तर। हासले रघुवीर॥ बाळा जो जो रे॥ १०॥

राम भावाचा भुकेला । भक्ताधीन जाहला ।
दास विठ्ठलें ऐकिला । पाळणा गाईला ॥ बाळा जो जो रे ॥ ११ ॥

## उद्धवचिद्धन

### ध्रुवाख्यान

उत्तमर्षी उत्तानपाद राजा । रूपवती तयास दोन भाजा ॥
कनिष्ठेसी अत्यंत प्रीति माया । पट्टराणी नावडे तया राया ॥ १ ॥
वरिष्ठेसी जाहला एक पुत्र । भक्तराज वैकुंठपाळमित्र ॥
सुकुमार आकर्णपद्मनेत्र । ठाणमाण रेखिलें जैसें चित्र ॥ २ ॥
पाच वर्षे लोटली ध्रुवाआंगीं । पिता ठाउक तो नाहिं तयालागीं ॥
पुसे मातेसी भक्तराज योगी । तात कोठें तो सांग मज वेगीं ॥ ३ ॥
म्हणे माय तान्ह्या तोचि तूझा । धराधीश बोलती ज्यास राजा ॥
येरु बोले पाहीन पिता माझा । नको जाऊं मारील राजभाजा ॥ ४ ॥
पूर्वपुण्यें सुदिन उगवला । मुलासंग तो राजगृहा गेला ॥
राजदृष्टीसन्मुख उभा ठेला । पिता पाहे तो मोह झळंबला ॥ ५ ॥
अनिवार मोहासि पूर आला । उचलोनि मांडियेें बैसवीला ॥
बाळशब्दें खेळवी तनूजाला । न साहेचि राणीस कोप आला ॥ ६ ॥
उचंबळे क्रोधाग्नि शिखा टाकी । म्हणे कोण बैसला राजअंकीं ॥
राज कैसा खेळवी कवतूकीं । ध्रुव राजा होईल निश्चयें कीं ॥ ७ ॥
धरोनीया सापत्न भाव चित्तीं । पदीं लोटोनी पाडियेला क्षीतीं ॥
रडत गेला माउली जेथ होती । न खंडेचि तें नेत्र अश्रुपातीं ॥ ८ ॥
म्हणे माय तान्ह्या काय झालें । कोण पापीयें तूज गांजियेलें ॥
मला रायें मांडियें बैसवीलें । राजभाजेनें पदीं लोटियेलें ॥ ९ ॥
बुझावीता माउली काय बोले । स्वामि जैसें मांडीस बैसवीलें ॥
नाहिं पूर्वी देवासपूजि येलें । रमारंगें स्थापिता काय चालें ॥ १० ॥

ध्रुव बोले तो देव कसा आहे । वरो कोटे तो साग ल्वलाहे ॥
तया मागा अविनाश एक ठाय । पद मागा नृटवी दुर्जी माय॥ ११ ॥
अरे बाळा वल्कल जगधारी । भस्म अगीं लाविती दिगंबरीं ॥
सर्व भोगीं उदास ब्रम्हचारी । निरजनीं धुडिती निराहारी ॥ १२ ॥
अधोमूख पचाग्नि धूम्रपानी । ऊर्ध्वबाहू आकाशिं महामूनी ॥
शीत उष्ण पर्ज य ताप तीन्हीं । जया अगीं सोशिती महामूनी॥ १३ ॥
तुझी बुद्धी बा काय वय सान । तुज काय होईल दरशन ॥
ध्रुव बोले साडीन निज प्राण । न भेटे तो देणार दरशन ॥ १४ ॥
उभा होता तैसाचि जाय वेगीं । रडत पाठीं लागली माय मार्गी ॥
पुत्र गेला रायासि दूत सागे । राय झाला घाबरा माहसंगें ॥ १५ ॥
सर्वसौख्याचें मूल बाळ माझा । ध्रुव गला घेणार राज्य ओझा ॥
त्यजिल प्राण काननीं लोकलजें । नेणा काय मारिलें दुष्टभाजें ॥ १६ ॥
ल्वलाहें लागला ध्रुवापाठीं । म्हणे बाळा आईक एक गोष्टी ॥
बुझावीतो तुज धरुनि हनूवटी । तुजवीण दाटला प्राण कठीं ॥ १७ ॥
ध्रुवबाळ चालला हृपिकेशीं । बाल्क तू भूषण आम्हा हाशीं ॥
नाहिं दूजें आमुचे सुवशासी । तुजवीण होऊ गा परदेशी ॥ १८ ॥
नको जाऊ, देईन एक गाव । ध्रुव बोले देईल देवराव ।
पाच गाव दीधलें फीर मागे । ध्रुव बोले देइजे रमारगें ॥ १९ ॥
नको जाऊ देईन एक देश । ध्रुव बोल देईल जगदीश ॥
फीर माग देईन एक प्रात । ध्रुव बोले देईल रमाकात ॥ २० ॥
अर्धराज्य दीधलें फीर त्वरित । ध्रुव बोले देईल जगनाथ ॥
सर्व राज्य दीधलें आन तूझी । ध्रुव बोले देवाम लाज माझी ॥ २१ ॥
सहज बोलाचा राग धरियेला । सहज हास्याचा निठुर कसा केला ॥
पुत्रविरहाची गमे मला रती । नमस्कारें अपराधक्षमा होती ॥ २२ ॥
प्रेममयादेचि ना सिमा नेणें । बाळशब्द आशब्द काय जाणें ॥
म्हणे उद्धवचिद्घन दयावत । शात दात आनद कृपावत ॥ २३ ॥
ध्रुवा कैसा साडिला मोह आजी । तोंड काळें जाहलें जगामाजीं ॥
ध्रुव बोले तयासि तात देवा । आता येता मी लोभ असा द्यावा ॥ २४ ॥

हरीभक्तीचा डौल कसा पाहीं । अनुतापें कोंदल्या दिशा दाही ॥
म्हणे धाव धाव गा मायबापा । कृपावंता अनंत ज्ञानरूपा ॥ २५ ॥
निरंजनीं जाउनी उभा राहे । नामघोषें तें मूळ गर्जताहे ॥
दुरूनीया काननीं मुनी पाहे । तयालागीं कैवल्य दीसताहे ॥ २६ ॥
जवळ येऊनी पुसे बाळकासी । वय सान तूं कोण वनवासी ॥
पूर्ववृत्तांत सांगे नारदासी । कृपायोगें तोषला देवऋषी ॥ २७ ॥
गुरुमनानाचोनि देव वैंचा । श्रमें बोले सर्वही वेदवाचा ॥
हस्त अभय ठेवोनि शिरीं साचा । मंत्र सांग तें द्वादशाक्षराचा ॥ २८ ॥
ध्रुवा कानीं सांगोनि मुनी गेला । जपतांचि तो हृदयि प्रकाशला ॥
लोकलीला वैकुंठपाळ आला । तया दृष्टीसन्मुख उभा ठेला ॥ २९ ॥
सर्व तेजाची एकमूस झाली । दिव्य कांतीची दीप्ति प्रकाशली ॥
चतुर्भुज सायुध घननीळी । दिव्यमूर्ती त्या ध्रुवें देखियेली ॥ ३० ॥
नमस्कारें पूजिला हृषिकेशी ॥ म्हणे देव तूं माग इच्छितासी ॥
मनोवेगाचा वास तुझे पायीं । गर्भवासें कष्टलों वदे कायीं ॥ ३१ ॥
धराधीश कीं स्वर्गभोगवासी । करूं इंद्र कीं सांग आपणासी ॥
तुझे भक्तीचा डौल कसा देईं । पद दीजे नुठवी दुजी आई ॥ ३२ ॥
देवयानीं वाहोनि ध्रुव नेला । अढळसुपदीं नेवोनि बैसवीला ॥
ध्रुवाख्यान ऐकती गाति वाचे । ध्रुवलोकीं अक्षयी वास त्याचें ॥ ३३ ॥
ब्रह्मानंद आनंद थोर झाला । अढळपदीं तो ध्रुव बैसवीला ॥
बाळशक्तीची बहुत धन्य झाली । शिरीं सुरवरीं सुमनवृष्टि केली ॥ ३४ ॥
चंद्रसूर्यादि ग्रहगण तारा । मुनी सर्व घालिती ज्यास फेरा ॥
औदार्यचि क्षीराब्धिशयनाचे । उद्धवचिद्घन गुण गाय त्याचे ॥ ३५ ॥

* * *

वैकुंठाहुनि तो गरूड हरिनें तात्काळ पालाणिला ।
जेथें उग्रतपें धरूनि महिला त्या पर्वतीं स्थापिला ॥
शक्ता दुर्लभ उच्च थोर पद जें तेथें ध्रुव स्थापिला ।
मेरूचे शिखरीं अनंतकविनें लक्षोनिया वंदिला ॥

* * *

खळाळुनि जलौघ तो करित भोंवरे चालला।
तयात फिरती तरी करिति अप्सराच्या कला ॥ ९ ॥
हिमाद्रिभव चालता पवन पत्रपुष्पें जळीं।
समर्पण त्रिवेणिच्या करि म्हणोनि झाला बळी ॥
तटानिकट भूरुह श्रमहर स्वयें वाकले।
जनासि सुख द्यावया सुजन सगतीच्या फळें ॥ १० ॥
उभय बाजुनें चित्र तरूची दाट लागली छाया।
पाथस्थाला सुखकर मोठी श्रमहर मार्गी जाया ॥ ११ ॥
जंबु कवट सुरदास नारळी केळि पोफळी आंबे।
फणस पेरु आणि लिंबतरूच्या भरले तीर कदंबें ॥ १२ ॥
सरल कुब्ज वनवृक्ष सातवण प्लक्ष दाडिमी चाफा।
शाल ताल किति तमाल उत्तर घालविती जन-तापा ॥ १३ ॥
मदारामल बकुल बिल्वकुट अशोक चंदन जाती।
तृप्ति नैसर्गे पक्षि सर्वदा भागिरथीगुण गाती ॥ १४ ॥

# नरहरि

*गंगारत्नमाला*

पाणी सुनिर्मळ जिथें अतिरम्य भासे। मोठे ल्हान फिरती अगणीत मासे॥
तैसेच कच्छप असंख्य जळांत कांहीं। तीरीं बहूत रमती तप ध्यावयाही॥ १॥
भौरे अनंत फिरताति अगाध पाणी। तेथील नक्र समुदाय न अंत जाणी॥
लाटावरा भिडति येउनि उच्च लाटा। तीरास लागति न होय जळांत साठा॥२॥
एकापुढें एक सहस्र नावा। धावोनि जाताति नसे विसावा॥
तरंग वेगें वर खालिं होती। होड्या किती त्यातुनि पार जाती॥ ३॥
भागीरथी शब्द करीत वेगें। येऊन सारी यमुनेसि मार्गें॥
येतां तिचा ओघ मिळोनि दोघी। प्रेमें पुढें चालति पूर्व भागीं॥ ४॥
भागीरथीचें अति शुभ्र वारी। काळी दिसे सूर्यसुताहि भारी॥
दोघीमधें जे जल लाल आहे। सरस्वती ती प्रकटोनि वाहे॥ ५॥

आकाशापरि तोय त्यांत ढगसे फेनौघ ते चालती।
उर्मी अभ्रि तशा सशब्द लहरी विद्युल्लता हालती।
नावा त्यांत विमानपंक्ति तळिचीं मोतीं जशा तारका।
रामा विष्णुपदासि याचि धरि तूं चित्तीं सदा तारका॥ ६॥
नरामर शतावधी पुलिनिं बैसुनी ते किती।
सुधारससमान त्या अति अमृत तोया पिती॥
सुकांत पुलिनांत ते पसरले दुहीं वालुका।
रमे जननि पाजवी पय धरोनि तेथें मुला॥ ७॥
मृदु सुगड वाळुका लखलखीत शोभे वरा।
हिरे चुरुनि वोपिले म्हणुनि स्वच्छ तेजा धरीं॥
सुरें भरित मत्स्य ते वरिवरी उड्या मारिती।
सुरा कळविती न तीं वरि जळीं आम्हां जीं रती॥ ८॥
मदांध गज आतुनी करिनि जीं करामें वरी।
करेणुसह चालतां दिसति पंकजाचे परी॥

सळाळुनि जळौघ तो करित भोवरे चालला।
तयात फिरती तरी करित अप्सराच्या कला ॥ ९ ॥
हिमाद्रिभर चालता पवन पत्रपुष्पें जळीं।
समर्पण त्रिवेणिच्या करि म्हणानि झाला नळी ॥
तरानिकर भूरुह श्रमहर स्वयें वाकले।
जनासि सुख द्यावया सुजन सगतीच्या फळें ॥ १० ॥
उभय बाजुनें चित्र तरूची दाट लागली छाया।
पांथस्थाला सुखकर मोठी श्रमहर मार्गी जाया ॥ ११ ॥
जनु कवट सुरदास नागळी फळि पोफळी आवे।
फणस पेरु आणि लिंबतरूच्या भरले तीर कदवे ॥ १२ ॥
सरल कुब्ज वनवृक्ष सातवण प्लक्ष दाडिमी चाफा।
शाल ताल किति तमाल उतर घालतिती ज्नन–तापा ॥ १३ ॥
मरागमल नकुल बिल्वकुर अशोक मदन जाती।
पक्षि नैसर्गें पक्षि सर्वदा भागिरथीगुण गाती ॥ १४ ॥

—श्लोक १३५–१४८

## देवीदास ( देवदास )

### १

### व्यंकटेशस्तोत्र

ओं नमोजी हेरंबा। सकळारंभ तू प्रारंभा। आनंदूनि तुझी स्वरूपशोभा। वदन भार्य करीतसे ॥ १ ॥ नमन माझें हंसवाहिनी। वाग्वरदे विलासिनी। ग्रंथ वदावया निरूपणीं। मातार्थराणा करामाजीं ॥ २ ॥ नमन माझ गुरुवर्या। प्रकाशरूपा तू स्वामिया। स्फूर्ति द्यावी ग्रंथ वदावया। जेणें आतरा सुख वाटे ॥ ३ ॥ नमन माझें संतसज्जना। आणि योगिया मुनिजना। सकळ श्रोतया

सज्जना । नमन माझें साष्टांगीं ॥ ४ ॥ अथ ऐका प्रार्थनाशतक । महादोषासी दाहक । तोषूनिया वैकुंठनायक । मनोरथ पूर्ण करील ॥ ५ ॥ जयजयाजी व्यंकटरमणा ॥ दयासागर परिपूर्णा । परज्योति प्रकाशगहना । करितो प्रार्थना श्रवण कीजे ॥ ६ ॥ जननीपरी त्वा पाळिलें । पितयापरी त्वा सांभाळिलें । सकळ संकटापासूनि रक्षिलें । पूर्ण दिधलें प्रेमसुख ॥ ७ ॥ हें अलौकिक जरी मानावें । तरी जग हें सृजिलें आघवें । जनकजननीपण स्वभाव । सहज आलें अंगासी ॥ ८ ॥ दीननाथा प्रेमासाठीं । भक्त रक्षिले संकटीं । प्रेम दिधलें अपूर्व गोष्टी । भजनासाठीं भक्ताच्या ॥ ९ ॥ आता परिसावी विज्ञापना । कृपाळुवा लक्ष्मीरमणा । मज घालोनि गर्भाधाना । अलौकिक रचना दाखविली ॥ १० ॥ तुज न जाणता झाला कष्टी । आता दृढ तुझे पायीं घातली मिठी । कृपाळुवा जगजेठी । अपराध पोटीं घालीं माझे ॥ ११ ॥ माझिया अपराधाच्या राशी । भेदोनि गेल्या गगनासि । दयावंता हृषीकेशी । आपुल्या ब्रीदासी सत्य करीं ॥ १२ ॥ पुत्राचे सहस्र अपराध । माता काय मानी तयाचा खेद । तेवीं तूं कृपाळू गोविंद । माय बाप मजलागीं ॥ १३ ॥ उन्दामाजी काळेंगोरें । काय निवडाव निवडणारें । कुचरियाचीं वृक्षफळें । मधुर कोठोनि असतील ॥ १४ ॥ अरटीलागीं मृदुता । कोठोनि असेल कृपावंता । पाषाणासी गुल्मलता । केशियापरी फुटतील ॥ १५ ॥ आपाद मस्तकावरी अन्यायी । परी तुझें पदरीं पडिलों पाहीं । आता रक्षण नाना उपायीं । करणें तुज उचित ॥ १६ ॥ समर्थाचे घरींचे श्वान । त्यास सवही देती मान । तैसा तुझा म्हणवितो दीन । हा अपमान कवणाचा ॥ १७ ॥ लक्ष्मी तुझे पायातळीं । आम्हीं भिक्षेसी घालोनि झोळी । येणें तुझी ब्रीदावळी । कैशी राहील गोविंदा ॥ १८ ॥ कुबेर तुझा भांडारी । आम्हा फिरविसी दारोदारीं । यात पुरुषार्थ मुरारी । काय तुजला प आला ॥ १९ ॥ द्रौपदीसी वस्त्रें अनंता । देत होतासी भाग्यवंता । आम्हालागीं कृपणता । कोठोनि आणिली गोविंदा ॥ २० ॥ मानेची करूनि द्रौपदीसती । अन्नें पुरविली मध्यरात्रीं । ऋषीश्वराच्या बैसल्या पंक्ती । तृप्त केल्या क्षणमात्र ॥ २१ ॥ अन्नासाठी दाही दिशा । आम्हा फिरविशी जगदीशा । कृपाळुवा परमपुरुषा । करुणा कैशी तुज न ये ॥ २२ ॥

—ओव्या १ २२

# २

## भामेचा शृंगार

शरत्काळिच चांदण । वाट पाहे भामा जाण । सर्वहि शृंगार करून । बसे सुंदरा ॥ १ ॥ मुक्ताफळ घातलें नाकीं । हस्ती कंकणें वोप देती । पदक डोल्हा ढाळ देती । करी शृंगार ॥ २ ॥ माथा सिसफुल वदनाचे । त हो निशाण मदनाचे । मुद राखडि लेणें वेणीचें । करी शृंगार ॥ ३ ॥ दोहीं कानींचीं तान वडें । गोरें रूप दिसे गाडें । झुगव्या झुबकभळयाच्या जोडें । लेणें कानाने ॥ ४ ॥ कपाळि शोभतसे हिंगळ । सकळा शृंगाराचा भगरा । जेवि का दृष्टी दिसे तारा । तेज तेजीं ॥ ५ ॥ कंठीं शोभे मोहनमाळ । हस पुतळ्या तेज कल्लोळ । नाम्बुर लेणें सुढाळ । करा शृंगार ॥ ६ ॥ दोहीं करी जडित कांकणें । गोरीं शोभा अपूर्व जाणें । अगुळि दशागुळाचें लेण । लेत सुदंग ॥ ७ ॥ कटीं त्यालीसे कडदोरा । भरता नवरत्नाचा फग । जडित जडलेंस सोनारा । वेली सुंदरी ॥ ८ ॥ वाकी रुळे गुजनीया जाण । अनवट पोल्हारे संपूर्ण । तोरड करी सना गजन । ठेक माजणी ॥ ९ ॥ ऐसा सर्वही शृंगार । दर्पणीं अवलोकुनि सुंदर । जवळी ना देखुनी यादवेंद्र । होए घाबरी ॥ १० ॥ उकल्ला उकला माझी वेणी । मज हे भासतसे सर्पिणी । क देखेन चक्रपाणी । करू मी काय ॥ ११ ॥ अगीं न लवा वो चन्दन । व्याकुळ होतसे माझा प्राण । तया सारंगधराचाचुन । करू मी काय ॥ १२ ॥ आता होती गत मध्यानी । वाटे दिवसाचा हा तरणी । मज पोळवी उष्णा किरणी । करू मी काय ॥ १३ ॥ केव्हा देखेन देव मुरारी । अग्न लागला त्याविण शरिरीं । विरहें दाटलि सुंदरी । नावडे काहीं ॥ १४ ॥ म्हणे म्या धरिली तुझी कास । तरि का नागसि उदास । झडकरि पुर्वी माझी आस । पाव हर्षीकेशी ॥ १५ ॥ करुणोत्तरे बाहे सुंदरी । ऐकुनि प्रगटला श्रीहरी । मंचकीं देखुनिया मुरारी । येरा सद्गद ॥ १६ ॥ भामेच्या चित्तीचा आनंद । पाना देवदास सद्गद । ऐसा लाघवी हा मुकुंद । तारी भक्तांला ॥ १७ ॥

मजविण त्या युगसम घटका ।
आठवतें प्रेम जयाचें ॥ उद्धवा ॥ २ ॥
पतिसुतादि गृहधन, त्यजिलें, मजवरती धरुनी ममता ।
मानिलें तुच्छ अपवर्गा, मजसगें निश्चळ रमता ।
मद्दत्तचित्त त्या गोपी, नेत्रांतरिं लावुनि समता ।
तिळतुल्य नाहिं मनि उगल्या ।
दृढ निश्चय धरुनी तगल्या ।
बहुधा त्या नसतिल जगल्या ।
भगले मनोरथ ज्यांचे ॥ उद्धवा ॥ ३ ॥
हरि आहे सुखरूप म्हणुनी, भेटताचि त्या सागावें ।
साग कीं समस्ता पुशिलें, प्रत्युत्तर त्या मागावें ।
करुनिया ज्ञान तयांत, साग कीं शोक त्यजावे ।
हें कार्य नव्हे तुजजोग ।
मजसाठीं जावें वेग ।
हें मध्वमुनीश्वर सागे ।
त्या न पवे ज्ञान जयाचें ॥ उद्धवा ॥ ४ ॥

## २

### भूपाळी

उठोनिया प्रात काळीं विनवी कौसल्यामाता ।
मगल आरतीसमयो जाला जागृत होई रघुनाथा ॥ ध्रु ॥
आले नित्य होम देउनि सद्गुरु वसिष्ठ ।
व्यास वाल्मिक विश्वामित्र ज्ञानी वरिष्ठ ॥
आले सनकादिक योगी तुझिये भेटी ।
त्यासी हितगुज बोलावें त्वा जगजेठी ॥ १ ॥
काढुनि प्रावरण दावीं तुझिया मुखचद्रा ।
स्वरूपी सावध झाला त्याला कची मग निद्रा ॥

सुगंधशीतल येतो तुळशीचा वारा ।
तुझा प्रताप देखुनि दिनकर गगनीं लोपल्या तारा ॥ २ ॥
सुमनसेज होती त्याची सार्थकता केली ।
पक्षी करिती कल्लोळ छाया दीपाची गेली ॥
द्वारीं वंदीजन मागध करिती गर्जना ।
वर्णिति वंशावळी तुझी सुंदर रघुनंदना ॥ ३ ॥
अनंत वाद्यें वाजतीं त्यांचा होतो जयघोष ।
रामा तुझिये स्मरणें सर्वही जाती भवदोष ॥
शरयू भागीरथी यमुना जळ आल्या घेउनी ।
वदन प्रक्षाळुनी त्यां गौरवीं तांबूल देऊनी ॥ ४ ॥
कस्तूरी मळवट रेखुनि पाहीं निर्मळ आरसा ।
रघुकुलटिळक मध्वनाथा विजयी होई फारसा ॥
श्रद्धाभक्ति प्रातःकाळीं स्मरती जे भावें ।
भवसिंधूचें पैलतीरीं धांवती स्वभावें ॥ ५ ॥

## श्रीधर

[ इ. स. १६७८–१७२८ ]

### १

### कृष्णप्रयाणाचे वेळचा हाहाःकार

गोपींच्या शोकास नाहीं पार । जैसा वनासी निघतां रघुवीर । पाठीं लागलें अयोध्यानगर । तैसेंच येथें जाहलें ॥ १ ॥ जीवनाविण मत्स्य जैसे । गोकुळींचे लोक तळमळती तैसे । यशोदेसी मूर्च्छा येतसे । धांवतसे रथापाठीं ॥ २ ॥ माझिया विसांविया जगजीवना । मुख पाहूं दे जगमोहना । आला मज प्रेमाचा पान्हा । पाजूं कोणा सांग पां ॥ ३ ॥ माझे सांवळे कान्हाई । उभीं गे राजसे

कृष्णाबाई । तुजवेगळ्या दिशा दाही । ओस मज वाटती ॥ ४ ॥ कृष्णा मज परी झाली कैशी । तान्हें बाळ टाकूनि परदेशीं । माता जाय सहगमनासीं । गति तैसी मज झाली ॥ ५ ॥ कीं काटेवनांत आंधळे जातां । सांगाती टाकून जाती अवचितां । तैसें मज केलें कृष्णनाथा । पुन्हा मागुता न भेटसी ॥ ६ ॥ ऐका पद्मपुराणींचे संमत । राधा तेथें आली धावत । रथापुढें येऊनि त्वरित । ध्यान हरीचें विलोकिलें ॥ ७ ॥ हरिस्वरुपीं लावूनि नेत्र । हृदयीं सांठविला यादवेंद्र मग कृष्णचरणीं ठेविलें शिर । झालें थोर नवल पैं ॥ ८ ॥ जैसें उदकीं मिळे लवण । तैसी राधा गेली अदृश्य होऊन । हरिरूपीं झाली लीन । दुसरेंपण हरपलें ॥ ९ ॥ थोर जाहला चमत्कार । राधा हरिरूप जाहली साचार । गोपी तटस्थ समग्र । वानिती भाग्य राधेचें ॥ १० ॥ नाना साधनें योगी साधिती । त्यांसीही ऐसी नव्हे गती । धन्य धन्य राधा पुण्यमूर्ती । हरिस्वरूप जाहली ॥ ११ ॥ असो हरि म्हणे अक्रुरा । आतां रथ चालवी सत्वरा । तरीच या गोपिका सुंदरा । मागें दूरी राहती ॥ १२ ॥ रथ घडघडिला समीरगती । क्रमूनी मागें टाकिली जगती । तेव्हां मूर्च्छा येऊनि गोपिका पडती । हांका देती कृष्णामागें ॥ १३ ॥ कपाळ पिटूनि फोडिती हाका । अहा कमलावरा वैकुंठनायका । आपुले हातें गोपिका । वधूनि जाई आतांचि ॥ १४ ॥ आतां केव्हां देखों पुढतीं । एक हातें केश तोडिती । रथ क्रमीत जात क्षिती । दृष्टी पाहती सुंदरा ॥ १५ ॥ म्हणती प्राणसखया वनमाळी । तुझा वियोगानळ परम जाळी । एक म्हणती रथाजवळी । धांवूनि जाऊं चला गे ॥ १६ ॥ अक्रूरासी घालूनि कृष्णाची आण । रथ आणावा वेगें परतोन । नेदी तरी बळेंचि हिरोन । आणूं मनमोहन आतांचि ॥ १७ ॥ आम्ही आहों इतुक्या सुंदरी । अक्रूर एकला काय करी । तो रथ गेला बहुत दूरी । विकल नारी पडियेल्या ॥ १८ ॥ म्हणती वेधका परमपुरुषा । तुजविण ओस दाही दिशा । क्षीरसागर हृदयविलासा । जातोसि कैसा टाकूनि ॥ १९ ॥ चारी ध्वज आणि कळस । रथ उतरता सकल भूमीस । न दिसे कांहीं निराश । थोर गोपींस जाहलेसे ॥ २० ॥ अवघ्या गोपी आक्रांत करित । गोकुळा परतल्या स्फुंदत । एक म्हणती अग्नि त्वरित । लावा आतां गोकुळा ॥ २१ ॥ ऐसा शोक करिती सुंदरी । प्रवेशल्या यशोदेच्या मंदिरीं । तों यशोदा म्हणे ते अवसरीं । माझा श्रीहरी दावा गे ॥ २२ ॥ यशोदा

मंदिरात हिंडे रडत। म्हणे आता मन वेंचा गे कृष्णनाथ। तो वैकुंठनाथ समर्थ। टाकूनि यथार्थ मज गेला ॥ २३ ॥ सकळ गोपी यशोदेचे कंठीं। घालिती तेव्हां दृढ मिठी। शोक केला तो न माये सृष्टीं। न वर्णवेचि कोणातें ॥ २४ ॥ शुकें वर्णिता हे कथा। सद्गदकंठ जाहला तत्वता। शुकासी जाहली जे अवस्था। ते वर्णिता मज न ये ॥ २५ ॥ आणि सद्गद जाहला परिक्षिती। ढळढळा नयनीं अश्रु वाहती। म्हणे श्रीकृष्ण वेधकमूर्ती। त्याचीच कीर्ती सांगा पुढें ॥ २६ ॥ असो यशोदा सांगे गोष्टी। सख्यांनो घर लागते गे पाठीं। आता माझा जगजेठी। पुन्हा दृष्टी पडेना ॥ २७ ॥ कृष्णाचीं जीं नाळ लेणीं। टाकिलीं गोपींपुढें आणूनी। हरीचीं खेळावयाचीं खेळणीं। हृदयीं धरुनि माय रडे ॥ २८ ॥ वाघनखें पदकमाळा। पाहूनि शोक करिती वेल्हाळा। आपाद गळ्याच्या वनमाळा। सदनीं ठेविल्या ठायीं ठायीं॥ २९ ॥ हरीची घोंगडी चांगली। दशियाप्रति मोतीं ओविलीं। चिमणीच हरीची मुरली। ऐकता हरिली चित्तवृत्ति ॥ ३० ॥ हरीचा चिमणा पीतांबर। शिंदो रीचें जाळें सुंदर। शिरींचीं पिच्छें परिकर। करींचा वेत्र रत्नजडित ॥ ३१ ॥ वनमाळांचे ठेविले जे भार। त्या सुवासें दाटलें मंदिर। माया म्हणे पूर्वकर्म घोर। आड आलें बळेंचि ॥ ३२ ॥ पूतना शोषून अघबक मारिला। कालिया मर्दून अग्नि प्राशिला। गोवर्धन नखाग्रीं धरिला। शक्रही आला शरण ज्यासी ॥ ३३ ॥ गर्ग नारदादि मुनिजन। मज क्षणक्षणा सांगती येऊन। हे क्षीरसागरीचें निधान। तुझे पोटीं अवतरलें ॥ ३४ ॥ ऐसे सांगती क्षणक्षणा। परी सत्य न वाटे माझिया मना। दशावतारींच्या दिव्य रचना। क्रीडता दाविल्या हरीनें ॥ ३५ ॥ पूर्ण ब्रह्म सांवळें। म्यां पायांवरी घेऊन न्हाणिलें। आपल्या पदरें अंग पुशिलें। वैकुंठपतीचें नेणता ॥ ३६ ॥ पूर्ण अवतार श्रीकृष्णनाथ। उखळीं बांधिला न कळत। जळोत जावोत गे माझे हात। जाहल्यें भ्रांत मायेनें ॥ ३७ ॥ ब्रह्मादिकांची आराध्य मूर्ति। त्यासी मी पाठवीं वना प्रती। गुरें राखविलीं निश्चितीं। अपराधा मिती नाहींच ॥ ३८ ॥ ज्यासी वर्णिता भागलीं दर्शनें। त्यासी ये रे जा रे म्हणें। ठकलें ठकविलें जगज्जीवनें। महिमा नेणे अद्भुत ॥ ३९ ॥ हरीविण गृह दिसतें गे थोर। जीवनेंविण जैसें कासार। कीं प्राणेंविण शरीर। दीपाविण मंदिर जेवीं ॥ ४० ॥ ऐसा खेद करीत गौळणी।

प्रवेशल्या आपुल्या सदनीं। ससारकृत्य करिता चक्रपाणी। गीतीं गाती सर्वदा ॥ ४१ ॥

—हरिविजय (इ. स. १७०७), अध्याय अठरावा, ओव्या १०६–१४६

## २

## अभिमन्युवध

जो सच्चिदानंद कमळापती। तो जाहला पार्थाचा सारथी। जो निजभक्ताचे मनोरथीं। बैसोनि सूत्र हालवी ॥ १ ॥ मारोनिया भगदत्त। विजयी जाहला अद्भुत। यावरी समसप्तकाकडे रथ। चालविला त्वरेने ॥ २ ॥ मिळाले त्रिगर्त समशप्तक। सुशर्मा असे त्यात मुख्य। वेगळें युद्धबड देख। अनर्थकारक ओढवलें ॥ ३ ॥ युद्धास गोविला अर्जुन। इकडे काय जाहलें वर्तमान। चक्रव्यूह गुरुद्रोण। रचिता झाला अद्भुत ॥ ४ ॥ सुपर्णव्यूह पांडव रचित। धर्मास अवघेचि रक्षित। युद्ध मांडिलें अद्भुत। द्रोणें आणि भीमसेनें ॥ ५ ॥ नकुल सहदेव पांचाळ। अवघे युद्ध करिती सबळ। परी चक्रव्यूह भेदावया बळ। कोणासही दिसेना ॥ ६ ॥ धर्म म्हणे असता पार्थ। तरी हा व्यूह भेदी निश्चित। तों पुढें येऊन सुभद्रासुत। अभिमन्यु विनवीतसे ॥ ७ ॥ ताता मज आज्ञा द्याल जरी। तरी हा व्यूह भेदीन निर्धारीं। धर्म म्हणे ते अवसरीं। तूं बालक सुकुमार ॥ ८ ॥ मग बोले पार्थनंदन। आम्हा क्षत्रिया रण हेचि धन। ताता तुमचे दर्येकरून। व्यूह फोडून जाईन मी ॥ ९ ॥ परम सुंदर सुभद्रासुत। रूपासी तुळिता उणा मन्मथ। दुसरा कृष्णचि मूर्तिमंत। विराटजामात तो होय ॥ १० ॥ घनश्यामवर्ण राजीवनयन। आजानुबाहू सुहास्यवदन। जो पांडवांसी प्राणाहून। आवडता पाचांसही ॥ ११ ॥ ऐसा तो उत्तरावर। रथावरी चढला सत्वर। उदयाद्रीवरी दिनकर। तैसा सुंदर दिसतसे ॥ १२ ॥ केला धर्मास नमस्कार। युद्धा निघाला पार्थकुमार। तों एकदात राजपुत्र। व्यूह पूर्ण रक्षिती ॥ १३ ॥ व्यूह भेदित जाय सौभद्र। दशसहस्र मारिले कुंजर। एक अयुत महावीर। अश्वासहित पाडिले ॥ १४ ॥ एक अयुत महारथी। तात्काळ

पाडी उत्तरापती । जेथें शंभर राजपुत्र रक्षिती । त्या स्थळासि पातला ॥ १५ ॥ दळासमवेत राजकुमार । एकल्यावरी सोडिती शर । परी तो आनकदुंदुभी-कन्याकुमार । तितुके तोडी क्षणमात्रे ॥ १६ ॥ तितुक्याचेही बाणजाळ । एकसरें भेदी सुभद्राबाळ । जैसें उगवतां सूर्यमंडल । भगणें सर्व लोपती ॥ १७ ॥ एक उठतां विनायक । असंख्य संहारी दंदशूक । कीं सुटतां चंडवात देख । जलदजाल वितुळत ॥ १८ ॥ कीं विष्णुनामेंकरून । असंख्य दुरितें जाती पळोन । कीं चेतता कृशानन । असंख्य वनें दग्ध होतीं ॥ १९ ॥ कीं मूढाचें वाग्जाल समस्त । एकाच शब्दें खंडी पंडित । कीं एक सिंह गज बहुत । पडती गतप्राण होउनी ॥ २० ॥ हृदयीं प्रकटतां बोध । सहपरिवारें पळती कामक्रोध । कीं प्रत्यय येता ब्रह्मानंद । क्षुद्रानंद विरधळती ॥ २१ ॥ तैसा एकलाचि धनंजयकुमार । परी सैन्य केलें अवघें जर्जर । कोणी वरी उचलिताच कर । शस्त्रासहित भुजा छेदी ॥ २२ ॥ दुर्योधनसुत जो लक्ष्मण । त्यासीं युद्ध केलें निर्वाण । घेतला तात्काळ त्याचा प्राण । शीर उडवून पाडिलें ॥ २३ ॥ पृथक् पृथक् युद्ध केलें । शतही राजपुत्र पाडिले । अष्ट कौरव मारिले । दुर्योधनाचे बंधु पैं ॥ २४ ॥ बाण सोडित धांवला कर्ण । दों बाणीं भेदिले त्याचे कर्ण । आग टाकून भानुनंदन । पळता जाहला एकीकडे ॥ २५ ॥ दशबाणीं सुयोधन खिळिला । द्रोण पंचबाणीं विंधिला । जयद्रथ पळविला । एकाच बाणेंकरूनी ॥ २६ ॥ अश्वत्थामा कृपाचार्य । हेही पळती गतवीर्य । देखोनी अभिमन्यूचें शौर्य । द्रोण मस्तक डोलवी ॥ २७ ॥ पूर्ण होय हा प्रतिअर्जुन । ऐसें बोले गुरुद्रोण । तो क्रोधें संतप्त दुर्योधन । आचार्याप्रति बोलत ॥ २८ ॥ जैसा मदें मातला शूकर । जिव्हेनें चोखितां छेदी जिव्हार । तैसा तूं आमुचा हितकर । पाहसी क्षुद्र सर्वदा ॥ २९ ॥ माझा प्रियपुत्र लक्ष्मण । येणें मारिला न लागतां क्षण । अजुनि काय पाहतां निर्वाण । घ्यावा प्राण आजि याचा ॥ ३० ॥ व्यूहीं सांपडला पार्थकुमार । तों सहा जण महावीर । सोडिते जाहले निर्वाणशर । एकलिया बाळावरी ॥ ३१ ॥ सुकुमार तो सौभद्र । एकल्या हाणिती महावीर । चहूंकडे तो पाहे सुंदर । आपुलें कोणी दिसेना ॥ ३२ ॥ असता जरी पिता अर्जुन । तरी साह्य करिता एथें पूर्ण । जयद्रथ असे व्यूह धरुन । शिववरद तो नाटोपे ॥ ३३ ॥ आक्रांत झाला पाडवदळीं । जवळी नाहीं पार्थ वनमाळी । व्यूह फोडी ऐसा बळी । कोणी नाहीं

पाठविल्या संग्रामा ॥ ५४ ॥ अहो धर्म भीम माद्रीसुत। धिक् जळो तुमचा पुरुषार्थ। हे विराट पांचाल भूभुज समस्त। धिक जीवित हिंडता ॥ ५५ ॥ उपलव्य नगराहुनी। उत्तरा सुभद्रा द्रौपदी धांवोनी। येत्या झाल्या तेच क्षणीं। हृदय पिटिती अतिदुःखें ॥ ५६ ॥

—पांडवप्रताप (इ. स. १७१२), अध्याय पंचेचाळिसावा,
ओव्या १-५६

## ३

## चांगुणाविलाप

तिचें पाहतां मग वदन। काळवंडला रोहिणीरमण। मृगशावाक्षी गुण-निधान। उपमा नाहीं स्वरुपातें ॥ १ ॥ म्हणे कोमलांगा बाळा सुकुमारा। सुलक्षणा सुशीला किशोरा। सुहास्यवक्त्रा राजीवनेत्रा। येवोनी उदरा धन्य केलें ॥ २ ॥ तूं सुकुमार परमगुणवंता। माझे निष्ठुर घाव लागती माथां। तुजवीण परदेशी आतां। दुबळी भणंग झालें मी ॥ ३ ॥ कुच–मंडळीं अति–सुंदरा। कंचुकीबाहेर फुटल्या दुग्धधारा। कीं भूलिंगासी एकसरा। गळत्या लाविल्या तियेनें ॥ ४ ॥ म्हणे अतीत जेवोनी अवधारीं। जाऊं दे राजद्वाराबाहेरी। देह त्यागीन ये अवसरीं। यावरी धीर न धरवे पैं ॥ ५ ॥ कैलास पंथ सखया लक्षून। एकला जातोसी मज टाकून। तुझे संगतीं मी येइन। उभा राहें क्षणभरीं ॥ ६ ॥ तूं मोक्षद्वीपींचें केणें भरुन। जासी कैलासराजपेठ लक्षून। तुजसंगतीं मी उद्धरेन। मज टाकूनि जाऊं नको ॥ ७ ॥ उदकावीण जैसा मीन। तैसी मी तान्हया तुजवीण। माझें हृदय निर्दय कठीण। लोकांत वदन केविं दावूं ॥ ८ ॥ तुझी माउली मी म्हणतां। लाज वाटे रे गुणवंता। तुवां आपुली सार्थकता। करुनि गेलासी शिवपदा ॥ ९ ॥ हें त्रिभुवन शोधितां सकळ। तुज ऐसा न दिसे बाळ। मग तें पचवूनि तात्काळ। उठा म्हणे अतीतातें ॥ १० ॥ अतीत म्हणे अवनीपती। उठा तुम्ही यजमान माझे पंक्ती। ऐसें ऐकतां श्रियाळ नृपती। झाला निश्चीं

पाडवात ॥ ३४ ॥ युद्ध करित अभिमन्य। कर्णें सोडिले निर्वाण बाग। हातींचें धनुष्य तोडुन। बाणभाता छेदिला ॥ ३५ ॥ सारथी घोडे ते वेळे। द्रोणाचार्यें मारिले। मग अभिमन्यूनें खड्ग घेतलें। रथावरुन उतरला ॥ ३६ ॥ जैशी वीज लखोनि जाये। तैसा अभिमन्यु तळपताहे। तो दुर्योधनें लवलाहे। खड्ग छेदिलें हातींचें ॥ ३७ ॥ मग गदा घेऊन पार्थसुत। अमित वीरातें पाडित। तों दु शासनें त्वरित। गदा छेदिली हातींची ॥ ३८ ॥ मग घेतलें रथचक्र। तळपतसे सुभद्राकुमार। जैसा श्रीकृष्ण चक्रधर। तैसा वीर दिसतसे ॥ ३९ ॥ कर्ण द्रोण दुर्योधन। सोडिती बाणापाठीं बाण। हातींचें रथचक्र जाण। अश्वत्थाम्यानें छेदिलें ॥ ४० ॥ तों दु शासन पुत्र दौ शासनी। वेगें आला गदा घेउनी। अभिमन्यूनें तये क्षणीं। गदा घेतली दुसरी ॥ ४१ ॥ दोघीं गदायुद्ध मांडिलें। सकळीं बाणजाळ घातलें। दौ शासनीस केलें। अभिमन्यूनें मूर्च्छित ॥ ४२ ॥ सवेंच दु शासनसुतें। हाणीतलें अभिमन्यूतें। दोघेही पावले मूर्च्छेत। गदाघातें एकमेकां ॥ ४३ ॥ मूर्च्छा सावरोन दौ शासनी। वेगें आला गदा घेउनी। निकल सौभद्र पडला रणीं। त्याचे मस्तकीं घातली ॥ ४४ ॥ तेणें चूर्ण जाहले शिर। पडला पडला पार्थकुमार। तों आकाशवाणी वदे उत्तर। धर्मयुद्ध नव्हे हें ॥ ४५ ॥ सकळ दळभार एकवटला। भांवता पाहावया पाळा पडला। त्यात जयद्रथें हाणीतला। अभिमन्यु लातेनें ॥ ४६ ॥ द्रोणें धिक्कारलें जयद्रथा। दुर्जना वीरास हाणिसी लत्ता। त्या अभिमन्यूनें बाण सोडिता। पळालासि त्वरेनें ॥ ४७ ॥ कौरव गेले समस्त। अभिमन्यु धायें विलपत। श्रीहरींचें नाम स्मरत। वाट पाहात पार्थाची ॥ ४८ ॥ पाडवदळीं आकात दारुण। धर्मराज करी रोदन। आता येइल अर्जुन। त्यास वदन काय दाखवूं ॥ ४९ ॥ दिवस गेला अस्तमानासि। वधोन येता समसप्तकांसी। अपशकुन पार्थासी। मार्गी येता बहुत होती ॥ ५० ॥ धर्माजवळी आला अर्जुन। अवघे बैसले अधोवदन। पार्थ पुसे कोठें अभिमन्य। का उत्साह मंदिरीं दिसेना ॥ ५१ ॥ धर्म बैसला अधोवदन। का मौन धरा हो भीमसेन। म्हणती संसारमाया त्यागुन। अभिमन्यु गेला स्वर्गांत ॥ ५२ ॥ रथाखालीं पडला अर्जुन। पुत्रशोकें करी रोदन। मग श्रीकृष्णें सावरुन। सावध केलें पार्थातें ॥ ५३ ॥ अर्जुन अवघ्यास धिक्कारीत। जळो जळो तुमचा पुरुषार्थ। इतुके असता माझा सुत। का

पाठविला संग्रामा ॥ ५४ ॥ अहो धर्म भीम माद्रीसुत। धिक् जळो तुमचा पुरुषार्थ। हे विराट पांचाल भूभुज समस्त। धिक् जीवित हिंडता ॥ ५५ ॥ उपप्लव्य नगराहुनी। उत्तरा सुभद्रा द्रौपदी धावोनी। येत्या झाल्या तेच क्षणीं। हृदय पिटिती अतिदु:खें ॥ ५६ ॥

—पांडवप्रताप (इ. स. १७१२), अध्याय पंचेचाळिसावा,
ओव्या १-५६

## ३

## चांगुणाविलाप

तिचें पाहतां मग वदन। काळवंडला रोहिणीरमण। मृगशावाक्षी गुण निधान। उपमा नाहीं स्वरुपातें ॥ १ ॥ म्हणे कोमलांगा बाळा सुकुमारा। सुलक्षणा सुशील किशोरा। सुहास्यवक्त्रा राजीवनेत्रा। येवोनी उदरा धन्य केलें ॥ २ ॥ तूं सुकुमार परमगुणवंता। माझे निष्ठुर घाव लागती माथा। तुजवीण परदेशी आतां। दुबळी भणंग झालें मी ॥ ३ ॥ कुच-मंडळीं अति-सुंदरा। कंचुकीबाहेर फुटल्या दुग्धधारा। कीं भूलिंगासी एकसरा। गळत्या लाविल्या तियेनें ॥ ४ ॥ म्हणे अतीत जेवोनी अवधारीं। जाऊं दे राजद्वाराबाहेरी। देह त्यागीन ये अवसरीं। यावरी धीर न धरवे पैं ॥ ५ ॥ कैलास पंथ सरसाया लक्षून। एकला जातोसी मज टाकून। तुझे संगतीं मी येईन। उभा राहें क्षणभरीं ॥ ६ ॥ तूं मोक्षद्वीपींचें केणें भरून। जासी कैलासराजपेठ लक्षून। तुजसंगतीं मी उद्धरेन। मज टाकूनि जाऊं नको ॥ ७ ॥ उदकावीण जैसा मीन। तैसी मी तान्ह्या तुजवीण। माझें हृदय निर्दय कठीण। लोकांत वदन केविं दावूं ॥ ८ ॥ तुझी माउली मी म्हणतां। लाज वाटे रे गुणवंता। तुवां आपुली सार्थकता। करूनि गेलासी शिवपदा ॥ ९ ॥ हें त्रिभुवन शोधितां सकळ। तुज ऐसा न दिसे बाळ। मग तें पचवूनि तात्काळ। उठा म्हणे अतीतातें ॥ १० ॥ अतीत म्हणे अवनीपती। उठा तुम्ही यजमान माझे पती। ऐसें ऐकतां श्रियाळ नृपती। झाला चित्तीं

संकोचित ॥ ११ ॥ चांगुणा म्हणे नृपनाथा । सत्व राखावें सत्वर आतां । विन्मुख जाऊं न द्यावें अतीता । मनीं चिंता न धरावी ॥ १२ ॥ नव मास वाहिला म्यां उदरांत । तुम्हास जड नव्हे चौप्रहरांत । पोटींचा पोटीं घालिता सुत । चिंता काय नृपश्रेष्ठा ॥ १३ ॥ राव बैसला पंक्तीसी । ताट वाढोनि आणिलें वेगेंसी । अतीत म्हणे चांगुणेसी । तूंही येईं सवेगें ॥ १४ ॥ अवश्य म्हणोनि झडकरी । येवोनि बैसली नृपसुंदरी । यावरी अतीत म्हणे तुमच्या मंदिरीं । अन्न न घ्यावें सर्वथा ॥ १५ ॥ निपुत्रिकाचें न पहावें वदन । मग तेथें कोण घेईल अन्न । दीपेंविण शून्य सदन । पुत्रावीण तेविं तुम्ही ॥ १६ ॥ नासिकेंवांचोनि वदन । कीं वृक्ष जैसा फळावीण । कीं बुबुळावीण जैसे नयन । शून्य सदन तुमचें तेवीं ॥ १७ ॥ तंव तीं दोघें बोलतीं सद्गद । एक होता तो अर्पिला सुत । चांगुणा म्हणे गेलें सत्व । अतीत विन्मुख जाईल आतां ॥ १८ ॥ एक बाळ तो दिधला भोजनासी । आतां महाराज सत्त्व किती पाहसी । ऐसें बोलतां चांगुणेसी । अद्भुत गहिंवर दाटला ॥ १९ ॥ म्हणे सत्वही बुडालें सकळ । वृथा गेलें माझें बाळ । मग कंठ मोकळा करुनि ते स्नेहाळ । हांक फोडी चांगुणा ॥ २० ॥ नयनीं चालल्या प्रेमाश्रुधारा । म्हणे अहा शिव कर्पूरगौरा । दीर्घस्वरें बाहे उमावरा । पाव सत्वरीं या आकांतीं ॥ २१ ॥ अहा झालें वंशखंडन । न देखों पुढतीं पुत्रवदन । ऐसें ऐकतां अतीताचे नयन । सर्वां लागलें प्रेमभरें ॥ २२ ॥ बाहेर फुटली मात । वळसा थोर होत नगरांत । लोक दुःखें वक्षःस्थळ पिटीत । राजकिशोर आठवुनी ॥ २३ ॥ विमानीं दाटले सुरवर । म्हणती धन्य पतिव्रता सत्त्वधीर । ईस प्रसन्न होवोनि श्रीशंकर । काय देईल तें न कळेची ॥ २४ ॥ अतीत म्हणे चांगुणेसी । जें प्रिय असेल तुझे मानसीं । तें मज माग सद्गुणराशी । यावरी सती काय बोले ॥ २५ ॥ मज निपुत्रिक म्हणतील लोक । हा धुवोनि काढीं कलंक । ऐसें ऐकतां कैलासनायक । बोलावी म्हणे पुत्रासी ॥ २६ ॥ सत्य मानूनि अतीतवचना । दीर्घ हांक फोडीत चांगुणा । म्हणे चिलया गुणनिधाना । येईं स्नेहाळा धांवोनी ॥ २७ ॥ अतीत तुजवीण न घे ग्रास । कोठें गुंतलास खेळावयास । मार्गें तान्हें तूं पाहस । सत्त्व राखीं येवोनिया ॥ २८ ॥ तूं न येसी जरी धांवोन । तरी माझा जाऊं पाहे प्राण । दया दिया विलोकून । चांगुणा पाहे तेधवां ॥ २९ ॥

मागुती हाक फोडी वेल्हाळ। तो जैसे उगने मित्रमंडळ। तैसा धावतचि आला बाळ। पाहे श्रियाळ स्नेहभरें ॥३०॥

—शिवलीलामृत (इ. स. १७१८), अध्याय चवदावा, ओव्या १४९-१७८

## ब्रह्मदास

### १

### अल्लमाचरित्राचा आरंभ

आता वदू शिवभक्त। ज्यांचि निर्त्ति जगविख्यात। ज्यालागिं भूतलीं भूतनाथ। विचरे अव्यक्त साकार ॥ १ ॥ देहामाजि गुरुलिंग जगम। तें जागवया उपाय सुगम। प्रतिमा भजन दाखउनि अधम। लोक उत्तमपदा नेले ॥ २ ॥ भक्तिज्ञान वैराग्यकला। दीक्षा द्यावी जना सकळा। आवडी लावी जासननीला। आला भूतला सगुणत्वें ॥ ३ ॥ तो नंदिराज मानववेशीं। सुलभ जाला भाविकासि। बसप्पै या अभिधानेसी। वंदिली शिरीं पदाबुजे ॥४॥ वीरशैवी मार्ग पुरता। आचार गौरव सगह्लता। शिवभक्ति शानरता। केला आपैता नित्यक्रम् ॥ ५ ॥ करुणानिधि कैवल्यदानी। षट्भूमिका द्योतक जनीं। षड्विकारावर्जित करणी। प्रिय शूलपाणी सदा जो ॥ ६ ॥ श्रीचेन्नबसप्पा विवेकमूर्ति। वंदिता सरली यातायाती। कैलासिं गा जें अगाधकीर्ति। आवडे पशुपती मानसा ॥ ७ ॥ कामकर्दम अतरातें। लागो नेदीं निवेकहातें। उघडी योगभाडारातें। अनुभवीं पुरतें शिवसुख ॥ ८ ॥ शरणागत मनोधर्म। पूर्ण करिता विश्वकाम। सोल्लापुरीं सिद्धराम। उद्धरीं नाम जडजीवा ॥ ९ ॥ इंद्रियवृद निर्दाल्लिा। विषयपादप उन्मलिला। निःशकांतरीं प्रवेश केला। शिवसुखपदाला सतुष्ट ॥ १० ॥ शिवैक्यभक्तिसुखसमचका। आरूढ जाली महादेवी अक्का। तुकिता जियेचिया तुका। न पुरे देखा ब्रह्मगोळ ॥ ११ ॥ शरणागतजनांत:करण। अनादिमायामोहमलिन। भवितमगाह्रसजीवनें।

करीं क्षालण निजयोगें ॥ १२ ॥ तो रजककुळीं माचिदेव । विमळब्रह्मींचा गौरव । अद्वैतज्ञानिचा अनुभव । जेणें स्वयमेव प्रकटिला ॥ १३ ॥ मदलशकर ऐसिया नामी । किन्नरी ब्रह्मा भजनभूमी । भावीकामाजि अतिप्रेमी । केतै या कामी अनासक्त ॥ १४ ॥ कनप्पाग तेली भक्तराजे । ज्याचि कीर्ती ब्रह्मांडीं गाजे । कर्नाटके देशामाजि वोजें । भक्तींचि गर्जे दुदुभि ॥ १५ ॥ अनतकुर्मी अनतभक्त । भजनें तोषविला भगवत । नामे लिहितां न धरें ग्रथ । उनगती श्रोते श्रवणार्थि ॥ १६ ॥ ऐशापरी भक्तमडळी । नमोनि स्तविला चद्रमौळी । *प्रेमामृतें मनमवाळी । साधूकुळा पालवें ॥ १७ ॥ अल्पमा मसूत समई ।* सन्मार्ग द्योतिला लोकीं तिहीं । सकला लाभे सुगमोपाई । तो मी ळवळाही सागेन ॥ १८ ॥

— श्री लीलाविश्वभर ( इ. स. १७२२ ), अध्याय पहिला, ओव्या १०–२७

## २

## राजकुमारी मायेची देवपूजा

नभीं दाटला आगमुगध । वेष्टुनि चालती षट्पद । मजुळ गाजती ककणवृद । भूषणें विविध झणारिती ॥ १ ॥ पुढे गाती भाट बदीजन । स्वानंदे करिती शिवकीर्तन । अनेक वाद्यांचें परिगर्जन । कळकळाट जाग मनु ज्याचा ॥ २ ॥ ऐसीया परि माया भवानी । सहित चालिली विलासिणी । तव देखती जाली दुरुनी । विपुळनयनीं शिवाळय ॥ ३ ॥ निर्मळ तें जैसा कैलासगिरि । रौप्यतगडें मडिल्यापरि । अथवा शार्वरीश गगनोदरीं । किंवा निमलाचरी पुष्पक ॥ ४ ॥ निखिळ काश्मिरी वर्गे ळगळवित । धवळकर्पूर विराजत । विशाळ शिखरे गगनचुबित । कळस सोभित काचनाचे ॥ ५ ॥ गुढिया पताका तोरणें । रगमाळिका नानावर्णे । निर्मळ सडेसंमार्जन । मायालोचन मानले ॥ ६ ॥ येउनि महाद्वारप्रति । उतरली सुखासनापासुनी । करपदें मुख क्षालवी । जाठि महासती सादर ॥ ७ ॥ शुचिर्भूतें चद्रवदना । मृगेंद्रमध्या

कुरगनयना । अंतरीं प्रवेशुनि त्रिलोचना । केलें चरणा दंडवत ॥ ८ ॥ पुष्पाजुळीं वोपोनि चरणीं । शरीर टाकिलें दीर्घ मेदिनी । उभी हस्तकमळें जोडुनी । विनीतवाणीं स्तुति गाये ॥ ९ ॥ जयजय शम्भो शूलपाणी । मधुकेश्वरा स्वामी कैवल्यदानी । व्योमकेशा स्वरुपज्ञानी । चित्सुखप्राणी मृत्युंजया ॥ १० ॥ आगमोक्त विधि शिवार्चन । अर्घ्यपाद्यासन विधान । करोनि पचामृत मगल स्नान । करी अभिषेचनें समन्त्रे ॥ ११ ॥ उत्तमाम्बरें भूतनाथा । अष्टगंधें निर्मळाक्षता । मुक्तामाणिकें सरिधानता । नरेंद्रदुहिता शिवपूजा ॥ १२ ॥ अनिंधमुक्तें मोळागळीं । अक्षता समर्पी विशालभाळीं । नाना पुष्पमाळा चद्रमौळीं । नरेंद्रबाळी पूजितसे ॥ १३ ॥ घटा शख जेंगट टाळ । मृदगवीणा भेरी कसाळ । मगळ तुरें ध्वनी कल्लोळ । जासननीळ तोषार्था ॥ १४ ॥ सुगध धूप धूपिला पाहिं । परिमळ कोंदला दिशा दाहीं । येकारती देउनि ठाईं । अर्पिती ळवळाही नैवेद्यु ॥ १५ ॥

— श्री लीलाविश्वभर, अध्याय चवथा, ओव्या ५१–६५

## ३

## ऐसें विश्वभरचरित्र

ऐसें विश्वभरचरित्र । अद्भुत लीळी अतिपवित्र । विश्वीं विस्तारिलें स्वतत्र । श्रोते सत्पात्र पाहुनि ॥ १ ॥ प्रभुलिंगलीला विख्यात पाहीं । चरित्र विस्तारी कामदाहीं । अनुभवें नसे उणीव काही । श्रोतीं स्थळाहीं परसिजें ॥ २ ॥ सुरवरेंज आळापिती । रागोद्धारें नित्य गाती । तेणे वाणी पुनित क्षिती । पावे सद्गति वाचिता ॥ ३ ॥ ऐकता भावें सादरमनें । श्रोत्र होती परमपावन । शभुचरित्र अगाधपुण्य । जन्ममरण उछेदी ॥ ४ ॥ पदार्थ घेता स्वकीय मनीं । स्वानदसुखाची पुरे धणी । जीव पावती सायोज्यसदनीं । पुरे श्रवणी मोक्षाची ॥ ५ ॥ विश्वभराची अतर्क्यलीला । मुक्ति वोगरिली पवित्रशीला । अक्षय सुखाचा निजराउळा । माजि स्थापिला श्रवणार्थी ॥ ६ ॥ लीलाविश्वभराची करणी । वर्णिता आगळी पवित्र गुणी ।

ससार अपार, थोर करितो कारभार, महाल मुलूख जागीर इजारा, कमाविसदारी, भारि पसारा, सावकारी, हत्ती घोडे सैन्य शिबीका, वा पोशाख कानि चौकडा, सुंदर वनिता प्रिया नवोढा, शहाणपणाचा गर्व गाढा, मनसोब्याचा करा निवाडा, वाडा रंगित रंगमहाल, सोनेरी बैठका, जरी भर्जरी तमाम ऐने, काम मुलायम, फिरंगाणी विल्लोरी फानसे, मिनेगारी किनखापी पडदे, सणोसणीं रेशमी गाल्चे, नागनगीचे, रागरंगामधि गुग वेटा, निसग माठा, अभिमानाचा चढला ताठा, उन्मत्त सोटा, धर्माविषयीं फार करटा, त्याच्या मधुनि धरल्या वाटा, अग्नी तस्कर करिति चपेटा, आगापीछा, राजदंड उठड उदेले, भड निघाले, लडपणें प्रचंड भोगिलें, परोपरीची छीथू अवघी, मारामारी, जरेनद कडाकड सोटे मारी, कमचा पाठीं उडती भारी, या या परिचे जाच शरीरीं, हृदयीं मस्तकीं शिळा भारी, वेढिता जड सोडी वेडी, पायिं रोकडी, प्रास देहुडी, तरी येइना कबूल कवडी, अधिकारी धरदार सावडी, सर्वहि नेली घोडीपाडीं, उरली नाहीं एकहि कवडी, पहिली होती विनी वाकडी, शाल जोडील शेला जोडी, देव द्विजगुरु तडीतापडी, त्यासि क्रोधें फार झडाडी, ईश्वर त्याची मस्ती मोडी, आता कैची उप्पर माडी, देशधडीवर गुढी लाविली, दुष्कर्मांचीं अभ्र दाटलीं, पहा पहा रे डोळे उघडुनि, पुढें यातना यमलोकींच्या, नानापरिच्या, जाणोनि एथेंचि का रे सावध व्हा ना, हरिलागिं भजाना ॥ १ ॥

## २

### पदें

ना तुझा चालता काळ, खायाला मिळती सकळ ॥ ध्रु ॥
हे कोण नायकोचे साले । तुपानेगळा घास न गिळे
तांदुळ गधियेले मोकलें । केलें बंबीचे ऊरवळ ॥ ध्रु ॥ ॥ १ ॥
हे कोण नायकोचे मामे । घरात वागती रिकामे ॥
सासर शाल्योदन खाणें । भोजनभाऊ केवळ ॥ ध्रु ॥ ॥ २ ॥
बहिणीं सासू घरासि येती । फराळाच्या पक्ती बैसती ॥
नातीं कोरकोरन काढिती । सर्व मायेचा गोंधळ ॥ ध्रु ॥ ॥ ३ ॥

राजवाहिनीप्रवाहीं । जैसी छत्रें विराजती ॥ २३ ॥ कोमल तरूचे पल्लव । चचल चामरी दाविती भाव । दुदुभिघोषस्थानीं रव । सरिता प्रसवप्रपात ॥ २४ ॥ यथाकाली होता वृष्टी । सस्यें पिकली देखोनि दृष्टीं । आनद कृषीवलाचे पोटीं । सभाग्य सृष्टी मानिती ॥ २५ ॥ वृष्टि खडता चाचरे पीक । तेणें सवेचि पावती दु ख । नेणोनि अदृष्टविवेक । जैसे लोक व्यवसायी ॥ २६ ॥ ते सर्वही स्थलजलवासी । करिता नवनीर सेवनासी । पुष्टि पावती आनदेशीं । अमरा जैशी पीयूष ॥ २७ ॥ मेघभरें महापूर । सरिता यांकिती सागर । संगमीं एकवटता नीर । तेणें समुद्र क्षोभती ॥ २८ ॥ वर्षवाताच्या झझाटा- । सरिशा प्रचड उठती लाटा । मोडती जलयानाच्या वाटा । पाथ सकटा वरपडती ॥ २९ ॥ सरिता सिंधूची जेथ मिळणी । महानौका तये स्थानीं ॥ येता जाता स्थिरावोनी । क्रियाचरणीं वर्त्तती ॥ ३० ॥ महापूराच्या सगमकाळीं । त्या न थरती तये स्थळीं ॥ प्रबळ वातें ऊर्मिमाली । सागर समूळीं क्षोभती ॥ ३१ ॥

—हरिवरदा, अध्याय विसावा, ओव्या ६१–६५, ७४–८१, ८३–८५, ८७, ९६, ९७, १०१–१०६, ११०, ११६–११९, १२७

## अमृतराय

[ इ. स. १६९८–१७५३ ]

१

समार अपार, थोर करितो कारभार, महाल मुलूख जागीर इजारा, कमाविसदारी, भारि पसारा, सावकारी, हत्ती घोडे सैन्य शिबीका, वा पोषाख कानि चौकडा, सुंदर वनिता प्रिया नवोढा, शहाणपणाचा गर्व गाढा, मनसोब्याचा करा निवाडा, वाडा रंगित रंगमहाल, सोनेरी बैठका, जरी भर्जरी तमाम ऐने, काम मुलायम, फिरंगाणी बिल्लोरी फाणसे, मिनेगारी किनखापी पडदे, खणोखणीं रेशमी गालिचे, बागबगीचे, रागरंगामधि गुंग बेटा, निसंग मोठा, अभिमानाचा चढला ताठा, उन्मत्त खोटा, धर्माविषयीं फार करटा, त्याच्या बधुनि धरल्या वाटा, अग्नी तस्कर करिति चपेटा, आटापीटा, राजदंड उदंड उदेले, भंड निघाले, लडपणे प्रचंड भोगिलें, परोपरीची छीथू अवघी, मारामारी, जरेजद कडाकड सोटे मारी, कमचा पाठीं उडती भारी, या या परिचे जाच शरीरी, हृदयीं मस्तकीं शिळा भारीं, वेढिता जड खोडी वडीं, पायिं रोकडी, प्रास देहुडी, तरी येइना कबूल कवडी, अधिकारी घरदार सावडी, सर्वहि नेली घोडीपाडीं, उरली नाहीं एकहि कवडी, पहिली होती बिनी वाकडी, शाल जोडील शेला जोडी, देव द्विजगुरु तडीतापडी, त्यासि क्रोध फार झगडी, ईश्वर त्याची मस्ती मोडी, आता कैची उप्पर माडी, देशधडीवर गुढी लाविली, दुष्कर्माचीं अभ्रे दाटला, पहा पहा रे डोळे उघडुनि, पुढें यातना यमलोकींच्या, नानापरिंच्या, जाणोनि एथेंचि का रे सावध व्हा ना, हरिलागि भजाना ॥ १ ॥

## २

### पदे

ना तुझा चालना काळ, खायाला मिळती सकळ ॥ ध्रु ॥
हे कोण नायकोचे साले । तुपावेगळा घास न गिळे
तांदुळ राधियेले मोकळें । केलें येंतीचे ऊगळ ॥ ध्रु ॥ ॥ १ ॥
हे कोण नायकोचे मामे । घरात वागती रिकामे ॥
साखर शाल्योदन खाणें । भोजनभाऊ केवळ ॥ ध्रु ॥ ॥ २ ॥
वर्षाणीं सासू घरासि येती । फराळाच्या पक्ती नेसती ॥
नातीं गोतगोतन काढिती । सर्व मायेचा गाधळ ॥ ध्रु ॥ ॥ ३ ॥

अमृतराय म्हणे रे मूर्खा । किती मुल्लासी मायेच्या सुखा ॥
अर्ती जासी नरका एकगा । भज सद्गुरु दयाळ ॥ ध्रु ॥ ॥ ४ ॥

* * *

भक्ताचिया काजासाठीं साधूचिया प्रेमासाठीं, सोडिली मी लाज रे ॥ ध्रु ।
सुयोधना रागावलों । विदुराच्या गृहा आलों ॥
आवडीनें कण्या प्यालों । जोंधळ्याची पेज रे ॥ १ ॥
धुतो अर्जुनाचे घोडे । सदा राहें मागे पुढें ॥
झाडी अगणीचे सडे । बाधोनिया माज रे ॥ २ ॥
शुद्ध निरंजनवासी । तो मी आलों आकारासी ॥
पाडियलों प्रेमापाशीं । दशाकृति काज रे ॥ ३ ॥
वेडी गौळीयाची पोरें । त्याचें ताक प्यालों ना रे ॥
खाता भिल्लीणीची बोरें । उच्छिष्टाची चोज रे ॥ ४ ॥
पूर्णब्रह्म म्हणती मातें । सर्वब्रह्म मीच त्यातें ॥
ऐसियासी जाणीव ते । धरी अमृतराज रे ॥ ५ ॥

## जीवनतनय

### पद

माझ्या बाळा रघुवीरा ॥ वनासि जाऊं नको ॥ ध्रु ॥
कोमल नाजुक तुझा काय ॥ व्यर्थचि भरीं भरलासी काय ॥
रडतें मोकलोनि मी धाय ॥ परकी गाय रोवूं नको ॥ माझ्या ॥ १ ॥
तुझे पाया येतिल फोड ॥ वनविचराची इच्छा सोड ॥
देई मनाचा एवढी जोड ॥ सुहृतमोड मोडूं नको ॥ माझ्या ॥ २ ॥
राम पेंचळ तूं तर बाळ ॥ कैसा फिरशिल रानोमाळ ॥
होइल अनर्थ कीं तात्काळ ॥ विपरित काळ दावूं नको ॥ माझ्या ॥ ३ ॥
विनविति रामासी ते माय ॥ गरथचि मनासी तू राय ॥
जीवनतनय वंदितो पाय ॥ काहीं उदास होउ नको ॥ माझ्या ॥ ४ ॥

# माधव

## पद

कौसल्या म्हणे ना रामा नको वना जाऊं जाऊं ।
माझिया रे तान्ह्या बाळा तुला कोठें पाहूं पाहूं ॥ ध्रु ॥
अयोध्या ही ओस पडली तुझ्याविण अजि रामा ।
मला गमेना की साधुजनमनविश्रामा ।
श्रावणारि मूर्च्छित पडला श्राप लागो तुझ्या कामा ।
किती तुझ्या मागें मागें कोठवरी धावूं धावूं ॥ १ ॥
हरणीचें पाडस वनीं चुकलें गे बाई बाई ।
तैसें घन झालें रामा रडतें मी धाई धाई ।
नको आता टाकुन जाऊं मजकडे पाहीं पाहीं ।
तुजसाठीं रामा आजी विष कीं मी घेऊं घेऊं ॥ २ ॥
स्तनीं फुटलासे पान्हा बाळा जवळि येईं येईं ।
किती कष्टविशी मजला सुखीं राहीं राहीं ।
त्यजूनिया राज्य ऐसें वनीं कांहीं नाहीं नाहीं ।
कैकेयीचे सदनीं कैशी एकटी मी राहूं राहूं ॥ ३ ॥
सीताबाई स्वरूपानें अति सुकुमार राणी ।
रडे रुसतील तिजला वनीं माझें मायबहिणी ।
तृषाक्रांत झाल्या रामा उभा रहा पाज पाणी ।
चतुर्दश वर्षें दु:ख कोठवरी साहूं साहूं ॥ ४ ॥
वनीं करीं साउलिये दिनकरकुळदीपा ।
सरोवर जवळीं ठेवी वरुणा तूं मायबापा ।
पदोपदीं रक्षी तान्ह्या नव्हे वनवास सोपा ।
निशिदिनीं माधव तुझे गुण सदा गाऊं गाऊं ॥ ५ ॥

## सोहिरोबानाथ आंबिये

पद

हरि भजनावीण काळ घालवूं नको रे ॥ ध्रु ॥
सत्संगतिनें उमज। चिद्रुपासि पुरतें समज।
अनुभवावीण उगीच मान हालवूं नको रे ॥ हरि ॥
दोरिच्या सापा भिउनि भवा। भेटी नाहिं जीवशिवा।
अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नको रे ॥ हरि ॥
विवेकाचि ठरेल ओल। ऐसे बोलावे कीं बोल।
आपुल्या मतं उगीच चिखल कालवूं नको रे ॥ हरि ॥
सोहिरा म्हणे ज्ञानज्योति। तेथें कैंचि दिवस राति।
तयाविणें नेनपाति, हालवूं नको रे ॥ हरि ॥

## अमृतशिष्य ब्रह्मगिरी

दामाजीचरित्र

पतिच्या दु:खाची देखुन लहरी । सावित्री नारी ॥
गेली वनवासा जनककुमारी । श्रीराम शरीरीं ॥
नळ दमयती पडे आकातीं । तैसें करी ती स्तवन पतीचें ॥ ४ ॥ वारी•
हृदयीं गुज कळलें श्रीरंगाला । सांगे रुक्मिणीला ॥
धरुनि नेतील गे दामाजीला । ही लज्जा मजला ॥
हिशेब घेउनि जातों वहिला । नग हे द्यावे सत्वर तुमचे ॥ ५ ॥ वारी०
जैसा वनवासा गेला राम । दशरथासि श्रम ॥
पांडुरंगासि तैसें प्रेम । भक्ताचें परम ॥
धन्य धन्य हा पुरुषोत्तम । कोमल हृदय बहू तयाचें ॥ ६ ॥ वारी•
पांडुरंगानें नवल केलें । पोतें भरियलें ॥
धान्यविक्रीधन जमेसी केलें । ठिक अवघे लिहिलें ॥
पाहुनि झडती न पडे अडती । जाउनि दर्शन घे यवनाचें ॥ ७ ॥ वारी०
प्रथम यवनासि करुनि जोहार । म्हणे मी विठ्या महार ॥
मंगळवेढियाचा बंडिवार । ऐकावी खबर ॥
पोतें घेउनि मायबापें । उत्तर द्यावे लखोट्याचें ॥ ८ ॥ वारी०
यवनें महारा तो पाहुनि नयनीं । म्हणे अंत:करणीं ॥
याचे स्वरुपासी पाहातां तुळणी । मज न दिसे कोणी ॥
क्षणक्षणा अवलोकुनि पाहे । अद्भुत सुंदर रूप तयाचें ॥ ९ ॥ वारी•
जैसें नीर क्षीर एकें ठायीं । असतां हो पाहीं ॥
राजहंसासी अवघड नाहीं । निवडी लवलाहीं ॥
परीक्षवंत बुद्धिवंत । पाहुनि मोल करी रत्नाचें ॥ १० ॥ वारी०
राजा कृत्रिमें झाला कोळी । डोईवर मोळी ॥
चतुर देखुनी चिन्ह न्याहाळी । तैसा वनमाळी ॥
पांडव जातां विराटनगरीं । राजा नेणें लक्षण त्याचें ॥ ११ ॥ वारी•
तैसें महाराचें देखुनि रूप । भुलला तो भूप
विश्वजनकाचा म्हणती बाप । यादवकुळदीप ॥
सकळ सभा ते झाली वेडी । टकमक पाहाती रूप हरीचें ॥ १२ ॥ वारी•

अनंत ब्रह्मांडें ज्याचे पोटीं । सावळा जगजेठी ॥
काळी घोंगडी, काळी काठी । काळा ढोर करीं ॥
बोली माहाराची थेट मराठी । गाडिस लंगोटी ॥
पायिं वाहाणा मोठा शाहाणा । पतितपावन नाम ज्याचें ॥ १३ ॥ वारी०
कमलदळशोभा नेत्रकमळा । पाहता मुखकमळा ॥
मिरवीं हृदयीं द्विजचरणकमळा । विधि नाभीकमळा ॥
कमला सेवी चरणकमळा । श्रीहरि निधान क्षिरसागरीचें ॥ १४ ॥ वारी०
बोले धन्याजी उमरदराज । ऐका महाराज ॥
आम्ही देसाई गरीबनवाज । साहेब सिरताज ॥
अर्जी करिता झाली मर्जी । कागद जाब द्याने सनदेचे ॥ १५ ॥ वारी०
म्हणे मी पताचा बहु कामाचा । विश्वासू घरचा ॥
नदा शरमिंदा आहें त्याचा । जन्मोजन्मींचा ॥
नाजुक जरूर अडलें भिडलें । तेथें काम मज नफराचें ॥ १६ ॥ वारी०
मुजुमदारानें लबाडी केली । खोटी खबर लिहिली ॥
नाहीं तुम्हासी करुणा आली । तलब पाठविली ॥
लोकामध्यें अबरु गेली । कष्टी मन झाले पताचें ॥ १७ ॥ वारी०
मोठा चाडाळ निमकहरामी । यासी काढा तुम्ही ॥
आणिली पतावरती बदनामी । बेढग गुलामी ॥
तस्कर बहुत करी तस्करी । ईश्वर कुशल न करी त्याचें ॥ १८ ॥ वारी०
नोहे दासीस घरचाकर । जागा साचार ॥
आणा ध्यानासि तुम्ही विचार । कुळवती नार ॥
कन्या पुत्र बहु विस्तार । तेणें पावें सुख स्वर्गीचें ॥ १९ ॥ वारी०
जैसीं खडकावर नोहे शेतें । पान्याची मोत्यें
केलें गणिकेशी बहुतचि नाते । जन निंदा करितें ॥
कीर्तन हरिचें नाहीं प्रीतिचें । तरि तें सोंग दिसे मेंगाचें ॥ २० ॥ वारी०
नाहीं शूद्रासी वेदसंबंध । त्या न कळे भेद ॥
मूर्ख शाहाण्याशीं घाली वाद । मग पावे खेद ॥
लीलानाटकी तो गोविंद । अतरिं असता बळ भक्तीचें ॥ २१ ॥ वारी०

जैसा वनसिंह ग्रामसिंह । पहा एकचि नाव ॥
चतुर जाणती त्याचा भाव । हा श्वानस्वभाव ॥
कुश्चल निश्चल बहु प्रीतीनें । अखड हाड चघळी ढोराचें ॥ २२ ॥ वारी०
तुम्ही रत्नाची केली गार । हे अंतर फार ॥
तैसा कानडा मुजुमदार । बहु फजीतखोर ॥
पतीं सांगितलें साचार । म्हणोनि बोलें धीटपणाचें ॥ २३ ॥ वारी०
पायिंची वाहाण पायिंच बरी । मज कैंची थोरी ॥
सलगी चरणींची केलीच खरी । माझी वैखरी ॥
हीन दीन मी नीच जातिचा । शरीर तुमचिया अन्नाचें ॥ २४ ॥ वारी०
त्याला हरिवांचुनि नाहीं कोणी । परदेशी प्राणी ॥
त्याचें मन आहे विठ्ठलचरणीं । म्हणे चक्रपाणी ॥
श्रीहरि त्याचें करि सरक्षण । जाणुनि लक्षण बहुत गुणाचें ॥ २५ ॥ वारी०
साहेब दामाजी बहु कामाचा । विश्वासू साचा ।
वदनीं छद तो हरिनामाचा । बहु हेत त्याचा ॥
पढरपुर हरिमंदिर सुदर । तेथें मन रमलें तयाचें ॥ २६ ॥ वारी०
तसलिम करुनी जाता झाला । नवल यवनाला ॥
पोटीं मोठासा विस्मय झाला । बोलवा त्याला ॥
तव तो न दिसे म्हणुनी हासे । ध्यानीं वाहे रूप तयाचें ॥ २७ ॥ वारी० ॥
बोली महाराची चतुराई । ऐका गुरुभाई ॥
महार नोहे तो शेषशायी । मज वाटे हृदयीं ॥
धन्य सुकृत दामाजीचें । सार्थक माझिया जन्माचें ॥ २८ ॥ वारी०

—कडवीं २३–५०

मी स्वल्पशास्त्र मज हासति थोर ज्ञाते
त्वद्भक्ति बोलवि मला दृढ शक्ति चित्तें ।
जो चैत्रमासि मधु सुस्वर कोकिळासी
भक्षोनि अम्रकलिका शुभ हेतु त्यासी ॥ ७ ॥
हे जे तुझे स्तवन पाप बहू भवाचे
नासील की क्षण स्वार्ध पढेल त्याचे ।
जैसे निशातम पडभ्रि कुवर्णभासी
सर्वत्र व्यापक तरी रवि त्यासि नासी ॥ ८ ॥
जानोनि हे करितसे स्तवनाल्पबुद्धी
तूझा प्रभावच करील नरी सुसिद्धी ।
चित्तासि हे हरिल साधुमहाजनाच्या
मुक्ताफला द्युति जला नलिनीदलाच्या ॥ ९ ॥
आता असो स्तवन सर्वहि पापहारी

# जिनसागर

## भक्तामरस्तोत्र

जो देव नम्र मुगुटीं शुभ रत्न काती
तीतें विकास करितो जिनपाद दीप्ती ।
जो पापरूप तम घोर समूळ छेदी
नेदी बुडू भवजळीं जिन हे युगादी ॥ १ ॥
जो देव हा स्तविथला सुरलोकनाथीं
उत्पन्न बुद्धि पढता वचनप्रबंधीं ।
जो आदिनाथ पहिला प्रभु त्या जिनातें
स्तोत्रें करोनि स्तवितों शुभभक्तिचित्तें ॥ २ ॥
जो मानतुग कविने स्तविला हितासी
सर्वत्र सौख्य मग पावन होय त्यासी ।
ते हे बहू परम पावन स्तोत्र सर्वां
भक्तामराख्य रचना रचिली विगर्वा ॥ ३ ॥
मी बुद्धिहीन सुर–वंदित पाय ज्याचे
कैसा करीन म्हणतो स्तुतिवाद त्याचे ।
तो येथ बालक म्हणे शशिबिंब घेतो
तैसाच मी विभु तुझ्या स्तवना करीतो ॥ ४ ॥
जे चंद्रतुल्य गुण शुभ्र तुझे जिनेशा !
बोलावता सुरगुरू न पवेचि लेशा ।
कल्पातवायु उव्हळी जल जेथु ज्याचे
ऐसा समुद्र तरणे न घडे जनाचे ॥ ५ ॥
तो मी असा जिनप भक्तिवशीं मुनीशा
स्तोत्रासि या रचिन हे धरली सुआशा ।
नीशक्त केवळ जसा मृगबाळकासी
राखावया समुख ये रिपु सिंह त्यासी ॥ ६ ॥

मी स्वल्पशास्त्र मज हासति थोर ज्ञाते
त्वद्भक्ति बोलवि मला दृढ शक्ति चित्तें ।
जो चैत्रमासि मधु सुस्वर कोकिळासी
भक्षोनि अंब्रकलिका शुभ हेतु त्यासी ॥ ७ ॥
हे जे तुझे स्तवन पाप बहू भवाचे
नासील की क्षण लवार्ध पढेल त्याचे ।
जैसे निशातम षडंघ्रि सुवर्णभासी
सर्वत्र व्यापक तरी रवि त्यासि नासी ॥ ८ ॥
जानोनि हे करितसे स्तवनाल्पबुद्धी
तूझा प्रभावच करील तरी सुसिद्धी ।
चित्तासि हे हरिल साधुमहाजनाच्या
मुक्ताफला द्युति जला नलिनीदलाच्या ॥ ९ ॥
आता असो स्तवन सर्वहि पापहारी
तूझी कथाचि जनपाप महा निवारी ।
हा सूर्य दूर असताहि निभा जयाची
का हो विकास न करी कमलें जलेंची ॥ १० ॥
जे सत्य सात्विक गुणें स्तवितील तूतें
तू आपनासम करीसिल सीघ्र त्याते ।
जो आत्मतुल्य न करी प्रभु आश्रितासी
त्याला प्रभुत्व न घडे म्हणतो जनासी ॥ ११ ॥
देखोनिया जिनसरूप सुधीर डोळे
अनिमीष पाहती सुतोषु तया न मीळे ।
जो पीतसे जल समुद्र सुगोरसाचे
तो क्षार नीर न करी वदनीं पिपाचे ॥ १२ ॥
जो शातराग परमाणुहि निर्मिलासी
तो तू त्रिलोकतिलकापरि शोभतोसी ।
ते पै प्रशात परमाणुहि तेच होते
या कारणें तुज समान न रूप कीं ते ॥ १३

हे वस्त्र सुंदर तुझें जगनेत्रहारी
नाहीच कीं त्रिभुवनी उपमा विचारी ।
जे चंद्रबिंब पाहताचि कलंक त्यातें
ते दीवसा पळसपत्रसमान होतें ॥ १४ ॥
जे चंद्रमंडळ-कळासम शुभ्र होती
ते हे तुझे गुण जगत्रय लंघिताती ।
तूझाच आश्रय असे सहजीं गुणाला
त्यातें निवारिल असा विभु कोण जाला ? ॥ १५ ॥
देखोनि देववनिता मन तें चळेना
आश्चर्य हे म्हणुनि तर्क कदा मिळेना ।
कल्पांतकाल्पवनें जरि हाल्वेला
तो मंदराद्रि न चळे स्थिरभाव जाला ॥ १६ ॥
ज्या धूम्रवाति न लगे न लगेच तेल
सर्वत्र जो त्रिभुवनासि करी उजाळा ।
वायुप्रकोप न लगे तुज सुप्रकाशीं
तो तू अपूर्व जिनदीप विराजतोसी ॥ १७ ॥
नाहीच अस्तहि जयास न राहु वैरी
सर्वत्र पूर्ण जगव्यापक तेज भारी
येऊनि मेघहि जयासि कदा न झाकी
सूर्याहुनी अधिक रूप मुनींश लोकीं ॥ १८ ॥
नित्योदयी प्रबल मोहतमासि नासी
राहोनि मेघ सिवती रिपुभावनेसी ।
तैसें मुखांबुज तुझे शशिबिंब जैसे
लोकप्रकाशक सुसीतल व्यक्त ऐसे ॥ १९ ॥
रात्रीस चंद्र दिवसा रवि व्यर्थ गेला
तूझा मुखेंदु तमनाशक व्यक्त जाला ।
संपूर्ण शालि पिकल्यावरि मेघ काशा
पाणीहि वर्षिल तरी न मिळे फलाशा ॥ २० ॥

तुझ्याच ठाइ विभु ज्ञान विशेष भासे
ते अन्यथा हरिहरा न मिळेच तैसे ।
जे काच-खंड म्हणवी किरणावभासी
रत्नप्रकाश न मिळे सहसाहि त्यासी ॥ २१ ॥
मी मानितो हरिहरादिक देखिल्याही
तुझ्याच ठाइ दिसतो बहु तोष पाही ।
तूं पाहिल्यावरि धरेवरि अन्य कोण्ही
नाही मना हरि असा पुढल्या भवींही ॥ २२ ॥
पृथ्वीवरी असति कामिनि पुत्रखाणी
त्वत्तुल्य पुत्र न जने जननीच कोण्ही
सर्वा दिशा धरिति सर्व उडूच पोटीं
पूर्वा दिशा प्रसवते रवि तेच मोठी ॥ २३ ॥
तूतेंच वंदिति मुनी विमला प्रकारीं
आदित्यवर्ण सुविपत्र सुकीर्णधारी ।
तुझ्याश्रयेंच हरती जननादि मृत्यू
नाहीच अन्य सिवमार्ग जनासि सत्य ॥ २४ ॥
तूं अक्षयी विभु अचिंत्य असंख्य आर्घी
ब्रह्माच ईश्वर अनंत अनंग बाधी ।
योगीश्वर प्रभु समस्तहि योग जाणे
ज्ञानस्वरूप अतिपूत बुधासि माने ॥ २५ ॥
तूं बुद्ध कीं विबुध वंदिति बोधभर्ता
तूं शंकरा सकल लोकसुखासि कर्ता
धाताचि तूं सहज दाविसि मोक्ष मुख्या
सर्वांत थोर म्हणतां पुरुषोत्तमाख्या ॥ २६ ॥
त्रैलोक्य दुःख हरतां तुज कारणें हा
मी हात जोडुनि करी प्राणिपात केला ।
त्रैलोक्य-ईश्वर भवोदधिशोषगाला
पृथ्वींत भूषण तुला प्रणिपात केला ॥ २७ ॥

हें काय कौतुक समस्त गुणासि थारा
तू देव आश्रय असे कळलें विचारा ।
स्वप्नातही तुज न लागति दोष खोटे
तो तू मुनीश नमता बहु तोष वाटे ॥ २८ ॥
पाहा अशोकतरु हा वर रूप त्याचें
शोभे महाकिरण ऊठति ऊर्ध्व ज्याचे ।
जैसें महातमविनाशक सूर्यबिंब
वृष्टीस मेघ वसतीं उपमा स्वयंभू ॥ २९ ॥
रत्नप्रभाजडित त्या हरिविष्टरीं तू
स्वर्णप्रभाव वपु निर्मित मीनकेतू ।
तुंगोदयाद्रिसिखरीं रविबिंब भासे
संपूर्ण तेज तशियापरि देव दीसे ॥ ३० ॥
कुंदप्रसूनसम चामर चारु शोभा
शोभे महाप्रभु तुझा शुभ हेम गाभा ।
जैसें शशांकसम निर्झर तोयसर्गी
कीं हे सुराद्रितट जे यस हेमरंगी ॥ ३१ ॥
हे छत्र तीन तुज शोभति चंद्रकांती
सूर्यप्रताप किरणासहि झाकिताती
मुक्ताफल प्रकर सुंदर ज्यासि लेता
कीं सांगति त्रिभुवनीं प्रभु हाचि देता ॥ ३२ ॥
गंभीर शब्द उठवी सकला दिशासी
त्रैलोकिचें विभव दाखवितो जनासी ।
जो धर्मराज जयघोषण कीर्ति वीतो
तो देव दुंदुभि असा ध्वनि दाखवीतो ॥ ३३ ॥
मंदार सुंदर नमेरु सुपारिजातीं
संतानिकादि बहु पुष्प समृद्ध माती ।
गंधोदकासह सुसीतल पुष्पवृष्टी
स्वर्गाहुनी पडतसे वचन प्रदृष्टी ॥ ३४ ॥

भामंडल प्रभु तुझे बहु ज्यासि शोभा
त्रैलोकिचें सकल तेज सुवर्ण आभा ।
कोट्यर्कही उगवती जरि एक वेळा
त्यातेहि जिंकिल असा प्रभु देखियेला ॥ ३५ ॥
स्वर्गापवर्गगमनादिक मार्ग दावी
धर्मप्रभाव शुभ तत्त्व विचार भावी ।
दिव्यध्वनी परमपावन अर्थ ज्याचा
भाषा समस्त न कळे सुप्रबोध त्याचा ॥ ३६ ॥
जे हेमपंकजसमान विराजताती
जे बालचंद्रकिरणें नख भासताती ।
ते पाउलें धरति त्या स्थल भूमि मार्गी
होते सुदेवकमलीं रचना सुरंगी ॥ ३७ ॥
ऐसे तुझे परमवैभव थोर पाही
धर्मोपदेश करिता इतरासि नाही
जैसे दिवाकरविभा हरि अंधकारा
अन्य ग्रहासि न घडे करिता विचारा ॥ ३८ ॥
ज्याचा असा मद झरे अति मस्तकाचा
जे फीरती भ्रमर यास्तव कोप ज्याचा
ऐरावतासम असा गज देखताही
तूझ्या पदाश्रयि नरा अणु धाक नाहीं ॥ ३९ ॥
फोडोनि थोर गजमस्तक रक्त पाडी
मुक्ताफल प्रकर भूमि तयांत सोडी ।
उड्डाण थोर करितो जरि सिंह तोही
तूझ्या पदाश्रयि नरावरि तो न ये कीं ॥ ४० ॥
कल्पांतकालपवनासम वन्हि ज्याचा
ज्वाला कराल तिडक्या भडका जयाचा ।
विश्वासि गीळिल असा वनवन्हि धावे
त्वन्नामकीर्तनजलें विझतो स्वभावें ॥ ४१ ॥

आरक्त नेत्र वर कोकिल कंठ काळा
क्रोधे फणा फडफडीत समीप आला ।
त्यातें उलघुनि सरे नच ये भयासी
त्वन्नाम नागदमनी वळसा नरासी ॥ ४२ ॥
घोडे अनेक गज गर्जित भीम वाणी
संग्रामिचें नरपसैन्य जनासि हाणी ।
जैसे दिवाकरकरें तम नाश जालें
तैसे तुझें भजन देखुनि दूर गेलें ॥ ४३ ॥
भाला करी दुखड रक्तप्रवाह वाहे
त्याचा महाप्रभव वीर जना न साहे ।
युद्धीं असे जिंकुनिया रिपु सैन्य मोटें
तूझ्या पदाश्रयि नरा विजयित्व भेटे ॥ ४४ ॥
ज्याचे बहू खवळले जल जीव पाणी
ज्यामाजि मच्छ मकरादिक वाडवाग्नी ।
ऐसा समुद्र तरणे जहाजीं बसोनी
तूझे पदस्मरण तारक त्या निदानी ॥ ४५ ॥
जाला महाभय जलोदर मार ज्याला
चिंता करीत बहु थोर समीप आला ।
तूझ्या पदांबुजरजामृतें न्हाणियेला
तो मानवी मदनमूर्तिसमान जाला ॥ ४६ ॥
पायाहुनी सबळ कंठ समानताही
बेडी बळें जकडिलें न सुटेच लाही ।
होते महानिगड घासुन मांडियासी
तूझे सुनाम जपता तुटि बंधनासी ॥ ४७ ॥
हस्ती मृगेंद्र वनिचा वन वन्हि दाटी
सर्पादि युद्ध सबला जलरोग पोटीं ।
जे पैं महासबल बंधन त्या भयासी
तूझें महा स्तवन हें सुनलाध्य नासी ॥ ४८ ॥

हे स्तोत्रमाळ जिनजी तुझिया गुणाची
नाना सुवर्णरचना रचिली फुलाची ।
कंठी धरील नर जो शुभ भक्ति लक्ष्मी
तो मानतुंग पद पावल एकलक्ष्मी ॥ ४९ ॥
माझ्या मनात भरला मुनि शक्रकीर्ति
तो स्तोत्रपाठ वदला गुरु पुण्यमूर्ति ।
मी बोल हाचि नमिलें जिनसागराला
द्यावी क्षमा विनवितो बुध पंडिताला ॥ ५० ॥

## जगन्नाथ

### शशिसेना

बहुत संभ्रम उत्सव त्या क्षणीं । करितसे जननी नृपकामिनी ॥
परम सुंदर शोभन मांडिलें । ललित मांडव आंगणिं घातले ॥ १ ॥
*विविध पल्लव कोमळ आणुनी । त्वरित तोरण बांधिति मालिणी ॥*
करिति संभ्रम गे नगनायिका । सकळ सोयरि आणिति वीटिका ॥ २ ॥
कनकमंडित सुंदर पाळणा । त्वरित बांधिति मंगळ अंगना ॥
करिति मंगळ गायन नायिका । झुलविती युवती नृपकन्यका ॥ ३ ॥
ह्यापरी करुनि कौतुक नाना । नाव ठेविति तिचें शशिसेना ॥
जन्मताच बरवी नृपकन्या । मोहिली सकळही स्मरसेना ॥ ४ ॥
घालिती श्रवणिं सुन्दर बाळ्या । खेळवीति तिजलागिं सहेल्या ॥
साजती करिं अमोलिक बाकीं । शोभते ललित मौक्तिक नाकीं ॥ ५ ॥
घालती चरणिं पैंजण तीचें । निंदिलें सकळ रूप रतीचें ॥
वारलें आणि गळा यवमाळा । शोभती करिं अमोलिक वेळा ॥ ६ ॥
अलंकार लेवीति नाना तिला गे । सखी लाडकी मायबापासि लागे ॥
*तिनें पद्मिनी–रूप–लावण्यता गे । स्वयें जिंकिली वाढता वाढता गे ॥७॥*

उमराव ॥ बसविले हस्तिनापूरी तख्त बाच्छाव। दादासि मोकळे केले राज्य कराव ॥ तुटलि आयुष्याची दोरी, नाहीं उपाव। मराया समयास बोल्विले नारायणराव ॥ (चाल) दादासि मिळुनि असाव। द्वैत मनीं नसाव। अशा वेळान पडाव। ओटींत नारायणराव तुमच्या हो घातला ॥ अशा बहु प्रकारें निरविले हो दादाला ॥ दक्षिणचा॰॥ १ ॥

मग गेले हो सातान्यासी, राजापाशीं। शिके रोखे वस्त्रें दिलीं हो नारायणापाशीं ॥ आले वाजवित चौघडे शहर पुण्याशीं ॥ कुच करुन लोकर गेले हो नाशकाशीं ॥ दुसन्याची बुद्धि ऐकली निमित्यासी ॥ मग येऊन जप्ती फार केली दादासी ॥ (चाल) देती गस्तीवर मस्ती। थोर केली नदीवस्ती। पूल बांधुनि करु मग वस्ती। नळादि काम लाविलें, हुकुम झाला ॥ पुढे कोट बांधणार होते शहर पुण्याला ॥ दक्षिणचा ॥ २ ॥

शुद्ध भाद्रपद तेरस, दिवस सोमवार। त्या दिवशीं दिवस चढला दोन प्रहर ॥ मग सुमरसिंग गारदी होऊन तैय्यार। संगे महमदखाँदेव इमानी सरदार ॥ हजिरी देतों म्हणोनि लाविली कटार। मग शिरले वाड्यामदी उपसुनि तलवार। (चाल) झाली गर्दी एकच हल्ला। राव निजला जागा झाला। उठुनिया उभा ठेला। राव फिरुनि अवघा वाडा भयाभित झाला। थरथराच कापत राव दादापैं गेला ॥ दक्षिणचा ॥ ३ ॥

आता हिंडुन पळाले राव, सुमरसिंग माग। बरोबर गारदी घेऊनि केला लाग। शोध करित पुढें चालले, लाविला थाग। म्हणे दूरुनि पळाला सुमरसिंगाप्रत साग। राव हात जोडीं दादाला सोडा राग। म्हणे आता वाचवा, जीवदान माग ॥ (चाल) डोइ घातली पोटात। आलि माया ह्रदयात ॥ नका करु बाळकाचा घात। दादा ठेविं वरहात 'वाचवा याला' ॥ दक्षिणचा ॥ ४ ॥

बोले सुमरसिंग गारदी, तुम्ही वाचविता। पुढें आमुचि मनुष्यें घाण्यात पिळीता। तुम्हीं मुळीं आपुल्या प्राणासि का दवडता। तुळाजी खिसमददार झाला बोलता। दादानिं काढला हात झाला सरता। नि शक हात मारिला किं साद्यावरता ॥ (चाल) झाला पुरा एकच घायी। दादाची फिरली द्वाही ॥ चौघडा वाजे ठायींठायीं। तेथ उपाय नाहीं काहीं। दो धन्यें एकच ठायीं मारात कोणाला। होयाचे होऊन गेलें शब्द दैवाला ॥ दक्षिणचा ॥ ५ ॥

गगाबाई करी रोदन 'हरपले रत्न! गाईनें वत्स गिळिला! देवा धन्य! टाकून घोडे पालख्या द्रव्य धन। नाहीं हौस पुरली गेले नारायण'। राव नेले अर्धे रातिं लाविलें अग्न। खडिभर लाकडे आठ मण चंदन ॥ (चाल) कामा आला खिसमदगार। चापाजी टिळेकर। शुद्ध इमानी चाकर। धड पडले अंगावर। नारुजी नाईक ठार पुरा झाला। जखमा लागल्या ईशराम पताला ॥ दक्षिणचा ॥ ६ ॥

आता मोठे राज्य दादाचें। केवळ काशी। नेले तुकुमदेही (हुकुम द्वाही?) आडग चिंता दादासी ॥ वस्त्रें आणवुन पाठविलें अमृतरायासी। नेले सुदामा ब्राह्मण प्रसन्न शिव दादासी ॥ (चाल) दादाचीं तर्पे तीं भारीं। शिवलाभ विघ्न नीवारी। बाहेर निघाली स्वारी। दरारा पडला भारीं सर्व दुनियेला ॥ नेले लहिरि मुकुंदा दादाचा बोलवाला ॥ दक्षिणचा ॥ ७ ॥

## महिपती

[ इ. १७१५–१७९० ]

### कृष्णलीला

मातेचें भय वागोवोनि थोर। भयें पळतसे सारंगधर। दोन प्रहर आला दिनकर। उष्ण तीव्र जाहलें ॥ १ ॥ धावत पळता साचार। जननीसी श्रम जाहला फार। घर्मेकरुनी निथळे सुदर। कैसा विचार करावा ॥ २ ॥ म्हणे एकदा लागता माझ्या हातीं। मग त्यासी न सोडीं कल्पांतीं। हृदयमंदिरीं निश्चिती। बांधोनि श्रीपती टाकिते ॥ ३ ॥ ऐसें मातेचें अंतर। जाणोनिया करुणाकर। म्हणे जननिसी श्रम झाला फार। आता स्थिर असावें ॥ ४ ॥ यशोदा पाहे चपळ दृष्टीं। तों पुढे देखिला जगजेठी। मग सत्वर धरितसे मनगटीं। क्रोध पोटीं न समाये ॥ ५ ॥ मग फरफरा ओढीत चक्रपाणी। यशोदा घेऊनि आली सदनीं। मंदिरीं मिळोनि सकळ गौळणी। नंदराणी गोपान्तिती ॥ ६ ॥ मग होउनी यशोदेसमोर। म्हणती कृष्ण तुझा चोर जार। आम्ही सांगों

निरंतर । तें असत्य उत्तर तुज वाटें ॥ ७ ॥ आज घरीं लवंडिला गोरस । यास्तव धरिलें कृष्णास । आता उखळा बाधोनी गर्वी यास । शिक्षा नसे मान काहीं ॥ ८ ॥ ऐसें बोलता व्रजनारी । तो स्फुदस्फुदोनी रडे मुरारी । अश्रुपात वाहती नेत्रीं । परी मातेसि अंतरीं कींव न ये ॥ ९ ॥ दावें सोडोनि लवलाहें । यशोदा कृष्णासी बाधो जाये । तव तो वीतभर उणें राहे । गाठ नये सर्वथा ॥ १० ॥ मग दुसरें दावें त अवसरीं । यशोदा आणोनि लावी सत्वरीं । ता आणिक पाहिजे वीतभरा । म्हणे कैशी परी करावी ॥ ११ ॥ एकमेकासी लाविता दोर । परी कदा न पुरती साचार । दावीं लाविली नवलक्षवर । परी उणें वीतभर येतसे ॥ १२ ॥ गौळणी आपुल्या सदनीं जाउनी । च्च्हाड देताती आणोनि । म्हणती कृष्णासि उखळीं बाधोनि । शिक्षा जननी लावीं वो । १३ ॥ घरची नवलक्ष असता दावीं । आणि घरोघरची आणिली सवही । एक एकासी यशोदा लावी । परी ती कदाही न पुरती ॥ १४ ॥ वैष्णवी मायेनें भुलविल्या गौळणी । तैशाच रीतीं यशोदा जननी । जो का विश्वंभर चक्रपाणी । अवतरे सदनीं नंदाच्या ॥ १५ ॥ ज्याच्या रोमरध्रीं ब्रम्हाड । मातील येवढें प्रचड खंड । त्यासी यशोदा बाधू पाहे कोडें । नवल चोरसें हच की ॥ १६ ॥ अरूप अनाम साचार । ब्रह्मादिकासि न कळे पार । त्यासि बाधावया न पुरे दोर । हें साचार कळेना ॥ १७ ॥ आकाश थोर वाडपणीं । गोचर सर्वांसि दिसतसे नयनीं । त्यासी घालावया गवसणी । आणावी कोठुनी कळेना ॥ १८ ॥ क्षीरसागरासी साच्या । कोणत्या पात्राणे माडावा । अमृतासी पाहुणेर करावा । कोणत्या पदार्थे कळेना ॥ १९ ॥ पृथ्वीचें वजन करावें कोडें । तरी येवढें निस्तीर्ण नाहीं पारडें । समीर कोणते ठायीं थांडे । ऐसें रोकड कळेना ॥ २० ॥ तैशाच रीतीं यशोदा माय । कृष्णासि दोर बाधा जाय । तरी तो अपार अनंत आहे । यालागीं न समायें चराचरीं ॥ २१ ॥ परी यशोदा म्हणे माझा कुमर । गौळणी भामिनी नवनिशार । म्हणवानी नवलक्ष लावोनि दोर । सारंगधर बाधिती ॥ २२ ॥ परी वीतभर उणें दिसतसे दिठीं । पदरीं सर्वथा न ये गाठी । म्हणोनि यशोदा होतसे कष्टी । म्हणे कैसी गोष्टी करूं आता ॥ २३ ॥ एकदा बधनामाजीं येता । मग मी न सोडिते कृष्णनाथा । जाणोनि मातेच्या मनोगता । कृपा भगवंता

उपजली ॥ २४ ॥ म्हणे मज बाधावया निश्चिनी । कटी होतसे यशोदा राती ॥ आता यान्ती जी मनोवृत्ती । तैशीच निश्चिनी हो मुखे ॥ २५ ॥ ऐसे चिंतिता चक्रपाणी । तो दोर पुरला तेंच क्षणीं ॥ सत्वर गाठ देतसे जननी । हासती गौळणी सर्वत्र ॥ २६ ॥ उखळीं बांधिता जगज्जीवन । मातेसी विलोकी दीनपणें । म्हणे सोडीं न मी करीं आजपासुन । मुक्तबंधन करी का ॥ २७ ॥ ऐसे म्हणोनि पूतनारी । टपटपा आसुवें गाळीत नेत्रीं । माता टाकोनि तैसेचि परी । लागे मंदिरीं निजकार्या ॥ २८ ॥

—भक्तलीलामृत ( इ. स. १७७४ ), अध्याय बेचाळिसावा, ओव्या ६५-९२

## मोरोपंत

[ इ. स. १७२९-१७९४ ]

१

### बालिश बहु बायकांत बडबडला

कुरुकटकासि पहाता तो उत्तर बाळ फार गडबडला ।
स्वपरबळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ १ ॥
बोले बृहन्नडे हे कुरुबळ कल्पांतसिंधुसे गमते ।
ने रथ पुरांत, माझें मन नयनहि पाहता बहु भ्रमतें ॥ २ ॥
दुर्योधन, दुःशासन, कर्ण, कृप, द्रोण, भीष्म ज्या कटकीं ।
त्यांत मरेनचि शिरता, काळ्यावरि घालिता चिरे पट कीं ॥ ३ ॥
एकाकी मी रिपु बहु, या ऐशा कीर्ति काय हो मरणीं ।
पक्षघ्नें केवि करू सर्पपुरंधरसुतायहोम रणीं ॥ ४ ॥
आशा नसता आलों, रागें न भरेल कां रहो तात ।
रोमांच घर्म कंप प्रकट व्यापूनि काय होतात ॥ ५ ॥
पार्थ म्हणे राजसुता आता वदतोसि हें अहा कांरे ।
शय्येवरि न पडाया योग्य, रणक्षितिवरींच हा कायरे ॥ ६ ॥

तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि, आतां असें करें वदसी।
एकहि भाग न सुटला नाहीं अद्यापि झळकला सदसी ॥ ७ ॥
गोमुक्त्यर्थ न शिरता धैर्ये या वीरनायकानीकीं।
करिजेल हास्य, आस्य प्रेक्षुनि नगरात नायकानीं कीं ॥ ८ ॥
देउनि सारथ्य मला घेउनि आलासि काय उत्साहें।
नेणसि काय पलायन करितां, लोकांत होय कुत्सा हें ॥ ९ ॥
निजवृत्तिरसीं लोभी हो साधो बुद्धि अन्यथा न करीं।
निजहितलोभें धरितो शिशुहि मुखीं एक अन्य थान करीं ॥ १० ॥
सैरंध्रीनें कथिलें माझें सारथ्यनिपुणपण साचें।
टाकिति न नाहरगें फळ नीरस म्हणुनि निपुण पणसाचें ॥ ११ ॥
मी भांडेन स्थिर हो, तुजहि मजहि विहित आजि न परतणें।
हरितील न गाईंत भीतिल करितील आजि न परतणें ॥ १२ ॥
मरतींच न दावनितीं, पाउलहि पळोनि तोंड लेक वित्या।
म्हणती सत्त्वकीर्तिप्रशमस्पर्शी तांडलें कवि ल्या ॥ १३ ॥
कज्जळ कसें करूं जें सैरंध्रीकृत सुधासम स्तवन।
सन्मन अमृता मीतें, जेंवि कुठारायुधा समस्त वन ॥ १४ ॥
ती या मुखीं न येतां यावी मुयशें करुनि सुरमाजी।
दावाया सैरंध्रिप्रति हें मति धरिल कैंवि सुज्ञ मार्गी ॥ १५ ॥
चाल उगाचि अपयशें न तुझें मुखचन्द्रमंडळ मळावें।
होतो बळाब्धिपारद, पारदतुल्य न तुवां डळमळावें ॥ १६ ॥

—आर्यभारत, विराटपर्व अध्याय तिसरा, आर्या ३९–५४

## २

## हंसराजीयाख्यान

पूर्वी सावरतीचीं माजुरपाच्या पुरात एक धर्मा।
सन्मान्य वैश्य होता नादे त्याच्या स्वधर्मनीति मनीं ॥ १ ॥

त्या धनिका वैश्याचे होते बहु पुत्रपौत्र गुणवंत ।
ज्यातें आशीर्वादें गौरविती सर्वदा सदय संत ॥ २ ॥
त्या वैश्यकुमारांचें भक्षी उच्छिष्ट एक काक सदा ।
बाळक उदारमति ते न वदति वाणी कदापि साध्वसदा ॥ ३ ॥
देती वैश्यकुमारक मांसोदन सेवया वडे मांडे ।
मधु घृत पायस वायस खाय सदा, पक्षिपांसवें भांडे ॥ ४ ॥
सागरतीरीं तेथें आले दैवें कदाचित मराळ ।
जे मुक्ताफळभोजन करिती, बिसतंतु भक्षुनि फराळ ॥ ५ ॥
पाहुनि हंसांतें ते बाळ स्वोच्छिष्टपिंडपुष्टातें ।
म्हणती 'तूंचि विहंगा ! सर्वखगश्रेष्ठ' त्या सुदुष्टातें ॥ ६ ॥
करिती प्रतारणा अशि काकाची अल्पबुद्धि ते बाळ ।
तों तो फुगे कुगेहद्वारीं मूत्रेंहि जेंवि जंबाळ ॥ ७ ॥
गर्वें मूर्खपणें तो मानी बाळोक्त सर्व साचार ।
अधिकचि माजे स्तवनें, न विचार करी मलीमसाचार ॥ ८ ॥
गेला उडोनि गगनीं मग नीच सगर्व काक तो त्यांत ।
साधूंत खळ जसा कीं काचमणी परमशुद्ध मोत्यांत ॥ ९ ॥
जाणे त्या हंसांत श्रेष्ठ जयामाजि त्यासि तो काक ।
'दोघे उडों, तुझें बळ पाहों दें, मत्समीप ये टाक' ॥ १० ॥
ऐसें वायस वदतां हांसति ते हंस त्या खगापसदा ।
कीं शुद्धासी मत्सर मूर्ख करी, त्यांत तापपाप सदा ॥ ११ ॥
म्हणती हंस तयातें, 'गर्वभरें करिसि वायसा ! चार ।
आम्हीं मानसवासी सर्व खगांचेहि राय साचार ॥ १२ ॥
आम्ही सुदूरपाती हंस खगांमाजि पूज्य खगनीच्या ।
क्षीरधितीरविहारी जलकेलि करूं नदींत गगनींच्या ॥ १३ ॥
करिसी बरोबरी तूं हंसाची काय ? वायसापसदा ।
करितो घात तुझा मद, मारीलचि जो गृहांत साप सदा ॥ १४ ॥
रे बळिपुष्टा ! दुष्टा ! कैसे हंसासमेत उडशील ? ।
साहस करितां सहसा स्पष्ट व्यसनार्णवांत बुडशील' ॥ १५ ॥

वायस बहु हसाच्या हितवचनाची करूनि कुत्सा हे।
वदता झाला त्यासीं पुनरपि तो गर्वराशि उत्साहें ॥ १६ ॥

— आर्याभारत, कर्णपर्व, अध्याय अठ्ठाविसावा, आर्या १३–२८

३

## तेव्हा गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म

कृष्ण म्हणे राधेया ! भला बरा स्मरसि आजि धर्मातें ।
नीच व्यसनीं बुडता निंदिति दैवास न स्वकर्मातें ॥ १ ॥
जेव्हा तू, दुर्योधन, दुःशासन, शकुनि एकमति झाला ।
कैसे कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लाजिता भ्याला ॥ २ ॥
जेव्हा सभेसि नेली पांचाली मानिलें मनीं शर्म ।
तेव्हा गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ॥ ३ ॥
राज्य न देसी करुनि वनवासाज्ञातवासही जेव्हा ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनन्दना तेव्हा ॥ ४ ॥
केले दग्ध जतुगृहीं वा पांडव वारणावतीं जेव्हा ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना तेव्हा ॥ ५ ॥
चारुनि विषान्न भीमा सर्पे डसविले नृप असे खोटें ।
कर्म करविता कर्णा होता तव धर्म तेधवा कोठें ॥ ६ ॥
फेडी वस्त्र सतीचें जेव्हा उघडें करावया आंग ।
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवा कृपा सांग ॥ ७ ॥
शाश्वत नरकीं पडले पति पहिले पद्मतील वरि अन्या ।
बोलुनि असें सभेत द्रुपदाची गांजिली तुवां कन्या ॥ ८ ॥
खरदुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवा मर्म ।
तेव्हा गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ॥ ९ ॥
अभिमन्यु बाळ बहुतीं वधिता त्वां वारिलें न तें कर्म।
तेव्हा गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ॥ १० ॥

पूर्वी धर्म न रुचला त्यजिला निपटूनि तो जसा कुचला ।
आताचि बरा सुचला धर्मग्रह्य सर्व ह्या परासु चला ॥ ११ ॥
नळ होय धर्मराजा, कलहोत्सुक पुष्करहि तुम्हीं सर्व ।
बळ होतें सत्याचें, खळ हो तुमचा न चालिला गर्व ॥ १२ ॥
मार्गेचि तुम्ही भजता धर्माला तरि तुम्हांसि वांचविता ।
आता भरा, न वाचे दीप्तगृहीं जो न तोय साचविता ॥ १३
मार्गेचि धर्म करिता, जरि देता राज्य, धर्म वांचविता ।
न जगे तो दुर्भिक्षव्यमनापूर्वी न धान्य साचविता ॥ १४ ॥
आता रक्षील कसा धर्म तुम्हीं वित्तमद्यमत्तानीं ।
जो लोटिला दहाटां स्वहितहि मानूनि अहित, लत्तानीं ॥ १५
रक्षात्रा धर्म असा करिसीं उपदेश तरि असे मान्य ।
रक्षितसो धर्मातें आम्हाला धर्म ठाउका नान्य! ॥ १६ ॥
हा धर्म मूर्तधर्म प्रभु, यातें भजतसो असा मान्य ।
लोकात कोण दुसरा सामान्य नव्हेचि हा असामान्य ॥ १७ ॥
आश्रित जनाभिमानी प्रभु, जोले जेधवा असें रागें ।
निःश्वास नृपें लज्जावनतमुखें सोडिला जसा नागें ॥ १८ ॥
न वदे काहींच रथी वेधे तो सूर्यसूनु, चापातें ।
जोडी बाण, कराया मूर्च्छित शशासि सूनुच्या पातें ॥ १९ ॥

४

केकावली

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें ।
न तें अनृत वर्णिनी बुधजनीं सदाचार जें ॥
असे सतत ऐकतें सतत बोलतें, मीच तें ।
प्रमाण न म्हणों जरी उचित मासिरा नीचतें ॥ १ ॥
तथाचि उरलों कसा पतित मी नसें काय कीं ।
कृपाचि सरली अगेंहि न घडे उगाकारीं ॥

नसेन दिसलों कसा नयन सर्वसाक्षी रवी ।
विषाद धरिला म्हणों न सुरभी विषक्षीर वी ॥ २॥
फळीं करि मुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं ।
तयात अविशुद्ध मी, शलभ जेंवि दावानळीं ॥
व्रणार्तपशुच्या शिरावरि वर्नी उभे काकसे ।
स्मरादि रिपु मन्मनीं अहि न काळ भेका कसे ॥ ३ ॥
धना परिजना, घरीं तुमचिया उणें कायसे ।
न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसे ॥
परि प्रभुहि सग्रहीं सकल वस्तुला ठेविती ।
गुणा न म्हणता उणा, अधिक, आदरें, सेविती ॥ ४ ॥
अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार या हे विधी ।
श्रुतिशहि म्हणे सदा, स्तविल आमुची केवि धी ॥
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती ।
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती ॥ ५ ॥
प्रभो ! शरण आलियावरि न व्हा कधीं वाकडे ।
म्हणोनि इतुकेंचि हे स्वहितकृत्य जीवाकडे ॥
प्रसाद करिता नसे पळ विलंब बापा खरें ।
घनाम्बु न पडे मुखीं उघडिल्याविना पाखरें ॥ ६ ॥
म्हणा मज उताविळा, गुणचि घेतला घाबरें ।
असो मन असेंचि या भजकचर्हिमेघा बरें ॥
दिसे क्षणिक सर्व हें भरवसा घडीचा कसें ।
धराल मन ? आधिनें बहु परिभ्रमे चाकसें ॥ ७ ॥
कृतांतकरकामलध्वजजरा दिसों लागली ।
पुर सरगदासर्वे झगडता तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ।
न हो जरि उताविळा स्वरिपु कापितो हा गळा ॥ ८ ॥
असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा करा ।
तयावरि दया, पचे वर असाचि या चाकरा ॥

घृथाचि गमते दिले, यहुहि जें न दासा जिरे।
पुसोनि अधिकार द्या, सुकर ते सदा साजिरे ॥ ९ ॥
तुझें यशचि तारितें, परि न केवळा तारवे।
सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे ॥
न भागवत भेटला, न घडताहि सत्संगती।
न अशहदर्थे, तशीं तव यशोरसीं रंगती ॥ १० ॥
सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो।
कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो ॥
सदंघ्रिकमळीं दडो, मुरडिता हटानें अडो।
वियोग घडता रडो, मन भवच्चरित्रीं जडो ॥ ११ ॥
न निश्चय कधीं टळो, कुजनविघ्नबाधा टळो।
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गीं वळो ॥
स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो।
पुन्हा न मन हे मळो, दुरित आत्मबोधें जळो ॥ १२ ॥
मुखीं हरि वसो तुझी कुशलधामनामावली।
क्षणात पुरवील जी सकल कामना, मावली ॥
कृपा करिशि तू जगत्रयनिवास दासावरी
तशी प्रकट हे निजाश्रितजना सदा सावरी ॥ १३ ॥
दयामृत-घना अहो हरि वळा मयूराकडे।
रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिकस्तुतिपदा ! कदा सापडे ?।
तुम्हा जड भवार्णवीं उतरिता न दासा पडे ॥ १४ ॥
कारूण्यामोद राम प्रियसख गुरुही जो मयूरा नदाचा।
होता तापत्रयार्त त्वरित भववनीं रक्षिता रानदाचा ॥
त्याचे साचें स्वभद्रस्मरण, मग न तें त्या कस ये कवीस।
केका एक्या सख्यातें स्मरुनि, करि अशा एकशे एक्वीस ॥१५॥

—केकावलि, श्लोक ३, ४, २१, २३, २७, ४०, ४५,
४६, ६७, ११६–१२१

अति गुरुतर हे तमरजनी मेघाची पडली साई ।
अति भ्रमिष्ट चाले मार्गी पटले मी नादप्रवाही ॥ १ ॥
गीतसंगीत तानप्रबंधे रव मोहक त्या मुरलीचे ।
सुर किन्नर नर तल्लिन ते महिसहीत अहिपति नाचे ।
वर्णनीं शिणल्या वाणी न चले सुगम वेदश्रुतींचें ।
शेषाच्या चिरल्या जिव्हा अघटित गे करणें याचें ॥ २ ॥
मंजुळ ध्वनि सुंदर नाई वाजविता पडता श्रवणीं ।
खग मृग अति तल्लिन झाले ते पिऊ विसरले पाणी ।
वृक्षाचें पत्र न हाले रविरथ स्थिरवला गगनीं ।
सुर चकित पहाती अवघे मुकले रस अमृतपानीं ॥ ३ ॥
तृण भक्षिति ना त्या गाई पश्वानीं त्यजिला चारा ।
वनिं व्याघ्र वृकादिक सारे हिंसेचा त्यजिति उभारा ।
नरनारि सावधचि अवघे सोडुनिया मोहपसारा ।
गर्जना मेघ न करिती मुनि त्यजिती आत्मविचारा ॥ ४ ॥
सुर असुरादिक स्थिर झाले सोडुनिया सकलहि द्वंद्वा ।
अघटित हे लीला न कळे वर्णिता न वर्णवे वेदा ।
भाषावलि शास्त्रे सारी बोलता न शकतीं शब्दा ।
देवनाथ प्रभु त्या गातो निजभावें नामप्रबंधा ॥ ५ ॥

---

खुटलाचे रविरथ गगनीं । वायू तो मार्ग न चाले ।
चाल— वृक्षाचे पत्र न हाले । अप्सरादि नृत्य निमाले । गंधर्व थकित झाले ॥ वृंदा ॥
लभ्युनिया मग मृग गाई । व्याघ्रावरि टाकिति माना ।
गर्जना मेघ न करिती । नाचती मयूरी आणा ॥
होत्या ज्या वध्या ललना । प्रसवति त्या पुत्रनिधाना ।
चाल— थकित ते मार्थि नाना । सुर न करिति अमृतपाना ।
विसरले मुनी जपध्याना ॥ वृंदावनि ॥

५

## प्रार्थना

ऐक बा रामराया । तुझ्या वंदितो पाया ।
आवरी आपुली हे । विश्वमोहिनी माया ॥ ध्रु ॥
मी मूढ हीन दीन । सर्वसत्क्रियाहीन ।
तूं क्षमाशील देवा । शुद्धचरितनिजाधीन ॥ १ ॥
घडो सदा साधुसंग । नसो विषयप्रसंग ।
सत्प्रेमभक्ति द्यावी । सत्य वैराग्य अभंग ॥ २ ॥
वाटतें नित्य भावें । तुझे साधुगुण गावे ।
मन हें आवरेना । सांग काय म्यां करावें ॥ ३ ॥
करितां संसार काम । मुखीं असो तुझें नाम ।
दयाघना भक्त मोर । वाचा पुरविसि काम ॥ ४ ॥

## देवनाथमहाराज

[ इ. स. १७५४–१८२५ ]

अति गुरुतर हे तमरजनी मेघाची पडली साई ।
अति भ्रमिष्ट चाले मार्गी पडले मी नादप्रवाहीं ॥ १ ॥
गीतसंगीत तानप्रबंधें रव मोहक त्या मुरलीचे ।
सुर किन्नर नर तल्लिन ते महिसहीत अहिपति नाचे ।
वर्णनीं शिणल्या वाणी न चले मुख वेदश्रुतींचें ।
शेषाच्या चिरल्या जिव्हा अघटित गे करणें याचें ॥ २ ॥
मञ्जुळ ध्वनि सुंदर गाई धाजविता पडता श्रवणीं ।
खग मृग अति तल्लिन झाले ते पिऊ विसरले पाणी ।
वृक्षाचें पत्र न हाले रविरथु स्थिरवला गगनीं ।
सुर चकित पहाती अवघे मुकले रस अमृतपानीं ॥ ३ ॥
तृण भक्षिति ना त्या गाई पक्ष्यानीं त्यजिला चारा ।
वनिं व्याघ्र वृकादिक सारे हिंसेचा त्यजिति उभारा ।
नरनारि सावधचि अवघे सोडुनिया मोहपसारा ।
गर्जना मेघ न करिती मुनि त्यजिती आत्मविचारा ॥ ४ ॥
सुर असुरादिक स्थिर झाले सोडुनिया सकलहि द्वंद्वा ।
अघटित हे लीला न कळे वर्णिता न वर्णवे वेदा ।
मात्रावलि शास्त्रें सारीं बोलता न शकतीं शब्दा ।
देवनाथ प्रभु त्या गातो निजभावें नामप्रबंधा ॥ ५ ॥

खुटलाचि रविरथ गगनीं । वायू तो मार्ग न चाले ।
चाल— वृक्षाचे पत्र न हाले । अप्सरादि नृत्य निमालें । गंधर्व थकित झाले ॥ वृंदा ॥
लब्धुनिया मग मृग गाई । व्याघ्रावरि टाकिति माना ।
गर्जना मेघ न करिती । नाचती मयूरी नाणा ॥
होत्या ज्या वंध्या ललना । प्रसवति त्या पुत्रनिधाना ।
चाल— थकित ते मार्गि नाना । सुर न करिति अमृतपाना ।
विसरले मुनी जपध्याना ॥ वृंदावनि ॥

## रामजोशी

[ इ. स १७६२–१८१२ ]

### १

### परमार्थपर लावणी

भला जन्म हा तुला लाभला खुलास हृदयीं बुधा ।
धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु ॥
चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरी ।
जरा तरि समज धरीं अंतरीं ॥
हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिसि का शिरीं ।
मठाची उठाठेव का तरी ॥
वनात अथवा जनात हो का मनात व्हावें तरीं ।
हरीचें नाव भवाब्धि तरी ॥
काय गळ्यात घालुनि तुळशीची लाकडें ।
हीं काय भवाला दुर करितिल माकडें ।
बाहेर मिरविशी आंत हरिशिं वाकडें ।
अहा भक्तिच्या रसारहित तू कसा म्हणविशी बुधा ।
हरिरस सांडुनि घेसी दुधा ॥ ध्रु ॥
जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळ काम कोपला ।
आंतुनि बाहेर म्हणविशी भला ॥
नित्त पाहता पित्त येतसे चित्त पाहिजे मला ।
असें हरि म्हणतो नुमने तुला ॥
दांभिक वर सभावित अभ्यंतरिं नाहिंस निर्मला ।
बहिर्मुख नर नरका लाभला ॥
तू पोटासाठीं करि खटपट भल्तिशी ।
परि भक्तिरसाविण हरि भेटेल काय तुसी ।

काय मौन धरुनिया गोमुखिला जाळिसी ।
स्वार्थसुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला मुधा ।
न जाणसि काजी म्हणसी सुधा ॥ ध्रु ॥
टिळा टोपिवर शिला पडो या विळात करिसी जपा ।
तथापि न होय हरीची कृपा ॥
दर्भमुष्टिच्या गर्भि धरुनिया निर्भर पशुची वपा ।
जाळिशी तिला ताडुला तुपा ॥
दंडकमंडलु वड माजगिरि मुंड मुंडिशी तपा ।
न सार्थक लटक्या सान्या गमा ॥
ही बारबार तल्वार येइल काय पुन्हा ।
ह्या दुर्लभ नरदेहात ठेविशी कुण्हा ।
भगवत भुकेला भक्तिचा पाहुणा ।
वर्म कळेना धर्म घडेना कर्म चित्त न द्विधा।
सदा हरि कविरामावर फिदा ॥ ध्रु ॥

## २

### दुष्काळाची लावणी

उगा भ्रमसि वाउगा कशाला युगांत गाळ हा कली ।
कळी मातला सारा धनदारा इच्छि राज्यासहि हा कली ॥ ध्रु ॥
कुणा न कुणि मना येईल तसे जनासि जन वचिनी ।
धनानिमित्ते मरती किति गरति धरुनि यवन अन्न चारिती ॥
आठ दिशामधि पठाण तिंडा लुटावया धावती ।
उठावयाला तकवा नाहीं वकवा सारा धणिच्यावर झुजती ॥
दार वित्त घरदार दिलें तरि मार चुकेना अती ।
फार वदू मी काय वधिल्या हो गाई बाटविल्या द्विजसती ॥
पट मानलें धुट झालि वेवट बुडाली क्षिती ।
मंद करिति मसलतीला मग फसली तिला नाचरिता अळ भोगिती ॥

पुड घरोघरीं नड कुणावर दड कोण नाधिती ।
रड कुणाचा गाव कुणि घ्यावा कुणि कुणाला किती ॥
असा न कोणी पुसावयाला कसा काळ कशि मती ।
बसावया नच जागा मग पागा गजरथ बागा कुठें राहती ॥
चिक्का आंत त्या निक्का पढविल्या पिकाशि गळ लाविती ।
विकाविया त्या नेल्या किति मेल्या अबला उरल्या जन चुबिती ।
फास गळ्यामधिं बास पाठिवर लोह हाडा लाविती ।
मास विप्र लोकांचें तो कार्चे वेचिती साइस घेऊनि हातीं ॥
धीर वीर का हबिर होऊनि फकीर भिक मागती ।
चीर नसे हो आंगा किति सांगावा तो ताप जिवा लागती ॥
हातें धरुनि देवता फोडिल्या ल्ताराम भगिती ।
गतायु किति झाले किति प्याले विष किति उरले सुरस जेविती ॥
किती सागर उल्कें कुटुंबसह वाव्हले ।
किति दैवगतीनें काशीसही पावले ।
किती कर्नाटक देशांत घनिक धावले ।
किति अन्नाचे जन तेथचि मारावले ।
कैकांनीं हिरे बननागकैफ चावले ।
किति उठाउठी भयभीत मरण पावले ।
किति ब्राह्मणगांल्ही यवनांनीं बाटले ।
कावले जन करितील कागावले ।
अति सात्त्विक ते दुष्कर्मी सरसावले ।
किति फार करिति ते स्वातचि घातरु ।
काय समय हा त्या । रुद्र करिल दया । दृष्टि झाकली भया ।
नका क्षिति झाली । घर चाली । रुद्र त्रिंशति जगि फाकली ।
रसा न करिवर पुसा मनाला कसा काळ हा तरी ।
अमा जनक्षत्र वाढो कांगि पाहो सशय कथितां याचेवरीं ॥
घराधीश कोणी परास म्हणतीं कर पातर्क नरीं ।
दरारा जन निजकर्मे करिति अधर्म राजाची अप्सरा ॥

बाप तयाला ताप वृद्धपणिं पाप पुत्र हा करी।
शाप देतसे तोही म्हणे नोहे माझा वीर्यज हा तरि अरी ॥
माय टाकिली पाय बांधुनी बायकोसी घे शिरीं।
होय कशाचा बेटा तो पेटान्यांतुनि साप काढिला वरी ॥
सून वहिण सासु जे म्हणति तिशीं सुरतवासना धरी।
भवन बुडे पापानें मधुपानें मातुनि माय सुताला वरी ॥
मनीं धरुनि कामिनी मठामधीं मुनी विनय चातुरी।
जगीं दाविती बावापरि आंतुनि कावा भोंदुनि खाती पुरी ॥
लेश नसे उपदेश आपला देश टाकुनी दुरी।
केशवार्चन करती वरती परि आंतुनि कर्मे नानापरी ॥
असे धूर्त जे तूर्त जगामधि मूर्त पाप चव धरी।
पूर्वी सुखादिक यान्नि व त्यांचि कर्मे म्हणूं नको ही खरी ॥
वित्त हरिति निरनिमित्त ठेऊनी चित्त अर्थ यावरी।
मत्त धन्यार्शी चोरी करिती अधिकारी दया कोठून भूसुरीं ॥
सती म्हणती निजपती त्यजुनि नांदती पराचे घरीं।
जिवें मारिती भर्ते त्या वर्ते दुसरे करिति कितिक सुंदरी ॥

कित्ति कन्या हयविक्रये परम पातकी।
एकाची कृति एकास करी घातकी।
किति दुर्मतिनें गुरुपत्नीला हाटकी।
किति जारण मारण उच्चाटण नाटकी।
कितिकाची वाणी मृषा वदुनी हालकी।
धनी यास पालखी चाकरास नाल्की।
कुणि विधवा ठेविती घरांमधीं पाणकी।
मित्रास वंचिती मग कोठुन भावकी।
अशीं कितीं पापें जगीं कुणा ठाऊकी।
जराभयास्तव करावया स्तव जरा मतिस जाऊंदी।
करा श्रवण हो याचे व्हायाचे ऐशी विधिवाणी भाकली ॥ ध्रु ॥

चिन्ह वाटते भिन्न फुटति जे खिन्न जाहले मनीं ।
भिन्न देह किति करती किती भरिती पोटें स्नाना करालुनी ॥
पहा कितिक जन महागाईने दहादिशा धुंडुनी ।
अहा शेवटीं मेले गेले यमलोकाशीं गणावे कुणी ॥
भगाण सारा दणाण झाला कणा न पावती सणी ।
कुणास न मिळे भाजी कुणि राजी करडी मिळो आमडी जुनी ॥
मुरक चढती कुणी भूक म्हणति द्विज आधुक तशा ब्राह्मणी ।
कुकरी शालाशाला कुणि त्याला उभे राहू न देती अगणीं ॥
कढी म्हणति कोणी वडी घालती उडी अन्न पाहुनी ।
रडवितातिं किति पोरें ढोरें वोढिति तैशी दारावुनी ॥
पाक हो न हो हाक मारिती भाकर द्या म्हणउनी ।
टाक मुखामधिं काहीं मज नाहीं म्हणती अन्न पधरा दिनीं ॥
जळा पिउनि किती नळात फुगले पळात वपु त्यागुनी ।
गळा पडुनि किति रडती मरती नाल्क मुडदे कवटाळुनी ॥
क्षुद्र इतर जे शुद्र तयावरी रुद्र कोण या क्षणीं ।
मुद्रस कैचा त्याला भलत्याला भाकर मागसि मुग पसरुनी ॥
चणा अथवा नाचणा एकादा धणा मिळे त्यातुनी ।
उणा दिवाळी दसरा किति दुष्काळाचा घसरा घ्या पाहुनी ॥
पीठ डाळ गुळ मीठ दिगावरी नीट पडति जाउनी ।
धीट सोशिती काहीं परि पाही साडित नच मेल्यावाचुनी ॥

*करतील काय हो अन्नाविण गाजली ।*
ही दुनिया सारी जठराग्नित भाजली ।
नच माधुकरीला कोणि तदा लाजली ।
वेचिली शितें चिखलात राड माजली आपणातच समाविली ।
शेवटीं विळे पळी दिवेलावणी वाजली
यावरी येउनिया देवा का गाजली ।
वैसाने दुद्रने निप पाउनी निजली ।

ही दुष्काळाची चरी नौबत वाजली ।
वर्णावी म्हणुनिया कविमतिला डाजली ॥ ध्रु ॥
सुधि म्हणती निरवधी काळ त्यामधीं दीड पावली ।
कधीं ऐकिली चिपटी कधीं निपट कोळवीं कधीं पाहिलीं ॥
मणास रुपये तेरा तेलाला बारा तुपा शपथ वाहिली ।
गुळ असो तोळा भर आहे कीं मूळ मिठाचीं डली ॥
खूळ लवंगा पैशाच्या सवंगा मिरची पांच दीधली ।
हुजूर वाणी रुजू तराजू खजुरी ती एकली ॥
खिशुन घेती पैसा देतील हो कैसा मारली नच जिभली ।
गहूं म्हणती जे बहु सवंग ते नऊ चिपटी झाली ॥
मऊ नवे जे दाणे वेदाणे झाले अशी दशा माहिली ।
मका रांड ही आम्हा इला परि शिका कोठडी केली ॥
नका झाड एरंडी हे रंडी आठ चिपटीं कधीं ऐकिलीं ।
दुकाळ त्यामधिं बकाळ मंडळी ठकापरिस ठक भली ॥
दुकान घालुनि बसती वरि दिसती निर्फळ घातुक्ता बाइली ।
नितळ सोनियां पितळ म्हणती निज पितळ पुतळी आटली ॥
कुतळ बुडविले सारेही वारे वेळची सराफाइला दिली ।
सार हिऱ्याला गार म्हणति सोनार देत पावली ।
चार शेर तांब्याला कां म्याला म्हणे कांसार देत अधेली ।
पुरे काळ हा नुरे योग्यता विरे निधुनी चालली ॥
अहो शालुच्या फरदा चवलीचा खुर्दा काय गोष्ट चांगली ।
हें गहो भाजींत बारावा न जोडका ।
पैशाचा एकचि मुळा एकचि टोडका ।
पैशास मक्याचा कंद एक मोडका ।
हा कांदा दो पैशांस एक बोटका ।
चळगास रुपाया एक लहान सोडका ।
घोड्यास शिपाई काय करील घोडका ।
काळानें देशा यापरी केला रोडका ।

मग ह्यार राजउपाय काय थोडका ।
साऊनी नावद म्हणो नये गोड का ।
अजातरिपु हे प्रजा इत पर मजा वृष्टि शिरकली ।
दुजा असुनि कविरायाच्या कृति येथून उरकली ॥

## होनाजी बाळा

### १

### लावणी

आम्ही प्रलयगता तुझी ग बुध नाहीं कामाची । आली धन्याची पत्रें आम्हाला जलदी जाण्याची ॥ ध्रु ॥ या लष्करची सुरत साजणी नये ग सांगाया । आहे धन्याची दया आम्हावर कृपेची छाया । उठून तार्जीम देती टाग पगतीचा जेवाया । पोऱ्या खिसमतगार कोतवाल घोडा बसाया ॥ ( चाल ) ॥ स्वारि जपुन चाले । नवुमे रगीत भाले । वीटे पटेवाले । हाती विनीवर चाले । नौबद वाजे कडाक्याची । नामज्यात शीपाई पुढे जीलीन गारद्याची ॥ आम्ही प्रलयगता ॥ १ ॥ करनाटकची स्वारीस होतो श्रीमतावरोवर । रण संग्रामीं झटुन आगी केली तलवार । हीगातुन फटके आम्ही शिपाई रणशूर । झाडिमध्यें पिटुन घातला टप्पून हैदर ॥ (चाल) पाटुन मनीं चमका । म्हणनी त्याला हटका । शिरपाव द्या जरीपटका । चवरी आबदागिरी नक्षीग कठी मोत्याची आबदाची तोनी येक पालखीची ॥ आम्ही प्रलयगता ॥ २ ॥ पुवा पामुन नक्षा चालत आला वडिलाचा । आणीबाणीच्या वेळीं विडा उचलिला पैजेचा । कटुन मरावे खरें असा धर्म क्षत्रियाचा । कसे राहा म्हणतीस घरीं डाग लागेल जन्माचा ॥ ( चाल ) ॥ नाहीं असे कधी घडलें । यास्तव येणें पडलें । न कळे काहीं पुढले । होईल गे इतराजी आबरु असुची । नारी सारी गुतुन राहिली सालमजकुराची ॥ आम्ही प्रलयगता ॥ ३ ॥ करुनिया मनसुबा निघाले मग नगरातुन । प्रात काळीं साहा घटकेचा सुहूर्त पाहून ।

घर पागाही तयार केली मोठे हौशीनें । चौरोसावर मुकाम केला लौकर जाऊन ॥ ( चाल ) ॥ कवी म्हणे बाळा महेरु । गुणी म्हणे लावणी ही मनि रामाची । ज्ञानजळीची फत्ते तलवार रेवडी रावळाची । असी प्रलयगता ॥ ४ ॥

## २

## भूपाळी

*घन श्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठिं लवकरि वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥
सायंकाळीं एकें मेळीं द्विजगण अनचे वृक्षीं ।
अरुणोदय होताचि उडाले चरावया पक्षी ॥
अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरण दक्षी ।
प्रभातकाळीं उठुनी कापडी तीर्थपथ लक्षी ॥
करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनी कुक्षी ।
यमुनाजळासी जाति मुकुंदा, दध्योदन भक्षी ॥
मुक्तता होउ पाहे कमिळिणिपासुनि भ्रमरा ।
१ पूर्व दिशे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा ।

उठिं त्वकरि गोविंदा सावळया नदकुमरा ।
मुख प्रक्षाल्न करी अंगिकारीं भाकर काला ॥ उठिं ॥ १ ॥
घरोघरी दीप अखंड त्याच्या सरसावुनि वाती ।
गीत गाति सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥
प्रवर्तोनि गृहकामीं रगावली घालु पाहाती ।
आनंदकंदा प्रभात झाली, उठ सरली राती ॥
कार्दी धार क्षीरपात्र घेऊनि धेनू हबरती ।
दारिं उभे गोपाळ तुजला हाक मारुनि राहती ॥
हे सुमनहार कंठीं घालि या गुंजमाळा ।
हातीं वेत्रकाष्ठ बरवें कांबळा घेई काळा
ममात्मजा मधुसूदना हृषिकेशि जगत्पाळा ।
हबरताति वासरें धेनुस्तन पाहा आला ॥ उठिं ॥ २ ॥
प्रात स्नानें करुनि गोपिका अल्कार नटती ।
कुंकुमादि चर्चुनी मथनालागिं आरंभिती ॥
प्रेमभरित अंतरात वदनीं नामावलि गाती ।
अर्घ्यदान देउनिया द्विजजन देवार्चन करिती ॥
नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णुपूजा समर्पिती ।
स्मार्त शिवार्चनरक्त शक्तितें शाक्त आराधिती ॥
ऋषिगण आश्रमवासी जे का निरंजनीं धाले ।
अरुणोदय होताचि आपुले ध्यानिं मग्न झाले ।
पद्मपत्र उप कालीं रविचक्र निघों आलें ।
येवढा वेळ निजलासि म्हणुनि हरि समजेल नंदाला ॥ उठिं ॥ ३ ॥
विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सान्र गुरुपायीं ।
अध्यापन गुरु करितीं, शिष्यही अध्ययना उदयीं ॥
याज्ञिकजन कुंडात आहुती टाकिताति पाहीं ।
रविप्रभा पडुनिया उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥
हे माझे सावळे पाडसे उठीं कृष्णाबाई ।
मिष्टसवे बळिराम घेउनी गोधने वना जाई ॥

मुनिजनमानसहंसा गोपीमन कमलभृंगा ।
मुरारपंकज पाणी पद्मनाभ श्रीरंगा ।
शकटांतक सर्वेशा हे हरि प्रतापतुंगा ।
कोटिरवीहुनि तेज आगळें तुझिया वदनाळा ।
होनाजी बाळा नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा ।। उठि ।। ४ ।।

## कृष्णकेशव

### भूपाळी

उठी गोपालजी जाइ धेनूकडे । पाहती सौंगडी वाट तूझी ।। ध्रु ।।
लोपली हे निशा मंद झाला शशी । मुनिजन मानसीं तुज ध्याती ।।
भानु उदयाचळीं तेज पुंजाळलें । फुललीं कमळ उदकीं ही ।।
धेनुवत्सें तुला बाहती माधवा । उठि गा यादवा उशीर झाला ।।
उठि पुरुषोत्तमा वाट पाहे रमा । दावी मुखचंद्रमा सकळिका ।।
कनकपात्रांतरीं दीपरत्नें बरीं । ओवाळितें सुंदरी तुजलागीं ।।
जन्मजन्मांतरी दास होऊं हरी । बोलती वैखरी भक्त तूझें ।।
कृष्णकेशव करीं चरणांबुज धरी । ऊठ ना श्रीहरी मायबापा ।।

## अनंतफंदी

[ इ. स १७४४–१८१९ ]

१

### रावबाजीचें वर्णन

वडिलाचे हातचे चाकर । त्यास न मिळे भाकर ।।
अजागळ ते तूपसाकर । चारुनि व्यर्थ पोशिले ।। १ ।।

सत्पात्राचा त्रास मनीं । उपजे प्रभूचे मनांतूनि ॥
ज्या पुरुषास न पुसे कोणी । आधीं त्याला भजावें ॥ २ ॥
तट्टू ज्यास न मिळे कधीं । पालखी द्यावी त्यास आधीं ॥
मडकें टाकूनि भांड्यांत रांधी । ताट वाट्या भोजना ॥ ३ ॥
द्रव्य देवोनि आणिक आणिक । नवे तितके केले धनिक ॥
जुन्याची तिंबुनि कणिक । राज्य आपुले हरविलें ॥ ४ ॥
जो पायलीची खाईल क्षिप्रा । पालखी द्यावी तया विप्रा ॥
निरक्षर एकाद्या विप्रा । त्याला क्षिप्रा चारावी ॥ ५ ॥
एकें दिवशीं व्हावी खुशाली । स्वारीपुढें शंभर मशाली ॥
एकें दिवशीं जैसी निशा आली । मशाल एकही नसावी ॥ ६ ॥
मेण्यांत बसावें जाउनी । कपाटें घ्यावी लावुनी ॥
स्वरुप कोणा न दाखवुनी । जागे किंवा निजले कळेना ॥ ७ ॥
हुताशनीच्या सुंदर गांठ्या । शेरशेर साकरेच्या पेट्या ॥
विप्रकंठीं जैशा घंट्या । उगाच कंठ्या घालाव्या ॥ ८ ॥
तशाच राख्या जबरदस्त । संभाळितां जड होई हस्त ॥
दौलत लुटूनि केली फस्त । हस्त चहूंकडे फिरविला ॥ ९ ॥
तुरा शिरीं केवढा तरी । बहुतची मोठा चक्राकारी ॥
हार गजरे नखरेदारी । सोंगापरी दिसावें ॥ १० ॥
हात हात रेशमी धोतरजोडे । चालतां ओझें चहूंकडे ॥
आंगवण दहादां पडे । चरणीं खडे रुततानी ॥ ११ ॥
पोशाख दिधले बाजिरावें । मोच्यांस पैका कोठें आहे ॥
तैसेंच अनवाणी चालताहे । शास्त्री अथवा अशास्त्री ॥ १२ ॥
घडींत व्हावें क्रोधयुक्त । घडींत व्हावे आनंदभरित ॥
घडींत व्हावें कृपण बहुत । घडींत उदार कर्णापरी ॥ १३ ॥
घडींत व्हावी सौम्य मुद्रा । घडींत यावा कोप रुद्रा ॥
घडींत घ्यावी क्षणैक निद्रा । स्वेच्छाचारी प्रभु हा ॥ १४ ॥

## २

### फटका

विकट वाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडु नको ।
संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरू नको ॥
चल सालसपण धरुनि निरालस बोला खोट्या बोलु नका ।
अंगिं नम्रता सदा असावी राग कुणावर धरू नको ॥
नास्तिकपणात शिरुनि जनाचा बोल आपणा घेउ नको ।
भली भलाई कर काहीं पण अधर्म मार्गी शिरू नको ॥
मायबापावर रुसू नको । दूर एकला बसू नको
व्यवहारामधे फसू नको । कधीं रिकामा असू नको
परी उलाढाली भलभलत्या पोटासाठीं करू नका ॥ १ ॥
वर्म काढुनि शरमायाला उणें कुणाला बोलु नको ।
बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करुनी हेवा झटू नको ॥
मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्वभार हा वाहु नको ।
एकाहुनि चढ एक जगामधिं थोरपणाला मिरवु नको ॥
हिमायतीच्या बळें गरिबगुरिबाला तू गुरकावु नका ।
दो दिवसाची जाईल सत्ता अपेश माथां घेऊ नको ॥
बदुरा कर्जबाजारी होऊनि बोज आपला दवडु नको ।
स्नेह्यासाठीं पदरमोड कर परंतु जामिन होऊ नको ॥
विडा पैजेचा उचलु नको । उणी तराजु तोलु नको
गहाण कुणाचें डुबवु नको । असल्यावर भीक मागु नको
नसल्यावर सागणे कशाला गाव तुझा भीड धरू नको ॥ २ ॥
उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करू नको ।
बरी खुशामत शाहाण्याची परि मूर्खांची ती मैत्री नको ॥
कष्टाची बरि भाजिभाकरी तुपसाखरेची चोरि नको ।
आल्या अतिथा मुठभर द्याया मागें पुढतीं पाहु नको ॥

दिली स्थिती देवानें तींतच मानी सुख कधीं विट्‌ नको ।
असल्या गाठीं धनसंचय कर सत्कार्यीं व्यय हट्ट नको ॥
आता तुज ही गोष्ट सांगता सत्कर्मे ओसरू नको ।
सत्कीर्तीनौबदिचा डंका गाजे मग शंकाच नको ॥
सुविचारा कातरू नको । सत्संगत अंतरू नको
द्वैताला अनुसरू नको । हरिभजना विस्मरू नको
गावया अनंतफंदाचे फंदें मार्गे सरू नको ॥ ३ ॥

## २

### बंड व दुष्काळ

असो पुढें बंडाला आरंभ झाला । जोही त्याच्या गृहात गेला ॥
घरधनीच होउनी उभा ठेला । यजमान तैसा तस्कर ॥ १ ॥
ज्यास जी वस्तु आवडावी । तितुकी त्यानें सांवडावी ॥
मना जे नावडावी । ते ठेवावी घरधन्यास ॥ २ ॥
दह्यातुपाची चारुळी । भरुनी भरावी थारोळी ॥
घरधनी मारिता आरोळी । आधीं त्याजला चोपावें ॥ ३ ॥
मग त्याची गृहस्वामिनी । करीत भोंवतीं शंखध्वनी ॥
तों तिची बांधुनिया वेणी । मार देती फरमासी ॥ ४ ॥
लावूनिया दरवाजा । यथासांग घालिती पूजा ॥
येथें ईश्वराखेरीज । दुजा कोण त्याला वाचवी ॥ ५ ॥
हस्त देहेचे मार द्यावे । लाऊनिया तप्त तवे ॥
मोठमोठाले नरवरी तवे । उभे करावे त्यावरी ॥ ६ ॥
एक मस्तकीं एक तळीं । चाबकानीं झळाळी ॥
उष्ण वरती तळतळी । हस्त सकळीं मारावया ॥ ७ ॥
कर्णमार्गीं दारू भरिती । वरूनि बत्ति लाविती ॥
तिळमात्र दया नुपजे चित्तीं । शिवाय कुरघोड्या वेगळ्या ॥ ८ ॥

रीं दोनशांस करावे ओणवे । उडून त्यावरी बैसावें
राख मिरची घालूनि द्यावे । तोबरे मुखीं घोड्यांच्या ॥ ९ ॥
अशक्ताची करावी घोडी । वर बसवावा जड गडी ॥
सत्यपणें ओढीत गुड्गुडी । तोंड झोडी चाबकानें ॥ १० ॥
चराटांची सरासरी । त्यांची करावीं गळसरीं ॥
मग तो डोळे वटारी । प्राण जाऊं पाहती ॥ ११ ॥
खटमार म्हणजे जगविख्यात । वरकड मार त्याचे आश्रित ॥
ही टूम ईश्वरें अनश्रुत । कोठूनि काढिली कळेना ॥ १२ ॥
इंद्रियातें बाधुनि दोरी । उचलुनी त्याचे तराजु करी ॥
एक येता जाता मारी । कोठवरी सोसाव्या यातना ॥ १३ ॥
कांकडे धरुनिया अपुले हातीं । समग्र दाढी मिशा जाळिती ॥
एक मोचासुद्धां हाणिती । मुखावरी ब्राह्मणाच्या ॥ १४ ॥
मुखावाटे वाहे रुधिर । तो पुनः मारिती वारंवार ॥
आरडताती जैसे ढोर । हे उपचार शरिराचे ॥ १५ ॥
पायांस बांधावी चर्‍हाटें । झाडासी बाधिती उफराटे ॥
मग ते ब्राह्मण अथवा मराठे । कोण तेथे निवडतो ॥ १६ ॥
फकीर मानभाव संन्यासी । अतीत गोसावी तापसी ॥
त्यास हे पापी अभक्तरासी । मार मनस्वी देताती ॥ १७ ॥
अग्निहोत्र यांच्या यज्ञकुंडी । कोपोनि राधिती अजामुंडी ॥
होमशाळेमाजीं धुंडी । घरधनी कोठें धरा हो ॥ १८ ॥
कोण कोणाचा प्राण वधी । याची दाद ना फिर्यादी ॥
असंख्यात अमर्यादी । रीत स्वल्पी नाटळे ॥ १९ ॥
घरांत वसता उपद्रव वरी । बाहेर निघता मलता धरी ॥
जेऊं न घाली मातोश्री । पिता भिक्षा न मागू दे ॥ २० ॥
पीक पाणी यावें रंगा । म्हणावें चारावें तुरंगा ॥
रयत नेली भवगंगा । केवढा दंगा ओढवला ॥ २१ ॥
*घरदार लुटावे सर्वपरी । घरधनीच धरावा बिगारी ॥*
बायका मुलें लहान थोरीं । बिगारी अवघ्यानी पोचवावी ॥ २१ ॥

घेरे टाकूनिया बिगारी न्यावे । मुकामीं झाडासी बांधावे ॥
आणिक त्याजला पुसावें । दौलत कोठें दारास ॥ २३ ॥
मग ते बोलता दीनवदन । दौलत आणिती आपण ॥
आता वाचवा आमुचे प्राण । मस्तकें ठेवती पायावरि ॥ २५ ॥
तईंचे मस्तक धरुनि त्यानीं । आपटीत असावें मेदिनीं ॥
हाय हाय म्हणोनी । प्राण जाती कैसाचे । २५ ॥
तथापी त्याला न सोडिती । राहिले त्यासही तोडिती ॥
माकड्हाडें मोडिती । कुठार जसी काष्ठावरा ॥ २६ ॥
आल जैसे पिरगळावें । तैस मनुष्य धरुनि मुरगळावें ॥
गळ्यात बांधोनिया टांगावें । ओढावें जैस मदरु ॥ २७ ॥
एक नासिक पिरगाळिती । एक उगीच गालोरे घेती ॥
एक उठूनिया बैसती । घोड्यापरी माणसावरी ॥ २८ ॥
एक म्हणती असुचा घोडा । मोडा याचीया माकडहाडा ॥
लुटोनी आणिला ज्याचा वाडा । त्याच्या अपेष्टा ह्या केल्या॥२९॥
ऐसा बडाचा उपद्रव । व्याध्यास पातले वैभव ॥
मग ते तृणप्राय सर्व । गर्वमर्द व्यापिलेती ॥ ३० ॥
कोणि कोणात न ओळखती । ज्यास द्यावें त्यास न देती ॥
न द्यावें त्याचे दारीं हत्ती । बळेंच नेवोनी बांधावा ॥ ३१ ॥
*समय पातला उफराटा । ज्याचे सदनीं सुवर्णसाठा ॥*
त्याला अपवाद पिठाचा तोटा । दोन प्रहराची भ्रांती त्याला ॥३२॥
लुटीची वस्त्रें अपरिमित । महार पोरग्यास झाली प्राप्त ॥
परतु पाघरावयाची पूत । काय त्याला ठाऊकी ॥ ३३ ॥
मस्तकीं गुडाळिती पितांबर । लुगडेंच पांघरती वेडे पीर ॥
बायकाचे अलंकार । गळ्यात घालाव आपल्या ॥ ३४ ॥
हार पुतळ्याचे घालिती गळा । भार्येत आपुल्या साग सकळा ॥
काही आहेत सुनेच्या माळा । दुसऱ्या लेइल्या दुल्लडीं ॥ ३५ ॥
*ऐसीं अर्भकें उत्पन्न झाली । त्यानींच ही पृथ्वी लुटिली ॥*
दीनवदनें मनुष्यें कली । घरोघर भिकारी जाहले ॥ ३६ ॥

रकटे ज्यानीं पाघरावे । एकदाच त्याची उपटली दैवें ॥
शालजोडींत पर्ग माधावें । मोट जैशी चन्हाळ्याची ॥ ३७ ॥
दो दो लक्षाचा एक वाडा । त्याचा फोडोनिया क्वाडा ॥
मोकळा अथवा पिठवाडा । मदिरात लोळती उंदीर ॥ ३८ ॥
मोठमोठाली देवालयें । चागली राहू देऊ नये ॥
छिन्न भिन्न करावे हातपाय । कर्णघ्राण फाडावीं ॥ ३९ ॥
कोट्याधिपती संभावित । मार मारू भरावे भीत ॥
बताव ऐसें बोलतात । तोंडात घालिती बोकणे ॥ ४० ॥
जरी कोट्यावधी दिधले द्रव्य । तरा बताव ऐसी राहू नये ॥
आणीकही दारला काट आहे । बताव काहीं न सरेची ॥ ४१ ॥
मग बताव त्याची सरावी जेव्हा । प्राण त्याचा जाईल जेव्हा ॥
द्रव्य नाहींसे समजावें तेव्हा । असत तरी का मरते हो ॥ ४२ ॥
कोल्दाडे घालोनिया एकसरीं । झाडासि टांगिताती द्वारोद्वारीं ॥
जळत काष्ठे घालिती शिरीं । मास तोडिती साडसानें ॥ ४३ ॥
दुधारी ठेवावीं वक्ष स्थळीं । एक उगाच नेटें मुरगाळी ॥
एक नाकपुडी पिरगाळी । एक निपसतो दाढी मिशा ॥ ४४ ॥
एकदाचि धरोनिया दों दोनशे । नळदात कोंडावीं माणसें ॥
पुन त्याचे स्मरणही नस । जिवत किंवा मेले ते ॥ ४५ ॥
जरी भिकारी लागला हातीं । त्यास बिगारी लागे मारतानी ॥
जिकडे जाती तिकडे नेती । ओझें मनस्वी लादावे ॥ ४६ ॥
जी जी वस्तू सापडावी । ती ती बिगारीयापाशीं द्यावी ॥
मनस्वी ओझ्यानें मूर्च्छना यावी । वरुनीया वानें वडवावें ॥ ४७ ॥
म्हणे दिसतोसी तरणाताठा । असा तर तू नेशील चार मोटा ॥
मग सोबत्यास म्हणे तुमच्याही गाठा । टाका आमुच्या तट्टावरा ॥ ४८ ॥
तो बिगारी कैसा वाचावा । पुन गृहात न यावा ॥
मग तो गेलिया गावा । ऐसेही मेले लक्षावधी ॥ ४९ ॥
कैसेही शक्तिमान असेल मनुष्य । तें शक्तयनुसार उचलील ओझ ॥
पहिलवान मस्तकीं सहज । मन कैसा घेईल ॥ ५० ॥

जैसे दाणे काढिती कणसाचे । मग काय प्रयोजन विटोरियाचें ॥
तैसें मास रक्त भक्षावें त्याचें । सापळे हाडाचे लोळती ॥ ६५ ॥
ते मास ज्यानें भक्षिलें । सर्वेची त्याचे प्राण गेले ॥
असो ऐसे लक्षानुलक्ष मेले । गणित कोणा न करवे ॥ ६६ ॥
कोणी गृहस्थ ठेवारा चाकरी । तो चोरुनी आधीं भक्षितो भाकरी ॥
इतकी धान्याची अखेरी । कधीं पाहिली न ऐकिली ॥ ६७ ॥
स्त्री पाहतसे भ्रताराचे मढें । तिच्याही न पाहवे पोटाकडे ॥
तान्हें लेकरुंही न घेववे कडे । त्याचीही आस्था सोडिली ॥६८॥
कोण प्रेताला ओढितो । येथें अवघ्याचा प्राण जातो ॥
कोण कोणाचा समाचार घेतो? । यात वाचतो कोणता ॥ ६९ ॥
घरीं सर्वत्रालागीं जाणा । एक सारख्याचि वेदना ॥
धनाढ्यासी न मिळे दाणा । मग निर्धन कैंचा वांचतो ॥ ७० ॥
प्रताप असतो यत्किंचित । परंतु कवीचा लाघव बहुत ॥
तैसा येथें अनर्थ अद्भुत । कविनें यत्किंचित वर्णिलें ॥ ७१ ॥
मह्म अभिमानी देखण्या नारी । त्या घरोघर लागल्या दाण्यावारी ॥
घरधनी वरुनी काठ्या मारी । मग अभिमान कोठें राहिला ॥७२॥
बड आणि महर्घतेचा सयोग । त्या उभयतांच्या घडता योग ॥
प्रलय झाला यथासांग । रसावयाला जागा न ठेविली ॥ ७३ ॥
स्वामीचा जे घात योजिती । शेवट त्याच्या ऐशा गती ॥
सक्रियेसी न जागती । ते अधोगतीं मरताती ॥ ७४ ॥

## सगन भाऊ

### पानिपतची लढाई

भाऊनाना तलवार धरुन । गेले गिलच्यावर चढाई करुन ॥ ध्रु ॥
गिलच्यानीं हुकमत करुन भाऊ वेढीला बहु युक्तीनें । जठराग्नी चेतला

समजला व्याघ्र पचानन ॥ झागड नौबती वाजती वाजती दणादण भेरे वाजे मगीन। डंके झाले पताकाच्या घोड्यावरतीं ठेविलें जीन ॥ फोजा झाल्या तयार निष्ठूर करमळाच्या मैदाना। चोर डाक एकही होती गिळचाची नाहीं कळलें सधान। गिल्चा झाला घाबरा आणि वेढा उठविला जलदीनें ॥ दोनीं दळें झाली तयार त्यानेळे करता नारायण ॥ आदितवारी ल्दाई नेमिली जल्दिनें। भाऊस बातमी कळली जरीपटका गेला चालून ॥ चाल ॥ गिल्च्यानीं रणराव पूजीला भाऊशी वर्तमान कळला। काय पहातां गनीम सापडला। एकदाच हरहर केला ॥ रोखिले आराडी जेजाल। कडानिन सुतरनाल ॥ ऐंशी हजार होळकर भाला। शिंद्यानी मार खूप दिला। बाण सुर्खी वीर कमानीला। अरब दुपटीं तो रोहिला ॥ गोसावी धुंदत चालला ॥ करमलानें घोडा चमकाविला ॥ बाराभाईच्या मडपावर ढाला। फौजेचा मग चढ तुटला ॥ भाऊसाहेब अबारींत दुल्ला। दादू महातानें हत्ती पुढें नेला। आतु जडियले हत्तीला। तीर कमान हातीं धरला। कीं भीमसेन पाडवदळीं आला। कीं पार्थ वीर गनळिला ॥ दिल्ली सरबत्ती ताफेला ॥ नऊ हजार गोळा उडाला ॥ चाल ॥ तासे मर्फे ते तुरु किनी वाजती। कर्णे किनिएक रणनहिरी ककनी। गिल्च्याच्या तोफा बुल्पी गोळे गर्जती। धुकोट बाण जशी ढगात वीज चमकती। दणादण मेरू मांदार धरणी कापती। आडुमाड्ड शिपाई व्याघ्र उड्डाण साठती। वीरास वीर तरकून पुढे सरकती। झाली हमका शत्रुला वीरस वीर घुमतीं ॥ पेटीं गनाजगी स्वारावर स्वार धडकनी। बारा हजार पालखी भाऊची झाली रितीं। तीन लाख घाडा गर्द अरिपटक्याचा हत्ती। एशी हजार होळकर गुप नाहा दिसतीं। पायदळाचे गाळे जागोजाग पडले शिरीं। सोकल्या कठ मग पाणी पाणी बोलती। जरमाची नाहीं गगनी करथ नाचती। स्वर्गाचे देव पाहती वर्गिती अमगरती। गगनीं झाले सूर्यचंद्र भिऊनी ॥ ध्रु ॥ भाऊनाना ॥

—पानपतचा पोवाडा, चौक दसरा

# प्रभाकर

[ इ स १७६९ ते १८४३ ]

## १

## सवाई माधवराव रंग खेळले

जसा रंग श्रीरंग खेळले वृंदावनिं द्वापारात ।
तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगात अति आदरात ॥ ध्रु ॥

धन्य धन्य धनि सवाई माधवराव प्रतापी अवतरले । कीर्ति दिगंतरीं करून मुळांतिल सर्व पुरुष पहा उद्धरले ॥ एकापरिस एक मंत्रि धुरंधर बुद्धिमंत शहाणे ठरले । दौलतिचा उत्कर्ष दिसदिस नाहीं दरिद्री कुणि उरले ॥ शालिवाहन शक नर्मदेपावत जाऊन जेथें घोडे विरले । श्रीमंतास करभार देऊन आले शरण रिपु पृथ्वीवरले ॥ चाल ॥ महावीर महादजीबावा हुजरातीचे ॥ आणुनी मरातब नाच्छाई वजिरातीचे ॥ करूं महोच्छाव खुब मोठ्या गजरातीचे ॥ चाल ॥ तऱ्हेतऱ्हेचे ख्याल तमाशे बहुत होति दळभारात ॥ श्रीमंताचा संकल्प हाच कीं रंग करावा शहरात ॥ १ ॥

फल पाहुन मर्जिचा बरोबर रुकार पडला साऱ्यांचा । सिद्ध झाले संपूर्ण पुण्यामध्ये बेत अधिक अधिकाऱ्यांचा । मध्ये मुख्य अंबारी झळाळित मार्गे थाट अंबाऱ्यांचा । चंद्रबिंब श्रीमंत समोवता प्रकाश पडला ताऱ्यांचा । हौद हाडे पुढें पायन्ळातरीं पाऊस पडे पिचकाऱ्यांचा । धुमाधार अनिवार मार भर नवाऱ्या फरकाऱ्यांचा ॥ चाल ॥ नरवीर श्रेष्ठ पुरी नवळ कृष्णार्जुन ॥ वर्णिती भाट यश किर्ति सकल गर्जुन ॥ चालली स्वारी शनवार पेठ वर्जुन ॥ चाल ॥ घरोघरीं नारी झुरझुरक्यातुन सजुन उभ्या शृंगारात । गुलाल गर्दी पेल दुतर्फा रंग रिच विती नहारात ॥ २ ॥

सलाम मुजरे सर्व राहिले राव रंगाच्या छंदात । हास्यवदन मन सदय शोभले शूर शिपाईवृंदात । दोहा दाशा हाता भरमुठी दिरहे छत लाल दिसे खुब बुंदात । तक्तराव जिलेवत नाचती सभागना आनंदात । सुदिन दिवस तो

प्रथम दिसाहुन शकें सत्रारों चवदात। परिधावि सवत्सरात फाल्गुन वद्य चतुर्दशी घादात ॥ चाल ॥ बाळाजि जनार्दन रगामधें रगले ॥ रगाचे पाट रस्त्यात वाहू लागले ॥ किति भरले गुलालें चौक ओटे बगले ॥ चाल ॥ कुल-दीपक जन्मले सगुणी गुणी महादजी बाबा मुगरात। पराक्रमी तलवार बहादर मुगुटमणी सरदारात ॥ ३ ॥

भोतगले रणगाडे गुलालें भरून चालती स्वारींत। गुलाल गोटे शिवाय ठिवले निरनिराळे अंबारींत ॥ आपा बळवतराव रसाशित चौरी मिजाजीत बागीत। लाल कुसुवी रुमाल उडती घडोघडी मैरफगारींत ॥ कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करिति। बल्लम जाण बोथाट्या इटे ल्गी वाद्य घोष डिमदारींत ॥ चाल ॥ भले भले एकाडे मधें घोडे घालती। बारगीर भिनीवर ध्वज रक्षित चालती ॥ सपूर्ण भिजविले जन रगाचालतीं ॥ चाल ॥ नेत्रपाणि वारिती तरी झालि गर्दी मोठी बुधवारात। झुकतझुक्त समुदायसहित निट स्वारि आली रविवारात ॥ ४ ॥

आधींच पुणें गुलजार तशामधें अपूर्व वसला आदितवार। त्यात कृष्ण श्रीमत आवतर समस्त यादव परिवार ॥ हरिपत तात्यानीं उडविला रग केशरी अनिवार। हर्ष होऊनी राजेंद्र झाकिली शरिरानन वारवार ॥ पाटिल बावानीं नेऊन शिबीरा रग केला जोरावार। वस्त्रे देऊन किनखाब वाटिले ठाण कुशाल गजवार ॥ चाल ॥ चालली स्वारी मग महिताबा लाऊनी ॥ कुरनिसा करिती जन वाड्यामधें जाऊनीं ॥ दासवी पवाडा गगु हैबती गाऊनी ॥ चाल ॥ महादेव गुणिराज फेंकिती तान तनतन दरबारात। प्रभाकराचे कवन पसरलें सहज शतावधि नगरात ॥

## २

## खर्ड्याची लढाई

ल्ष्कर सगळे गुर्के। जरिपटक्याभोंताले घालिती गरर मानकरी गर्के। सुदर गोरे भुर्के। घोरपडे पाटणकर महाडिक ग्यानविल्कर शिर्के। मुगी मध्यें ना फिर्के। चव्हाण मोहिते गुजर धाडग निंबाळकर दे चर्के ॥ चाल ॥ पुढें

पसरले रिसालदार । मुसा मुनीम नामदार । सय्यद अहमद जमादार । अमीर आनास नव्हे नादार । शहामिरजा ते डौलदार । इतबयावर ते हुकुमदार । राघोपंत ते दौलतदार । तसे काशिना बल्लाळ रानडे ॥ चाल ॥ गोरा मुसावास अमोल । मुसा नारद तो समतोल । विनायकपंताचा गलोल । आना काळे गुणीच डोल । टोपकराचे बोलती बोल । पायदळाचा नाघोनि गोळ । तबुर ताशे वाजती ढोल । उठावल्या बैरखा निशाणें ॥ चाल ॥ सरस्थानी याविरहित राजे । सेनासाहेब किताब साजे । रावोजीबावा नाव विराजे । बाणाचा मडिमार माजे । सरखेलांचा लौकिक गाजे । समशेर बहाद्दर गरीब नवाजे । अक्कलकोटी लोक ताजे ॥ दुर्जनसिंग रजपूत हडोदी ॥ चाल ॥ दक्षिण उत्तर पश्चिम भागीं । पसरून तोफा जागोजागीं । तमाम गारदी त्याचे मार्गी । त्यासैन्य त्यामागें झगागी । जरिपटका तो दुरून धगागी । कोणीच नव्हता त्यात अभागी । त्वरित बक्षिस पावे विरागी । जासूद साडणीस्वार धावती ॥ चाल ॥ काय पलटणच्या फैरा झडती । पर्जन्यापरि गोळ्या पडती । शिग्कमळें कदुकवत् उडती । छिन्न भिन्न किती होऊन रडती । कितिक पाण्याविग तडफडती । कितीक प्रेतामधींच दडती । वीर विराशी निसग भिडती । सतीसारखे विडे उचलिती ॥ चाल ॥ पाऊल पाऊल पुढें सरकती । घाव चुकावुन शूर थडकती । सपुत वाघापरी गुरकती । हत्यार लावुन मागें मुरकती । सुणेनें शत्रुवर्म तरकती । मोंगल बच्चे मागे सरकती । जिवबादादा मनीं चरकती । अररर शाबास बापानो ॥ सुटती तोफा धुद दणादण । गुंगत गोळे येती छणाछण । सों सों करिती बाण सणासण । खालेल घोडे उडती टणाटण । टापा हाणती दुरून ठणाठण । वाजति पट्टे खांडे खणाखण । नौबति झाजा झडती झणाझण । एकच गर्दी झाली धुराची ॥ ॥ चाल ॥ थोर माडली रणधुमाळी । अगदींच बसली मग काठाळी । फौज पसरली रानोमाळीं । लाखो लाख तरवार झळाळी । होळकराची फिरती पाळी । जिवबाची मर्दुमकी निराळी । मोंगलाची केली टवाळी । सबळ पुण्य श्रीमंत प्रभुचें ॥ चाल ॥ अठरा घटका लाही फुटली । तोफ हजारो हजार सुटली । मिरजकराची मडळी झटली । भाउ-बरोबर निसग तुटली । मोंगलसेना मागें हटली । त्या समयीं कैकाची उपटली । पेंढाऱ्यानीं दौलत लुटली । गबर झाले एका दिसात ॥ चाल ॥ शके सत्राशें

सोळा भरता। आनद सवत्सरही सरता। दहा दिवस शिमग्याच उरता। वद्य पचमी सुवेळ ठरता। तीन प्रहराचा अमल फिरता। मोंगलाशीं प्रसग करिता। पळाले मोंगल धीर न धरता। चद्र उदयीं खर्ड्यांत काढिलें ॥ चाल ॥ गर्दीत खासे शिरले। मराठे मोंगल पठाण पुर्भे इतर घरोघर भरले। दैन्य दिवस हे आज सरले ॥

— खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा, चौक पाचवा

## ३

## सवाई माधवरावाचा मृत्यु

हाहाकार जाहला प्रगटता पुकार शहरात। बंद पडलि भगभगीत दुकानें भर बाजारात। वृद्ध तरुण नर नारि बुडाल्या आकात कहरात। कुंकु गध किति सेज पुसुनी धूळ बांधिती पदरात। स्वयभू दीप विझतांच तिमिरा व्यापली दरबारात। ठाया ठायीं थिजले लोक शोक मचला अधरात ॥ चाल ॥ बदोबस्त कडेकोट शनवारातुन अर्धी। अखंड स्वारा राघवची निराळी चौथीच्या अमला मधीं। दुलभ दर्शन जयाचें प्रभु तो नदींत निजायचा कधीं ॥ चाल ॥ पसरली तुळशी कर्पुर वेल चंदन। रचियलें सरण त्या दोवरचा स्पंदन। आरुढले वीरवर नारायणनदन ॥ (चाल पहिली) ॥ अनेक रिपुनें करुनी कदन दवडुन दिल्याला ॥ दर्मासन घातलें विष्णुलोकांग बसायाला ॥ कमि नव्हते पृथ्वीत अवतर प्राणा न्यायाला ॥ ७ ॥

माईसाहेब कल्पात जिवाचा तळतळुनी करती। वा ग कुळस्वामिनी कोपलिस आजी मनवरती। पति पूर्वी सौभाग्यवत्या त्या पुत्रवत्या मरती। इहलोकीं परलोकीं धन्या त्या कुळास उद्धरती। कमें माझ दुर्दैव उपजले चांडाळिण पुरती। म्हणुन श्रीमत प्रभुची मजला आरती मूर्ती ॥ चाल ॥ निरोगी सात सहस्र उंट न पार स्वामींचे। वीस सहस्र तुरग नियदर भिमथडी ग्रामींचे। सबल दोनशां नव्वद कुंजर विशाल इस्मामीचे ॥ चाल ॥ गर्दी दोन सहस्र कटगर बाणींच्या। सहा सहस्र गाई पाखरी बाणाच्या।

काहीं सफेत कपिला व्याघ्रांवर राणीच्या ॥ (चाल पहिली)॥ तैल धारा सहस्र एवढ्या जिवास खायाला। कोण श्रीमंतावाचून दुसरा समर्थ घ्यायाला। कमि नव्हते ॥ ८ ॥

शिकारी चित्ते व्याघ्र पटाइत वृक सांबर हरणें। जंबुक, चितळे रोही भेकरें कुरवाळुन धरणें। रीस एडके गेंडे सशाना वनांत पाघुरणें। आपण खावे ते त्यास पुत्रवत् माया किति करणें। सुंदर रूप रायाचें नाहीं कुणावर रागें भरणें। कलगी तुरा शिरपेंच कठिची पडत होती किरणें ॥ चाल ॥ सदय हृदय साक्षात् पितांबर परिधानाचा प्रभु। कृष्णाकुळीं देदीप्य जसा काय मकर ध्वज आत्मभू। तसा करून दिग्विजय शेवटीं अवघड गचिला विभू ॥ चाल ॥ पाहू द्या मला तर एकवेळ श्रीमुख। जन्म तो आता ह्या जिवास होइल दु:ख। भोगिलें रमाबाईनें काहीं तरि सुख ॥ चाल पहिली ॥ हरि जाहला विन्मुख विसरलें पूर्वि पुजायाला। प्रयागीं जावें उठुन वार्तत समाधि घ्यायाला ॥ कमि नव्हते ॥ ९ ॥

अश्व आवडते कुंजर धेनु मृग मैना रहती। मोर खनुतरें तितर सावर मूर्च्छागत पडती। स्वर मंजुळ कोकिळ पक्षि ते पिंजऱ्यामधीं तडफडती। पोपट भारद्वाज चाप परदु ग्यानें खुडती। भूकंपा उल्का भाउ रीत घन विजा कडकडती। असंख्य तुटती तारे नभमंडळीं किरणें पडती ॥ चाल ॥ ग्रामसिंह दिवसास भयंकर सहृद भुंकारिती। सवत्स नित अपरात्रीं गाई कितीक हुंबरती। भुतें पिशाचें खवीस डाकिणी काय हाका मारिती ॥ चाल ॥ दाहोद्वारीं बसुनी लक्ष्मी पिंपळावरी। करी दीर्घ रुदन मध्यान्ह होता शनिवारीं। नाहीं रहात आता होईल आकाशवाणी वरी ॥ चाल पहिली ॥ शक्ति घेऊन श्रीहरी निघुन जाता मूळ ठायाला। सव्यसाचि सारखें लागले माग पहायाला ॥ कमि नव्हते ॥ १० ॥

४

हरिघरच्या नाहीं नेम टळावा परंतु हा टळला। पहा पहिल्या प्रहरांत सूर्य नारायण मावळला। गरीब गाईवर विशाल पर्वतसमूह कोसळला।

वशावनावर चहूकडुन क्षयदावाग्नी वळला ॥ बाळाजी विश्वनाथ तारक सर्वांना मिळला। रत्नदीप झळझळीत केवळ कुळात पाजळला ॥ चाल॥ काशीबाई ती धन्य सती रामजी पुत्र प्रसवली। छत्तीस महिने लढून वसई पुढे आपानी वसविली ॥ दक्षण साडे सहा सुभ्यात सरदेशमुखी बसविली ॥ चाल॥ नानाची कची वासना नाहिं राहिली ॥ पुरुषार्थ करुनि दादानी अटक पाहिली ॥ भाऊनी कुरुक्षेत्रास कुडी वाहिली ॥ चाल॥ रणीं जागा विश्वासरायें ती पाहिली निजायाला। जनोनास मारून मूठ काय मिळाले खायाला ॥ कमि नव्हते ॥ १३ ॥

दर रिकिबिस तलवार जरब सर्वांवर दाभाची। हुकूम मोडिल कोण कठिण मेहनत रावसाहेबाची ॥ निवडक चाळिस सहस्र बरोबर फौज कराराची। शौर्य तेज पाहून छाती धडके नबाबाची ॥ कावेरी उत्तर तीर हद्द ठरवून शिवाराची। भोसल्याची रग जिरवुन धरली आस हेरबाची ॥ चाल॥ थेवरास ते समाप्त होता वैरी फिरुन पोसती ॥ वीर पदरिचे दिल्गीर सारे रायानिन असती ॥ करून निर्वानिरव रमाबाईसाहेब गेली सती ॥ चाल॥ नतर नारायणराव ते पद पावले ॥ दहा महिने मात्र सौख्याचे दिवस दावले ॥ गारद्यास दुपारी अडचणींत घावल ॥ चाल ॥ घावरून चुलत्याचीच गेले पाठ रिघायाला। ढकलुन देताक्षणीं साधली सध शिपायाला ॥ कमि नव्हते ॥ १४ ॥

झाला जन्म त्या कुळात माझ्या नाई राजेंद्राचा। केवळ माधव मूर्ती म्हसोबा नव्हेच रोदराचा ॥ आणिक मंत्री मर्द मराठा चद्रो चंद्राचा। ऐरावत बाधून आणतिल प्रसंगी इंद्राचा। येथे न चाले यत्न बृहस्पति भार्गव चद्राचा। उपाय असता तरी न मरता बाप रामचंद्राचा ॥ चाल ॥ हरहर जगन्निवासा आता काय करू ॥ पोटी जरी एक झाले असते राजबीज लेकरू ॥ राज्य न बुडते मी मात्र मरत्ये शोक सदा कर करू ॥ चाल ॥ पुढे काळ सरल्यानो कसा मी घालवू ॥ हिरकणी कुटुन जाऊ पाण्यामधे कालवू ॥ ती पिऊन पोढल्ये नका ग मज हालवू ॥ चाल ॥ जा ममया मालवुन आपल्या घरास न्हायाला। जिवत मी असल्यास उद्या या नेत्र पुसायाला। कमि नव्हते ॥ १५ ॥

धन्य वदा एकेक कल्पवृक्ष पिकले। शत वर्षे द्विज पक्षी आनदें त्या तरुवर टिकले। जलचर हैदर नबाब सन्मुख रण करिता थकले। ज्यानी पुण्यास्हे

विलोकिलें ते संपत्तीला मुकले। असे प्रभु कसे अमर कराया ब्रह्मदेव चुकले। गहन गती कर्माची सर्वजण पूर्वी फळ विकलें ॥ चाल ॥ संपविला अवतार धन्यांनी म्हणे गंगु हैबती। ध्वज पडले उलथुनी थडकल्या सुरू साहेबनौबती। कोण करिल प्रतिपाळ तूर्त मुलखास लागली वती ॥ चाल ॥ महादेव गुणीराज श्रुनी गादिचे। नवे नुतन नव्हती शाईर जदिप वादिचे। पीळ पेच अर्थ अक्षरांत वस्तादिचे ॥ चाल ॥ प्रभाकराचें कवन प्रतिष्ठित सभेंत गायाला। अशा कवीची बुज नाहीं कोणि करायाला ॥ कमि नव्हतें ॥ १६ ॥

— सवाई माधवरावांच्या मृत्यूचा पोवाडा, चौक ७-१० व १३-१६

## ५

## शेवटच्या बाजीरावाची शरणागति

सकल शहरचे लोक हजारों हजार हळहळती। सौख्य स्मरून राज्याचें मीनापरी अखंड तळमळती ॥ रात्रंदीस श्रीमंत न घेतां उसंत पुढें पळती। यमस्वरूप पल्टणें मागें एकदांच खळखळती ॥ धडाक्यानें तोफांच्या वृक्ष आणि पर्वत हादळती। त्यांत संधी साधून एकाएकीं दुरुन कोसळती ॥ चाल ॥ भगाण झालें सैन्य सोडिली कितिकांनीं सोबत। कितीक इमानी बरोबर झुकले घर टाकुनि चुंबत। कितीक मुक्कामीं अन्न मिळेना। गेली साहेबनौबत ॥ चाल ॥ कोठें डेरे दांडे कोठें उंट तट्टे राहिली। कोठें सहज होऊन झटापट रक्तें वाहिली। कोठें श्रीमंत बाईसाहेब खडी पाहिली ॥ चाल पहिली ॥ बहुत कोमावली पहावेना दृष्टीनें उभयाला। हरहर नारायण असे कसें केले सत्याला ॥ १ ॥

माघ शुद्ध पौर्णिमेस बापुसाहेब रणिं भिडले। जखम करून जर्नेलास फिरतां जन म्हणती पडले ॥ गोविंदराव घोरपड्याचे दोन हात भले झडले। आनंदराव वाघर दिग्गांमधि खूप जाऊन गडले। मानाजी शिंदे मागें फिरत ना डोई देऊन अडले। छत्रपति महाराज तळावर समस्त सांपडले ॥ चाल ॥ घाबरले श्रीमंत सुचेना मन गेलें वेधुनी। बाईसाहेबांना तशिच घोड्यावर

पाठीस बाधुनी । नेले काढूनिया अमृतराव बळवत जेष्ठ बधुनीं ॥ चाल ॥ दहा प्रहर पुरे पतप्रधान श्रम पावले । नाहीं शयन नाहीं स्वस्थपणें जेवले । आले आले ऐकता उठपळ राव धावले ॥ चाल ॥ गर्भगळित जाहले लागले शुष्क दिसायल । नाईसाहेबाना फुरसद न पडे बसून न्हायाला ॥ १० ॥

दिवाळी आणि सक्रात कठिला दु खात फाल्गुन । रागरग नाहीं आनद ठाऊक रायालागुन ॥ सदैव चिंताग्रस्त शब्द बोलती वैतागुन । कर जोडून फौजेस पाहिलें घडोघडी सागुन ॥ धैर्य धरून कोणि कमून ल्ढेना क्रियेस जागुन । कर्म पुढें प्रारब्ध धावते लगबग मागुन ॥ चाल ॥ पादरस्वडयावर रचविल्या घनगारा अद्भुत । थडीनें मेल लोक उठविले गारपगान्यानीं भुत । वेफाम होते लष्कर नव्हती काहीं वार्ता संभुत ॥ चाल ॥ ओढवलें कसे सर्वांचे समयीं सचित । कडकडून गगन पडलें गगन जसे अवचित । दु खाचे झाले डोंगर नाहीं सुख किंचित ॥ चाल पहिली ॥ अनुचित घडली गोष्ट दिसेना ठाव ल्पायाला । कोणें ठिकाणीं नदींत लागलें सैन्य बुडायाला ॥ ११ ॥

जे श्रीमत सुकुमार वनातरीं ते भ्रमत फिरती । वळेल तिकडे भर दिसास प्रभु कान्यामधीं शिरती ॥ आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारुन धरती । खालीं पसरून उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करती ॥ अस्तमानीं कधीं रात्री भात भक्षिती पाटावरती । दरबुच दर मजलीस कृपेंतिल सेवक अतरती ॥ चाल ॥ पेशव्याचे वशात नाहीं कोणी असा कहर पाहिला । हत्ती घोडे उट रजिना जेथील तेथ राहिला । बाजीराव होय धन्य म्हणून यापरीं आकात साहिला ॥ चाल ॥ नर्मदेस शालिवाहन शक संपला । त्या ठायी ठेविला शक पर्ती आपला । भरचद्र राहुग्रहणात जसा लोपला ॥ चाल ॥ सात्र पगा लोपला लागले गलीम लुटायाला । सिद्ध झाले माल्कमास राव राजेन्द्र मिळायाला ॥ १२ ॥

समस्त लष्कर दु खित पाहुनी श्रीमत गहिवरले । सद्गद झाला कठ नेत्र दोन्हीं पाण्यानें भरलें । आम्हापुढें जे शत्रु रणागणीं नाहीं क्षणभर ठरले । ते आमच्या जन्मास दुष्ट चाडाळ जन्माम पुरुन उरले । केवळ असा निश्वास घात केल्यानें कोमताले । इद्र चद्र आदिकरुन आल्या संकटास अनुसरले ॥ चाल ॥ तुमची आमची हीच भेट आता राव सर्वाना सागती । कृपा लोभ

परिपूर्ण करित जा द्या दर्शन मागती। ऐसे उत्तर ऐकुन शतावधी पायीं सेवक लागती ॥ चाल ॥ महाराज उपेक्षून आम्हास जाऊ नये। दूर ढकलून शरणागतास लावू नये। पहा क्सारार्चे घर गाईस टावू नये ॥ चाल ॥ हिंमत सोडू नये सर्व येईल पुढें उदयाला। कोण काळ कोण दिवस धन्यानीं पुसावें हृदयाला ॥ १३ ॥

प्राण असुन शरिरात बुडालो वियोग गोटात। बरोबर येतो म्हणून घातिली किती डोयी पोटांत। निराश जाणुन झाली रडारड मराठी गोटात। निर्दयानी लाविली पालखी पल्टणकोटात। मातबर लोकाची ओझी चालतात मोटात। गरीब करी गुजराण प्रसगीं एकया जोटात ॥ चाल ॥ कुकावाचुन कपाळ मगळसूत्रावाचुन गळा। तसा सैन्यसमुदाय उदाशित रग दिसे वेगळा। धर्म बुडाला अधर्म दुनियेमधिं आगळा। ॥ चाल ॥ कसे प्रभूनीं ब्रह्मावर्त शहर वसविलें। अगटींच पुण्याच्या लोकाना फसविलें। हुरहुर करीत का उन्हात बसविलें ॥ चाल ॥ काही तर तोड पुढे दिसेना जीव जगायाला। कोणास जावें शरण कोण हरि देइल खायाला ॥ १४ ॥

विपरीत आला काळ मेरुला गिळिले मुग्यानीं। पडीतास जिंकिलें सभेमध्यें मदाध भग्यानीं। भीमास आणिलें हारीस रणागणीं अशक्त लुग्यानीं। कुबेरास पळविलें अकिंचन कसे तेलग्यानीं। जळीं राघव माशास अडविलें असंख्य झिंग्यानीं। जर्जर जाहला विष्णुवाहन बदकाचे दग्यानी ॥ चाल ॥ ईश्वरसत्ता विचित्र सारें दैवानें घडविलें। हरिश्चद्र आणि रामचद्र नळ पाडवास रडवीलें। फितुर करून सर्वांनीं असलें राज्य मात्र बुडविलें ॥ चाल ॥ म्हणे गगु हैबती पावेल जरी शकर। तर दृष्टीपुढें पडतील राव लष्कर। महादेव गुणीजन श्रीमताचे चाकर ॥ चाल ॥ प्रभाकराची जडण घडण कडकडित म्हणायाला। धुरु नारो गोविंद वदी त्या निशीदिन पायाला ॥ १५ ॥

—शेवटच्या बाजीरावाचा पोवाडा, चौक ९ १५

## ६

### लावणी

उठा उठा हलविते आतां पहा पहा पहाट फारच झाली । व्हा जागृत प्रियकरा कुचाची खरी नौबत वाजुन राहिली ॥ ध्रु ॥ करून मघां जिनबंदी सख्या पुढें स्वतांच विनिवाले सरले । सरंजामि सरकारी एकाडे ठळक ठळक मागे उरले ॥ रंव पडली पहा उंट तटें किती सौदागर देशावरले । हाका आरोळ्या देति भयंकर मार्ग चुकुन डोंगरीं शिरले ॥ कठिण घाट आज म्हणुन मुळीं आधी फकीर आणिक दाले फिरले । अजुन आपण निश्चिस्त तशामधिं होती मुकाम फारच दुरले ॥ चाल ॥ पहाटेची झोप अति गोड केवळ शर-करा । उठूं नये वाटते खरेंच कि हो प्रियकरा । सुखरूप शयन मजलिस गेल्यावर करा ॥ चाल ॥ सगुण गुण गंभीरा तुला कशी दुपारची रे सोसेल कहाली ॥ १ ॥ बृहस्पती शशी दैत्यगुरु तिघे तेजहीन तेजीं बुडाले । इतर तारे तर लहान केवळ मग दिसतिल कोणिकडले ॥ श्रीमंत प्रभूचे रमणुकीचे तळि बादल डेरे पडले । नवे मंडप सजदार गजांवर खाब सहित सारे भिडले ॥ ठाईं ठाईं तासे तबल दुदुम तिनीं तयारिचे मर्फे जडले । अस्व रोहिले सिंदी सोरटी कुलतमाम जन गडबडले ॥ चाल ॥ आसवलें व्याघ्र या वनांत वृक हिंडती । दिवसास परस्पर मनिं निर्भय भांडती ॥ ज्या स्थळीं भुतें झोटींग पिंठ काडती ॥ चाल ॥ अशा गली श्रुत असन कसे जसे स्वस्थपणें निजलां महालीं ॥ २ ॥ चपल पंचकल्याण निळे एक एक सुरेख घोडे दिसती । उभार दाण्यासाठीं हुजुरच्या कुमेद नरमाद्या हिंसती । दुध खिरीं शिंगरे पिती मुरु अपेट जे जे बळू असती । चार जामे जिन ठेऊन अंधारी देऊन गडी कळकट कसती । उमेदवारी निवट गोहो कांहीं तयांत कुणी ब्राह्मण असती । सर्व कर्म सारून अगोदर एव्हांपासुन रोखुन बसती ॥ चाल ॥ जहाले रथारूढ नभांत नारायण ॥ लागलें काल कडकडींत उत्तरायण ॥ कुठवर तरी करूं आर्जव पारायण ॥ ॥ चाल ॥ निबीड अरण्यामधीं अशी कशी निश्चितपणाची घडी वाहली ॥ ३ ॥ दिन दुनियेचे मुगुटमणी राव

सुचिन्हमंडित छत्रपती । त्यजुन सौख्य सुख रोज यथाविधी सुरेश्वरापरी तप तपती ॥ आपआपल्या गुणें शहाणपणें चारी वर्ण शरीरद्वारा रपती । चंद्रदर्शना साठीं सदोदित लक्ष लावुन चातक जपती । धर्मस्वरुप साक्षात ज्याच्या स्मरणें करुन सकटें लपती ॥ चाल ॥ जा जा हो रायाची भेट घेऊनी । सुख करू आपण पंचामृती जेउनी ॥ करी कवन गगु हैवती जीवन ठेउनी ॥ चाल ॥ महादेव गुणिराज म्हणे ही चतुर सुगत काता पाहिली । प्रभाकरावर मर्जी बहाल दोघाची बहुत जाहली बहाली ॥ ४ ॥

## परशराम

[ इ. स, १७५४–१८४४ ]

### १

### लावणी

लष्करचें काय सुख सागू मे तुज नारी । तुझे प्रीतिस्तव ते सोडून राहिलो घरीं ॥ ध्रु ॥ आम्ही बाळ सराईत आधींच घोडेस्वार । आताच लागला लष्करात रोजगार । दिला बसाया सबळ घोडा धन्याचा प्यार । पगतीचें ताट दिलें मशाल खिजमदार ।

उमर्तीचा तवर केली झड घालून तरवार । बक्षिसा मिळविल्या चवरीन अबदागीर । दौलत मिळविली भर उट दोनचार । मग आली तुझी मय जीव करतो हुरहुर । धन्याची रजा चौमहिन्याचा करार । सुख मुकाम आलों कासार-बारी । केली गर्दी मिलानें दौलत गेली सारी ॥ लष्करचें ॥ १ ॥

दोन चार पायरुणें आला अगावर लेऊन । नारीचे दिपले डोळे लिबास पाहून । करी गोड गोड जेवाया समया लाऊन । करी खुशामत आर्जीनें पुढें उभी राहून । आज लाख मिळविले हरी विसरला देऊन । बरे आले हेतदीर घरीं आपले जीव घेऊन । वडिलाची अर्धी भाकर खाऊ धुऊन । आहेवपण

भोगीन कपाळीं कुंकू लाऊन। गेली महालामधें दिला पलंग बिछाऊन। शेजारीं निजलें दोघे र्ल्ई प्रीत लाऊन। भोगिला विलासे समया लाऊन चारा। मज रुपासारखा जोडा असा बेवहारी। ॥ लष्करचें ॥ २ ॥

गेली रात उगवला दिनमान दुसऱ्या दिवशीं। लगबगून उठली होती चतुर नार हावशी। वाटिती साकर जन नारीला पुसी। चुडेदान दिले अविका पावली नवशी। आंघोळीस पाणी ठेऊन ऊन ऊन सरशी। लावी उग्णें चौरंगावर होऊन सरशी। माथ्याला टक्कल कशाचे हो गुणराशी। दोन्ही साद्याला दोन्ही घट्टे बांधल्या गरेशी। वाकडा हात खुळा, देह झाली झाजरशी। टाचाच्या गेल्या भेगा असून सुखरासी। रात्रदिवस होती घोड्यावरती स्वारी। रागडा मुलुख तिथें ल्ढाई केली भारी ॥ लष्करचें ॥ ३ ॥

पाठीशीं ढाल खांद्यावर बंदुक आमच्या। कचरेला साज परदाळे सुऱ्या निमच्या। आम्ही केली ल्ढाई पाठशीं रुमच्या। करकरा निरपल्या जेव्हा चमाचम चमच्या। गोळ्यांचा बरसतो पाऊस अती सुमसुमच्या। रक्ताच वाहती पूर नद्या रुमधूमच्या। ल्ढणार असाम्या निधडक जाण आमच्या। तिथे पाणी मिळेना रुप्याचा एक चमचा। निसंग केली ल्ढाई पोटलें भरा। सोन्याचे मदिल तुरे दिले जरतारी ॥ लष्करचें ॥ ४ ॥

इतकें ऐकुन नार हर्षली चित्ता। लष्करचा गडी याला एक जामीन होता। त्यानें मुळापासुन सांगितली अवघी वार्ता। माथ्याला टक्कल पडलें मोळी वाहता। खांद्याला वढल पडलें बादलें वाहाता। बादल्याची मोठ्ली काठी याचे हाता। याला सकाळीच उठून मारती लाता। जेव्हा झाली ल्ढाई बुणग्यामधीं हा होता। पोपास पळाला घेऊन येता येता। हेलपाटा पडला इथवर याच्याकरिता। नाराचें झिजले कपाळ पाया पडता। वाण्याची उचापत देऊ कशानें मी आता। निठू परशरामाचे छंद असे बेवहारी। भगलीच्या उडाल्या भगल भणभण सारी ॥ लष्करचे ॥ ५ ॥

## २

## मुंबईचा पोवाडा

पहा वेटावर वस्ती वसविली दर्याचे तिरीं चौभौंती ।
जशी लंका रावणानी दुसरी कोणी कोणाला न चाहती ॥

राज्य राक्षसी प्रत्यक्ष जेथें पापाचे पर्वत होती। चौधुगाचे दोपी प्राणी अवतरून तेथें राहती । त्यात पार्मी क्रिरिस्ताव वाढुन होती ।-लक्षावधि जीव जंतु पशुपक्षी खानी। ताडी माडी सुरापानें गर्तीत नरनारी। रावरंक समसमान उचनीच एकंसारी। पायपिटी डोईचा गाडा तर ममईची वस्ती बरी। हेलपाटी जर करून राहशील चौघामधें मातबरी ॥ पाय ॥ १ ॥

कळा कुशल हिकमती जागती मातींचें करतील सोनें। शास्त्र न्याय दंड करावा आधींच कळे होणें जाणें। मोठमोठे रंगमहाल उंच उंच साजिरवाणें। रंगी वेरंगी लाऊन गलासे चकचकीत भौंती अयनें। त्यामधीं मनुष्य न मिळवू एक खासा वंचरापरी ॥ पाय ॥ २ ॥

## ३

## इंग्रजाचा पोवाडा

शककर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा।
जन भव्य निर्भय नाहीं कोणाशीं उघड्या दारीं करि निद्रा ॥ ध्रु ॥

तप तेजाचा सूर्य उगवला जशा चांदण्या गेल्या हरपून। तसे पृथ्वीतील निर्विर्य राजे शूरत्व आगीं गेले करपून। मोगल भासले आणिक पेशवे कोण उभें सन्मुख निर्धून।
जाट मराठतराव करून नेमळे वाघा वरे गेले शिरपुन।
सरकार कुंपुनी इंग्रेज बहादुर नावाला जातो दरपुन।
महाल मुलुख कुल पहाडी किल्ले ना लढता बसले अर्पुन।

तेजहीन अवघ्याचें झालें ना आले जननीउदरा।
शूरत्वासी डाग लागला यास्तव दैवीं आल्या मद्रा ॥ शक्कर्ता ॥१॥
नाहीं विलायत कोणी पाहिली या मुलखावर जरब कशी ?।
एक चपराशी पाहून रयत थरथरा कांपी जशी।
कला कुशल्या हीकमती जाणतो ईश्वर कळना कळ ऐशी।
दहा हस्तींशीं काम ढळेना एक माणूस हलवी त्याशीं।
न्याय नीति बालाहून बारीक मुसळाहुन ठोसर लइशी।
शास्त्र नाहीं देहदंड करावा खून केल्या ना चुके फाशी।
अतिरति एक दोरींत ओविलें फळझाडें आंब्रा गद्रा।
जापू जोशी भाकून गेले ते रोकड पडले पद्रा ॥ शककर्ता ॥ २॥
सुवर्ण चांदी पितळ पाच हिरे मोती पारा।
आणिक वस्तु तऱ्हेतऱ्हेच्या इतक्यावर अमल सारा।
वीरस पंजाब इंग्लशीदरीं वसता जिथवर वस्तीचा थारा।
जितका समुद्र तितका व्यापुन चौमोवतीं घालुन फेरा।
कोठें अमल कोठे शह नुसता पदर खाऊन लाउन थारा।
चिर चोरटे भूमिये गिरासी पगार त्यासी रुपये मोहरा।
पूर्वी आराधान रावणानें प्रसन्न केलें शिवरुद्रा।
तसा सीतेचा वर पाह्याला अहर्निशी त्या पत्मुद्रा ॥ शक्कर्ता ॥ ३ ॥
काशी रामेश्वर थेट द्वारका जगन्नाथ वर बंगाल।
कायलात हिकमतीनें नेलें ब्रिद लाऊन चंगाल।
दिल्ली तक्त आग्मिरु उदेपुर न भिडता रंगरंगाल।
क्षेत्री असून गौममान झाले वायु न लागे अंगाला।
पुणें नागपूर श्रीरंगपट्टण नेल्या हैदरा बंगाला।
अवघ्यावर एक हुकूम कलकत्ता पैंशून्य पाहून छिद्रा।
मोठे मोठाले किल्ले ढासळे इमारती मोडून सदरा ॥ शक्कर्ता ॥ ४ ॥
कृतायुगीं जे कुपींण त्यानें तप आचरण केल्या तस्ता।
तेज हीन अवघ्याच झाले शूर शिपाई काहीं नसता।
छत्तीस कारखाने घरींच करितो इतराची ना धरि आस्ता।

तराजूत तोलून काढिल्या पृथ्वीतील अमोल वस्ता ।
लक्ष्मीला मूळ आलें वाटतें समुद्रात जाईल दिसता ।
नामीं विठ्ठल परशराम म्हणे उजड दिसे धोपट रस्ता ।
चतुर सभा तुम्ही गुणीजन सज्जन हरिभजनीं तरि दिस गुदरा ।
हीच विनती ब्राह्मण क्षेत्री वश करून त्या अतिशूद्रा ॥ शक्कर्ता ॥ ५ ॥

## राव वर्वे

### १८५७ ची अवस्था

हिंदुस्थानचे हिंदू* लोक, जागे व्हा तुम्ही अजुनी ।
अपुल्या घरोघर चोऽर शिरले, नेलें सारें ठक्वूनी ॥ ध्रु ॥
हिंदुस्थान ही हिंदुची जागा, तस्कुर फिरला त्यावरती ।
नयऽन असता, अध ननला, विपरित भारऽते गती ॥
अपला साग मुलूख असता, दुसरा बळकाउन नसला ।
नाना तऱ्हेचे जुऽऽम केले, वराच माजविला खम्ला ॥
मानभावीचें वसन ग्रासितो, काळिज घेतो ओढून ।
बाह्यातकारीं गोड दिसतो, आऽत कपटी हा पूर्ण ॥
जळू पाहता डसऽन नाहीं, रक्त शरीरातिल घेती ।
तसीच वृत्ती मजला भासे, पुढे दिसतसे घोर गती ॥
घरचा मालक घरात असतां, दुसरा म्हणतो मालक मी ।
हिंदुस्थानचे तसेच झालें, भलताच चालवितो हुकमी ॥
याची ईर्षा मनी वागरा, शाप घाल्या डोळ्यांची ।
धूळधाण सर्वांची झाली, नाहीं राहिली कोणाची ॥
थोर थोर जन भीक मागती, प्रसग पडला लोकाना ।
कष्ट कष्ट बहुजनासीं दिधले, त्रासुनि गेले दु स्थान ॥ १ ॥

* हिंदु शब्द हा हिंदवासी या अर्थी आहे

शाहु छत्रपति, प्रधान पेशवे, यानी बरेंच सभाळिलें ।
हिन्यापोटीं परि गार निपजली त्याणें अवघें गमावलें ॥
पाठीमागून शहाणे राहिले, त्याणीं अक्कल सोडियल्या ।
निमकहरामी करून अवघे, ऊळेच सापडले जाळ्या ॥
दगडाखाली हात गुतला, तो युक्तीनें काढावा ।
आळसावर दूषण देऊन, हात तसा का ठेवावा ? ॥
श्रीमतीचा लेश मिळेना, दरिद्र झालें चाहिंकडे ।
नीच जातिच दैव उघडिलें, वरिष्ठ त्याच्या पायिं पडे ॥
हिंदु लोक हे शहाणे असता, ऊळेच वेडे का झाले ? ।
मद्यपान एकटा करोनी, अमलामध्यें जणु चढले ॥
गुणी गुणाची भीड धराना आपसामधीं करिती दगा ।
समजणार जर समजुनि जाती, मूर्खापाशीं काय सांगा ॥
ज्याचें त्याला हित समजेना, जन्म धरावा काय कामा ! ।
सांगितल्यानं लाभ कोणता ? झाली बोलण्याची सीमा ॥
आळस दैवत मूळच तुमचें, त्याच करता सुपूजन ।
सर्व तुम्हाला समजत असता, नरें धरला भ्रांतीन ॥ २ ॥
एक विचारी अन्य पाहिले, हिंदू लोकीं कर नाहीं ।
सारे अनुभव मनात समजा, येथे सांगिले कुणि काहीं ॥
वतनदाराचीं वतनें गलीं इनाम जहागिर गली ।
हरण कराया लष्कर जमले, जबर खुन गर्दी झाली ॥
नाना तऱ्हेचे दुःख पाहती, परतु उघडित ना डोळा ।
म्हणती अमुची सद्दी सरली, दूषण देताती काळा ॥
हिंदू लोकीं तारिफ मोठी ! कर होइना एकाचा ।
दुष्कन्याची हला घेला, घाम माडिला हा तुमचा ॥
धनावाचुनि उगीच नगता, भीक मागता परिणामीं ।
लाज लज्जा सोडुनि अवघे, कसे जाहला बेशरमी ? ॥
घरात तुमच्या नाणे नगता, ढग दाविता चोराला ।
दाउदी त्याचीं एकच असता, दुसरें मागिता त्याला ॥

जिनगी सारी घेऊन आता, नळेंच देता दुष्काला ।
सर्व मागती कबूल करता, काय वदावे तुम्हाला ? ॥
सर्व जनाचा वैरी वाटे, सूड उगवितो दुर्जन ।
तरफड, तरफड करता करता, जातिल हिंदूचे प्राण ॥ ३ ॥
सर्वेनाचे नशीब फिरले, याचक झाले चोंहिकडे ।
प्रभुरायासीं दया येईना जरा पाहिना कुणाकडे ॥
इलाज मजला एकच सुचला, कष्ट करावा अवघ्यानी ।
नाना तऱ्हेनी हिकमत काढुनि सुखी असावे सर्वांनी ॥
ठिठोर हलका ट्वाळाचिया, कधींच नादि लागू नये ।
ज्यावर त्यावर क्रोध नेलिया, कष्ट कैसा मग जमुनी ये ? ॥
शहाणपणाची गोष्ट शिकवितो, त्याला हुडकोनि काढा ।
त्याच्या मागिपरि वागोनी, वेकी टरडा ती झाडा ॥
सारे हिंदु लोक जमोनि, विचार काढावा पुरता ।
मनात तुमच्या नाहीं वागलें, मग खाल्च पुरता गोता ॥
सत्ताधारा जुलूम करतो, ठार निर्जवितो दुनियेला ।
डोळे उपडुनि कसे पहाता ? कोणि येइना समयाला ॥
हीन प्रार्थना करुनी विनवितो, राग नसाचा हृदयाला ॥
झापमोड मी तुमची करता, उभा राहिलो दृष्टीत ॥
राव बर्वे हा लीनपणानें, सागत फिरतो सर्वांना ।
सर्वेनाचीं कृपा असावी, हे द्यावें मजला दाना ॥ ४ ॥

द्वितीयखंड समाप्त

# परशुरामपंत तात्या गोडबोले

[ इ. स. १७९९–१८७४ ]

## १

## भवभूतीच्या उत्तररामचरित्रातील श्लोक

### अंक पहिला

साधारण साधूंची धावे अर्थाकडे सदा वाचा ।
परि ह्या आद्यऋषींच्या वाणिकडे अर्थ धावतो साचा ।। १ ।।

राम म्हणतो

काय वर्णूं लावण्य जानकीचें । कुटिल कुंतल शोभती मस्तकीचे
कळ्या कुंदाच्या तसे दंत तीचे । मुग्ध हसणें पाहणें बाळपणचें ।। २ ।।
लाजवी जी स्वप्नमें चंद्रिकेतें । दावत्री जी तैं सहज विभ्रमातें ।।
अशा पाहोनी मधुर अवयवातें । मनीं माता मानिती कौतुकातें ।। ३ ।।

### अंक दुसरा

सदा प्रीती चित्तीं विनय मधुरा वाणिहि सदा ।
स्वभावें कल्याणी मति परिचया भेद न कदा ।।
पुढें किंवा मागें मनि रस विपर्यास नसती ।
रहस्यें साधूंचीं अकपट विशुद्धच असती ।। ४ ।।
स्कधीं ज्याच्या वसुनी सुखानें । पक्षी किडे वेंचिति ते मुखानें ।।
चचूपुटें निचरिती स्वपक्ष । पहा असे रम्य तटस्थ वृक्ष ।। ५ ।।
ज्याचे गुहात रव गद्गद फार होती । गोदाप्रवाह मृदु ज्यावर वाहताती ।।
शृंगाग्र भाग अवलंबिति मेघ ज्याचे । ते हे पहा सकल पर्वत दक्षिणेचे ।। ६ ।।
अन्योन्य भेटी घडता जयांच्या । कल्लोलमाळा उठती जळाच्या ।।
प्रवाह गंभीर पवित्र ज्याचे । पहा महासंगम हे नद्यांचे ।। ७ ।।

अंक तिसरा

वासती म्हणते

फलमधुकुसुमानीं वृक्ष पूजोत सारे । स्फुटकमलसुगंधी मंद वाहोत वारे ॥
मधुरतर करावा शब्द येथे शकुंतीं । फिरुनि सहज आला राम कीं या वनातीं ॥ ८ ॥

तू जीव तू हृदय तू मजला विसावा । तू चंद्रिकाच नयना शरिरा सुधा वा ॥
मोहीं जिला वदुनि यापरि गुतवावें । तीतच-हाय तुज काय पुढें म्हणावें ॥ ९ ॥

कठिणहृदय रामा आवडे कीर्ति तूतें । तरि वद अपकीर्ता याहुनी काय मातें ॥
वनिं गति अबलेची काय झाली असेल । तव हृदयिं नरेंद्रा वाटतें काय तोल ॥ १० ॥

राम म्हणतो

भ्याल्या मृगापरि जिची सुविलोल दृष्टी । जी पूर्ण गर्भ धरिता बहु होय कष्टी ॥
तीची शरीरलतिका कुसुमें स्तवावी । रानात हिंसक जनीं गिळिली असावी ॥ ११ ॥

तमसा म्हणते

जळ तुंबता तडागीं फोडावा लागतो जसा पाट ।
शोकक्षोभीं रोदन हृदयस्थैर्था नसे दुजी वाट ॥ १२ ॥

राम म्हणतो

हृदय उलतें शोकें माझ नच्टे द्विविधा तरी ।
विकल करिते मूर्च्छा काया न जीवित महरी ॥
आतुनि तनुशी भाजी ज्वाळा न भस्म करीतसे ।
विधि जरि करी मर्मोच्छेदा न जीव हरीतसे ॥ १३ ॥

राम म्हणतो

हा हा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला।
वाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला॥
या आत्म्यानें किति तरी सदा दु:खभारा धरावें।
मोह व्यापी फिरफिरुनि म्या काय आता करावें॥ १५॥
व्यर्थ जेथें सुग्रीवसख्य व्हावें। वानराचेंही वीर्य वृथा जावें॥
जांबवता न स्फुरे बुद्धि कांहीं। वायुपुत्राची गती जेथ नाहीं॥ १६॥
विश्वकर्म्याचा पुत्र नळ त्याची। मार्ग करण्याला शक्ति नाहिं साची॥
लक्ष्मणाचे शर जेथ जाति वाया। प्रिये असशी कोणत्या अशा ठाया॥ १७॥

अंक चवथा

जनक म्हणतो

बाई माझे लाडके सिताबाई। बाळपणचें कौतुक सांगु कांई॥
बाळपणीं पाहता तुझें मूख। होय मजला तें काय वदूं सूख॥ १८॥
विनाकारण रोदन हास्य यावें। तिहीं वदना तें फार शोभवावें॥
थोडथोड्या कवळ्या दंतपंक्ती। जयामाजीं उगवल्या शुभ्रकांती॥ १९॥
जयापासुन बोबडे बोल गोड। निघुनि माझें पुरविती सर्व कोड॥

अंक पांचवा

सुमंत म्हणतो

बीजचि मनोरथाचें दैवें नेलें हिरून दाटून।
होता विच्छिन्न लता पुष्पफलाशा उरेल कोठून॥ २०॥

अंक सहावा

राम म्हणतो

हा कोण इंद्रमणितुल्य सुनीलकांती। देतो पहा सुवचनें हृदयास शांती॥
गंभीर शब्द घनगर्जितसा करीतो। माझ्या तनूस सहसा पुलकें भरीतो॥ २१॥

दृष्टी पहा कशि जगत्रय तुच्छ जीला । गभीर उद्धत गती लववी महीला ॥
अल्पा वयात गिरिसा गुरुतेस घेतो । हा मूर्त वीररस कीं रणदर्प येतो ॥ २२ ॥
कपोतकंठासम कांति जीची । शोभा वृषस्कंधसमा तनूची ॥
प्रसन्न सिंहापरि दृष्टि थोर । मृदंगशब्दासम शब्द घोर ॥ २३ ॥

अंक सातवा

भागीरथी म्हणते

लोकीं मोठें अयश उठलें जी तिची अग्निशुद्धी ।
लंकाद्वीपीं फरविलि तिला मानिना लोकबुद्धी ॥
इक्ष्वाकूचें कुलधनचि हें कीं जना रंजवावें ।
ऐसें त्याला कठिण पडता काय त्यानें करावें ॥ २४ ॥

राम म्हणतो

मांगल्या सुमनोहरा निजगता गंगापरी सर्वदा ।
पापापासुन रक्षिती नितरती श्रेयास जी ही कथा ॥
तीतें संत सदा धरोत हृदयीं जो पक्वबुद्धी कवी ।
त्याची वाणिसुधा नरीं बुध सदा घेवोत तीची चवी ॥ २५ ॥

—उत्तररामचरित्र (इ. स. १८५९)

अंक पांचवा

घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे । उल्लंघितो पवनभाग सदा नभाचे ॥
भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं । राजास विश्रम तसा क्षणमात्र नाहीं ॥

अंक सातवा

सुरपति नरलोकीं तो करूं प्राज्य वृष्टी । अविरत करि यत्नें तूंहि देवांस तुष्टी ॥
युगशत परिवर्तें हींच अन्योन्य कर्में । असुन उभय लोकानुग्रहार्थ स्वधर्में ॥

— शाकुंतल (इ. स. १८६१)

२

शूद्रकाच्या मृच्छकटिकांतील श्लोक

तपें तपे उत्तम वेदवादी । युद्धाविशीं उत्सुक अप्रमादी ॥
प्रीती असे बाहुरणीं जयाला । राजा असा शूद्रक नाम झाला ॥ १ ॥
दारिद्र्य मरण यांतुनि मरण बरें वा दरिद्रता खोटी ॥
मरणांत दुःख थोडें दारिद्र्यांत व्यथा असे मोठी ॥ २ ॥
माझें मलाच घर तापद फार झालें । क्षीणार्थ जाणुनि जनीं गृह वर्ज्य केलें ॥
गेला सुकोनि मद कालवशेंचि ज्याचा । जातात भृंग कट सोडुनि त्या गजाचा ॥ ३ ॥
नाहीं खरें विभवनाशज दुःख मातें । दैवानुसार मिळतें धन आणि जातें ॥
हें दुःख फार मज नष्टधनास सारे । झालेचि मित्रपण सोडुनि पाठमोरे ॥ ४ ॥
चिंतेचें घर हेंच वैर दुसरें लोकांत होतें सदा ।
निंदा मित्रजनास कारण निजद्वेषास हें सर्वदा ॥
जाया बुद्धि वनास देइ सहसा जाया सदा त्यजवी ।
शोकाग्नी हृदयस्थ हा परि तनू जाळी न संतापवी ॥ ५ ॥
निर्द्रव्या पुरुषा न बंधुजनही साह्यास संतोषती ।
त्याचे ते प्रियमित्र तेहि फिरती आपत्तिही वाढती ॥

जातें सत्व लयास शील विधुची कांति क्षया पावती ।
जें केलें अन पापकर्म इतरीं तें त्याकडे लाविती ॥ ६ ॥
त्याची संगत कोणिही न धरिती त्या मान कोठें नसे ।
जाना तो धनिच्या गृहा सुवचनें त्याला न कोणी पुसे ॥
थोरापासुनि दूर दूर फिरतो लाजून दुर्वस्त्रक ।
वाटे निर्धनता मला सचित हें साव्वें महापातक ॥ ७ ॥
—मृच्छकटिक (इ स १८६२), श्लोक ५, ११–१३, १७, ४१, ४२

## वजावा रामचंद्र प्रधान

[इ स १८३८–१८८६]

### दैवसेनी

तया मागोनी चकित हंसगामी । जाय नेई पाथास स्वीय धामीं ॥
इंदु गगनीं संपूर्ण सौख्यहेतू । वृक्षछायेनें लोपतो परतू ॥ १ ॥
आहे नभीं सौख्यद तेजराशी । दावीतसे मार्ग निजप्रकाशीं ॥
तो वृक्षपत्रीं जरि लोपताहे । चंद्रानना सन्निध हेच आहे ॥ २ ॥
ठायीं ठायीं चंद्रिका अथरीली । पुष्पाची ही शुभ्र शय्याच केली ॥
वारा वाहे मन्दसा शांति सारी । श्रांतस्वाता होतसे तापकारी ॥ ३ ॥
असे सन्निध येतात जों गृहाचे । धाम पाही पाथस्थ सुन्दरीचे ॥
पर्णकाष्ठें छायेस मात्र थारे । तशा भिंती, साहित्य स्वल्प सारें ॥ ४ ॥
क्षेत्र आतिल नहु थोर नसे काहीं । स्वच्छ सारा, एकांतवास हाही ॥
गृहस्वामिणि होओनि पुढें वेगें । आंत या जी अतिथीस असें सांगे ॥ ५ ॥
अपरिचितसा पाथस्थ जाय गृहीं । नेत्र लावुनि जों भुवन सर्व पाही ॥
चित्र दचकें नहु नवल मनीं सोच । वीर पुरुषाचें धाम असें साचें ॥ ६ ॥
व्याघ्रशार्दुलमृगशशकचर्म भारे । रीस जंबुक शृक अथरिले सारे ॥
खड्ग गजिर तरवार तिरकमाणा । ढाल भाला बंदूक निजत्राणा ॥ ७ ॥

परी तेथें आश्चर्य तया भारी। स्तब्ध राहे रोखोनि दृष्टि सारी ॥
काय कोठिल गुजगोष्ट आठवीली। पूर्व परिचितशी मानसीं उदेली ॥ ८ ॥
दोन तेथें जीं पाहिलीं निशाणें। लिखित वरुनी सडीक याप्रमाणें ॥
'मालपुरचा ठाकूर बादशाही'। दुजा वरुनी 'जयपूर जय सवाई' ॥ ९ ॥
होय मानस उद्विग्न देखता हें। उभा कोठ हें कोण काय आहे ॥
देहभाना विसरोनि स्तब्ध ठेला। व्यर्थ शोधोनी श्रमवि कल्पनेला ॥ १० ॥
काय आठवलें पाहि तया साक्षी। कुरंगीतें सापेक्ष तो निरीक्षी ॥
पुन्हा दाटे सकोच मनीं वाया। गोष्ट अंतरिची कीं तिला पुसाया ॥ ११ ॥
या पुरुषाची चर्या ऐशी देखुनि नवल तिलाही।
निर्भय होउन वदन तयाचें उत्सुकतेनें पाही ॥ १२ ॥

—दैवसेनी (इ. स. १८६७), श्लोक ७६–८७

## महादेव मोरेश्वर कुंटे

[इ. स. १८३५–१८८८]

### बहिर्जी नाईक

दिसे ठेंगणी मूर्ति, ही बावळीशी। बहू शक्ति पायात, हिंडे स्वदेशीं ॥
असे रुंद छाती खरे गोल दंड। भरे जोर आंगात तक्का उदंड ॥ १ ॥
जरी मानिती लोक हे रूप भोळें। तरी न्याळती शत्रु हे तीन डोळे ॥
हुशारींत ऐसा नसो अन्य कोणी। निघे, दौड चाले, जसें काय पाणी ॥ २ ॥
कळे सर्व ज्याला, कुठें काय चाले। कुठें बैसला कोण तो काय बोले ॥
घडे शत्रुलोकात ज्याचा प्रवेश। करी रोज जो पाहिजे तोहि वेष ॥ ३ ॥
कधीं लांब दाढी, सजे वृद्ध काजी। कधीं घाग वस्त्रें, दिसे पूर्ण पाजी ॥
गळा जानवें शुभ्र हा वीर घाली। करी दर्भ, पत्राग, स्वारी निघाली ॥ ४ ॥
कळे काय जें त्यास, तें सर्व आणी। गमे थोर गडाम हा सत्यवाणी ॥
मिळे सर्व ग्रामवें स्वच्छ पाणी। तसा हा मिळे, दुष्ट लोकास जाणी ॥ ५ ॥

घडे वास त्या नारदा तीन लोकीं । सदा स्वर्ग पाताळ, मृत्यू विलोकी ॥
विण्यानें सुगीतें आलापीत चाले । जियें इंद्र शोभे, तिथें नृत्य ताले ॥ ६ ॥
कधीं स्वर्ग सोडून पृथ्वीस येतो । हवेंतून खालीं महाधाव घेतो ॥
तुटे जेविं तारा, नभीं चक्र होतें । पडे तेज त्या नारदाचें असें तें ॥ ७ ॥
कधीं चालता, पोंचतो सूर्यलोकीं । कधी आडवाटें, फिरे स्वर्गलोकीं ॥
दिसे मार्ग ज्याला नभातून पार । कुठें खोल आहे, कुठें उच्च पार ॥ ८ ॥
जसे डोंगरी रान ह्या मृत्युलोकीं । तसें सर्व कांहीं, असे स्वर्गलोकीं ॥
कुठें ओघळींच्या दऱ्या आड येती । कुठें धट्ट रस्ता, कुठें धूळ माती ॥ ९ ॥
खळाळे जळाची नदी थोर कोठें, । कुठें दैत्य राहे, कुठें देव मोठे ॥
असा ह्या मह्रिर्जी फिरे सर्व देशीं । जसा चा पन्हाळा, रिघे खानदेशीं ॥ १० ॥

—राजा शिवाजी (इ. स. १८७१), भाग दुसरा, श्लोक ९२ १०१

## पांडुरंग व्यंकटेश चित्तामणिपेठकर

[ इ. स. १८५१–१८७९ ]

### गंगास्तुती

तें उत्तरेकडिल भारतखंड सारें । पोंपेचि केवळ तुझ्या गुरुवारिभारें ॥
जाऊन तो विषम पर्वत भूप्रदेश । तू पातल्यावरि ल्याच सपाट देश ॥ १ ॥
ह्या लागता, तव जलप्रवह क्रमानें । होतो प्रशांत उपयुक्तहि त्याच मानें ॥
पाहून उद्गम हिमाद्रितटप्रदेशीं । ज्या भेटती तुज असंख्य नद्या जवेशीं ॥ २ ॥
त्यांहीं तुझ्या तळवटातिल देश सारा । पावेचि ह्या जलसमृद्धि सदा अपारा ॥
वर्षा ऋतूंत तुजला प्रतिवर्ष, माते । येतो न पूर तव जो भिजवी तटांतें ॥ ३ ॥
पाव्हा पुढूनचि जगा हरुषें पयातें । तू देवि, पाजिसि तया निजनंदनांतें ॥
तें क्षीरपान घडताचि पहा तयाची । मुद्रा क्षणांत किति जाय फिरून साची ॥ ४ ॥
होऊन सस्यफलपुष्पसमृद्धि मान । तो लागतो स्वर्गीत हिमवन्तें ॥
चोहींकडे तव थडींत अनेक धान्यें । नानाफळें मधुर लोकरुचीस मान्यें ॥ ५ ॥

पुष्पेंहि नैकविध रम्य सुगंधशाली । उत्पत्ति पावति अखंडित योग्य काली ॥
साऱ्याहि वर्षभरि, जन्हुनरेंद्रकन्ये, । त्वत्तीरवर्ति विषयातुनि देनि धन्ये ॥ ६ ॥
वैपुल्य अस्खलित नांदतसे, जनाला । पोषून जें नितरितें बहु मंगलाला ॥
गंगे, तुझ्या तळवटातचि पूर्वकाली । राज्यें असंख्य बहुथोर बलाढ्य झाली॥७॥
भासे मला निमल भारत भूमिका हे । त्वत्स्रोत हेंचि शुभ मंगलसूत्र वाहे ॥
तीरीं पुरें विलसती घन लागलेलीं । मुक्ताफळेंचि जणु त्यातुनि ओंविलेलीं॥८॥
व्यापार थोर बहु अस्खलित प्रसंगें । या सर्वही तळवटातुनि, देवि गंगे ॥
चाले तुझ्यावरुनि, यास्तव या प्रदेशीं । तू पावशी बहुत उन्नत योग्यतेशीं॥९॥
या रीतिचा रुचिर वस्तुसमूह जीतें । संभूषवी बहु, अशा तुझिया थडीतें ॥
पाहून, जन्हुतनये, वदु फार काय । स्वर्लोकही मजसि होउनि तुच्छ जाय॥१०॥

गंगावर्णना ( इ. स. १८७४ ), श्लोक ९९–१०८

## कृष्णशास्त्री चिपळूणकर

[ इ. स. १८२४–१८७८ ]

### अन्योक्ति

#### वटान्योक्ति

शाखा दूरवरी वटा पसरुनी दिग्मंडळा व्यापिशी ।
पक्षी आश्रय देउनी जवळ तू लक्षावधी पाळशी ॥
गेलें मस्तक मेघ भेदुनि तुझें दृष्टी न पोंचे वरी ।
तूतें शंभर थोर साविरिति हे बुधेंहि खाग्रापरी ॥ १ ॥

#### चंदनान्योक्ति

आहे एक सुगंध मात्र ज्वळी तों त्यास रक्षावया ।
ऐसे थोर भुजंग पाळिशि जना जे धावती खावया ॥

येती गोड फळें फुलेंहि बरवीं दैवें तुला चदना।
त्याच्या गा ! करितासि काय न कळे सरक्षणा योजना ॥ २ ॥

### केतकीअन्योक्ति

दला सर्वी काटे असति, मधुचा लेशहि नसे।
उडोनी नेत्रातें रज बहुत पीडा करितसे ॥
तुझ्या पुष्पीं ऐसे अवगुण असोनी भ्रमर हा।
कसा एक्या गधें भुलुनि पडला केतकि पहा ! ॥ ३ ॥

### आम्रान्योक्ति

पावोनी तव आश्रया द्विजकुलें लक्षावधी पोसती।
सारेही वनिचे तरू तुजपुढें क्षुद्रापरी भासती ॥
ऐसा तू गुणवत बा असुनिया आम्रा ! पिकावायसा –।
मध्यें जाणसि तारतम्य न मनीं हा मोह बा कायसा ? ॥ ४ ॥
ज्याचे पल्लव मगलप्रद, शिणा छाया जयाची हरी।
गधें युक्त फुलें फळेंहि असती ज्याची सुधेच्या परी ॥
वाटे जो रमणीय भूषण वनश्रीचें सुरीचा भला।
आम्रा त्या पिक सेविता समसमा संयोग कीं जाहला ॥ ५ ॥

### बाभळीअन्योक्ति

काट्यानी भरलें शरीर अवघें छाया नसे दाटही।
नाहीं वास फुलास, भूक न निव त्याच्या फळें अल्पही ॥
नाहीं एकहि पाथ येत जवळी तुझ्या असा गोप ही।
अन्यांचीं न फळें मिळोत म्हणुनी दाशी तयात वही ! ॥ ६ ॥

### मेघान्योक्ति

दावाग्नी गहनीं वनीं भडकता ज्या वाट ही सापडे ।
तीर्ते धावति जीव घेउनि पशू भागाउनी बापुडे ॥
ऐसा घोर आकांत हा उसळता दुर्वार या संकटा ।
वाराग्रास समर्थसा दिससि तू आम्हां ! घना ! एकटा ॥ ८ ॥

### चंद्रान्योक्ति

नक्षत्रं परिवार ज्याम पतिही जो ओषधींचा असे ।
ज्यातें पाहुनि हर्षती जन, सुधा ज्याच्या शरीरीं वसे ॥
होई तेज कमी तयाहि विधुचें येता रवीच्या गृहीं ।
ज्या येई लघुता न अन्यसदनीं ऐसा न कोणीचही ॥ ९ ॥

### सूर्यान्योक्ति

होता जोंवरि अंबरीं तपत तो चंडांशु तेजें निजें ।
झाला निष्प्रभ तारकाधिपतिही, गोला क्षशाला दुजे ? ॥
राहूच्या वदनीं अजी गरसता तो भानु दैवें अहा ! ।
कैसे क्षुद्रहि काजवे चमकती त्याच्यापुढे हे पहा ! ॥ १० ॥

देखूनी उदया तुझ्या द्विजकुळें गाती अतीं हर्षुनी ।
शार्दूलादिक दुष्ट सर्व दडती गिर्यंतरीं जाउनी ॥
देशी ताप परी जसा वरिवरी येशी नभीं भास्करा ।
अत्युच्चीं पदि थोरही बिघडतो हा बोल आहे खरा ॥ ११ ॥

### खद्योतान्योक्ति

गेला लोकांतरातें दिनकर सकला द्योतवी जो जगातें ।
अस्तातें जाय तोही हिमकिरण जसा सौख्यदा विश्व गाते ॥
मेघानीं व्याप्त ऐशा गगनि नच दिसे एक ताराहि कोठें ।
रे खद्योता ! आता तू चमक बहु तुझें दैव बा फार मोठें ॥ १२ ॥

### भ्रमरान्योक्ति

आहे चंदन चंपकादिक तरू सारेच का वाळले? ।
पद्मालीं भरले जलाशय लया कीं सर्वही पावले? ॥
झाली निर्मद आणि शुष्क करिंचीं कीं सारं गंडस्थळें ।
रे मूढा भ्रमरा! करीरकुसुम त्वां आजि जें चाखिलें ॥ १३ ॥

### शुकान्योक्ति

फळें मधुर खावया असति नित्य मेवे तसे ।
हिरेजडित सुंदरीं कनकपंजरींही वसे ॥
अहर्निश तथापि तो शुक मनात दुःखें झुरे ।
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडि घडी सुखातें स्मरे ॥ १४ ॥

### चातकान्योक्ति

नदीं पद्में जेथें विकसुनि सुगंधा विखरती ।
तळीं ऐशीं तोयें सतत भरलीं फार असती ॥
तरी पर्जन्याचे जलकणचि का चातक पितो ।
गळो प्राणें पाणी शिर नमविण्या लाज धरितो ॥ १५ ॥

या माळावरि वृक्ष एकहि नसे बाळा खुळ्या कोकिळा।
येथें मंजुळ शब्द काढुनि गळा का शोषिसी आपुला ? ॥
जेथें बोल अमोल वाटति तुझे तो देश बा वेगळा।
तेथें आम्र फुलोनि गंध विखरे चोहींकडे आगळा ॥ १८ ॥

बा या सुस्वर शब्द काढिशि पिका राहे उगा काळ हा।
लोटे तों तरुकोटरीं लपुनिया कोठेंतरीही रहा ॥
पानें तीव्र हिमें गळोनि दिसती झाडें जळाल्यापरी।
गर्जे कर्कश शब्द थोर करुनी काकावली त्यावरी ॥ १९ ॥

वसंत समयीं फुले, परिमळें दिशा व्यापि जो।
जयास अवलोकुनी सुरतरूहि चित्तीं थिजो ॥
तया सतत सेविती विहग आम्रवृक्षा किती।
परी पिकचि एकला मधुरवाणि लावे क्रुती ॥ २० ॥

ज्याचे पूर्वी वसतीं परिमलबहुलीं आम्रवृक्षीं सुखाचे।
गेले गुजारवातें दिवस परिसता मत्त भृंगांगनांचे ॥
कैसे त्या कोकिलातें अधम करिति हे कावळे चंचुघाता।
कोठें थारा मिळेना, गरिब पळतसे वाकडा काळ येता ॥ २१ ॥

### मयूरान्योक्ति

रत्नाचा जणु ताटवा झळकतो मोरा पिसारा तुझा।
हर्षे नाचसि ते गमे त्रिभुवनीं पक्षी न ऐसा दुजा ॥
मोठा सुंदर तू खरा, परि दया नाहींच भिल्लास या।
हे घेतील तुझ्या जिवा झडकरी सोडी अरण्यास या ॥ २२ ॥

झाडें पेटुनि वाजती कडकडा त्याचा ध्वनी होतसे ॥
ज्वाला राहुनि राहुनी उठति या विद्युल्लताही नसे ॥
काळा धूर नभीं बहू पसरला हा मेघ नोहे खरा।
वर्षाकाल न हा, दवानल असे मोरा पळे रे घरा ॥ २३ ॥

### बकान्योक्ति

उभा राहे एकें चरणि धरणीतें धरुनिया ।
तपश्चर्या वाटे करिन जणु डोळे मिटुनिया ॥
बका ऐशा ढाग तव अमति मासेंचि ठकती ।
परि ज्ञाते तुझे कपट लगलाही उमजती ॥ २४ ॥

### हरिणान्योक्ति

जाळें तोडुनिया बळें हरिण तो टाळोनि दावाग्निला ।
व्याधाचे चुकवूनि बाणहि महावेगें पुढे चालिला ॥
तों धाईंत उडी करुनि पडला आत्मघ्न खाचडा ।
होती सर्वहि यत्न निष्फळ जरी होई विधी वाकडा ॥ २४ ॥

### हंसान्योक्ति

विजा चमकती न जा, नभि न मेघ जां वर्षती ।
जलाशय सरोवरें कलुषता न जां पावती ॥
प्रफुल्ल नवपंकजीं कमलिनी वनीं तोंवरी ।
विलास कलहंसका सकलही मनींचे करी ॥ २६ ॥
पानामाजीं तरूच्या लपुनि बस कुठें, राजहंसा क्षणाही ।
जातीं वर्षाऋतूचे दिवस तनवरा रात्रें क्षणाख साही ॥
येऊनी शारदश्री पुनरपि फुलता पद्मवृंदें तयाचा ।
भोक्ता नाहीं कुणीही तुजविण दुसरा जाण हा नेम साचा ॥ २७ ॥
ज्याच्या तीरीं समतात् मधुरफलभरें वाकले वृक्ष भारी ।
ज्यामाजीं पद्मखंडें फुलुनि विलसती शत्र निस्तापहारी ॥
त्या जेणें मानसातें त्यजुनि वरियलें पंकिला पल्वलातें ।
त्या हंसाच्या मनानीं तरि पद निधरें मस्तकीं योग्य त्यातें ॥ २८ ॥

### सिंहान्योक्ति

ताण्यापासुनि रोडला जरि जरायोग बहु वाढला ।
रोगानें अति पीडिला तरि मरायातेंहि कीं टेकला ॥

उन्मत्त द्विपगंडभेदन करायाचीच इच्छा करी ।
मानी क्षुद्र जनावरापरि तृणा स्पर्शोंचि ना केसरी ॥ २९ ॥

मेघाच्या गर्जनेनें खवळुनि वरती सिंह पाही स्वभावें ।
काका त्या भीति सारी त्यजुनि तरुवरी मासखंडास खावें ॥
जो उन्मत्ता गजाच्या खरतर नखरीं फोडुनी मस्तकातें ।
घाला रक्ता पिऊनी नच मृत पशुच्या इच्छितो तो कणातें ॥ ३० ॥

भुंगे गुंजारवातें करिति शिरिं असे मत्त हत्तीहि जीतें ।
डोळा देखोनि होते पळत भयभरें सोडुनीया धृतीतें ॥
जेथे मुक्ताफळांचा खच बहु पडला, त्या गुहेमाजिं आता ।
सिंहाच्या क्षुद्र कोल्हे कल्कल करिती मृत्युनें त्यास नेता ॥ ३१ ॥

गजान्योक्ति

कर्णी लाभति चामरें चमकती माळा गळा सानिच्या ।
वेली रंगविल्याहि शोभति शिरीं सिंदुरी गोजि-या ॥
ऐसा तो नटला तरी नृपकरी पायीं निडी वागवी ।
कैसी त्यास मिळे स्वतंत्र वनिंच्या हत्तीपुढें थोरवी ॥ ३२ ॥

ज्याची स्पर्धा कराया इतर गज कधीं शक्त नाहींच झाले ।
सांगावे काय ! ज्याच्या मृगपतिहि भयें रान सोडून गेले ॥
तो पंकामाजिं आजी गजवर फसला युक्ति नाहीं निघाया ।
अन्हेरीती पहा हे कलकल करुनी क्षुद्र कोल्हे तयाला ॥ ३३ ॥

पूर्वी बाळपणीं वनीं मनिजनीं प्रेमें जया पोशिले ।
देवोनी धनधान्यमुष्टि जल्ही पाजून कुंभातलें ॥
झाला तो गज थोर आजि फिरती भुंगे तयाभावतीं ।
त्यातें पाहुनि ते मुनी टचकती संतोषही पावती ॥ ३४ ॥

— पद्यरत्नावली, ( इ स. १८७८ )

## वासुदेव वामनशास्त्री खरे

[इ. स. १८५८–१९२४]

### उज्जयिनी

जाता अस्ताहि तेजें दिपवि रवि जसा सर्फुटीं थोर लोक।
क्षिप्रेच्या पृष्ठभागीं चमकति किरणें पीत त्याचीं सुरेख ॥
ऐशा वेळीं तिथें मी भटकत असता फार झालों उदास।
तेव्हा नाना विचार प्रकटुनि करिती क्षुब्ध माझ्या मनास ॥ १ ॥
शास्त्रें विद्या ललित कविता धर्मनिष्ठा प्रताप।
होतीं जेव्हा करित वसती आर्यलोकीं अमूप ॥
जेव्हा होता विलसत जगीं विक्रमादित्य राया।
तेव्हा नांदे प्रथित भुवनीं उज्जनी याच ठाया ॥ २ ॥
पुरी पूर्वी गर्वें निरुपम निजैश्वर्य मिरवी।
जिला वर्णू जाता थकति सुकृती संस्कृत कवी ॥
तिच्या स्थानीं आता पसरत असे निर्जन वन।
बघोनी हें झालें मम समयिं त्या दुःखित मन ॥ ३ ॥
कोठें ते कांचनाचे कळस चमकती उच्च देवालयांचे?।
हर्म्यं प्रासाद कोठें असति? विरलें थोर ऐश्वर्य ज्याचें ॥
कोठें त्या नाट्यशाला? दिसति न नयना चंद्रशाला विशाला
रत्नानीं पूर्ण गेले विपणि तळ जणों अब्धिचे ते लयाला ॥ ४ ॥
प्रातःकालीं नगरवनिता कुंकुमाच्या सड्यानीं।
रांगोळ्यानीं अधिकचि जया देति शोभा झटोनी ॥
नाना यानीं धनिक बसुनी जात होते जयांत।
आता कैसे दिसति न इथें रम्य ते राजपंथ? ॥ ५ ॥
जेथें नाचति मोर मंजुळ रवें गातात जेथें पिक।
वापींच्या तटिं खेळती सुखभरें चक्रांगहंसादिक ॥

पुष्पांनीं लवल्या लता तरुवरा जेथें मिठी घालिती ।
उद्यानें दिसतीं न तीं वसति जीं क्षिप्रा नदीच्या तटीं ॥ ६ ॥
विद्याकर्मसुकर्मतत्पर असे होते इथें ब्राह्मण ।
तैसे क्षत्रिय शूर मानधन ते ज्यां जीव वाटे तृण ॥
अर्थोत्पादक वैश्य शूद्र खपले सेवावया भूमिला ।
कोठें उज्जियिनीमधील जन ते गेले कळेना मला ! ॥ ७ ॥
ज्यांस विक्रम पराक्रमी गुणी । तोषवी झटुन नित्य रञ्जुनी ॥
स्वामिभक्तिवश धन्य लोक ते । होति या नगरिं पूर्वि राहते ॥ ८ ॥
लोकीं पावसि तूंच विक्रम नृपा ! धन्यत्व या जन्मुनी ।
काव्याभिज्ञ जनांत तूंचि पहिला दात्यांमध्यें अग्रणी ॥
वाणी कंठमणी कवीश्वर गुणी शाकुंतलाचा पिता ।
होता आश्रय पूर्ण पावत तुझा विद्वत्सभासंमता ॥ ९ ॥
शृंगारवीर करुणारसपूर्ण काव्यें । श्री कालिदास तुज ऐकवि नित्य नव्यें ।
गंभीर सुस्वर रसाळ अशी सुवाणी । त्याची नृपा ! परिसली असशील कानीं ॥ १० ॥

सांगाया निजवल्लभेस वदला तो यक्ष जें जें घना ।
सीतेचा पतिला निरोप रतिचा तो शोकभेदी मना ॥
ज्यातें ही कविता मुखेंच कविच्या ऐकावया सांपडे ।
त्याचें भाग्य विशेष ! दुर्लभ जगीं तो लाभ ज्यातें घडे ॥ ११ ॥
ज्यांनीं गर्वभरें शिरें उचलिलीं आकाश भेदावया ।
जाती पर्वत उंच थोरहि असे ज्याच्या प्रभावें लया ॥
किंवा घोर अपार सागरजलें ज्यानें बळीं शोषिलीं ।
तो हा धन्य अचिंत्य काल्महिमा स्वच्छंदचारी बली ॥ १२ ॥
महाकाल रक्षावया सिद्ध नित्य । अवंतीस हें बोलती लोक सत्य ॥
कसा काल नाशावया तीस पाहे । अहो थोर आश्चर्य हें वाटताहे ॥१३

'कविवर चिर गाती कीर्ति ज्याची अमूप ।
त्यजुनि भुवन गेला विक्रमादित्य भूप ॥

कारण रसिक भोक्ता आपणा होय आता।
म्हणुनि सुकविता ही पावली स्वर्गपथा ॥ १४ ॥
*श्री विक्रमाग्रज नृपाल उदार शुद्ध। राज्यें प्रजा सुखवि भर्तृहरी प्रसिद्ध ॥*
तो आपुल्या प्रियपुरास विनाशकाल। येणार जाणुनि असे वदला असेल ॥१५॥
'ती रम्या नगरी महा नृपति तो सामंत चक्रावृत।
त्याची राजसभा विशाल, जवळी चंद्रानना त्या स्थित ॥
शौर्ये गर्वित राजपुत्रगण तो, ते भाट तीं भाषणें।
ज्या काळें सगळें लया दवडिलें मार्झी तया वदनें!' ॥ १६ ॥
गेली उज्जयिनी! तिच्या धरितसे नावास जें लोकि या।
*आहे सामंत उजनी नगर तें राज्यात शिंद्याचिया ॥*
आहे नाव परंतु वैभव दिसे कोठें न तें त्यापरी।
नामैक्यें समता चुन्यास अमृता येईल कैशी तरी ॥ १७ ॥
कोठें उज्जयिनी पुराणनगरी संपन्न राजन्वती।
ज्ञानी शूर सुखी स्वधर्मनिरता जेथें प्रजा नांदती ॥
कोठें उज्जयिनी नवी जन जिथें दारिद्र्यचिंताकुल।
राजे दुर्मद दुष्ट जीस लुटती होतीं रणें तुंबळ ॥ १८ ॥

## २

### गोपिकाबाईचा पुत्रशोक

शोभे ज्या अभिमन्युचीच उपमा विश्वास माझा गुणी।
*मानी माधव आठवीन न कसे नारायणाही मनीं? ॥*
एकामागुन एक नाश मुलगे माझे कसे पावले!।
हा देवा! करण्यास नाश पुरता कैसें तुला फावलें? ॥ १ ॥
होते खेळत बाळ राजस अहा ते तीन माझे घरीं।
होत्यें पावत धन्यवाद विसरूं आता कसा तो तरी ॥
स्वप्नीं येउन भेटती परि असें जागी पुन्हां जेधवा।
मूर्ती सुंदर त्यांचिया न दिसती डोळ्यांस या तेधवा ॥ २ ॥

विश्वासासम शूर सुंदर असे राष्ट्रामध्यें कोण या ।
एकोणीस अहो पुरीं न वरुषें होती जयाच्या वया॥
गेला पानपतीं मरुन लढतां तो शत्रुसैन्यासवें ।*
तेव्हां गाळिति शत्रुमित्र बघतां त्याच्या दावा आसवें ॥ ३ ॥
भावोजीसह जावयास निघतां विश्वास माझा रणा ।
तो भेटे न पुन्हां अशी नच मना माझ्या शिवे कल्पना ॥
गेला वीर सुपुत्र पुण्य सरलें तो मृत्यु आला धवा ।
होणारें न चुकेल होइल जरी ब्रह्मा तया आडवा ॥ ४ ॥
जाळाया पतिशोकदग्ध उठल्यें हा देह तेव्हां सुत ।
आला माधव घालुनी दढ मिठी तो बोलला स्फुंदत ॥
माते ! शोक करूं नको तुजविणें मातें नसे आसरा ।
आशीर्वाद वदें पुन्हा रत जयश्री आणितों मी घरां ! ॥ ५ ॥
केलें जर्जर हैदरास लढुनी शौर्यें निजामासही ।
काकातें दृढ आवरून विजयी पाळी जयानें मही ॥
होते कांपत थर्थर प्रतिदिनीं राज्यात ज्याच्या खल ।
नाहीं एकपरी भला उगवला ऐसें जयाचें बल ॥ ६ ॥
जे वैभव प्रथित पानपतीं बुडालें ।
तें आणिलें परत कीर्तिसमेत काळें ॥
पाळी प्रजेस जणु संतति ती स्वकीय ।
ऐसा द्वितीय सुत माधव अद्वितीय ॥ ७ ॥
व्यापारी उदमी गरीब कुणबी श्रीमंत आणी गुणी ।
होते त्यास समान सर्वच दुवा देती तयालागुनी ॥
ऐशा मी कुलदीपका प्रसवल्यें हा थोर मातें असा ।
होता जो अभिमान तो हरहर व्यर्थत्व पावे कसा ! ॥ ८ ॥
माझें दैव हताश यास्तव तया झाली क्षयाची व्यथा ।
गेला माधव लोक सोडुन किती गाऊं तयाच्या कथा ! ॥
सौंदर्यें विनयें अलौकिक पतिप्रेमें मनो–मोहिनी ।
साध्वी जाय रमा तयासह जशी चंद्रासवें रोहिणी ॥ ९ ॥

पुढें माझा नारायण तरुण तो पुत्र तिसरा ।
बसे जेव्हां गादीवर दिन गमे तो नच बरा ! ॥
अहो त्याच्या राज्या घडति न पुरे सात महिने ।
वरीलें गंगेनें तंव विषम वैधव्य महिनें ॥ १० ॥
ज्यातें चिंतुनि भूपती थरथरा सिंहासनीं कांपत ।
होते उत्तरचे प्रताप पतिच्या माझ्या असा अद्भुत ॥
त्याचा पुत्र, कनिष्ठ बंधु असतां जो माधवाचा प्रिय ।
हा दैवा ! स्वगृहींच त्यास वधिती मारेकरी निर्भय ॥ ११ ॥
भाच्याचा वध इच्छिला कुमतिनें कंसें प्रयासें महा ।
पुत्रातें वनिं धाडिलें सवतिच्या कीं कैकयीनें पहा ॥
भावांतें विषमिश्र अन्न कपटें दुर्योधनें चारिलें ।
आनंदी ! पुतण्यास निष्ठुरपणें तैसें तुवां मारिलें ! ॥ १२ ॥
गेला ख्याति करून तुंबळ रणीं विश्वास लोकोत्तर ।
गेला माधव राज्यसौख्य अकरा भोगून संवत्सर ॥
झाली केंवि परी अशी गति तुझी नारायणा ! पाडसा ! ।
दुष्ट व्याध सुमेर गांठि सहसा सोडी तुला तो कसा ? ॥ १३ ॥
नवस करिती पुत्रासाठीं कितीक जगीं स्त्रिया ! ।
सुत मज तिघे झाले गेले तिघेहि परी लया ॥
कितिक गुण ते त्यांचे चित्तीं स्मरून रडूं तरी ? ।
मरण नच ये मी दुर्भाग्या असे भुवनीं खरी ॥ १४ ॥

## २

### जन्मभूमि

पोटासाठीं भटकत जरी दूर देशीं फिरेन ।
मी राजाच्या सदनि अथवा घोर रानीं शिरेन ॥
नेवो नेतें जड तनुस या दूर देशास दैव ।
राहे चित्तीं प्रिय मम परी जन्मभूमी सदैव ॥ १ ॥

या संसारीं जरि निजशिरीं वाहतो क्लेशराशी ।
चिंताज्वाळा निशिदिन जरी जाळिती मन्मनाशीं ॥
होतें जेव्हा स्मरणच तुझें जन्मभूमी क्षणैक ।
तेव्हा शांत स्थिर मन क्रमें होतसे जाय दुःख ॥ २ ॥
वेळोवेळीं तुजसि बघुनी नेत्र संतुष्ट व्हावे ।
इच्छा होते परि तुजकडे चित्त हें मात्र धावे ॥
यावें देहें परि असिस तू शेकडों कोस दूर ।
आहे त्याच्या त्वरित गमना विघ्न हा दुर्निवार ॥ ३ ॥
पाहे नेत्रें बहुविध असे संपदेचे पसारे ।
नाना सौख्यें अनुभविति हे येथले लोक सारे ॥
येथें राहू परि नच शिवे वासना ही मनातें ।
यावज्जीव प्रियतम अशी तूच होशील मातें ॥ ४ ॥
जेथें माझें जनन घडलें पूर्वपुण्येंच थोर ।
जेथें गेले दिवस असता बाळ सौख्यात फार ॥
जेथें होते करित वसती पूर्वज प्रेमभावें ।
का त्या भूमिप्रत चिर न म्या पूज्यभावें स्मरावें ? ॥ ५ ॥
पाथोधीची श्रवणिं पडता गर्जना मंद धीर ।
वृक्षच्छायातरि झुळुझुळू वाहता वात गार ॥
होतां अंकीं निजत जननी ! जन्मभूमी ! तुझ्या ते ।
गेले कोठें दिवस ? झुरतों आठवोनी तयातें ॥ ६ ॥
होतों लहान गृहु खेळुन तृप्त झालों ।
अंकीं तुझ्या तिथुन थोरपणीं निघालों ॥
मातेसमीप असतीं परि थोर होतीं ।
तेव्हा पिलें सहज सोडुनि तीस जातीं ॥ ७ ॥
निःसत्व निर्धन तुला म्हणतात लोक ।
वाटे मला लवहि त्यात नसे विवेक ॥
लक्ष्मीस देइ जननाप्रत वारिराशी ।
सेवार्थ तो सतत सिद्ध तुझ्या पदाशीं ॥ ८ ॥

बघुनि तव अहाहा ! थोर सौंदर्य झाले ।
बहुतच दिन जेव्हा नेत्र हे फार धाले ॥
अजुनिहि दिसताहे दृष्टिला काय नव्य ।
हृदयपटिं असे तें रोखिलें चित्र भव्य ॥ ९ ॥
*ज्या आपटता उठे ध्वनि शिरे तो ज्याचिया कंदरीं ।*
ऐसे पर्वत दुर्ग शोभति अति प्राचीन ज्याच्या शिरीं ॥
'धो धो' शब्द करीत त्यातुन झरे खालीं कसे धावती ! ।
पाणी तेंच पिऊन बाग उठती शोभा तयातें किती ! ॥ १० ॥
आंबे पोफळि साग नारळि तटीं दाटे तरूंचें बन ।
झोंके घेति सुरम्य चंचळ जळीं छाया तयाच्या घन ।
आकाशीं जणु कीं विजा तळपती मासे जळीं त्यापरी ।
खाड्या त्या तव जन्मभूमि नयनीं पाहीन केव्हा तरी ! ॥ ११ ॥

## ४

## मृत्यू

जैसे निर्मळ बर्फ शुभ्र वितळे तो भासिलें तें जळें ।
भासे भिन्न तथापि कुंभ फुटता मातींत माती मिळे ॥
तैसे या जगि जंतुदेह दिसती नानाकृती सुंदर ।
*काळें जीवित नष्ट होय फिरुनी मृत्यूत होती स्थिर ॥ १ ॥*
त्यानी सूर्यशशांक दीप पसरी आकाश हा चांदवा ।
पृथ्वी सुंदर रंगभूमि सजवी दावी निजा वैभवा ॥
बांधोनी मग जन्ममृत्युपडदे तेथें जगन्नायक ।
प्रारंभीं प्रभु सूत्रधार बन हो संसार हें नाटक ॥ २ ॥
पात्रें प्राणि अनेकरूप असती या नाटकीं जेवढे ।
जन्माचा पडदा प्रवेश करिती सारून एकीकडे ॥
त्या त्यातें निजभूमिकार्य अवघे संपादुनी शेवटीं ।
जाणें मृत्युचिया अमेय पडद्यामागे न अन्या गती ॥ ३ ॥

गेला राज्य करून रावण युगें पन्नास आणी सहा ।
गेला श्री रघुनाथ राक्षस कपी गेले बळी ते महा ॥
गेले कौरव पाडव क्षितिपती छप्पन्न कोटी भग ।
गेले यादव बापुडे बलमदें होते वृथा उद्धट ॥ ४ ॥
सारें गार शरीर ताठ पडलीं निश्चेष्ट तीं इंद्रियें ।
कोमेजें मुख नेत्र निष्प्रभ जणों बाहेर आले मयें ॥
ऐसें भीतिद रूप पाहुन तुझें मृत्यो ! मनीं ज्याचिया ।
भीतीचा चरका बसेल न असा कोणी नसे लोकिं या ॥ ५ ॥
देतो सूर्य मला प्रकाश दिवसा रात्रौ निशानायक ।
वारा मद सुगधि शीतल सुटे देतो शरीरा सुख ॥
जीवित्वास हवा अवश्यक नवी मातें मिळे निर्मळ ।
का मी याकिन देह मित्र असता माझे असे पुष्कळ ॥ ६ ॥
होतों बाळपणात खेळत जयासगें सुख हासत ।
कष्टीं घालुन हात मी हितगुजें होतों जया सागत ॥
हर्षाची उकळी फुटे मम मनीं पाहून मित्रा जया ।
मृत्यो ! तू अधमाधमा ! पळवुनी नेलेस कोठें तया ? ॥ ७ ॥
नानासकटकण्टकान्वित अशा ससाररूपीं पथीं ।
आलों येथवरी पुढें न कळतये होणार कैशी स्थिती ॥
धाग्रार्चे मम मार्गसचरण हें वाटेल वेच्हा तुला ? ।
सान्निध्या तव सर्व मगलमया आत्मा असे लोभला ॥ ८ ॥

—फुटकळ चुटके (इ. स. १८९२)

गेला तो नृपती तदन्वय तसा सामत कोठें आता ? ।
त्याची ती नगरी सुरम्य वनिताशालाहि वाताहता ।
गेलें वैभव ये फिरुनि कसचें ? तो काल गाळीं हसे ।
कालाचा महिमा अगाध समजें तद्रक्ष्य सारें असे ॥ ९ ॥

—कुसुमांजली, (इ. स. १८९२)

## कृष्णाजी केशव दामले ( केशवसुत )

[ इ. स. १८६६–१९०५ ]

### १

### एका भारतीयाचे उद्गार

सध्याकाळीं बघुनि सगळी कांति ती पश्चिमेला ।
वाटे सत्र स्थितिच अपुली मूर्त ती मन्मनाला ॥
हा ! हा ! श्रीचा दिवस अपुल्या मावळोनी प्रतीचे ।
गेला ! गेला ! सहज पडती शब्द हे मन्मुखाचे ॥ १ ॥
तेणें माथे फिरुनि सगळें जें म्हणोनी दिसावें ।
त्या त्यामध्यें स्वजनदुदशा वाचुनी मी रडावें ! ॥
जें जें चित्तीं बहुतकरुनी तें सुपुर्तीत भासे ।
वृद्धाचें हें अनवितथ हो वाक्य होईल कैसे ? ॥ २ ॥
प्रात कालीं रवि वरि वरी पाहुनी चालताना
होई मोदातिशय बहुधा सर्वदा या जनाना ॥
पूर्वींची तो स्थिति परि करी व्यक्त ती वाचुनीया ।
एकाएकीं हृदय मम हें जातसे भंगुनीया ! ॥ ३ ॥
हा जैसा का रवि चढतसे त्याप्रमाणेच मागें ।
स्वोत्कर्षाचा रविहि नव्हता वाढता काय ? सांगें ॥

जावोनी तो परि द्युनिशा पश्चिमेशीं रमाया।
ऱ्हासाची ही निबिड रजनी पातली ना छळाया ! ॥ ४ ॥
वर्हीनो ! हीं सुरभ सुमनें काय आम्हास होत ? ॥
युष्मद्गानें मधुर रस हो ! या जना काय होत ? ॥
आम्हा डोळे नसति बघण्या पारतन्त्र्यामुळें हो ! ।
ऐकायाला श्रुतिहि नसती पारतन्त्र्यामुळें हो ! ॥ ५ ॥
आहे आम्हावर जव निशा पारतन्त्र्याधिकारें ।
वाटे जों का उलट कुदशेचें तसे फार वारें ॥
सौख्याचें तांवरि फुकट तें नाव व्हावें कशाला ? ।
दु खाचा तोंवरि उचित तो भोग आहे आम्हाला ! ॥ ६ ॥
आनंदाचे समयिं मजला पारतन्त्र्य स्मरून ।
वाटे जैसें असुख, तितकें अन्य वेळीं गमे न ! ॥
पाहोनीया विष जरि गमे उग्र तें आपणातें ।
अन्नामध्यें शतपट रमे उग्रसे पाहुनी तें ॥ ७ ॥
देवा ! केव्हा परवशपणाची निशा ही सरून ।
स्वातन्त्र्याचा द्युमणि उदया यावयाचा फिरून ? ॥
केव्हा आम्ही सुटुनि सहसा पंजरातूनि देवा ।
राष्ट्रत्वाला फिरुनि अमुचा देश येईल केव्हा ॥ ७ ॥

इ स. १८८६

## २

### गांवीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून

येथें होता राहत माझा स्नेही । स्नेह्यासाठीं जो या लोकीं राही ॥
पाशाला जो तोडायाला पाही । स्वदेशपाशीं आपणा बांधुनि घेई ॥ १ ॥
पाशाविण या कोठें काहीं नाहीं । पाशाकरिता चाले अवघें काहीं ॥
पाशातुनिया सुटता सुंदर तारे । तेज तयाचें विझुनि जाई सारें ॥ २ ॥

चन्द्रानें या सदैव पृथ्वीपाशीं । राहुनीच का सेवावें सूर्याशी ? ।
शक्त जरी का असेल तो, तरि त्यानें । सेवावा रवि खुशाल निजतत्रानें ॥ ३ ॥
सोडी पत्नीपाशाची तो आस । स्वदेशसेवकरिता घाली कास ॥
तो मत्सरा निज गावीं गेला आहे । खोलीला या कुलूप लटकुनि राहे ॥ ४ ॥
येथें गोष्टी आम्ही करीत होतों । होतों नित्याभ्यासहि करीत होतों ॥
मित्रत्वाचें बीज पेरुनी खासें । मैत्रीवल्ली वाढविली सहवासें ॥ ५ ॥
देशाविषयीं गोष्टी बोलत येथें । नसलों, विसरुनि किनीकदा निद्रेतें ॥
श्वासीं आमुचे श्वास मिळाले तेव्हां । अश्रूमध्यें अश्रु गळाले तेव्हां ॥ ६ ॥
ऐसें असता, पहाट भूपाळ्याला । पक्षिमुखाहीं लागियली गायाला ॥
हवा चालली मद मद ती गार । प्रभाप्रभावें वितळे तो अधार ॥ ७ ॥
तेव्हां आम्हीं म्हटलें ही न्हासाची । रजनी केव्हां जाइल विरुनी साची ।
स्वतत्रतेची पहाट ती येईल । उत्कर्षाचा दिन नेव्हा सुचवील ॥ ८ ॥
या डोळ्यांनी पहाट ती बघण्याचें । असेल का हो नशिबीं दुर्दैव्याचे ? ॥
किंवा तीतें आणायाचे कांहीं । यत्न आमुच्या होतिल काय कराहीं ॥ ९ ॥
असो यापरी आम्ही प्रश्न अनंत । केले होउनि कष्टी परस्परांत ॥
इच्छा धरिता मार्ग मिळे आपणाला । या वचनें मग धीर दिला चित्ताला ॥ १० ॥
कोठ असशिल आता मित्रा माझे ? । करीत असशिल काय काय तीं कार्जे ? ॥
देशासाठीं शरीर झिजवायाला । स्फूर्ती आणित असशिल का कोणाला ? ॥ ११ ॥
तुझी पाहुनी ही मित्रा खोली बद । विरहाग्नीनें भाजे चेत कद ॥
पुनरपि आपण येथें भेटू ऐशी । आशा होई जलधारा मग त्यासी ॥ १२ ॥

झाल्यानतर अस्त, तो कमल ते पाहूनिया लागलें ।
उद्या मित्र करील तो निजकरें येऊनि याला खुलें ॥
ऐसें बोलुनि त्यापरी भ्रमर तो जातो श्रमानें दुरी ।
जातो बोलुनि या स्थलासहि तसे मित्रा ! आता मी घरीं ॥ १३ ॥

इ. स १८८७

## ३

## तुतारी

एक तुतारी द्या मज आणुनी
फुंकिन जी मी स्वप्राणानें । भेदुनि टाकिन सगळीं गगनें ।
दीर्घ जिच्या त्या किंकाळीनें । अशी तुतारी द्या मजलागुनि ॥ १ ॥
अवकाशाच्या ओसाडींतिल
पडसाद मुके जे आजवरी । होतिल ते वाचाल सत्वरी ।
फुंक मारिता जील जवरी । कोण तुतारी ती मज देईल ? ॥ २ ॥
सारंगी, ती सतार सुंदर
वीणा, बीनहि मृदंग, वाजा । सुरहि, सनई, अल्गुज माझ्या ।
कसची यीं हो पडतिल काजा ? । एक तुतारी द्या ती सत्वर ॥ ३ ॥
रूढी जुल्मि याची भेसुर
सतानें गक्षसी तुम्हाला । फाडुनि खाती, ही हतवेला ।
जल्शाची का ? पुसा मनाला ! । तुतारिनें ह्या सावध व्हा तर ! ॥ ४ ॥
अवडंवरलीं ढगें कितीतरि
रविकिरणाचा चूर होतसे, । मोहर सगळा गळुनि जातसे ।
कीड पिकावरि सर्वत्र दिसे ! । गाफीलगिरी तरिहि जगावरि ! ॥ ५ ॥
चमत्कार ? तें पुराण तेथुनि
सुंदर, सोज्वळ, गोडें मोठ ? । अलिकडलें ते सगळें खोटें ! ।
म्हणती धरुनी टेरीं पोटें । धिक्कार अशा मूर्खांलागुनि ! ॥ ६ ॥
जुन्या नभीं या ताजे तारक,
जुन्या भूमिवर नवी टवन्वी । जुना समुद्रहि नवरत्नें वी ।
जुन्यातून जी निष्पत्ति नवी । काय नव्हे ती श्रेयस्कारक ? ॥ ७ ॥
जुनें जाउ द्या मरणालागुनि
जाळुनि किंवा पुरुनी टाका । सडत न एक्या ठायीं ठाका ।
सावध ! ऐका पुढल्या हाका ! । खांद्यास चला खादा भिड्वुनि ! ॥ ८ ॥

प्रातःकाल हा विशाल भूधर,
सुंदर लेणीं तयांत खोदा । निजनामें त्यावरतीं नोंदा ।
बसुनी का वादविता मेदा ? विक्रम काहीं करा, चला तर ! ॥ ९ ॥
अटक कशाची बसला घालुनि ?
पूर्वज वदले त्या गमलें तें । ऐका खुशाल सादर चित्तें ।
परंतु सरका विशंक पुढतें । निरोप त्यांचा ध्यानीं घेउनि ॥ १० ॥
निसर्ग निर्घृण, त्याला मुर्वत —
नाहीं अगदीं पहा कशाची ! । कालासह जी क्रीडा त्याची ।
ती सकलांला समान जाची । चुरुनी टाकी प्रचंड पर्वत ! ॥ ११ ॥
त्याशीं भिडुनी, झटुनी झगडत
उठवा अपुले उच्च मनोरे, । पुराण पडक्या सदनीं का रे ! ।
भ्याड बसुनिया रडता पोरें ! । पुरुषार्थ नव्हे पडणें रखडत ॥ १२ ॥
सघशक्तिच्या भुईंत खंदक
रुंद पडुनि ये तुकडे झाले । स्वार्थानपेक्ष जीवीं अपुले ।
पाहिजेत ते सत्वर भरले । घ्या त्यांत उडया तर बेलाशक ॥ १३ ॥
धार धरिल्या प्यार जिवावर
रडतिल रडोत, रांडा पोरें । गतशतकाचीं पापें घोरें ।
क्षालायाला तुमचीं रुधिरें । पाहिजेत रे ! स्वैग न व्हा तर ! ॥ १४ ॥
जाऊ बघते नाव लयाप्रत
तशांत बनला मऊ मदरें । अहह ! घेरिल आहे तिमिरें ।
परंतु होऊ नका बावरे । धीराला दे प्रसंग हिंमत ! ॥ १५ ॥
धर्माच माजवूनि डंबर
नीतीला आणिती अडथळे । विसरुनिया हें जातात खुळे ।
नीतीचें पद जेथें न ढळे । धर्म होतसे तेथेंच स्थिर ॥ १६ ॥
हल्ला करण्या तर दंभावर-तर बंडावर
शूरानो ! या त्वरा करा रे ! समतेचा ध्वज उंच धरा रे ।
नीतीची द्वाही पसरा रे ! । तुतारिच्या ह्या सुगंभीरस्वर ! ॥ १७ ॥

नियम न मनुजासाठीं, मानव--
नसे नियमनासाठीं जाणा। प्रगतिस जर ते हाणी टोणा।
झुगारुनी त देउनि, बाणा। मिरवा निज ओजाचा अभिनव! ॥ १८ ॥
घातक भलत्या प्रतिबंधावर
हल्ला करण्या करा त्वरा रे!। उन्नतिचा ध्वज उच्च धरा रे!।
वीरानो! तर पुढें सरा रे--। आवेशानें गर्जत 'हर हर'! ॥ १९ ॥
पूर्वीपासुनि अजुनि सुरासुर
तुंबळ समरामाला करिती। सप्रति दानव फार माजती।
देवावर झडा मिरवीती। देवाच्या मदतीस चला तर! ॥ २० ॥

इ स १८९३

४

रांगोळी घालतांना पाहून

होतें अंगण गोमयें सकलही समार्जिलें सुंदर।
बालार्कें अपुली प्रभा वितरली नेत्रोत्सवा त्यावर ॥
तीची जी भगिनी अशी शुभमुखी दारीं अहा पातली।
रांगोळी मग त्या स्थळीं निजकरें घालावया लागली ॥ १ ॥
आधीं ते लिहिले तिनें रवि शशी नक्षत्रमाला तदा।
मध्यें स्वस्तिक रेखिलें, मग तिनें आलेखिलें गोपदा ॥
पद्म, बिल्वदलें, फुलें, तुळसही, चक्रादिके आयुधें।
देवाचीं लिहिलीं न ते वगळिलें जें चिन्ह लोकीं सुधें ॥ २ ॥
होती मंजुळ गीत गात वदनीं अस्पष्ट काहीं तरी।
गला दाटुनि शांत तो रस अहा तेणें मदभ्यंतरीं ॥
तीर्थें, देव, सती, मुनी, नरपती, देवी तशा पावना।
अंतर्दृष्टिपुढूनिया सरकल्या, संतोष झाला मना ॥ ३ ॥
चित्रें मीं अवलोकिलीं रुचिर जीं काव्यें तशीं चांगलीं।
त्याहीं देखिल न स्मरेच इतुकी मद्वृत्ति आनंदली ॥

लीलेनें स्वकरें परतु चतुरे! तू काढिल्या आकृती ।
त्या या पाहुनि रगली अतिशयें आहे मदीया मती ॥ ४ ॥
*रागोळींत तुझ्या विशेष गुण जो आर्ये! मला वाटतो ।*
स्पष्टत्वें इतुक्या अशक्य मिळणें काव्यात चित्रात तो ॥
स्वर्भूसंग असा तयात इतक्या अल्पावकाशीं नसे ।
कोणी दाखविला अजून, सुभगे! जो साधिला तू असे ॥ ५ ॥
आदित्यादिक आकृती सुचविती दिव्यत्व तें उज्ज्वल ।
*तैसे स्वस्तिक सूचवी सफलता धर्मार्थकामातिल ॥*
पावित्र्याप्रत गोष्पदें तुळसही, शोभेस हीं सारसे ।
पुण्यें प्रीतिस, चक्र हें सुचविते द्वारीं हरी या असे ! ॥ ६ ॥
तत्त्वें मगल सर्वही विहरती स्वर्गीं तुझ्या या, अये ।
आर्ये! तू उपचारिकाच गमसी देवी तयाची स्वयें ॥
नातें स्नेह निदान ओळख जरी येथें मला आणिती ।
होतों मी तर पाद सेवुनि तुझे रम्य स्थळीं या कृती ! ॥ ७ ॥
चित्तीं कल्मष ज्याचिया वसतसे ऐशा जनालागुनी ।
या चिन्हातुनि हा निषेध निघतो आहे गमे मन्मनीं — ॥
'जा मार्गें अपुल्या न दृष्टि कर या द्वाराकडे वाकडी ।
पापेच्छूवरि हें सुदर्शन पहा आणील कीं साकडी ! ' ॥ ८ ॥
'आहे निर्मल काय अतर तुझ ? मागल्य कीं जाणसी ? ।
लोभक्षोभ जयें उदात्त हृदयीं व्हायास का इच्छिसी ? ॥
ये येथें तर, या शुभाकृति मनीं घे साच अभ्यासुनी ।'
आर्ये! स्वागत हें निघे सरल या त्वल्लेखनापासुनी ॥ ९ ॥
साध्याही विषयात आशय कधीं मोठा मिनी आढळे ।
नित्याच्या अवलोकनें जन परी होती पहा आधळे ! ॥
रागोळी बघुनी इत पर तरी होणें तयीं शाहणे ।
कोठें स्वर्गसमक्षता प्रगटते हें नेहमी पाहणें ! ॥ १० ॥

इ. स. १८९५

## २

## सतारीचे बोल

काळोखाची रजनी होती । हृदयीं भरल्या होत्या खती; ॥
अंधारातचि गढलें सारें । लक्ष, न लक्षी वरचे तारे; ॥
विमनस्कपणें स्वपदें उचलित । रस्त्यातुनि मी होतों हिंडत, ॥
एका खिडकींतुनि सूर तदा । पडले–डिड दा, डिड दा, डिड दा ॥ १ ॥
जड हृदयीं जग जड हें याचा, । प्रत्यय होता प्रकटत साचा ॥
जड तें खोटें हें मात्र कसें । तें न कळे, मज जडलेंच पिसें ॥
काय करावें, कोठें जावें, । तुमजे मजला कीं विष खावें ! ॥
मग मज कैसे रुचतील तदा । ध्वनि ते–डिड दा, डिड दा, डिड दा ॥२॥
सोंनाड्याचें वादळ येतें, । तरि तें तेव्हा मज मानवतें, ॥
भुतें भोंवतीं जरि आरडती । तरि तीं सचितचि मज आवडती, ॥
कारण आतिल विप्रणवृत्ती । बाह्य भैरवीं धरिते प्रीती ॥
सहज कसे तिज करणार फिदा । रव ते–डिड दा, डिड दा, डिड दा ? ॥३॥
ऐकुनि ते मज जो त्वेष चढे । त्यासरशीं त्या गवाक्षाकडे ॥
मूठ वळुनि मीं हात हिसकिला, । पुटपुटलोही अपशब्दाला; ॥
म्हटलें ' आटप, आटप मूर्खा ' । सतार फोडुनि टाकिसी न कां ? ॥
पिरपिर कसली खुशालचंदा, । करिसी डिड दा, डिड दा, डिड दा ! ॥४॥
सरलों पुढता चार पावलें; । तों मज न कळे काय जाहलें, ॥
रुष्ट जरी मी सतारीवरी । गति मम वळली तरि माघारी, ॥
ध्वनिजालीं त्या जणू गुतलों । असा स्ववशता विसरुनि बसलों ॥
एका ओम्यावरी स्थिर तदा । ऐकत–डिडदा, डिडदा, डिडदा ॥ ५ ॥
तेथ कोपरें अंकि टेकुनी । कराजलीला मस्तक देउनि ॥
बसलों ह्युकयामाजीं करुणा– । रसपूर्ण गती माझ्या श्रवणा ॥
आकर्षुनि घे, हृदय निरालें, । तन्मय झालें, द्रवलें, आलें– ॥
लोचनातुनि तोय किति कदा । ऐकत असता–डिडदा, डिडदा ॥ ६ ॥

स्कधीं माझ्या हात ठेवुनी । आश्वासी मज गमलें कोणी ॥
म्हणे ' खेद का इतुका करिसी ? । जिवास का बा असा त्रासती ? ॥
धीर धरी रे ! धीरापोटीं । असतीं मोठीं फळे गोमटीं ' ॥
ऐक मनींच्या हरितील गदा । ध्वनि हे दिड दा, दिड दा, दिड दा ॥ ७ ॥
आशाप्रेरक निधू लागले । सूर तयीं मी डोळे पुशिले, ॥
वरती मग मीं नजर फिरविली, नक्षत्रे तों अगणित दिसलीं, ॥
अस्तित्वाची त्याच्या नव्हती । हा वेळवरी दाद्च मज ती ! ॥
'तम अल्पश्रुति नहु' या शब्दा । वदती रव ते, दिड दा, दिड दा ॥ ८ ॥
वाद्यातुनि त्या निघती नतर । उन्मत्ततेचे पोषक सुस्वर ॥
तों मज गमलें विभूति माझी । स्फुरत पसरली विश्वामाजीं, ॥
त्रिकालासहि अतीत झालों, । उगमीं विलयीं अनत उरलों, ॥
विसरुनि गेलों अखिला भेदा । ऐकत असता, दिड दा, दिड दा ॥ ९ ॥
प्रेमरसाचे गोड बोल ते । वाद्य लागता बोलायातें ॥
भुललों देखुनि सकलहि सुदर । सुरागना तों नाचति भूवर, ॥
स्वर्ग धरेला चुनायाला । खालीं लवला मजला गमला ॥
अशा रितिरिती अत्यानदा । ध्वनि ते – दिड दा, दिड दा, दिड दा ॥ १० ॥
शात वाजली गती शेवटीं । शात धरित्री, शात निशा ती, ॥
शातच वारे, शातच तारे, । शातच हृदयीं झालें सारें ! ॥
अशा सुखें मी सन्ना आलों । शातींत अहा ! झोपीं गेलों ॥
बोल बोलले परा चितिकदा । स्वप्नीं दिड दा, दिड दा, दिडदा ॥ ११ ॥

इ स १९००

# दत्तात्रय कोंडो घाटे

[ इ. स. १८७५–१८९९ ]

## निज नीज माझ्या बाळा

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा
निज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु ॥
रवि गेला रे सोडुनि आकाशाला । धन जैसे दुर्भाग्याला ॥
अंधार बसे चोंहिकडे गगनांत । गरिबाच्या जेविं मनात ॥
बघ थकुनि कसा निजला हा इहलोक । मम आशा जेविं अनेक ॥
खडबड हे उंदिर करिती ।
कण शोधायातें फिरती ।
परि अंतीं निराश होती ।
लवकरि हेही सोडतील सदनाला । गणगोत जसें आपणाला ॥ ध्रु ॥
बहु दिवसांच्या जुन्या कुडाच्या भिती । कुजुनी त्या भोके पडतीं ॥
त्यामधुनी त्या दाखविती जगताला । दारिद्य आपुलें बाळा ॥
हें वळकीचें जीर्ण मोडकें दार । कर कर कर वाजे फार ॥
हें दुःखानें कण्हुनि कथी लोकाला । दारिद्य आपुलें बाळा ॥
वाहतो फटींतुन वारा ।
सुकवीतो अश्रुधारा ।
तुज नीज म्हणे सुकुमारा ।
हा सूर धरी माझ्या ह्या गीताला । निज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु ॥
जोवरती हें जीर्ण झोपडें अपुलें, । दैवानें नाही पडलें ॥
तोवरती तू झोप घेन जा बाळा, । काळजी पुढें देवाला ॥
तदनतरची करू नको तू चिंता । नारायण तुजला त्राता ॥
दारिद्या चोरिल कोण? ।
आकाशा पाडिल कोण? ।
दिग्वसना फाडिल कोण? ।

त्रैलोक्यपती आता त्राता तुजला, । निज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु ॥
तुज जन्म दिला सार्थक नाहीं केलें । तुज कांहिं न मीं ठेवीलें ॥
तुज कोणि नसे, छाया तुज आकाश । धन दारिद्र्याची रास ॥
या दाहि दिशा वस्त्र तुला सुकुमारा, । गृह निर्जन रानीं थारा ॥
तुज ज्ञान नसे अज्ञानाविण कांहीं ! भिक्षेविण धंदा नाहीं ।
तरि सोडुं नको सत्याला ।
धन अक्षय तेंच जिवाला ।
भावें भज दीनदयाळा ।
मग रक्षिल तो करुणासागर तुजला । निज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु

इ. स. १८९७

## हरी नारायण आपटे

[ इ. स. १८६४–१९१९ ]

### जीवित महिमा

असार जीवित ! केवळ माया ! रडगाणें हें गाउ नका ।
घोई झोपा तो नर मेला, संशय त्याचा धरू नका ॥ ध्रु ॥
वस्तुस्थिति ही असार भासे, परि अंतरिं बहु सार असे ।
जाणुनिया हें निजकर्तव्यें मन लावुनिया करा कसें ॥
मेलों म्हणजे मिळविलि झालि सार्थक, न धरा मनीं असें ।
'माती असशी मातींत मिळशी' आत्म्याला हें लागु नसे ॥
सुखदुःखाचे भोग भोगणें हा मुळिं जीवितहेतु नसे ।
उद्यां आजच्यापेक्षा कांहीं पुढेंचि जाऊं करा असें ॥
अपार विद्या, काळ अल्प हा झरझर वेगा धावतसे ।
शूर छातिचे किती अमाना हळुहळु मृत्यू गाठितसे ॥

अफाट ऐशा विश्वरणागणि जीवितयुद्धचि चालतसे ।
त्यात लढोनी बहु धीरानें नाव गाजवा शूर असे ॥
(चाल) मुकी विचारीं कुणी हाका । अशीं मेंढरें बनू नका ।
गेल्या गोष्टी स्मरू नका । गतकाळाचा शोक फुका ।
पुढचा भासो किती सुखाचा काळ भरवसा धरूं नका ॥ असार जीवित ॥
जाते घडि ही अपुली साधा करा काय तें आता करा ।
चित्तामध्यें धैर्य धरा रे, हरिवरी ठेवा भाव पुरा ॥
थोर महात्मे होउनि गेले चरित्र त्यांचें पहा जरा ।
आपण त्यांच्या समान व्हावें हाच सापडे बोध खरा ॥
जग हें त्यजिता भवसागरिंच्या वाळवटिवर तरी जरा ।
चार पाउलें उमटवु अपुलीं, ठेवु खुणेचा मार्ग बरा ॥
जीवितसागर दुस्तर मोठा त्यातुनि जाण्या पैल तिरा ।
खटपट करितो, गोते खातो, निराश होउनि जाय पुरा ॥
अशा नराच्या दृष्टिस पडता तींच पाउलें जरा जरा ।
कोणि म्हणावें नाहीं म्हणुनि ? येइल त्याला धीर बरा ॥
(चाल) उठा उठा तर, निजू नका । 'होइल कैसें' म्हणू नका ।
कशाहि विघ्ना भिऊ नका । दीर्घोद्योगा सोडु नका ।
'धीर धरी तो गमीर' असें शिका शिका रे विसरु नका ॥ असार जीवित ॥

## विठ्ठल भगवंत लेंभे

[ इ. स. १८५० १९२० ]

### १

### शारत्काल

व्योमीं नाहीं राहिली मेघमाला । धान्योद्यामीं शारत्काल आला ॥
देती वर्गा चित्रवर्ण प्रसूनें । पेला जागां गाजिला शारदेनें ॥ १ ॥

झाल्या फुल्ला वल्लरी सुप्रसन्ना । शाली झाल्या लोंबरांहीं विहीना ॥
सूर्यासंगें अंबरीं नीलकांती । नादें वाहे मंदमंद स्त्रवंती ॥ २ ॥
नेसे साडी शाद्वला श्रीधरित्री । पुष्पें जीतें दे शरत्काल मैत्री ॥
गंधोद्दामा सौरभें वृक्षमाला । भूलोकीं या आणिते नंदनाला ॥ ३ ॥
वेली डोले मंद मंदानिलानें । रेणुस्त्रावें रंगलीं सर्व रानें ॥
पक्षी गाती अंबरीं नाद कोंदे । वायुक्रीडासंगमीं वेणुनादें ॥ ४ ॥
शोभा देती रम्य फुल्लारविंदें । जेथें नादे हंसमाला प्रमोदें ॥
विंबे झाडी पुष्पिताग्रा तरंगीं । ऐशी टाकीं निर्मला जागजागीं ॥ ५ ॥
जाई देई सौरभा मंडपांतीं । शेवंतीचे ताटवे शुभ्रकांती ॥
देती मोदा मालती गंधपूर्णा । शोभे तैशी केतकी गौरवर्णा ॥ ६ ॥
शेतें सारीं हीरवींगार झालीं । ब्रालें क्षेत्रीं रंगलीं टैवशाली ॥
ओढा वाहे छिन्न दर्भांकुरांतीं । जेथें वत्सें चारिती बालमूर्ती ॥ ७ ॥
पक्षी वृक्षीं स्वैर लीलाभरानें । देती मोदा मंजु मंजु स्वनानें ॥
वेणुध्वानें गोधनें लुब्ध झालीं । ज्यांच्या नादीं मंजुगुंजा मिळाली ॥ ८ ॥
आनंदा दे स्वच्छ पाणी नद्यांचें । जाणो चित्त स्वच्छ तें सज्जनाचें ॥
रत्नच्छाया निर्मला वाळवंटीं । येती रम्या सुंदरी कंबुकंठी ॥ ९ ॥
अस्तशृंगीं चालला अंशुमाली । संध्यारागें पश्चिमा रक्त झाली ॥
पूर्वप्रांतीं चंद्रमा लाल झाला । प्रेमानंदीं रंगल्या मेघमाला ॥ १० ॥
रंगे गंगा रक्तबिंबप्रभेनें । विश्वांमाजीं संचरे प्रेम जाणे ॥
प्रेमानंदें गुंगली भृंगमाला । गाणीं गाती मंजुला पौरबाला ॥ ११ ॥
अस्ताद्रीतें सूर्य गेला क्रमानें । देई व्योमीं चंद्रमा पूर्ण ठाणें ॥
सोडोनीयां रक्तदिव्यांबरातें । नेसे भूही पांढऱ्या पातळातें ॥ १२ ॥
झालीं रानें मंदिरें सुप्रसन्नें । नादे मोद श्रीशरच्चंद्रिकेनें ॥
अद्रिशृंगें चंदनें लिप्त झालीं । नाचे मोदें पुष्पहास्या चकोरी ॥ १३ ॥
घालोनीयां मंगला पुष्पमाला । आल्या बाला रासलीलोत्सवाला ॥
प्रेमानंदें श्रीसुहृत्सज्जनांतीं । गाती खेळा सुंदरी मंजुगीतीं ॥ १४ ॥
रम्योद्यानीं कौमुदी हर्षभारें । कारंज्याचे उंच जाती फवारे ॥
स्नेहें फुल्ला मल्लिका पुष्पहास्यें । बोलावी ते पल्लवें नाथ भासे ॥ १५ ॥

आल्हादा दे चंद्रिका संगमें ती । अग्निक्रीडा चित्र दीपोत्सवार्ती ॥
वाटे व्योमीं धूमबाणासवेंची । माला नाचे अंबरीं तारकांची ॥ १६ ॥
धम्मा वाजे इंदिरामंदिराची । व्योमीं जाई घोषणा दुंदुभीची ॥
कर्णां वाजे धीरगंभीर घोष । स्तोत्रें गाती पौर हर्षप्रकर्षें ॥ १७ ॥
झालें विश्व शांत कालक्रमानें । घोरायातें लागलीं घोर रानें ॥
चंद्रासंगें शारदी शर्वरीचे । चालू झाले प्रेमसंगीत साचे ॥ १८ ॥
चंद्र व्योमीं शांत विश्वास पाहे । संगें ज्याच्या तारकापुंज राहे ॥
बिंबग्राही रौप्य शुभ्रा स्रवंती । संगें शोभे चंद्रिका धौतमूर्ती ॥ १९ ॥
निद्रायोगें विश्व तें स्तब्ध झालें । झाडीचें ना एकही पान हालें ॥
हू चू नोहे थांबल्या भृंगलीला । ओढा वाहे एकला तो खळाळा ॥२०॥

* * *

## २

### रमणीस्मरण

अद्यापि ते कुटिल कुंतल नील तीचे । जाणां विलास अवघ्या भ्रमरीकुलाचे ॥
देती अहा सुरुचि या मम मानसात । तें शोभवी धवल कोमल पुष्प ज्यातें ॥ १ ॥
अद्यापि तो वदनसौरभ रंजनाला । दे ज्यास सर्व भ्रमरसंभ्रम गुंजनीला ॥
भाळीं टिळा अरुण कुंकुमकेशराचा । आठव जो प्रणयसंगम मंगलाचा ॥ २ ॥
अद्यापि तें सुमनभूषण वर्ण देहीं । लागानि गाष्टि शिकवी प्रियसंगमाची ॥
अद्यापि हास्य वदनीं नवरत्नकांती । आश्रय दे शुचि मनोरम दंतपंक्ती ॥ ३ ॥
अद्यापि ते श्रुतिमनोहर मंजुवाणी । जी वर्णिती कुशल किन्नरगायकांनीं ॥
जीच्यापुढें परुष ते रव वल्लकीचे । मातें स्मरे अखिल जें स्खल रम्यतेचें ॥ ४ ॥
अद्यापि ते कनकचंपकगौरकाया । माझ्यासमोर दिसते परि हाय वाया ॥
जी शिक्षित रुचिरता नवराजयाची । धन्या अशी भुजल्या हरि सुंदरीची ॥ ५ ॥

अद्यापि ते चपलरम्य विशाल डोळे । ज्याचे कटाक्षशर हाय असह्य झाले ॥
ते भ्रूविलासहि तशा स्मरजन्य लीला । विश्राम दे हृदय एकचि साक्ष
याला ॥ ६ ॥
अद्यापि रम्य सरला निमला सुनासा । आनदवी हृदयमदिर चारुवेषा ॥
दतावली भ्रमुनि दाडिमतेस आली । नासा म्हणोनि जणु ती
शुकचचु झाली ॥ ७ ॥
अद्यापि पुष्पहरिणी हरिणेक्षणेची । लीला मनोरम अशी करपल्लवाची ॥
लोकीं असे कमल वा कर हेंचि शका । यालागिं ती वरि रणत्करकंकणाका ॥ ८ ॥
गेलें भुलोनि मम संचित कर्मयोग । म्या निर्दयें न हृदयीं धरिली वराग ॥
विद्युल्लता चमकुनी चपला घनात । जावी तशी निघुनि जाय अहा वनात॥९॥
माझे प्रताप रणधैर्यहि शौर्य चाले । वेग कटाक्षशरपजरनिद्ध झाले ॥
आता तरी प्रणयबधन या जनाला । दावो स्वयें हृदयमदिर चद्रशाला ॥ १० ॥
सर्वत्र जी प्रियतमा मज दीसताहे । विश्वात ते रुचिर रूप भरोनि राहे ॥
कोठें करी ललितकुज विहारलीला । गुजारवा करि तियें नवभृगमाला ॥ ११ ॥
कोठें शरत्कुसुमसौरभ घेत आहे । कोठें अघोर गिरिनिर्झरवारि पाई ॥
कोठें सुरम्य पुलिनीं कलहसग । खेळे सवे हरिणशावकसानुरागें ॥ १२ ॥
कोठें अशोकतरुच्या अतिशुभ्रपारीं । सागे सखी स्वमनिंची गुजगोष्ट सारी ॥
कोठ पडेचि नलिनीदल रम्य शेजें । अन्या न दु ख समजे विरही जना जें॥१३॥
पाहू कुठें प्रियतमा गिरिनिर्झरानो । सागा जरी बघितली मृगशावकानो ॥
आर्या तुवा बघितलीस मयूरपुना । जी शीकवी तुजसि नर्तन तें पवित्रा॥१४॥

—'आनदकद'मधून

  

# विनायक जनार्दन करंदीकर

[ इ. स. १८७२--१९१९ ]

## १

## नदी आणि कवी

असो कवीचें कुल अप्रसिद्ध । होई कवीच्या कवनें प्रसिद्ध ॥
तसा नदीच्या उगमस्थलाला । नदीमुळें गौरवलाभ झाला ॥ १ ॥
काव्यें कवींचीं जगतात गावीं । त्याचें न त्याच्या परि चोज गावीं ॥
नदी सुदूरस्थ जना पवित्र । विटाळती तीर्थ तिचेच पुत्र ॥ २ ॥
बाल्यात उच्छृंखल वृत्ति दोन्ही । ठावा नसे आडथळा म्हणोनी ॥
लागो दरी खोल उभा पहाड । जातात तीं धावत धाडधाड ॥ ३ ॥
जाई जसें अंतर होत खोल । गांभीर्य ये वृत्ति निवे विलोल ॥
रेखून मार्ग क्रमितात संथ । करीत कल्याण जगीं अनंत ॥ ४ ॥
अभंग त्याच्या हृदयीं तरंग । निःसंग ते त्यात सदैव दंग ॥
गाऊन गाणीं भ्रमतात रानीं । ते धन्य ज्यांच्या पडतात कानीं ॥ ५ ॥
स्वजीवनानें उगवून दाणे । नदी जिवा दे चिरजीवदानें ॥
तैसे कवीच्या कविताप्रवाहें । जीवात संजीवन दिव्य लाहे ॥ ६ ॥
राष्ट्रें बुडालीं नृप थोर गेले । नदी कवी मात्र अनंत ठेले ॥
भागीरथीला खळ लेश नाहीं । अखंड रामायण लोक गाई ॥ ७ ॥
महाकवी थोर नदाप्रमाणें । मी बापडा ओघळ अल्प जाणें ॥
धावें न ओढा खळखळ वाहे । माझी तशी ही गुणगूण आहे ॥ ८ ॥

## २

## देशभक्ताचा अपूर्व सोहळा

देशभक्ता प्रासाद बंदिशाला । शृंखलांच्या गुंफिल्या पुष्पमाळा ।
चिता सिंहासन, शूल राजदंड । मृत्युदैवत दे अमरता उदंड ॥

३

## हतभागिनी

तळहातीं टेकुनी ही स्वशिरातें बैसली ! ॥ ध्रु ॥
मस्तकीं केश विखुरले । श्वास चालले, अश्रु लोटले ।
गळे जल गालीं—चिंतेनें पोळली ! ॥ १ ॥
वस्त्रें तीं अपुरीं जुनीं । तेथ कोठुनी असावा मणी
दीनता त्यालीं—दुःखानें कावली ! २
दारिद्य घरीं जागतें । अन्न काय तें, दिसेना कुठें
वायु जल वाली—गगनाची साउली ३
होती ती सिंहासनीं । भाग्यशालिनी धनी विजयिनी
परी तिज खालीं—दुर्दैवें ओढिली ४
एकाश्रुबिंदुकारणें । तियेच्या रणें, झुजले मनें
असे सुत त्यालीं—जयकालीं माउली ५
कारटीं करटीं तियें । निपजलीं भुतें । मातृशोणितें—
स्वताला लालीं आणाया—धावलीं ! ६
कल्याण काय नेणतीं । नित्य भांडतीं, आपसांत तीं
परा वश झालीं—स्वत्वाला विसरलीं ! ७
गेले दिन यावे कसे । वर्तनें असे, एकदा फसे
गाय जी गाळीं—चेपत ती चालली ! ८

# विनायक दामोदर सावरकर

[ जन्म इ. स. १८८३ ]

## १

## सागरास

ने मजसी ने, परत मातृभूमीला । सागरा प्राण तळमळला ॥ ध्रु ॥
भूमातेच्या चरणतला तुज धूता । मी नित्य पाहिला होता ॥
मज वदलासी अन्य देशिं चल जाऊं । सृष्टिची विविधता पाहू ॥
तइं जननीहृद् विरहशंकितहि झालें । परि तुवा वचन तिज दिधलें ॥
मार्गज्ञ स्वयें मीच पृष्ठिं वाहीन । त्वरित या परत आणीन ॥
विश्वसलों या तव वचनीं ।
जगदनुभव योग बनुनी ।
तव अधिक शक्त उद्धरणीं ।
येईन त्वरें कथुन सोडिलें तिजला । सागरा प्राण तळमळला ॥ १ ॥

शुक पंजरिं वा हरिण शिरावा पाशीं । ही फसगत झाली तैशी ॥
भूविरह कसा सतत साहु यापुढतीं । दशदिशा तमोमय होती ॥
गुणसुमनें मीं वेचियलीं या भावें । कीं तिनें सुगंधा घ्यावें ॥
जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा । हा व्यर्थ भार विद्येचा ॥
ती आम्रवृक्षवत्सलता ।
नवकुसुमयुता त्या सुलता ।
तो बाल गुलाबहि आता ।
फुलबाग मला हाय पारखा झाला । सागरा प्राण तळमळला ॥ २ ॥

नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा । मज भरतभूमिचा तारा ॥
प्रासाद इथें भव्य परी मज भारी । आईची झोपडी प्यारी ॥
तिजवीण नको राज्य, मज प्रिय साचा । वनवास तिच्या जरि वनिंचा ॥

भुलविणें व्यर्थ हे आता ।
बहु जिवलग गमते चित्ता ।
तुज सरित्पते ! जी सरिता ।
तद्विरहाची शपथ घालितों तुजला । सागरा प्राण तळमळला ॥ ३ ॥
या फेनमिषें हससी निर्दया कैसा । का वचन भंगिसी ऐसा ? ॥
त्वत्स्वामित्वा सांप्रत जी मिरवीते । भिउनि का आंग्लभूमीते ? ॥
मम मातेला अबल म्हणुनि फसवीशी । मज विवासनातें देशी ॥
तरि आंग्लभूमिभयभीता ।
अबला न माझिही माता ।
कथिल हें अगस्तिस आता ।
जो आचमनीं एक क्षणीं तुज प्याला । सागरा प्राण तळमळला ॥ ४ ॥

इ. स. १९०९

## २

## माझें मृत्युपत्र

वैशाखिच्या कुमुदनाथ नभात हासे ।
यच्चंद्रिका धवल सौधतटीं विलासे ॥
घाली स्वयें जल जिला प्रिय बाळ लोभें ।
जाई फुले, परिमलें सुमनात शोभे ॥ १ ॥
आले घरीं सकल आप्त सुहृद् जियाचे ।
आनंदमग्न कुल गोकुल काय साचें ॥
आदर्श दीप्ति शुचिता धृति यौवनाचे ।
पाहूनि जें तरुणमंडल, कीर्ति नाचे ॥ २ ॥
प्रेमें हृदें निरगतीं नव यौवनाच्या ।
गंधे सुवासित उदात्त सुसंस्कृतीच्या ॥
दिव्या लतातरुसि जें गृह बाग झाला ।
ज्या पौर हर्षित वदे जन 'धर्मशाला' ॥ ३ ॥

सैंपाक त्वा निजकरें कुशलें कराना ।
*प्रेमे तुझ्या अधिकची सुरसाल व्हावा ॥*
सम्राट सर्व मिळुनी करितां नितांत ।
जेवावयासि असलों जइ चांदण्यांत ॥ ४ ॥

श्रीरामचंद्र-वनवास-कथा रसाला ।
कीं नेनि देश इटली रिपुमुक्त झाला ॥
तानाजिचा समरधीर तसा पवाडा ।
गाता चितोरगड वा शनवारवाडा ॥ ५ ॥

झाली कशी प्रियकरा अपुली अनाथा ।
*दुर्दास्यसिंध शरभिन्न विपन्न माता ॥*
*शोकें भिवचुनि तिच्या जइ मोचनाचे ।*
केले अनंत तरुणा उपदेश साचे ॥ ६ ॥

झाल्या तदा प्रियकरासह आणाभाका, ।
त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हा का ? ।
'बाजी प्रभू ठरु' वदे युवसंघ सर्व ।
'आम्ही चितोर युवती' युवती सुगर्व ॥ ७ ॥

*की घेतलें व्रत न हें अम्हि अधतेनें ।*
लब्धप्रकाश इतिहास निसर्ग मार्ने ॥
जें दिव्य, दाहक म्हणूनि असावयाचें ।
बुद्ध्याचि बाण धरिलें करिं हें सतीचें ॥ ८ ॥

*

ज्या होति तैं प्रियजनासह आणभाका ।
*त्यांते स्मरोनि मग सांप्रत हें विलोका ॥*
नाहीं पुरीं उलटलीं जरि आठ वर्षें ।
तों कार्यसिद्धि इतुकी मन का न हर्षे ? ॥ ९ ॥

आसेतु पर्वत उचंबळला प्रदेश ।
वीराकृती धरित टाकुनि दीनवेष ॥

भक्ताचिया रघुपदीं झुलताति झुडी ।
आज्वल्य होयहि हुताशन यज्ञकुडीं ॥ १० ॥
तो यज्ञ सिद्ध करण्यास्तव उग्र दीक्षा ।
जे घेति घेइ तइ तत्कृतिची परीक्षा ॥
'विश्वाचिया अखिल मगल-धारणाला ।
बोला असे त्याग मध्य हुताशनाला?'॥ ११ ॥
आमत्रण प्रभु रघूत्तम सोडिता हें ।
दिव्यार्थ, देव! अमुचें कुल सज्ज आहे ॥
हे साधि, गर्जुनि असे पहिल्या हवींचा ।
हा ईश्वरीं मिळविला अम्हि मान साचा ॥ १२ ॥
धर्मार्थ देह वदलों ठरलें नितात ।
ते बोल फोल नच जालिश वायफात ॥
ना भगली भिउनिया धृति यातनाना ।
निष्काम कर्मरति योगहि खडिला ना ॥ १३ ॥
त्या होनि ते प्रियजनासह आणाभाका ।
केल्याचि सत्य कृतिनें अजि ह्या विलोका ॥
दीसानलात निजमातृविमोचनार्थ ।
हा स्वार्थ जाळुनि अम्हीं ठरलों कृतार्थ ॥ १४ ॥

*

हे मातृभूमि! तुजला मन वाहियेलें ।
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेलें ॥
तूतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला ।
लेखाप्रती विषय तूंचि अनन्य झाला ॥ १५ ॥
त्वत्स्थडिलीं ढकलिलें प्रिय मित्रसंघा ।
केलें स्वयें दहन यौवन देह भोगा ॥
त्वत्कार्य नैतिक सुसमत सर्व देवा ।
त्वत्सेवनींच गमली रघुवीरसेवा ॥ १६ ॥

त्वत्स्थंडिलीं ढकलिलीं गृहवित्तमत्ता ।
दावानलांत वहिनी नवपुत्रकांता ॥
त्वत्स्थंडिलीं अतुल धैर्य वरिष्ठ बंधु ।
केला हवी परमकारुण पुण्यसिंधु ॥ १७ ॥
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाल झाला ।
त्वत्स्थंडिलीं बघ अता मम देह ठेला ॥
हें काय, बंधु असतों जरि सात आम्ही ।
त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मीं ॥ १८ ॥
संतान या भरतभूमिस तीस कोटी ।
जे मातृभक्ति रत सज्जन धन्य होती ॥
हें आपुलें कुलहि त्यामधि ईश्वरांश ।
निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ॥ १९ ॥

*

कीं तें ठरोहि अथवा न ठरो परंतु ।
हे मातृभू अम्हि असों परिपूर्ण हेतु ॥
दीप्तानलांत निजमातृविमोचनार्थ ।
हा स्वार्थ जाळुनि अम्हीं ठरलों कृतार्थ ॥ २० ॥
ऐसें विचारुनि, अहो वहिनी ! व्रतातें ।
पाळोनि वर्धन करा कुल दिव्यतेतें ॥
श्रीपार्वती तप करी हिमपर्वतीं ती ।
कीं चितघात हसल्या जहु राजपूती ॥ २१ ॥
तें भारतीय अनल्प बल तेज कांहीं ।
अद्यापि या भरतभूमित लुप्त नाहीं ॥
हें सिद्ध होइल असेंचि उदार उग्र ।
वीराग्रणे, तव सुवर्तन हो समग्र ॥ २२ ॥
माझा निरोप तुज येथुनि हाच देवी ।
हा वत्स वत्सल तुझ्या पदिं शीर्ष ठेवी ॥

सप्रेम अर्पण असो प्रणती तुम्हाते ।
आलिंगन प्रियकरा मम अंगनेते ॥ २४ ॥
कीं घेतलें व्रत न हें अमिह अधत्तेनें ।
लब्ध प्रकाश इतिहास निसर्गमार्गें ॥
जें दिव्य, दाहक म्हणूनि असाग्रयाचें ।
बुद्ध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ॥ २५ ॥

इ. स. १९१०

## गोविंद त्र्यंबक दरेकर

[ इ. स. १८७४--१९२६ ]

### मुरली

भारता तार या कालिं कालिं । हरि वाजिव गीता मुरली ॥ ध्रु ॥
नाचून कालियामौलिं मौलि । हरि वाजिव गीता मुरली ॥
परतेचा हल्ला आला । फितुरीचा मारा झाला ।
ऐक्याचा किल्ला पडला । धनराशी चोरी गेला ।
परतंत्र मायभू झालि झालि । हरि वाजिव गीता मुरली ॥ १ ॥
कापण्यगड्ग उपसून । ये गुलामगिरि घारून ।
करी स्वातंत्र्याचा खून । मोदास नेइ पळवून ।
ऐक्याची करुनी होळि होळि । हरि वाजिव गीता मुरली ॥ २ ॥
कलहाचें नाचे भूत । समतेचा झाला अंत ।
पडलेंच ज्ञान नंदींत । हें सत्य खरी आक्रांत ।
न्यायश्री अश्रू ढाळि ढाळि । हरि वाजिव गीता मुरली ॥ ३ ॥
विघ्नाचा वणवा आला । सुगुणाचा मळा जळाला ।
पापाचा सुकाळ झाला । नाजार भ्रांतिचा भरला ।
हृदयाची लज्जा गेलि गेलि । हरि वाजिव गीता मुरली ॥ ४ ॥

जो जाहला प्रिय निरंतर मन्मनाला
ज्याच्यासवें सुरसखा नृप वैभवाला
भोगोनिया चिर करीन विलास-लीला
ऐशी मना सुरवि नित्य विचारमाला २

तो यादवाग्रणि कुठें प्रिय नेमिनाथ !
गेला मला त्यजुनिया विरहानलांत
भाजे मदंग निशि झोंप न अल्प येते
ती रम्य मूर्ति नयनापुढुनी न जाते ! ३

प्रासाद रम्य विभवें कमला-गृहाला
आणी उणेंपण ! उणें नच सेवकाला
स्वर्लोकतुल्य सुरस साधन-वृंद जाग
जेथें प्रियाविण परा गमत स्मशान ! ४

नाना लता विटपयुक्त मनोभिराम
आराम-वास लव दे न मना विराम !
आलाप सांगति जणां, मज कोकिलांचे
"कांताविणें विफल जीवित गायकाचें" ५

जेव्हा शशांक निशिला उन्यास येतो
प्रेमें निज प्रिय सखीस-महीस-देतो
आलिंगना निज करीं मुरा तें तयाचें
पाहूनि मानसि सवेंचि सदैव डाचे ! ६

वाटे सखीजनविनोद मना न गोड
तें आदरें वचन गोड न ज्यास जोड !
तींही अता सुरवितीं नच मानमास
नाहींच औषध जगीं विरहामयास ! ७

इच्छी मि हृदय हें परिरंभणांत
कांता तुझ्या मृदुलश्या करबंधनानें

झालें समुत्सुक तुझ्या मुखदर्शनातें !
मनेत्र, कर्ण वचनामृतसेवनातें ८

सोडोनिया अतुल्शा नृपवैभवास
मातापिता परिजनासह गहृवास
जी भामिनी तुज गणी सुख सर्व तीस
सोडोनि का तुज रुचे तरि शैल्यास ? ९

नाथा, तपे, अनशनं, प्रखरातपानें,
गाग अघोर पतनें, घनवर्षणानें
तैंवि प्रचंड पवनें निशिला हिमानें
हो काय मुक्त वसनें तनुचे न जाणें ? १०

जेव्हा निशीं तम करी निजरूप व्यक्त
घृकध्वनी भयद गोठवि सव रक्त !
एकाकि घोर वनि हिंस्र पशु सभांत
तूतें स्मरानि मन हें करपोनि जातें ! ११

वा एकनिष्ठदयितानयनाश्रुपातें
येई न का द्रव तुझ्या ल्न मानसातें ?
हा हत ! मन्मथशगनल्ततनाया
जाया गमे उचित का ? तुजही (ही)त्यजाया १२

हें भारभूत मम जीवित होय पाहीं !
नाहीं जरी सुखद या जगतात कांहीं
तन्मूर्ति जी वसविली मम शुद्ध देहीं
काढी न तू चिर जरी नतशी विदेहीं ! १८

इ. स १९१८ — काव्यरत्नावलि

## नारायण वामन टिळक

[इ. स. १८६१-१९१९]

### १

### केवढें हे क्रौर्य !

क्षणोक्षणिं पडे, उठे परि बळें, उडे बापडी ।
चुके पथहि येउनी स्तिमित दृष्टिला झापडी ॥
किती घळघळा गळे रुधिर कोमलांगातुनी ।
तशीच निजकोटरा परत पातली पक्षिणी ॥ १ ॥
म्हणे निजशिशूंप्रती 'अधिक बोलवेना मला ।
तुम्हांस अजि अंतिचा कवळ एक मी आणिला ॥
करा मधुर हा ! चला ! भरवितें तुम्हां एकदा ।
करो जतन यापुढें प्रभु पिता अनाथां सदा ॥ २ ॥
अहा ! मधुर गाउनी रमविलें सकाळीं जनां ।
कृतघ्न मज मारितील नच ही मनीं कल्पना ॥
तुम्हांस्तव मुखीं सुखें धरुनि घास झाडावरी ।
क्षणैक बसलें न तों, शिरत बाण माझ्या उरीं ॥ ३ ॥
निघून नरजातिला रमविण्यात गेलें वय ।
म्हणून वधिलें मला ! किति दया ! कसा हा नय ! ॥

उदार बहु शूर हा नर खरोखरा जाहला ।
वधून मज पाखरा निरपराध कीं दुर्बला ! ॥ ४ ॥
म्हणाल भुलली जगा, विसरली प्रिया लेकरा, ।
म्हणून अतिसकटें उडत-पातलें मी धरा ॥
नसे लवहि उष्णता नच कुशींत माझ्या शिरा ।
स्मरा मजबरोबरी परि दयाघना ईश्वरा ॥ ५ ॥
असो रुधिर वाहुनी नच भिजो सुशय्या तरी ।
म्हणून तरुच्या तळीं निजलि ती द्विजा भूवरी ॥
जिवत बहु बोलकें निति सुरम्य ते उत्पल ।
नरें धरुनि नाशिलें, रचित थोर बुद्धी, नल ॥ ६ ॥
मातींत ते पसरले अति रम्य पख ।
पेलें वरी उदर पाडुर निष्कलक ॥
चचू तशीच उघडी, पद लाबवीले ।
निष्प्राण देह पडला, श्रमही निमाले ! ॥ ७ ॥

इ स १९०१ — काव्यरत्नावली

२

पाखरा ! येशिल का परतून ?

# लक्ष्मीबाई टिळक

[ इ. स. १८६८-१९३६ ]

## १

मी तुझी मावशी तुला न्यावया आलें

ही भरली घागर तुझ्या शिरावर बाळे! तूं उभी, लागले कुठें कुठें तव डोळे!॥
ही गाडी वाजे खडखड खडखड दूर। हे इकडे उडतें धडधड तवही ऊर!॥
तूं प्रसन्न आतां क्षणें खिन्न तूं होशी। मेघांत गवसला चंद्रच दुसरा दिसशी!॥
तूं अल्लड-साधी पोर! लाडके।
गुरुजनें कल्पिली थोर! लाडके।
तुज कशास हा संसार! लाडके।
हा दोन दिवस तरि टळो म्हणोनी झालें। मन अधीर, गेलें माहेरा तव गेलें॥
माहेरीं आपण भाउबिजेला जाऊं। येतील न्यावया बाबा अथवा भाऊ॥
हें प्रौढपणाचें ओझें फेकुनि देऊं। मुक्तील तेवढे खेळ खेळुनी घेऊं!॥
ही मनात तुझिया बाई! वासना,।
मी ओळखिलें का नाहीं? सांग ना!।
भर येई पुन्हां अश्रूंहीं! लोचनां।
ये हांसत आतां आलिंगी मज बाळे। मी तुझी मावशी तुला न्यावया आलें।

इ. स. १९१२ — मनोरंजन

## २

वसंत

हा असा धरोनी तुला चुंबितें बाळा! गुदगुल्या करीतें! वसंत म्हणती याला!॥
हा असा हंसुनि, तूं असा निसटुनी जासी! परि पुन्हां बिलगसी! वसंत म्हणती यासी॥
हा असा तुझा रे करचरणांचा चाळा। हा पाहुनि म्हणतो वसंत करितो खेळा!॥

तुजसवें वनीं फुलवेली–पाखरें ।
सृष्टिचीं मजेमधिं आली लेकरें ।
सारेंच जसे या काली–नाचरें ।
तू नाच, नाच रे, नाच! धरीतें ताला । बघ वसंतरागीं वसत करि गानाला ! ॥
तू ये ये म्हणता मीही धावुनि येतें! मग आपण करितो किती तरी मौजातें!
ही तशीच अपुल्या सृष्टिमाय बाळातें। रमविते, खेळते! वसंत म्हणती त्यातें!॥
ही मजा मायलेकाची–चालते ! ।
पाहुनी वृत्ति विश्वाची–डोलते ! ।
स्वर्णदी हर्षसौख्याची–धावते ।
या पृथ्वीवर ये नवेपणा उदयाला । तुज कळेल पुढतीं वसंत म्हणती याला ॥

## एकनाथ पांडुरंग रेंदाळकर

[ इ स. १८८७–१९२० ]

### १

### प्रवोधन

अजुनि किती निजसी । सुंदरा । अजुनि किती निजसी ! ।
ही प्रभात झाली तरी पुरेशी होय न झाप कशी ? ॥
मधुरजनी सरली । गडे ही । मधुरजनी सरली ।
दशदिशा फाकल्या, प्रकाशलहरी विश्वामधिं भरली ! ॥
नक्षत्रें लपलीं । अवरीं । नक्षत्र लपलीं ।
हे गुलाब हसले उपवनिं कमळें सरोवरीं फुलली ! ॥
हा प्रभातवायू मंद सुशीतल वाहे ! ।
चहुकडे उपेचें हास्य भरुनिया राहे ! ।
ऊठ नेत्र उघडी । सुंदरा । ऊठ नेत्र उघडी ।
शुभशांतिरसाची चिरमंगलमय आहे हीच घडी ! ॥

वाट तुझी बघती । सर्वही । वाट तुझी बघती ॥
तुज उठवायाला तिकडे रानीं ओढे खळखळती! ॥
प्रकाश हा गगनीं । पातला । प्रकाश हा गगनीं ।
तुजसाठीं आहे अरुण थांबला पहा तरी अजुनी! ॥
तुजसाठीं भरलीं । नभीं हीं । तुजसाठीं भरलीं ।
खगगीतें मंजुळ मधुर स्वर्गामधुनी पाझरलीं ॥
हा ओघ तुंबला मम हृदयीं प्रेमाचा ।
हा हार गुंफिला नयनिं अश्रुमुक्तांचा ।
वाहिन तव चरणीं । आदरें । वाहिन तव चरणीं ।
तव दृष्टिसंगमें होइल पावन नाथा! ही धरणी! ॥
व्योमास्तव रवि हा । निर्मिला । व्योमास्तव रवि हा ।
रविसाठीं आहे व्योमहि उत्सुक अनंत काल पहा! ॥
कमल असे सुजिलें । सरास्तव । कमल असे सुजिलें ।
हें सरही कमलासाठीं दिसतें उतावीळ कसलें! ॥
तरुसाठीं वेल । उगवली । तरुसाठीं वेल! ।
हा पसरुनि बाहू प्रेमें तरुही तिज आलिंगील! ॥
सौंदर्य तसें तव माझ्या दृष्टीसाठीं ।
ही प्रीतिवाहिनी माझी ही तुजसाठीं ।
अजुनि न कां उठसी? । सांग मज । अजुनि न कां उठसी? ।
ही प्रभात झाली तरी पुरेशी होय न झोंप कशी? ॥

## २

### अजुनि चालतोंचि वाट

अजुनि चालतोंचि वाट माळ हा सरेना!
विश्रांतिस्थळ केव्हां यायचें कळेना! ॥ १ ॥
त्राण न देहांत लेश, पाय टाकवेना ।
गरगर शिर फिरत अजी होय पुरी दैना! ॥ २ ॥

सुपकर सदेश अमित पोंचविले कोणा ।
भार वाहुनी परार्थ जाहला दिवाणा ! ॥ ३ ॥
काऱ्यावरि घातलाचि जीव तयासाठीं ।
इसवाया या केली किति आगाआटी ! ॥ ४ ॥
हेंच त्यास माझें घर म्हणुनि शीण केला ।
उमगुनि मग चूक किती अश्रुसेक झाला ! ॥ ५ ॥
दिन गले मास तसे वत्सरेंहि गळी ।
निकट वाटते जीवनसंध्या ही आली ! ॥ ६ ॥
कुठुनि निघाला काठ जायचें न ठावें ।
मार्गीतच काय सकल आयु सरुनि जावें ! ॥ ७ ॥
काय निरुद्देश सब जीवन मम होतें ।
मरुसरितेपरि अवचित झरुनि जायचें तें ॥ ८ ॥
पुरे पुरे ही असली मुशाफरी आता।
या धूळत दगडावर टेकलाच माथा ॥ ९ ॥

## चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे

[ इ स १८७१-१९३७ ]

### १

### सोमनाथाच्या वास्तुपुरुषाचे दर्शन

ऐकोनि एशा मम भाषणातें । तो बोल्ला वास्तुपुरुष मातें ॥
घुमे तयाचा स्व मंदिरात । पचाननाचा जणु गव्हरात ॥ १ ॥
हे आयवशीय सुता नवीना । कालागराच्या रमणाय फना ॥
आली अशी ने कुदशा मला हे । हेतू तिचा केवळ तोच आहे ॥ २ ॥
जा काननातील वसंतशोभा । नाशोनि दे त्यास हिम विशोभा ॥
जा चंडमार्तंड कराभिघातं । दे दैन्य निर्तोग महानघातं ॥ ३ ॥

पडला गे पडला तो वीर रणीं धूलिमाजि पडलाहे ।
कज्जलमिश्रित अश्रू हीच तया तू तिलांजली वाहे ॥ ४ ॥
विद्युत्प्राय सभोंतीं चमकत असता सुतीव्र तरवारी ।
त्यातुनि अचल उभा तो, पर्वतगर्व स्वनिश्चयें हारी ॥ ५ ॥
जे संग्रामधुरंधर रिपुसंहारार्थ करिति घोर रण ।
त्या वीरातें यावें, तैसें सन्मान्य यास ये मरण ॥ ६ ॥
तद्देश केशरी तो, झालाहे चिंवट मेणकापडसा ।
चढुनि पुटें रुधिराचीं नुमजे होता तयास रंग कसा ॥ ७ ॥
जेथें देह तयाचा गळला, तेथं तयास तुडवोनी ।
राऊत बहुत पडले, शतावधी अरिशिरास उडवोनी ॥ ८ ॥
अपुल्या प्रिय देशास्तव वीर जसा पाहिजे रणीं लढला ।
लढला तसाच तोही, पाडुनि शतशों रिपू स्वयें पडला ॥ ९ ॥
गृध्रादिक आकाशीं घिरट्या जे घालिती प्रभातीं ते ।
त्वत्प्रियजनदेहावरि करितिल उदईक मेजवानीतें ॥ १० ॥
हे वीरवल्लभे तू सतत करिशील शोक बहु ज्याचा ।
कवि गातील तयाचा महिमा तत्प्राणहारि समरांचा ॥ ११ ॥

## राम गणेश गडकरी ( गोविंदाग्रज )

[ इ स १८८५–१९१९ ]

१

### एकाचा नशीन

कोठीं गोड फुलें सदा विहरती स्वर्गांगनांच्या शिरीं ।
कोठीं टेंविलसे कुणी रसिकही स्वच्छंद हृन्मंदिरीं ॥

मग हृदय बधिरची झालें। अति दुःख धिजवि चित्ताला
तें तिच्या जिवाचें फूल ! । मांडीवर होत मद्दूल ! । तरि शोकें पडुनी भूल,
वास्तवची होतें तिजला। 'राजहंस माझा निजला' ॥ २ ॥
जन चार भोंवतीं जमले। मृत बाळा उचलायाला
तों काळ नाथनिधनाचा। हृतभागि मना आठवला
तो प्रसंग पहिला तसला। हा दुसरा आतां असला!
तें चित्र दिसें चित्ताला!। हें चित्र दिसें डोळ्यांला!। निजचित्र चित्तनयनांला,
मग रडुनि वदे ती सकलां। 'राजहंस माझा निजला!' ॥ ३ ॥
करुं नका गलबला अगदीं। लागली झोंप मम बाळा
आधींच झोंप त्या नाहीं। खेळाचा एकच चाळा
जागतांच वाऱ्यासरसा। खेळाचा घेइल आळा
वाजवूं नका पाऊल। लागेल तया चाहूल। झोंपेचा हलका फूल।
मग झोंपायाचा कुठला। राजहंस माझा निजला! ॥ ४ ॥
हें दूध जरासा प्याला। आतांसा कोठें निजला!
डोळ्याला लागे डोळा। कां तोंच भोंवतीं जमलां?
जा! नका उठवूं वेल्हाळा। मी ओळखतें हो सकलां

मी मुका असा घेताना । हा पहा पुन्हा हंसला ना ? । का असा फिरविता माना ?
सुरा खुपे काय डोळ्याला ? । राजहंस माझा निजला ! ॥१३॥
हें सर्वस्वाचें फूल । त्यावरती झाला गोळा
मी बनतें-कधिंचा आहे । त्यावरती तुमचा डोळा
एकदा करावा त्याचा । वादानें चोळामोळा
सर्वांच्या मनिंचा लाहो । हाच ना ? स्पष्ट बोला हो । मी इतकी वेडी का हो-
कीं हेंहि कळेना मजला । राजहंस माझा निजला ! ॥ १४ ॥
जरि होउ नये तें झालें । तरि सोडणार या नाहीं !
पाळणाहि रुततो ज्याला । प्रेमें जरि निजवी आई !
तो देह राच दगडात । छेः नको नको ग बाई !
हृदयाची राणुनी खाच । शान्ति मी बाळ असाच । दुःखाचे फत्तर साच !
जा ! जाउनि सागा काळा । 'राजहंस माझा निजला' ॥ १५ ॥
जरि काळाचाही काळ । बाळाला न्याया आला !
तरि नाहीं मी द्यायाची । या जीवाच्या जीवाला !
सारखीं गाउनी गाणीं । निजवीन कल्पवर याला !
जा ! करा आपुले काळें । माझेही दमले डोळे ! । प्राणाचें पसरुनि जाळें-।
मी निजतें घेउनि याला । राजहंस माझा निजला ! ' ॥ १६ ॥

* * *

सागुनी असे सकलाशीं । मृत बाळ उराशीं धरुनी
तन्मुखीं स्वमुख ठेवोनी । चुंबिलें एकदा फिरुनी
पाहिलें नीट निरखोनी । झणिं तीही गली निजुनी ।
मग पुन्हा कधीं ती उठली । जाणीव कुणा ही कुठली । परि मति या प्रश्नें हटली-
बोलेल कोण या बोला । 'राजहंस माझा निजला ! ' ॥ १७ ॥
मग मातापुत्रावरि त्या । तरु गाळिति कोमल पानें
दाळिती लता निजसुमनें । पशुपक्षिहि रडती गानें
दशदिशा दगडही फुटती । मग दुभगुनी शोकानें
दुमदुमते स्थळ तें अजुनी । त्या एकच करुणागानीं । जा जाउनि ऐका कानीं !
ऐकाल याच बोलाला-। ' राजहंस माझा निजला ! ' ॥ १८ ॥

४

## स्मृतिगीत

आठवतो का सांग सखे ! तो काळ विवाहाचा ।
बाळपणाचा, मुग्धपणाचा, निर्मळ भावाचा ॥ १ ॥
संसाराचें चित्र चिमुकलें, चिमकुलेंच जीव ।
फुललें नव्हतें हृदयाचेंही राजस राजीव ! ॥ २ ॥
पाहत होते तात तदा त्या लीला बाळांच्या ।
जणुं आठवती त्यासहि लीला त्याच सुकाळाच्या ॥ ३ ॥
जपति परोपरि प्रसन्नहृदया पुण्यमया माता ।
गेले ते दिन, सीते, यापरि, हा ! बघतां बघतां ! ॥ ४ ॥
बाळपणींचे प्रसंग जणुं ते घडति आज फिरुनी ।
चित्रपटा या अश्रुजलानें चल टाकूं धुवुनी ! ॥ ५ ॥
तूं सीता ती, राम तोच मी, त्याच आज माता ।
परि जे गेले दिन ते आता येतिल का हाता ? ॥ ६
कशास आशा नसती आतां–झालें तें गेलें ।
सुकलें फूल न वास देत जरि अश्रूंनीं भिजलें ॥ ७ ॥

— 'प्रेमसंन्यास' नाटकामधून

४

## स्मृतिगीत

आठवतो का सांग सखे ! तो काळ विवाहाचा ।
बाळपणाचा, मुग्धपणाचा, निर्मळ भावाचा ।। १ ।।
संसाराचें चित्र चिमुकलें, चिमकुलेंच जीव ।
फुललें नव्हते हृदयाचेंही राजस राजीव ! ।। २ ।।
पाहत होते तात तदा त्या लीला बाळांच्या ।
जणु आठवती त्यासहि लीला त्याच सुकाळाच्या ।। ३ ।।
जपति परोपरि प्रसन्नहृदया पुण्यमया माता ।
गेले ते दिन, सीते, यापरि, हा ! बघता बघता ! ।। ४ ।।
बाल्यपर्णीचे प्रसंग जणु ते घडति आज फिरुनी ।
चित्रपटा या अश्रुजलानें चल टाकू धुवुनी ! ।। ५ ।।
तू सीता ती, राम तोच मी, त्याच आज माता ।
परि जे गेले दिन ते आतां येतिल का हातां ? ।। ६

४

## स्मृतिगीत

आठवतो का सांग सखे ! तो काळ विवाहाचा ।
बाळपणाचा, मुग्धपणाचा, निर्मळ भावाचा ॥ १ ॥
संसाराचें चित्र चिमुकलें, चिमुकलेंच जीव ।
फुललें नव्हतें हृदयाचेंही राजस राजीव ! ॥ २ ॥
पाहत होते तात तदा त्या लीला बाळाच्या ।
जणु आठवती त्यासहि लीला त्याच सुकाळाच्या ॥ ३ ॥
जपति परोपरि प्रसन्नहृदया पुण्यमया माता ।
गेले ते दिन, सीते, यापरि, हा ! बघता बघता ! ॥ ४ ॥
*बाल्पणींचे प्रसंग जणु ते घडति आज फिरुनी ।*
*चित्रपटा या अश्रुजलानें चल टाकू धुवुनी ! ॥ ५ ॥*
तू सीता ती, राम तोच मी, त्याच आज माता ।
परि जे गेले दिन ते आता येतिल का हातां ? ॥ ६
कशास आशा नसती आता–झालें तें गेलें ।
सुकलें फूल न वास देत जरि अश्रूंनीं भिजलें ॥ ७ ॥
— *'प्रेमसंन्यास' नाटकांत*

५

## महाराष्ट्रगीत

मंगल देशा ! पवित्र देशा ! महाराष्ट्र देशा ।
प्रणाम घ्यावा माझा हा श्री महाराष्ट्र देशा ॥ ध्रु ॥
राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा ।
नाजुक देशा, कोमल देशा, फुलांच्याहि देशा ॥
अंजन कांचन करवंदीच्या काटेरी देशा ।
बकुल फुलांच्या प्राजक्तीच्या दळदारी देशा ॥

भीमथडींहुनि चहुमुलखांवर फिरले धारकरी।
भीमथडीवर चहुमुलखांतुनि जमले वारकरी॥
आळंदीच्या ज्ञानोबाची भिंत घेत धाव।
पुंडलिकाचें नाव चालवी दगडाची नाव॥
बोल्हुमट धुमवीत सारखी नवलाची भाक।
जेजूरीवर चढी पायरी उभी नऊ लाख॥ १०॥

(अपूर्ण)

## त्र्यंबक बापूजी ठोमरे (बालकवि)

[इ. स. १८९०–१९१८]

### १

### मेघाचा कापूस

फिकट निळीनें रंगविलेला कापुस मेघाचा।
वरुनि कुणी गुलजार फिरवला हात कुसुम्याचा॥
त्यातहि हसली मदपणें ती चंद्रकला राणी।
कडेकडेच्या मेघावर ये मोत्याचें पाणी॥ १॥
इंद्रनिलाचा रंग बहरवी गिरिच्या अंगाला।
मधुन जलाची शुभ्र शोभते ती मोहनमाला॥
चौबाजूला थाट दाटला हा हिरवळीचा।
सृष्टिसतीनें साज घेतला पाउसकाळीचा॥ २॥
यशस्विनी सौभाग्यदेवता माता जगताची।
त्या अंबेची घटस्थापना आज करायाची॥
घोर घनघटा भूलिंगाला प्रक्षाळुनि गेला।

(अपूर्ण)

आणि मराठी भाला घेई टक्सन कगाल।
तिकडे इस्तंबूल थरारे, इकडे बंगाल ॥ ५ ॥
रायगडावर माय जिवाची गवळण निनघोक।
झोंक हिरकणी नाव ठेवुनी जाइ रोखठोक ॥
करीत पावन अर्पुनि पंचप्राणाचा पिंड।
हिरडस मावळचा श्रीबाजी, ती पावनखिंड ॥
करी रायगड रायरिचा तो जिजाइचा तान्हा।
करी सिंहगड कोंडाण्याचा मालुसरा तान्हा ॥ ६ ॥
रसवतीच्या पहिल्या शाळा, मुकुंद राजाला।
पहिलावहिला अष्टागानीं, प्रणाम हा त्याला ॥
शहर पुण्याच्या, शिवनेरीच्या, पंढरिच्या देशा।
पुंडलिकाच्या, शिवरायाच्या, निळकंच्या देशा ॥
अनंत कोटी ग्रंथ रचुनिया जोडि तुझ्या नामा।
वाल्मीकीचे शतकोटी यश विष्णुदास नामा ॥ ७ ॥
मयूर कविच्या पूर्ण यमकमय महाराष्ट्र देशा।
कवि कृष्णाच्या निर्यमका हे महाराष्ट्र देशा ॥
देवी ज्ञानेश्वरी करि जिथ भक्तीचा खेळ।
तिथेंच गीतारहस्य रचनी बुद्धीचा मेळ ॥
जिथें रात्रीं साधीभोळीं जनाइचीं गाणीं।
तिथंच खेळे श्रीपादाची करामती वाणी ॥ ८ ॥
निकारयाला अमोल असलीं अभंगमय वाणी।
करी तुझी बाजारपेठ तो देहूचा वाणी ॥
तुला जागवी ऐन पहाटे गवळी गोपाळ।
धार दुधाची काढित काढित होनाजी बाळ ॥
मर्दानी दुष्काळा प्याला तुझा भरवसी।
उभा टाकला सगनभाउ हा शाहुनगरवासी ॥ ९ ॥
प्रभाकराची उडत घडत कडकडित महगाणी।
दो हाताचा मुजरा माझ्या तुळशीरामाला ॥

भीमथडीहुनि चहुमुलुखावर फिरले धारकरी।
भीमथडीवर चहुमुलुखातुनि जमले वारकरी॥
आळंदीच्या ज्ञानोबाची भिंत घेत धाव।
पुंडलिकाचें नाव चालवी दगडाची नाव॥
चौलघुमट घुमवीत सारखी नवलाची भाक।
जेजूरीवर चढी पायरी उभी नऊ लाख॥ १०॥

(अपूर्ण)

## त्र्यंबक बापूजी ठोमरे (बालकवि)

[इ स १८९०–१९१८]

### १

### मेघाचा कापूस

फिक्या निळीनें रंगविलेला कापुस मेघाचा।
वरुनि कुणी गुलजार फिरवला हात कुसुम्याचा॥
त्यातहि हसली मदपणें ती चंद्रकला राणी।
कडेकडेच्या मेघावर ये मोत्याचें पाणी॥ १॥
इंद्रनिलाचा रंग बहरवी गिरिंच्या अंगाला।
मधुन जलाची शुभ्र शोभते ती मोहनमाला॥
वैराजूला थाट दाटला हा हिरवळीचा।
सृष्टिसतीनें साज घेतला पाउसकाळीचा॥ २॥
यशस्विनी सौभाग्यदेवता माता जगताची।
त्या अंबेची घटस्थापना आज करायाची॥
घोर घनघन भूलिंगाला प्रक्षाळुनि गेला।

(अपूर्ण)

२

## मोहिनी ( ताराराणी )

या शुभ्र विरल अभ्राचे । शशिभवतीं नर्तन चाले
गंभीर धवळली रजनी । बेभान पवनही डोले
तंद्रींतच अर्धीमुर्धी । लुकलुकते ताराराणी
ये झुळुमुळु तेजानें । पूर्नेवर पिवळे पाणी
निष्पंद मंद घटिका ती । अधुक्ता धुंद भरीत
ब्रह्मांड मंदिरीं गाई । सौभाग्य सुभग संगीत ॥ १ ॥
निद्रिस्त नील वनमाला । निद्रिस्त सरोवर खालीं
वर मूक मोहनें जैशीं । शशिकिरणें निथळलेलीं
इवलाच अधर हलवून । जल मंद सोडितें श्वास
इवलाच वेल स्पंदून । ये नीज पुन्हा पवनास
निश्चित शांतिदेवींचा । किंचितसा अंचल हाले

पायांत रुप्याचा तोडा । ये थबकत थोडा थोडा
युवराज विजयसिंहाचा । झाडींतुनि पिवळा घोडा
शिरपेंच शिरावर साजे । पाठीवर लटके ढाल
रूदार झगा जरतार । अंगावर हिरवी शाल
उतरून विलासी वीर । चुंबुनि ती मोहनमाला
जणु रम्य हृदय रमणीचें । हलुवार धरी हृदयाला
उतरून वारुवरतून । सरदार शिपाई आले
हलुवार हृदय रमणीचें । हृदयाशीं संगत झालें

(अपूर्ण)

## ३

### श्रावणमास

श्रावणमासीं हर्ष मानसीं, हिरवळ दाटे चोहिंकडे ।
क्षणांत येतें सरसर शिरवें, क्षणांत फिरुनी ऊन पडे ! ॥ १ ॥
वरती बघतां इंद्रधनूचा गोफ दुहेरी विणलासे ।
मंगल तोरण काय बांधिलें नभोमंडपीं कुणि भासे ! ॥ २ ॥
झालासा सूर्यास्त वाटतो, सांज अहाहा ! तों उघडे, ।
तरुशिखरावर, उंच घरांवर पिवळें पिवळें ऊन पडे ! ॥ ३ ॥
उठती वरती जलदांवरतीं अनंत संध्याराग पहा ।
सर्व नभावर होय रेखिलें सुंदरतेचें रूप महा ! ॥ ४ ॥
बलाकमाला उडतां भासे कल्पसुमांची माळचि ते ।
उतरुनि येती अवनीवरती ग्रहगोलचि कीं एकमतें ! ॥ ५ ॥
फडफड करुनी भिजलें अपुलें पंख पांखरें सांवरिती ।
सुंदर हरिणी हिरव्या कुरणीं निजबाळांसह बागडती ॥ ६ ॥
खिल्लारें हीं चरती रानीं, गोपहि गाणीं गात फिरे ।
मंजुळ पावा गाय तयांचा श्रावणमहिना एकसुरें ! ॥ ७ ॥

सुवर्णचंपक फुलला विपिनीं, रम्य केवडा दरवळला ।
पारिजातही बघता भामा, रोष मनीचा मावळला ! ॥ ८ ॥
सुंदर परडी घेउनि हातीं पुरोपकंठीं शुद्धमती ।
सुंदर बाला या फुलमाला, रम्य फुलें पत्री खुडती ॥ ९ ॥
देवदर्शना निघती ललना, हर्ष माइना हृदयात ।
वदनी त्यांच्या वाचुनि घ्यावें श्रावण महिन्याचें गीत ॥ १० ॥

४

## फुलराणी

हिरवे हिरवे गार गालिचे । हरित तृणाच्या मखमालीचे
त्या सुंदर मखमालीवरती । फुलराणी ती खेळत होती
गोड निळ्या वातावरणात । अव्याज मनें हातीं डोलत
प्रणयचचला त्या भूलीला । अवगत नव्हत्या कुमारिकेला !
आईच्या मांडीवर बसुनी । झोके घ्यावे, गावीं गाणीं,
याहुनि ठावें काय तियेला । साध्या भोळ्या फुलराणीला ! ॥ १ ॥
पुरा विनोदी सध्यावात । डोलडोलवी हिरवें शेत
तोंच एकदा हासत आला । चुंबुन म्हणे फुलराणीला
'छानी माझी सोनुकली ती । कुणीकडे ग पाहत होती ?
कोण बरें त्या संध्येतून । हळुच पाहतें डोकावून ?
तो रविकर का गोजिरवाणा । आवडला अमुच्या राणींना ?'
लाजलाजली या वचनानीं । साधी भोळी ती फुलराणी ॥ २ ॥
आंदोली संध्येच्या बसुनी । झोके झोंक घेते रजनी,
त्या रजनीचे नेत्र विलोल । नभीं चमकती ते ग्रहगोल !
जादूटोणा त्यानीं केला । चैन पडेना फुलराणीला,
निजलीं शेतें, निजलें रान । निजले प्राणी थोर लहान
अजून जागी फुलराणी ही । आज कशी ताळ्यावर नाहीं ?
लागेना डोळ्यासी डोळा । काय जाहलें फुलराणीला ? ॥ ३ ॥

या कुंजांतुन त्या कुंजांतुन । इवल्याशा या दिवल्या लावुन,
मध्यरात्रिच्या निवांत समयीं । खेळ खेळते वनदेवी ही
त्या देवीला ओव्या सुंदर । निर्झर गातो, त्या तालावर
झुलुनि राहिलें सगळें रान । स्वप्नसंगमीं दंग होउन !
प्रणयचिंतनीं विलीनवृत्ति । कुमारिका ही डोलत होती
डुलतां डुलतां गुंग होउनी । स्वप्नें पाही मग फुलराणी ॥ ४ ॥
कुणी कुणाला आकाशांत । प्रणयगायनें होते गात
हळुंच मागुनी आलें कोण । कुणी कुणा दे चुंबनदान !
प्रणय-खेळ हे पाहुनि चित्तीं । विरहार्त फुलराणी होती !
तों व्योमींच्या प्रेमदेवता । वाऱ्यावरतीं फिरतां फिरतां
हळूच आल्या उतरुन खालीं । फुलराणीसह करण्या केली,
परस्परांना खुणवुनि नयनीं । त्या वदल्या ही असुची राणी ! ॥ ५ ॥
स्वर्भूमीचा जुळवित हात । नाचनाचतो प्रभात-वात
खेळुनि दमल्या त्या ग्रहमाला । हळुहळु लागति लपावयाला
आकाशींची गंभीर शांती । मंदमंद ये अवनीवरतीं
विरूं लागलें संशयजाल । संपत ये विरहाचा काल
शुभ्र धुक्याचें वस्त्र लेवुनी । हर्षनिर्भरा नटली अवनी
स्वप्नसंगमीं रंगत होती । तरीहि अजुनी फुलराणी ती ! ॥ ६ ॥
तेजोमय नव मंडप केला । लख्ख पाचरा दहा दिशाला
जिकडे तिकडे उधळित मोतीं । दिव्य वऱ्हाडी गगनीं येती
लाल सुवर्णी झगे घालुनी । हासत हासत आले कोणी;
कुणी बांधिला गुलाबि फेटा । झकमकणारा सुंदर मोठा !
आकाशीं चंडोल चालला । हा वाङ्निश्चय करावयाला !
हें थाटाचें लग्न कुणाचें । साध्या भोळ्या फुलराणीचें ! ॥ ७ ॥
गाउं लागले मंगलपाठ । सृष्टीचे गाणारे भाट,
वाजवि सनई मारुतराणा । कोकिळ घे तानावर ताना !
नाचुं लागले भारद्वाज । वाजविती निर्झर पखवाज,
नवरदेव सोनेरी रविकर । नवरी ही फुलराणी सुंदर !

लग्न लागतें! सावध सारे! । सावध पक्षी! सावध वारे!
देवमय हा अंतःपट फिटला । भेटे रविकर फुलराणीला! ॥ ८ ॥
वधूवराना दिव्य रवांनी । कुणी गाइली मंगल गाणीं,
त्यात कुणीसें गुंफित होतें । परस्परांचें, प्रेम! अहा तें!
आणिक तेथिल वनदेवीही । दिव्य आपुल्या उच्छ्वासाही
लिहीन होत्या वातावरणीं । फुलराणीची गोड कहाणी!
गुणगुणत कवि त्या ठायीं । स्फूर्तीसह विहराया जाई
त्यानें तर अभिषेकच केला । नवगीतानीं फुलराणीला! ॥ ९ ॥

## ५

## तूं तर चाफेकळी

गर्द सभोतीं रान साजणी तूं तर चाफेकळी!।
काय हरविलें सांग शोधिसी या यमुनेच्या जळीं? ॥ १ ॥
ती वनमाला म्हणे 'नृपाळा, हें तर माझें घर।
पाहत बसतें मी तर् येथे जललहरी सुंदर ॥ २ ॥
हरिणी माझी तिला आवडे फारच माझा गळा।
मैना माझी गोड बोलते, तिजला माझा लळा ॥ ३ ॥
घेउन हातीं गोड तिला त्या कुरणावरनीं फिरे।
भाऊ माझा, मंजुळगाणें गाणें न कधीं विरे' ॥ ४ ॥
'रानीचें वनदेव पाहुनी भुलतिल रमणी तुला।
तूं वनराणी, दिसे न भुवनीं तुझिया रूपा तुला ॥ ५ ॥
तव अधरावर मंजुळ गाणीं ठसलीं कसलीं तरी।
तव नयनीं या प्रेमदेवता धार विखारी भरी! ॥ ६ ॥
क्रीडांगण जणु चंचल सुंदर भाल तुझें हें गडे।
भुरु भुरु त्यावर नाचत सुंदर कुंतल कुरळा उडे ॥ ७ ॥
अर्धस्मित तव मंद मोहनें, पसरे गालावरी।
भुललें तुजला हृदय साजणी, ये चल माझ्या घरीं' ॥ ८ ॥

सान समाठीं हिमवतीचें सुंदर मोतीं घडे ।
हात लावितां परि नर नाथा त तर लागीं पडे ॥
ती वनमाला म्हणे नृपाळा सुन्दर मी हो खरी ।

( अपूर्ण )

* * *

६

पारवा

भिंत खचली कलथून खांब गेला । जुनी पडकी उध्वस्त धर्मशाळा ॥
तिच्या कौलारीं बसुनि पारवा तो । खिन्न नीरस एकांतगीत गातो ॥ १ ॥
सूर्य मध्यान्हीं नभीं उभा राहे । घार मंडल त्याभवतिं घालिताहे ॥
पक्षि पानांच्या दाट सावल्यात । सुप्त सागरस्वप्नांत पेंगतात ॥ २ ॥
तुला नाहीं परि हौस उडायाची । गोड हिरव्या झुबक्यात दडायाची ॥
उष्ण झळया बाहेर तापतात । गीतनिद्रा तव भ्रांत अडखळीत ॥ ३ ॥
चित्त चिंता तव कावळ्या विचार । दुखत खुपतें का, सांग सांग बा रे !
तुला काहीं जगतात नसे मान ? । गाड गावें मग मान हें कुठून ? ॥४॥
झांप सौख्यानंदात मानगाची । पुरा क्षणही कोठून टिकायाची ? ॥
दु खनिद्र निद्रिस्त तुझ्या ग्रान । करुण गीत घुमवीत जगीं आज ॥ ५ ॥
दु खनिद्रा ती आज तुला लाग । तुझें जगही निद्रिस्त तुझ्या संगें ॥
फिरे माझ्या जगतात उष्ण वारे । तुला त्याचें भानही नसे का रे ? ॥ ६ ॥

( अपूर्ण )

* * *

७

पाखरास

पाखरा गाइल तुला कधींहि न कोणी । नच अश्रु गाळिले वनीं कुणी येवोनी ॥ १ ॥

# नारायण मुरलीधर गुप्ते ('बी')

[ इ. स. १८७२-१९४७ ]

## १

### नावांत काय आहे ?

का आग्रह ? रसिका ! नाव सांग मज म्हणसी ।
नावांत मोहनी भासे सामान्यांसी ॥
घन नीलमणि-प्रासाद-चंद्रशालांत ।
ते असंख्य सुंदर तारे चमचमतात ॥
अनिवार इंद्रजालतें-दाविती ।
वसुधेस मंत्रमुग्धतें-भ्रमविती ।
सगूढ नेत्रसंकेतें-बाहती ।
हे विलास हरिती वस्तुजात हृदयासी ।
वद ! त्यांचीं नांवें काय पुसाया जाशी ? ॥
तरुलता प्रसूनान्विता राहती रानीं ।
संपूर्ण भारिती वनश्रेणिगंधानीं ॥
ह्या प्रमदवनांतरिं शिरले-जे जन ।
तरुलताचि अंगें झालें-आपण ।
निजनामरूपही गेले विसरुन ।
आनंद समीरण डोल देतसे त्यांसी ।
टपटपा पडति सालती लूट कुसुमांसी ॥

इ. स. १९१२ —मनोरंजन

नि:श्वास धावती सौख्यामागें सारे। दु:खाचा वाली कुणा कुणीहि न बा रे!॥२॥
मधु सुखद उष्णता मिळता रविरायाची। ही पवनादोलीं कमळें उमलायाची॥३॥
तेव्हाच कोकिळा मैना गातिल गाणीं। होतील फुलें स्मरविव्हल त्या गीतानीं॥४॥
त्या मधुर मुखींचें अश्रुजाल चुंबीत। झुलतील फूलपाखरें निजानंदात॥५॥
रविवदनाचा रंग जरा परि बदले। मग गान सर्व सौंदर्य, सर्व हें थिजलें॥६॥
या मत्त कोकिळा गिरिकुहरीं रडतील। कोंवळ्या कळ्या मोडोनि मान पडतील॥७॥
ल्वदार मनोहर वेलबुटी नवलाची। त्या काळीं कोठें नाहीं प्रगटायाची॥८॥
रवि वरतीं वरतीं चढत चढत गगनात। अंगार भरिल या मदशीत पवनात॥९॥
निष्प्रेम मनाचें गाणें वेविलवाणें। तें तुझें मात्र राहील जसेच्या तसें॥१०॥
ती पूर्वतारका प्रभातरेषेवरतीं। जशि काय उभी सौंदर्यदेवता होती॥११॥
पीतांबर कसिलें रानवेत्र परि हातीं। शिरिं मुकुट कळ्यांचा त्रिलोकसुखद मूर्ती॥१२॥
हळुवार हिमाचें अवगुंठन हलवोनी। बोलेल सर्व निद्रिस्त विश्व म्हणवोनी॥१३॥
सारून जरा कचभार नाल्का पाहे। एकेक तारका समाधिचें सुख लाहे॥१४॥
निद्रिस्त भूमिला स्वप्न जणों हें दिसलें। स्वप्नात लाडके सुंदर डोळे भिजले॥१५॥
स्मरताहि जया हो रोमांचाची भरती। मधुमद अहा ती घटिका सौख्यद होती॥१६॥
परि तोहि काल तव हृदया नच सुखदायी। निष्प्रेम मनाला कोठेंही सुख नाहीं॥१७॥
चुंबीत गुलाबी गाल मधुर सध्येचा। कर वरतीं आला सुंदर रविरायाचा॥१८॥
जग समाधिस्थ जणु सर्व सर्व हें होतें। परि शांतिलेशाही नव्हता टाऊक तूतें॥१९॥
हुंदुन कुठेंतरि काटेरी झुडुपात। तव हूहूहूचें होतें गीत वहात!॥२०॥
येईल दिवस परि धन्य दिवस सौख्याचा। तो करिल तुझ्यासह अंत तुझ्या गीताचा॥२१॥
फिरवून भरारा गोफण तो झाडील। काट्यावर उपडें भग हृदय पाडील॥२२॥
मग एकच धडकी एकच अंतिम बोल। नेोंदून तुझें हें जळतें हृदय निवेल॥२३॥

# नारायण मुरलीधर गुप्ते ('बी')

[ इ. स. १८७२–१९४७ ]

## १

### नांवांत काय आहे?

कां आग्रह? रसिका! नांव सांग मज म्हणसी।
नांवांत मोहनी भासे सामान्यांसी॥
घन नीलमणि–प्रासाद–चंद्रशालांत।
ते असंख्य सुंदर तारे चमचमतात॥
  अनिवार इंद्रजालातें–टाकिती।
  वसुधेस मंत्रमुग्धेतें–भ्रमविती।
  संगूढ नेत्रसंकेतें–वाहती।
हे विलास हरिती वस्तुजात हृदयासी।
वद! त्यांचीं नांवें काय पुसाया जाशी?॥
तरुलता प्रसूनान्विता गाहती रानीं।
संपूर्ण भारिती घनश्रेणिगंधानीं॥
  ह्या प्रमदवनोतरिं शिरले–जे जन।
  तरुलताचि अंगें झाले–आपण।
  निजनामरूपही गेले–विसरुन।
आनंद समीरण डोल देतसे त्यांसी।
टपटपा पडति खाली लूट कुसुमांसी॥

इ. स. १९१२ —मनोरंजन

## २

## मनोहरिणी

पदन्यास लावण्यप्राली ही करिते रमणी ।
तारामंडित निरभ्रांबरीं जशी रम्य रजनी ॥ १ ॥
शुभ्र कृष्ण वर्णातिल सारा मोहकता आली ।
नेत्रीं गात्रीं, एकें पात्रीं हृदयंगम मेळी ॥ २ ॥
समीलित ती कांति दिसे अति शांत सरस नयना ।
शशिकररंजित रजनीसम जी प्रखर दिना येना ॥ ३ ॥
उणा किरण की अधिक झाक जर या रूपीं पडती ।
अनिर्वाच्य ती सगमशोभा अधा तरि जाती ॥ ४ ॥
कृष्णकेशपाशावरि येती श्याम श्याम ल्हरी ।
शुभ्र तेज मुखसरसिरुहावरि सुरुचिर लास्य करी ॥ ५ ॥
मृदुमंगल मधुभाव आननीं ज मुद्रित होती ।
किती शुद्ध किति रुचिर उगम निज ते प्रस्फुट करिती ॥ ६ ॥
मृदुल कपोलीं हास्य मनोहर जें क्रीडा करितें ।
भास्वत्भालीं शांत तेज जें सतत लसलसतें ॥ ७ ॥
मूकचि त्याच्या वक्तृत्वान द्विजविषयीं पटते ।
साभ मनोमय पवित्र चारित्र्याची हृदयातें ॥ ८ ॥
निर्वैर भूतमात्राच्या ठायीं हिची चित्तवृत्ती ।
निर्व्याज प्रेमल भावाची ही रमणी मूर्ती ॥ ९ ॥

## ३

## माझी कन्या

गाई पाण्यावर काय म्हणुनि आल्या । का ग गंगायमुनाहि या मिळाल्या ? ॥
उभय पितराच्या चित्तचोरटील । कोण माझ्या बोलले गोरटीला ? ॥ १ ॥

उष्ण वारे वाहती नासिकांत । गुलाबांला सुकविती कादिमरांत ॥
नंदनांतिल हलविती वल्लरीला । कोण माझ्या बोलले छबेलीला ? ॥ २ ॥
शुभ्र नक्षत्रें चंद्र चांदण्यांची । दूड रचलेली चिमुकली मण्यांची ॥
गडे ! भूईवर पडे गडगडून । का ग आला उत्पात हा घडून ? ॥ ३ ॥
विभा विमला आपटे प्रधानांच्या । अन्य कन्या श्रीमान कुलीनाच्या ॥
गौर चैत्रींची तशा सजुनि येती । रेशमाचीं पोलकीं छिटें लेती ॥ ४ ॥
तुला लंकेच्या पार्वतीसमान । पाहुनीया होवोनि साभिमान ॥
काय त्यांतिल बोलली एक कोण । 'अहा ! आली ही पहा भिकारीण' ! ॥ ५ ॥
मुली असती शाळेंतल्या चटोर । एकमेकींला बोलती कठोर ॥
काय बाई ! चित्तात धरायाचे । शहाण्यानें ते शब्द वेडप्यांचे ? ॥ ६ ॥
रत्न सोनें मातींत जन्म घेतें । राजराजेश्वर निजशिरीं धरी ते ॥
कमल होतें पंकांत तरी येतें । वसंतश्रीसत्कार करायातें ॥ ७ ॥
पंकसंपर्कें कमळ का भिकारी ? । धूलिसंसर्गें रत्न का भिकारी ? ॥
सूत्रसंगें सुमहार का भिकारी ? । कशी तूंही मग मजमुळें भिकारी ? ॥ ८ ॥
कालसरिता विधुवल्लरीसमान । नशीबाची चढतीच तव कमान ॥
नारिरत्नें नरवीर असामान्य । याच येती उदयास मुलांतून ॥ ९ ॥
भेट गंगायमुनास होय जेथें । सरस्वतिही असणार सहज तेथें ॥
रूपसद्गुणसगमीं तुझ्या तसें । भाग्य निश्चित असणार तें अपैसें ॥ १० ॥
नेत्रगोलांतुन बालकिरण येती । नाच तेजाचा तव मुखीं करीती ॥
पांच माणिक आणखी हिरा मोतीं । गडे ! नेत्रां तव लव न तुळों येतीं ॥ ११ ॥
लाट उसळोनी जळीं खळें व्हावें । त्यात चंद्राचें चादणें पडावें
तसें गालीं हासतां तुझ्या व्हावें । उचंबळुनी लावण्य वर वहावें ॥ १२ ॥
गौर कृष्णादिक वर्ण आणि त्याच्या । छटा पातळ कोंवळ्या समवयांच्या ॥
सर्व घेउनि तनुवरी अद्‌भुताचा । खेळ चाले लघु रंगदेवतेचा ॥ १३ ॥
काय येथें भूषणें भूषवावें । विविध वसनें वा अधिक शोभवावें ? ॥
दानसीमा हो जेथ निसर्गाची । काय महती त्या स्थलीं कृत्रिमाची ? ॥ १४ ॥
खरें सारें ! पण मूळ महामाया । आदिपुरुषाची कामरूप जाया ॥
पहा नवलाई तिच्या आवडीची । सृष्टिशृंगारें नित्य नटायाची ॥ १५ ॥

त्याच हौसेंतुन जगद्रूप लेणें । प्राप्त झालें जीवास थोर पुण्यें ॥
विश्वभूषण सौंदर्यलालसा ही । असे मूळातचि, आज नवी नाहीं ॥ १६ ॥
नारि मायेचें रूप हें प्रसिद्ध । सोस लेण्याचा त्यास जन्मसिद्ध ॥
तोच बीजांकुर धरी तुझा हेतू । विलासाची होशील मोगरी तूं ॥ १७ ॥
तप सिद्धीचा ' समय ' तपस्व्याचा । ' भोग' भाग्याचा कुणा सभाग्याचा ।
पुण्यरताचा स्वर्ग कीं कुणाचा । ' मुकुट ' कीर्तीचा कुण्या गुणिजनाचा ॥१८
' यशःश्री ' चा ही कुण्या महात्म्याची । धार कोण्या रणधीर कट्यारीची ॥
दिवसमासें घडवीतसे विधाता । तुला पाहुन वाटतें असे चित्ता ॥ १९ ॥
तुला घेइन पोलकें मखमलीचें । कुडी मोत्याची, फूल सुवर्णाचें ॥
हौस बाई पुरवीन तुझी सारि । परि आवरि हा प्रलय महाभारी ॥ २० ॥
दगे मळकट झाकोनि चंद्रिकेला । तिच्या केलें उद्विग्न चाडण्याला ।
हास्यलहरींनीं फोडुनी कपाट । प्रकाशाचें वाहवी शुद्ध पाट ! ॥ २१ ॥
प्राण ज्याचेवर गुतले सदाचे । कोड किंचित् पुरविता न ये त्याचें ॥
तदा बापाचें हृदय कसे होतें । न ये वदता, अनुभवी जागती तें ॥ २२ ॥
माज धनिकाचा फिका पडे साचा । असा माझा अभिमान गरीबाचा ॥
प्राप्त होता परि हे असे प्रसग । हृदय होतें हदरोनिया दुभग ॥ २३ ॥
देव देतो सद्गुणी बालकाना । काय म्हणुनी आम्हास करंट्याना ॥
लाज त्याच्या गावास जाउनीया । गूढ घेतों हें त्यास पुसोनीया ॥ २४ ॥
' गावि जातों ' ऐकता त्याच काळीं । पार बदलुनि ती बालवृष्टि गेली ॥
गळा घालुनि करपाश रेशमाचा । वदे येतें मी पोर अज्ञ वाचा ॥ २५ ॥

# श्रीधर बाळकृष्ण रानडे

[ जन्म इ. स. १८९२ ]

## १

### लहानपणचा प्रवास

आगगाडी ती शीघ्रगतीनें । चाले पळती डोंगररानें
रूळ सरकले आले जवळी । पळती भरभर तरुच्या ओळी
उच खांबांवर तार हाल्ली । वळणोंवळणीं गाडी डुलली
क्षणात पुढती डोंगर फाटे । डवे भराभर गिळतो वाटे
सोडित सुस्कारे धडपडते । काळोखाला कापित जाते
विजयी होता लुब्धक दृष्टी । नयते खालीं नटली सृष्टी
पर्वत मर्यादित मैदान । झाडित निजलीं खेडीं सान
डुलली कुरणें शेतें पिवळीं । मळ्यात पणसें भरुनि वाकलीं
नागरफणिनें विंचरलेलीं । दिसतीं काहीं शेतें काळीं
पर्वतशिखरीं लेढि भीषण । उड्या मारिती कड्यावरून
तेच परी त्या मैदानात । वक्र गतीनें झुळझुळ वाहत
नेत्रपटावर चित्र मनोहर । उमटत नच तों गेलें दूर
सुरवटासम मद चालली । दीपप्रकाशित मार्ग गेली
दिसली भूमी सपाट केवळ । निळसर डोंगर दूर न जवळ
नद्या कोरड्या जळकी रानें । गेली भरभर शीघ्र गतीनें
कातकऱ्याच्या फिनी झापड्या । दिसल्या परि त्या क्षणात गेल्या
खोपट जातीं मागें वरतीं । घेउनि गाडव चाले पुढतीं
रचली म्हशिवर मडकीं भांडीं । त्यावर फडफड करी कोंबडी
मूल पाठिवर निणीत चटई । कातकरिण ती पेंगत जाई
झिंगत चिल्मी फुकत सगळे । चित्रविचित्र नोळत पुष्प चालले
भवयानेचें सार्थ चित्र । दिसलें नयना परि क्षणमात्र

उभीं राहुनी तारेवरतीं । पोरें नाचुनि टाळ्या पिटती
चरता गाई दूर पळाल्या । शेळ्या मेंढ्या उभ्या राहिल्या
भुक्त कुतरीं आनदानें । जागडलें तें करडूं तान्हें
तारेवरती पक्षी चिमणे । फडफड करिती गोजिरवाणे
रात्र उमलली जगत झोंपलें । गाडी भरभर पुढतीं चाले
रस्त्याच्या वडपिंपळओळी । *नवल बघाया येती जवळी*
ताबुस कदिल तारा दिसली । अपशकुनानें गाडी बुजली
अधारातुनि व्यक्त जाहलें । मोठें होउनि स्टेशन आलें

इ. स. १९१४ — 'काळाच्या दाढेंतून'

## २

## माधुकरी

गरिब बिचारा माधुकरी । कष्ट तयाला जन्मभरी ॥
कडक उन्हानें जीव घाबरे । कपोल सुकले घर्मे भिजले
पायीं चटके तापे डोकें । धापा टाकित पळे जरी ! गरिब ॥ १ ॥
बुरबुर लागे पाउसधारा । चिखल माजला आगीं सारा
घट्ट तपेली झोळी धरिली । धावत जातो घरोघरीं ! ॥ गरिब ॥ २ ॥
भणभण झोंबे वारा अगा । बधीर गात्रें पायीं भेगा
हात कापती दात वाजती । कुडकुडतो हा घडी घडी ! गरिब ॥ ३ ॥
विटक्या अपुऱ्या मुकट्यावाचुनि । वस्त्र दुपारीं अगीं कोठुनि
*ही धार्मिकता लोकांकरिता । नित्य सोशितो कष्ट जरी ! ॥ गरिब ॥४॥*
सण आनदी घरोघरीं जरि । नित्य कपाळी सुटे न वारी
शिळी बुरसली खवट आंबली । भोक्ता वस्तुस मिळे परी ! ॥ गरिब ॥५॥
उशीर कोठें कुठें सपर्ले । मिळे कालवण-भाग्य उदेलें
नावा धरिली करीं तपेली । अश्रू तोंडीं घास गिळी ! ॥ गरिब ॥ ६ ॥
झोळी थोडिहि अजुनि न भरली । शाळेची तर घटा झाली
मुख हिरमुसलें घास कोंबले । दप्तर घेउनि पळे जरी ! ॥ गरिब ॥ ७ ॥

शिळे त्यातलें रात्रीकरिता । निजे उपाशी अपुरें पडता
कुणा कळवळा येई बोला । दु:ख तयाचें आणूपरी ! ॥ गरिब ॥ ८ ॥
नवर गेला एक साल्तीं । जाइल नादारी ही भीती
साजसकाळीं अभ्यासच करि । पुरसत खेळा कुठें तरी ! ॥ गरिब ॥ ९ ॥
गोसावी भट अन्य भिकारी । तेलग्याचें भाग्य त्यांतीतरी
पैसा दूरच पुस्तक धोतर । जुनें द्यावया नसे घरीं ! ॥ गरिब ॥ १० ॥
निजे कुणाच्या ओटीवरतीं । अर्धे धोतर खालीं वरतीं
एकच सदरा तोच उन्हाळा । दया न येते जगा परी ! ॥ गरिब ॥ ११ ॥
यजमानाला पलंग गिरदी । आत उकडते खुपते गादी
पोटीं धरुनी पाय जुळवुनी । कुडकुडतो हा रात्रभरी ! ॥ गरिब ॥ १२ ॥
पुण्यात आला अभ्यासाला । पदोपदीं जग अडवी त्याला
विद्या करितो हाल सोशितो । शूर नव्हे का खरोखरी ॥ गरिब ॥ १३ ॥

इ. स. १९१६ — काव्यरत्नावळी

## कृष्णाजी रामचंद्र परांजपे

[ जन्म इ. स. १८९६ ]

### निद्रागीत

निज लडिवाळा नीज नीज वेल्हाळा । लागु दे घडीभर डोळा ॥
का खेळाया दिन सारा नच पुरला । म्हणुनी हा करिसी चाळा ॥
अपरात्रीच्या शांत अशा या समयीं । निज आता करि अंगाई ॥
सवंगडि हे पाहीं अपुले । भाउनिजा सारे निजले । निद्रेचें राज्य पसरलें ।
निज नीज अता राहू दे हा चाळा । हलविता हात अवघडला ॥ १ ॥
रवि घाटनिया दिन सारा श्रमलेला । गिरिशिखरीं झोंपीं गेला ॥
हीं पाघरुनी तरुवर हिरवीं पानें । रागेंत झापलीं सुमनें ॥

ज्या दिन सारा चिमण्या चिवचिव करिती। झुडुपातुनि झोंपा घेती ॥
निद्रित ही गमते सृष्टी। वारेही डुलक्या घेती। पेंगते दिव्याची ज्योती।
वघ वरती हे दाट मेघ पावरुनी। ताराही निजल्या गगनीं ॥ २ ॥
तुज असति वहू दिवस पुढेंही अजुनी। मग काय हवी ती करणी ॥
निज कमरेला लटकावुनि समशेर। रणगाजी होई वीर ॥
वा बुद्धिबळें पढुनी सारीं शास्त्रें। राज्याचीं हल्वीं सूत्रें ॥
हो राज्याचा हितकर्ता। देशाचा सेवक मोठा। निजधर्माचा उद्धरता।
वा मिळवोनी तत्वज्ञान अपार। जगताचा करि उद्धार ॥ ३ ॥
परि करणें हें सगळें पुढच्या काळा। आयुष्य उदंडहि तुजला ॥
परि या काळा राहू दे हा चाळा। अगाई करि वेल्हाळा ॥
निज निज बाळा घडिभर लागो डोळा। हलविता हात अवघडला ॥
नाहीं का तुजला निजणें ? । वेल्हाची गातें गाणें ! हें काय असे हें करणें ?।
अपरात्रीच्या शांत अशा या समयीं। करि आता जो जो गाई ! ॥ ४ ॥

इ. स. १९२० —मनोरंजन

## दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी

[ इ. स. १८८७-१९३९ ]

### १

### गारदी कटोनी मेला

जातीचा रान परतू। तो भारतभूमुत होता ॥
तो तिच्यान्न अकावरतीं। दुग्धामृत प्याला होता ॥
तत्प्रवाह नवरुधिराचा। नसनसात खेळत होता ॥
जननीऋण फेडायाला। स्वामिभक्ति दावायाला। भाऊराह पानपताला ॥
इब्राहिम सगिनवाला। गारदी कटोनी मेला ॥ १ ॥

तो कवायती फौजेचा । चौफेर बांधुनी गोल ॥
चालला अघाडीवरती । वाजवीत पडघम ढोल ॥
भाऊस सलामी देता । शेवटचे वदला बोल ॥
मी धर्माचा इस्लाम । नाहीं परि निमकहराम । जरि झालों नामोहरम ।
सपादिन या कीर्तीला । गारदी कटोनी मेला ॥ २ ॥
ही वेळ न बोलायाची । कर्तव्यसमय हा खास ॥
हा समोर आता आहे । घोडा आणी मैदान ॥
पाहतां ठेविता कैसा । या भाऊचा अभिमान ॥
चढवुनी मिशीवर हात । बोले तो आवेशात । येतील शब्द कानात ।
विजयी झाला वा गेला । गारदी कटोनी मेला ॥ ३ ॥
मांडीच्या खालति घोडा । फुरफुरुनी नाचत होता ॥
टाचेनें उडवित गेला । डोळ्यानीं बघतां बघता ॥
तो मेघ वायुवेगाचा । वीजेनें भरला होता ॥
कडकड या आवाजानें । दशदिशास भरिले त्यानें । अतींही तो जोमानें ।
गगनात निघोनी गेला । गारदी कटोनी मेला ॥ ४ ॥
गिल्च्याच्या तोफावरती । फेकतां नेमके गोळे ॥
होऊन तयाच्या ठिकऱ्या । अस्मानीं तुकडे गेले ॥
अफगाणी गोलंदाज । होते की नव्हते केले ॥
तें युद्ध तोफखान्याचें । चातुर्य ग्वानखानाचें । उलटले डाव युद्धाचे ।
गढला तेथुनी न ढळला । गारदी कटोनी मेला ॥ ५ ॥
भेसूर गर्जना व्हावी । नाचावी चपला वरतीं ॥
दृष्टी श्रावण महिन्याची । खड ना जियेला पद्धती ॥
खालतीं रक्तमासाच्या । चिखलानें भरली माती ॥
तो घटोत्कची अवतार । गारदी रिसालेदार । रक्ताची गाळित धार ।
गर्दीतचि गारद झाला । गारदी कटोनी मेला ॥ ६ ॥
ते दैवचि फिरलें होतें । करणार काय त्या कोणी ! ॥
आकाश फाटलें त्याला । लावावें ठिगळ कुठोनी ! ॥
रोधावें सागर फुटता । खडकानें क्षिति अडवोनी ! ॥

विश्वास सोडुनी गेला । भाऊ न दिसे नयनाला । स्वामींच्या परि कार्याला ।
लढला तेथेंची निजला । गारदी कटोनी मेला ॥ ७ ॥

होळीच्या होळकराची । आधींच परतली स्वारी ॥
निजलीवर नसुनी स्वार । शिंद्याची फिरली स्वारी ॥
रणरंग पाहुनी घेती । एकेक पाय माघारीं ॥
समशेरबहाद्दर पडले । तेजस्वी तारे तुटले । पेंढारी धावत सुटले ।
रणसिंह न परि चळवळला । गारदी कटोनी मेला ॥ ८ ॥

शिंद्याची दृष्टी गेली । इब्राहिमखानावरती ॥
फेऱ्याचे पेंच सुटोनी । मानेच्या भवतीं रुळती ॥
अर्धीच जळाली दाढी । फेंसाची तोंडीं भरती ॥
परि करायती फौजेशीं । दे वरचेवर हुकुमाशीं । नेउनि भिडवी गिलच्यांशीं ।
नखशिखात शौर्य भरला । गारदी कटोनी मेला ॥ ९ ॥

शूराचें शौर्य बघोनी । राहवे न त्या शूराला ॥
शाबास खानसाहेब । गहिंवरुनी शिंदा वदला ॥
तो जंगबहादुर मान । लववोनी थोडा हसला ॥
पाटील चालला तुम्ही । येऊ न शकें परि हा मी । कळवा नानास सलामी ।
सांगा कीं नाहीं हटला । गारदी कटोनी मेला ॥ १० ॥

तनख्याच्यासाठीं ज्यानें । अडवुनी कितीदा धरिलें ॥
इब्रही तुम्ही लाडानें । ज्याचे सगळे पुरवीले ॥
आपल्या कृपेची छाया । ज्यावरी सर्वदा डोले ॥
बेइमान नाहीं झाला । जागला खऱ्या निमकाला । घनघोर अशा समयाला ।
हे कळवा हो नानाला । गारदी कटोनी मेला ॥ ११ ॥

रडतील बायकापोरें । जा सांभाळा जा त्याना ॥
घ्या सलाम शेवटचा हा । मज मारू द्या गिलच्याना ॥
शिंद्यानीं मुख फिरवीलें । लावून पदर डोळ्याला ॥
चालली लाडगेतोड । आली बाजू बिनतोड । सर्वस्वी झाला मोड ।
निच्छिन्न होउनी पडला । गारदी कटोनी मेला ॥ १२ ॥

हिंदूच्या मानेवरती । ठेवोनि आपली मान ॥
देशाच्या असुचा भाई । निजला इब्राहिमखान ॥
जानींचा पडला आम्ही । फेकोनी देऊं मान ॥
निजराष्ट्रहिताच्यासाठीं । व्हाव्या सकलांच्या गाठीं । परवा न जिवाची मोठी ।
हें दावाया सफलाला । गारदी फटोनी मेला ॥ १३ ॥

## २

### भाऊवर गर्दी झाली

शौर्यानं जगों अभिमन्यू । विश्वास सोडुनी गेला ॥
संगरीं घडोलच ऐसा । गारदी फटोनी मेला ॥
समशेरबहादर प्यारा । सजिव तो लढतां पडला ॥
दुर्दैव हासलें विकट । विसकटला सेनासकट । राहिला न कोणी निकट ।
असहाय अशा त्या काळीं । भाऊवर गर्दी झाली ॥ १ ॥
मदमत्त कुंजरीं व्याघ्र । घनसमूह भानूवरतीं ॥
कीं तुहिन कणाची वृष्टी । तेजस्वी कमलावरतीं ॥
अफगाणी फौजा चळल्या । त्वेषानें भाऊवरतीं ॥
जनकोजी आणि तुकोजी । शिंदे कुलभूषण गाजी । उडवीत पातले वाजी ।
त्यांच्याही कार्नीं आली । भाऊवर गर्दी झाली ॥ २ ॥
शेलले तुकोजी शिंदे । जाहली शर्थ शौर्याची ॥
फिरवानी भाऊ ढाल । दख्खनच्या ही छायेची ।
फळि फोडूं पुढच्या वर्षी । काबुलच्या दरवाजाची ॥
गर्जला पुण्याचा वाघ । छे पराजयाचा डाग । लावितो तनूला आग ।
मति हृदयातली भिडली । भाऊवर गर्दी झाली ॥ ३ ॥
टाकिल्या उडया दोघानीं । निर्धार धन्याचा बघुनी ॥
गोटात घातला गिल्ला । हिरहिरीसवें दडपोनी ॥
शिंद्याची नौबत गर्जे । धन्य धन्य या शब्दानीं ॥

गाजली अहा तलवार । तो होय अकस्मिक वार । जाहले तुकोजी ठार ।
आगावर बाजू आली । भाऊवर गर्दी झाली ॥ ४ ॥
हत्तीला बसवा खाली । जरिपटका आणा इकडे ॥
राष्ट्राचें भूषण माझ्या । होवो न तयाचे तुकडे ॥
त्यावर तर दाटी झाली । भिडले जनकोजी निधडे ॥
आता तरि भाऊ परता । सोनजी भापकर वदता । होणारे होइल आता
शूराची वाणी वदली । भाऊवर गर्दी झाली ॥ ५ ॥
नजिबखा दुराणी दोघे । दशसहस्त्रसेनेसहित ॥
वेगाने ऐशा आले । की दिसले भिडले निकट ॥
इकडे तर उरले होते । सेनानी मात्र सहस्त्र ॥
जनकोजी समरधीर । पाचशे घेउनी स्वार । उसळला मराठा वीर ।
इकडे जरिपटक्याखाली । भाऊवर गर्दी झाली ॥ ६ ॥
कदाहर गिझनीवाले । काबुली शिपाई बाके ॥
मुल्तानी खोरासानी । यत्किंचित न मरणा धाके ॥
शस्त्रासह ज्याच्या वदनी । विजयाचें तेज लकाके ॥
एकदाच वेष्टुन भवतीं । घावाची घाई करिती । वर्णावी कैशी विगती ।
लेखणी लववि शिर खाली । भाऊवर गर्दी झाली ॥ ७ ॥
'दीन दीन' लाटेवरतीं । आदळली 'हर हर' लाट ॥
समशेरी भाले पट्टे । याचाच उडाला थाट ॥
भाऊनें विरथपणींही । बहु केली कापाकाट ॥
मातब्बर झाली झुज । एकावर सगळी झुड । पाडिले अमित नररुड ।
शेवटची घटिका आली । भाऊवर गर्दी झाली ॥ ८ ॥
क्षणिं दिसे, दिसेना फिरुनी । मच्छावतार भाऊचा ॥
बुडुनीया उदया येई । कच्छावतार भाऊचा ॥
'हाणा हाणा' हा शब्द । राहिला मुखीं वीराचा ॥
गर्दनतोडीचे डाव । खेळून घातले घाव । गाजलें मराठें नाव ।
कळसास शूरता गेली । भाऊवर गर्दी झाली ॥ ९ ॥

हें महाराष्ट्रशौर्याचें। कुरुभूमीवरचें तेज ॥
दिसणार पुन्हा जें नाहीं। पाहोनी घ्या तें आज ॥
लष्करी तनूवर चढला। रक्ताचा ताना साज ॥
चगलफेक छातीचीर। चालले सफाई वार। भूमीस शवाचा भार।
रणदेवी तरिहि न धाली। भाऊवर गर्दी झाली ॥ १० ॥

मातब्बर मर्दुमकीनें। जनकोजी झुंजत होते ॥
वीरप्रसवेचें दुग्ध। राहूत उफाळत होतें ॥
लपक चपक खाडाखाडी। वर्णाया शब्द न पुरते ॥
हातघाई अतीं झाली। बसले हो घाव जिव्हाळी। रणसिंह पहुडला खालीं।
राहिला एक बलशाली। भाऊवर गर्दी झाली ॥ ११ ॥

तो कुठें सुजाउद्दौला। विश्वासघातकी दावा ॥
अबदुल्ली खासा कोठें। त्याला तरि दावा दावा ॥
भाऊचे अतिम बोल। आले न पुन्हा ऐकाया ॥
दक्षिणी मोहरा मर्द। गर्दीतच झाला गर्द। अफगाण जात बेदर्द।
हें वाक्य मनाला जाळी। भाऊवर गर्दी झाली ॥ १२ ॥

कुरुभूमीवरच्या वीरा। तुज नमन असो हें माझें ॥
जाहला पराजय तरिही। तव शौर्यदुंदुमी वाजे ॥
गायिलीं जरी तव गीतें। होइना तृप्त मन माझें ॥
कुरुभूमीचें मैदान। एकदा लढशि बेभान। हें चित्र जाइना पुसुन।
कविताही मम गहिंवरली। भाऊवर गर्दी झाली ॥ १३ ॥

## श्रीनिवास रामचंद्र बोवडे
### [ इ. स. १८८९-१९३४ ]

### १

### ऋतुवर्णन

ग्रीष्म— सुगंधी पुष्पाची मृदुल झुलती शेज रचुनी ।
तयाला ज्योत्स्नेचे भरजरि नवे गोफ विणुनी ।।
सुखें प्रासादाग्रीं सरसरति शृंगारचतुर ।
विलासी ग्रीष्माचे झुलत नभिं हिंदोल मधुर ।। १ ।।

शरद्— करोनीया स्नानें फुलत वसुधा सस्मितवती ।
फुलोनीया डोले विमल गगनीं तारकततती ।।
नव्या सौंदर्यानें नटुनि थटुनी शांत सलिलीं ।
शरत्कांता हासे प्रणयमधुरा नीलकमलीं ।। २ ।।

हेमंत— तुषाराचे मोती हरिततृणपर्णांत खचित ।
प्रभा बालार्काची गिरिविटपराजींत रचित ।।
कुरंगाच्या स्वारीवर चपल हेमंत फिरुनी ।
दिगंताचीं शेतें हसवि वर सोनें उधळुनी ।। ३ ।।

शिशिर— पिकें हातीं येतां विविध तृणधान्यें भरुनिया ।।
जुन्या संपत्तीचीं अनवरत दानें करुनिया ।।
सुखानें हा आनंदित शिशिर झांकोनि नयन ।
धुकें आच्छादोनी दुलइत करी गाढ शयन ।। ४ ।।

वसंत— नवें नेसूनीया मृदुल हिरवें क्षौमवसन ।
फुलांच्या शालूचा वरुनि बुरखा नीट रचुन ।।
पिकांच्या गाण्याचा स्वर धरुनिया पंचमस्वनीं ।
नवोढा वासंती तरल फिरते ताल धरुनी ।। ५ ।।

—' शृंगारसंगीत ' मधून

## २

### प्रबोधन

जाग जाग जाग सखे उजळल्या दिशा ॥ ध्रु ॥
शशिमंडळ पश्चिमेस अस्त पावलें । तारेही बघ विलीन होउं लागले ।
हंसवित तुज मृदुल विमल हांसते उषा ॥ १ ॥
उदयाचलिं भानुबिंब देइ दर्शना । फांकली प्रभा नभांत हर्षवी मना ।
जागवीत अरुण तुला संपली निशा ॥ २ ॥
मधुर ह्या प्रभातवात गात वाहतो । खेळत तव वेणीशीं नाच नाचतो ।
ऐक तुला गाती शुकसारिका तशा ॥ ३ ॥
फुलल्या फुलवेली नवपुष्पभूषणीं । डौलानें डोलतात विमल कमलिनी ।
मंगल वनदेवि वरित जागृती दशा ॥ ४ ॥
ऊठ हे मनोविनोद सुगुण गुणवती । गृहमंगल देवि ! ऊठ, ऊठ गे सती ! ।
जागवीत जग सगळें जागल्या दिशा ॥ जाग जाग ॥ ५ ॥

## ३

### माझें मी जाणें

प्रसाद नाहीं सरस्वतीचा माझें मी जाणें ।
फुटक्या वीणेवरचें वेसुर भेसुर हें गाणें ॥ १ ॥
येथें केला नसे देविनें सिंचन रस मधुर ।
नाहीं धाडुनि दिले वरुनिया तिनें अलंकार ॥ २ ॥
कवित्व नसतां गुंफित बसलों शब्दांचें जाळें ।
गणमात्रांचें गणित मांडलें कोऱ्यावर काळें ॥ ३ ॥
सरस मधुर जर हृदयच नाहीं कोठुनि मग गाणें ।
मोत्यांच्या शिंपल्यांत होती मोत्यांचे दाणे ॥ ४ ॥

निरभिमान निर्मल हृदयानें माझें मी जाणें ।
प्रसाद मज या जन्मीं नाहीं दिला शारदेनें ॥ ५ ॥
या जन्मीचा निकाल झाला माझें मी जाणें ।
पुढच्या जन्मीं प्रसाद व्हावा म्हणुनी हें गाणें ॥ ६ ॥
जन्मोजन्मीं प्रसन्न व्हावी मज देवी वाणी ।
करिता आराधना म्हणुनि मी गाउनि हीं गाणीं ॥ ७ ॥
हृदयाच्या गीतावर झुल्तो स्फूर्तीचा पाळणा ।– रिकामा
प्रसाद घेउनि ये ये देवी ! माझ्या संकीर्तना ॥ ८ ॥

४

## आत्मनिवेदन

कशास 'कवि' हे अभिधान । कशास 'कविचा' सन्मान ॥
नलिनीवनिचा मी भृंग । स्वत च गाउनिया दंग ॥
स्वानंदानें । गावें गाणें
कशास निंदा स्तुति चिंता । माझें गाणें मजकरिता ॥ १ ॥
सुगंध अथवा दुर्गंध । फुलास फुलण्याचा छंद ॥
काय तयाला जगताचें । हसण्याचें वा रुसण्याचें ॥
स्वानंदानें । फुलुनी डुलणें ।
जनात अथवा विजनात । सदा एक तो भगवत ॥ २ ॥

५

## मृत्युलेख

होता कुणी जगात ॥ ध्रु ॥
नाहीं ठिकाणठाव । नाहींच नावगाव ॥
येथें बसोनि गेला । कुणि एकटा अनाथ ॥ १ ॥

येथें जलप्रवाहीं । आला वाहात आला ॥
वाऱ्यावरी इथोनी । गेला वरी नभांत ॥ २ ॥
हंसतां कळ्याफुलांत । बसला विहंगमांत ॥
शीतोष्ण तरुतळींचे । जिव गुंतला वनांत ॥ ३ ॥
मधुगीत आळवीत । ओठांतलें मनात ॥
स्वानंदलीन झाला । एकांत निर्जनात ॥ ४ ॥
मउ मोकळ्या घरेला । पानांत झांकलेला ॥
डोळे मिटोनि येथें । विरला चिरंतनांत ॥ ५ ॥

## नारायण केशव बेहेरे

[ इ. स. १८९०-१९५८ ]

### १

### नश्वर देह

हा देह आपुला क्षणभंगुर टिकणारा । आयुष्य संपतां धुळीस हा मिळणारा ॥ १ ॥
नवपुष्प उगवलें गंधें क्षण दरवळलें । तें बहार सरतां सुकुनी गळुनी गेलें ॥ २ ॥
वा तारा पडतां प्रकाश क्षणभर पडला । क्षण एक संपतां अंधकारही झाला ॥ ३ ॥
या पृथ्वी अपुली सुंदर वसना ल्याली । हा वसंत सरतां रूक्ष पुन्हां ती बनली ॥ ४ ॥
वा आहे दंव हें प्रभातिंच्या समयाचें । रविकिरण चमकतां तेज लोपलें त्याचें ॥ ५ ॥
बुडबुडा जलाचा क्षणभर टिकला दिसला । जलकंप पावतां लहरींनीं हा फुटला ॥६॥
आकुनी नभीं वा मेघांची ही बनली । परि वात वाहतां क्षणात लुप्तच झाली ॥७ ॥
परि वात संपला तसा बुडबुडा फुटला । दंवबिंदु आटले वसत ग्रीष्मीं बुडला ॥ ८ ॥
तारका निमाली गंध जाय कुसुमाचा । आयुष्य संपतां निमर पडे मनुजाचा ॥ ९ ॥

इ. स. १९१२

## २

### गाता का मग कुलथोरवी ?

तडित् कडाडे उपजे काळ्या कभिन्न मेघोदरीं ।
म्हणुनि का वीज नसे साजिरी ? ॥ १ ॥
खारे पाणी क्षुद्र शिंपले जन्माचें साधन ।
म्हणुनि का मौक्तिकास मौल्य न ? ॥ २ ॥
महाविषारी असे खरोखर नागाची ती फणी ।
म्हणुनि का गरळच वरचा मणी ? ॥ ३ ॥
पंकापोटीं जन्म पावुनी सौंदर्यें शोभतें ।
म्हणुनि का कमल तुच्छ वाटतें ? ॥ ४ ॥
असे कोळसा काळा, हीरक सांगे परि सोयर ।
म्हणुनि का धवल न कोहीनुर ? ॥ ५ ॥
सुरासुरानीं भांडण करुनी सागरास मथिलें ।
म्हणुनि का अमृत तें नासलें ॥ ६ ॥
मूळ पाहता पहाडातला लहानसा ओहळ ।
म्हणुनि का पूज्य न गंगाजळ ? ॥ ७ ॥
शिळा वाळुची मूळ, मूर्ति परि पढरीस नांदते ।
म्हणुनि का भक्ती महावते ? ॥ ८ ॥
जन्मा येणें दैवाधीनीं, करणी जग हासवी ।
गाता का मग कुलथोरवी ॥ ९ ॥

इ. स. १९२४

# आनंदराव कृष्णाजी टेकाडे

[ जन्म इ. स. १८९० ]

## १

## हा हिंद देश माझा

आनंद कंद ऐसा । हा हिंद देश माझा ॥ ध्रु ॥
सत्त्वासि ठाव देई । वृत्तीस ठेवि न्यायी
सत्त्वासि मानि राजा । हा हिंद देश माझा ॥ १ ॥
जगदीश जन्म घेई । पदवीस थोर नेई ।
पदवी स्वधर्म साजा । हा हिंद देश माझा ॥ २ ॥
जनकादि राजयोगी । शुक नामदेव त्यागी ।
घुमवीति कीर्तिनाजा । हा हिंद देश माझा ॥ ३ ॥
दमयंति जानकी ती । शीलास भूषवी ती ।
नटली नटेश गिरिजा । हा हिंद देश माझा ॥ ४ ॥
विश्वास मोह घाली । ऐशी मुकुंदमुरली ।
रमवी जिथे निकुंजा । हा हिंद देश माझा ॥ ५ ॥
गंगा हिमाचलाची । वसती जिथे सदाची ।
होऊनि राहि कलिजा । हा हिंद देश माझा ॥ ६ ॥
पृथुराज सिंह शिवजी । स्वातंत्र्यवीर गाजी ।
करिती रणात मौजा । हा हिंद देश माझा ॥ ७ ॥
तिलकादि वीर देही । प्रसवूनि धन्य होई ।
मरती स्वलोककाजा । हा हिंद देश माझा ॥ ८ ॥
जगि त्याविना कुणीही । स्मरणीय अन्य नाही ।
थोरात थोर समजा । हा हिंद देश माझा ॥ ९ ॥
पूजोनि त्यास जीवें । वदोनि प्रेमभावें ।
जयनाद हाचि गर्जा । हा हिंद देश माझा ॥ १० ॥

इ. स. १९२१ —चिन्मयजगत्

२

## तुज एवढेंच ठावें

वेणूस वाजवावें । तुज एवढेंच ठावें ॥ ध्रु ॥
मज देखताच नयनीं करिं बासरीस धरुनी ।
अधरास भेटवावें । तुज एवढेंच ठावें ॥ १ ॥
नुसतेच ओठ हलता । नच भाव दाखवीता ।
जाणोनि गीत गावें । तुज एवढेंच ठावें ॥ २ ॥
मधुचारु लास्यभावा । होवो न खेद केव्हा ।
हेंची सदा जपावें । तुज एवढेंच ठावें ॥ ३ ॥
सारग रात्रिं श्रवुनी । गाती विहग गाणीं ।
आश्चर्य हें खुलावें । तुज एवढेंच ठावें ॥ ४ ॥
गाणोनि मालकसा । दिनिं झोपवीसि हसा ।
कौशल्य हें नटावें । तुज एवढेंच ठावें ॥ ५ ॥
दिनिं रात्र भासवावी । रात्रीं निशा नसावी ।
भ्रमि जीव या बुडावे । तुज एवढेच ठावें ॥ ६ ॥
प्रक्षोभ शांतिमाजीं । क्षोभात दिव्य शांती ।
जग त्यात डोलवावें । तुज एवढेंच ठावें ॥ ७ ॥
मुरलींत रंगलेला । मुरलीस वाहिलेला ।
मुरलीधरा ! स्वभावें । तुज एवढेंच ठावें ॥ ८ ॥
वेणूस वाजवावें
तुज एवढेंच ठावें ॥

इ. स. १९२३ — मनोरंजन

३

## स्वतंत्र भारत

लभेल याच काला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ध्रु ॥
अजि दास जो दुज्याचा । धनि तो उद्या स्वताचा ।
नयता दिसे जगाला । स्वातन्त्र्य भारताला ॥ १ ॥
नामर्द हिंद सारा । बोलो कुणी बिचारा ।
बोलेल तोचि बोला । स्वातन्त्र्य भारताला ॥ २ ॥
स्त्रीवेश पार्थ घेई । स्त्री कां म्हणोनि होई ।
येताच त्या क्षणाला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ३ ॥
सविता सदा न जेवीं । राही निशा न तेवीं ।
मग का न शक्यतेला । स्वातन्त्र्य भारताला ? ॥ ४ ॥
हें कालचक्र फिरतें । स्थिरता मुळीं न त्यातें ।
म्हणुनी बघाल डोळा । स्वातन्त्र्य भारताला ॥ ५ ॥
देवो कुणी न देवो । घेवो कुणी न घेवो ।
न टळे अता विधीला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ६ ॥
श्रद्धा पराक्रमाची । निष्ठा निजात्मतेची ।
सामर्थ्य हें कृतीला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ७ ॥
जीवा विनाश नाहीं । जीवत जीव राही ।
तो जीव जीविताला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ८ ॥
अन्य स्वतन्त्र होती । येई सदैव दृष्टी ।
संदेह तो कशाला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ९ ॥
परमेश जो तयाचा । या तोचि भारताचा ।
दे छत्रचामराला । स्वातन्त्र्य भारताला ॥ १० ॥
नवकाल जन्म घेई । नवतेज तेज दात्री ।
नव दिव्य दिव्यतेला । स्वातन्त्र्य भारताला ॥ ११ ॥

इ. स. १९२८ —चित्रमयजगत्

## माधव केशव काटदरे

[ इ. स. १८९२–१९५८ ]

### १

### महादेवशर्म्यांचा मृत्यू

वार्ता न त्या लव भयंकर वादळाची । होते समीप असले जन जे तयांची
जों क्षुब्ध सृष्टि अधिकाधिक होत गेली । तों शांतता अधिक तद्हृदयांत
आली ॥
कापट्यपूर्ण जगता विटले बघून । तच्चारुनेत्र गमतें मिटले म्हणून ॥
प्राणासवें न सखिची प्रियमूर्ति जावी । वक्षीं जगो म्हणुनि दक्षिण हस्त ठेवी !
लीला अनेक दिसल्या हृदयेश्वरीच्या । बाल्यांतल्या किति तशा किति यौवनीं
तो एकदां बघतसे तिज रोहिणीतें । हिंदोलकीं बसुनि मञ्जुळ गीत गाते !
येती पुढें कुरल कुंतल जे उडून । त्याचें निवारण करें करिते मधून ! ॥
आघात भूवरि करी चरणारविंदें । हिंदोलका हलविते हसुनी प्रमोदें ॥ ४
पाहे पुनश्च तिजलागिं विवाहकालीं । लज्जाविनम्र परि उत्सुक फार झाली !
किंचित् सकंप मृदुहस्तयुगें सुशीला । अर्पी तयास हृदयासह पुष्पमाला ! ॥
कार्यांत दक्ष परि चोरुनि यास लक्षी । ऐशी अधोमुख पुन्हा दिसली मृगाक्षी
दृष्टींत दृष्टि मिळताच सलज्ज झाली । त्याची छटा चमकली क्षणमात्र गालीं ॥
होता सती कुलवती करपाशबद्ध । ती लाजलाजुनि बळें करिते निषेध ! ॥
यत्नें तदा पतिभुजांतुनि होय मुक्त । वेगें पळे, परि मनीं अनुरागयुक्त ! ॥
ते भ्रूविलासहि पुन्हां दिसले तयाला । ऐके सुधामय तिच्या वचनावलीला ।
तें प्रेम, तो विनय, ती शुचिता सखीची । ये प्रत्यया तनुहुनी मृदुता
मनाची ! ॥ ८
वाचूनि मोह तिचिया कवितेस पावे । चित्तांत आदर तिच्याविषयीं दुणावे ।
तादात्म्य वर्ण्यविषयीं, प्रतिभाहि दिव्य । कोणास मोहित असें न करील
काव्य ! ॥ ९

झाला विनोद करितां रुसवा सखीचा। । मानीपणा कलुनि ये मग मानिनीचा॥
ते चंद्रिकेतिल विहारहि एकवार । त्याच्या पुनश्च घडले नयनांसमोर! ॥ १० ॥
कंठूनिया दिन युगांसम विप्रयोगीं । निस्तेज तेविं कृश होय सुकोमलांगी ॥
होतां सतीस पतिदर्शन ये उमाळा । तीं अश्रुंनीच बघतो करि पूजनाला ॥११॥
सायाहि ये परंतुनी सदनासि नाथ । मार्गाकडे निरखुनी म्हणुनी पहात! ॥
जी वाम बाहुवरि वाम कपोल ठेवी । ऐशी समुत्सुक पुनश्च बघे स्वदेवी॥१२॥
मंदत्व ये पुनरपी तिज गर्भभारें । झाले असह्य मज कष्ट सतीस सारे! ॥
पाहे पुन्हां तिजसि ने स्वगृहास तात । हाही निरोप तिज दे अतिखिन्न-
चित्त! ॥ १३ ॥
झालें सखीस परिसे जरि पुत्ररत्न । ये क्षीणता बहु तिला हरले प्रयत्न ॥
आशा तदीय उरली तिळमात्र नाहीं । तीचा परंतु पतिदर्शनिं हेतु राही! ॥१४॥
पाहून यास सतिचें जरि चित्त धालें । याचें परी हृदय फाटुनि पूर्ण गेलें ॥
बाहेर तोंच तनुचा थरकाप झाला । निःश्वास एक अतिदीर्घ असा
निघाला! ॥ १५ ॥
घाली उगाळुनि कुणी समयज्ञ मात्रा । चाले परंतु न तिची लवमात्र मात्रा! ॥
जें आणणें घडवुनी प्रिय देवराया । तेथें नरा! यश कसें तव ये उपाया? ॥१६॥
त्या लागला मरणसूचक थोर घोर । गात्रावली पडत चाललि थंडगार ॥
यत्स्नेह सर्वहि असे विलयास गेला । त्या दीपसाच जन तो गमला मनाला! ॥१७॥
शुभ्र प्रकाश दिसला नयनांस अंतीं । शुभ्रांशुची बघुनि ज्या विरमेल कांती ॥
होता अपूर्व, गमला परि सौख्यधाम । त्याची तिथें रमुनि जाय मति प्रकाम ॥१८॥
प्रेमप्रपूरित जिचें मन ती निमाली । कालोदरात सुहृदावलि गुप्त झाली ॥
त्यावीण जें दिसतसें नयना भयाण । त्या एकलाच जगतात वसेल कोण? ॥१९॥
स्पर्धा, अहंकृति, तिरस्कृति, कोप रोष । संताप तेविं दुसरेहि अनेक दोष ॥
देहासवेंच कलहप्रिय या जगांत । ठेवून तो धरितसे परलोकपंथ! ॥ २० ॥

* * *

भस्मावशेष शव होय जिथें तयाचें । तेथेंच संप्रति शिवालय एक साचें ॥
त्याच्यापुढें करिति सांजसकाळ गान । बिल्वावरी बसुनि रम्य शकुंत तीन ॥२१॥

इ. स. १९१६

## २

### नको जाऊं बाहेर आज बाळा !

नभा आच्छादित करी मेघमाला । तिमिर दाटुनियां वनीं राहियेला ।।
होति जर्जर बहु ताल वृक्ष सारे । जधन पवनाशीं झुंजतां बिचारे ।। १ ।
पंख पर्जन्यें भिजुनि मलिन झाले । स्तब्ध चिंचेवरि काक बैसलेले ! ।।
नदी निर्जनतट भीति दे मनाला । नको जाऊं बाहेर आज बाळा ! ।।
वईपाशीं बांधुनी ठेविलेली । गाय कपिला आपुली भिजुनि गेली ! ।।
तिला बांधुनि गोठ्यांत परत येते । बसुनि बाळा तोंवरी रहा येथें ।। २ ।
जागजागीं शेतांत भरें पाणी ! । धरिति मासे जाउनी तिथें कोणी ।।
गल्लिगल्लींतुनि वरित खळखळाटा । गढुळ पाणी बुजवितें सर्व वाटा ! ।।
करुनि घोडा आपुला समीराला । स्वार त्याच्यावरि मेघ गमे झाला ! ।।
नदीवरुनी घागरी आपुल्याल्या । कधिंच भरुनी बायका परत आल्या ! ।।
तऱ्यालागी हा कोण हांक मारी ? । बंद तरिची जाहली असे फेरी ! ।।
असे आला सरितेस महापूर । ऐक बाळा ! गर्जना तिची घोर ! ।। ६ ।।
दिवे अजुनी आहेत पुसायाचे । सांज झाली तरि न तें कळायाचें ! ।।
जागजागीं मार्गांत चिखल झाला । नको जाऊं बाहेर आज बाळा ! ।। ७
घाव सांपडतां पिंजऱ्यांत जैसा । वनीं वेळूंच्या वायु आज तैसा ।।
क्षुब्ध होउनि धडपडे सुटायाला । शब्द त्याचा दे भीती बालकाला ।। ८

ई. स. १९२०

आला होउनि काठेवाडी वारुनरी स्वार ।
सर्गे होते मोहवर्तीतिल वावन सरदार ! ॥ ३ ॥
शर्थ करुनि,रणमूरत जिरविला गझल्फरेजग ।
भगवा नाणा मिरविन आला हिरवा रणरग ! ॥ ४ ॥
शोभिवत सर्पेच शिरावरि, गळ्यात मणिहार ।
अर्गी हिरवा निमा, पादरी पायीं सुरवार ॥ ५ ॥
लाल मियानीं कटीस लटके फत्ते करवाल ।
रणि इस्राइल, शम्स जगींचा दख्खनचा लाल ! ॥ ६ ॥
दर्शनमात्रे आनंदाला येउनिया भरती ।
कृतश पन्नानगर तयावर उधळी मणिमोती ! ॥ ७ ॥
झरोक्यांतुनी पहात होते प्रमुदित नयनानीं ।
सतेज माणिक मीहि तयावर दिधलें उधळोनी ! ॥ ८ ॥
तेंच नेमके जाउनि त्याच्या अगावरि पडलें ।
मणिहारीं अटकून शेवटी हृदयावर ठरलें ! ॥ ९ ॥
पाहे मज साहेब पेशवा वर करुनी नयन ।
लाजुनि गेलें ! परी विसरलें झाकाया वदन ! ॥ १० ॥
चित्त धरकलें ! अपूर्व कांहीं स्पर्श करी त्याला ! ।
अपूर्व सवेदना राहिल्या व्यापुनि हृदयाला ! ॥ ११ ॥
बेमालूम मुलखात दिलाच्या शिरुनि अकस्मात ।
गाउ लागला गझल मुशाफिर वास्तविक वात ! ॥ १२ ॥
गझल तयाची जादु आपली उधळी भवताली ।
जादूतुनि त्या प्रीति गुलाबी जन्माला आली ! ॥ १३ ॥
भीरु लाजरी म्हणुनि बैसली हृद्भागीं लपुनी ।
चुगली धेली परि गालानीं चहाडखोरानीं ॥ १४ ॥
परस्पराना खुणवुनि माझ्या धूर्त सख्या कांहीं ।
हासु लागल्या, कळुनि मला तें तरि आलें नाहीं ॥ १५ ॥
विनोदतत्पर सखी अमीना मग पुढतीं सरली ।
हलवुनि मजला हासत हासत विनोदपर वदली ॥ १६ ॥

'मद्याच गेला निघुनि पुढें प्रिय सुहेल गुल्जार ! ॥
मार्गी आता काय निरखितें नादी गुल्नार' ॥ १७ ॥
स्पर्श तिचा करि जागृत माझें निजलेलें भान ! ।
शब्द तिचा करि जागृत माझे निजलेले कान ! ॥ १८ ॥
फळून आले भारुनि गेला नजर पुरी माझी ।
वजीरजादा, वजीर उमदा, बाजी रणगाजी ! ॥ १९ ॥
सरता पुढतीं मैफलीत मी गायाला गान ।
छत्रसालजीसमीप दिसला माझा दिल्जान ॥ २० ॥
बावरलें मन, वर्तनही मग विचित्र ये घडुन ।
अभिनय चुकला, आणि जाहली कपाकुल तान ! ॥ २१ ॥
सोडुनि अर्धे बुंदेल्याचें प्रिय चपतगीत ।
प्रेमगीत अभिजात राहिलें न कळत मी गात ॥ २२ ॥
न कळे मजला काय दिलाशीं बोलाचा मेळ ।
गान रंगलें, सभा दंगली, निभावली वेळ ! ॥ २३ ॥
उधळु लागले विविध बक्षिसे बुंदेले वीर ॥
मन्नमुग्ध परि होउनि राहे माझा सर्दार ! ॥ २४ ॥
चमकत होते अश्रु तयाच्या तेजस्वी नयनीं ।
चरखारींतिल चार हिऱ्याचें लाजउनी पाणी ॥ २५ ॥
कल्पनाहि मज नव्हती गायन होइल परिणामी ।
तें तर नयनीं करी प्रियाच्या अश्रु उभे नामी ॥ २६ ॥
त्या अश्रूंचे बिंदु गळुनि मग ओघळले चार ।
पदकस्थानीं आर्द्र जाहला तेणें मणिहार ! ॥ २७ ॥
गान सपता तोच हार मज दे बाजीराज ॥
दिव्य देणगी मीहि तयाची केली शिर्ताज ! ॥ २८ ॥
बुंदेल्याच्या महाबळींनीं ओपुनि नजराणा ।
बोळविला जइ बाजबहादूर दख्खनचा दाणा ॥ २९ ॥
होउनि आले मीहि तयाची रूपमती प्यारी ।
आश्चर्यिलें मज पाहुनि दिपल्या दख्खनच्या नारी ॥ ३० ॥

४

## हिरवें तळकोंकण

सह्याद्रीच्या तळीं शोभत हिरवें तळकोंकण ।
राष्ट्रदेविचें निसर्गनिर्मित केवळ नंदनवन ! ॥ १ ॥
झुळझुळ गाणें मंजुळवाणें गात वाहती झरे ।
शिलोच्चयांतुनि झुरुझुरु जेथें गंगाजळ पाझरे ॥ २ ॥
खेळत खिदळत नद्या चालल्या गुणगंभीराकडे ।
दरिदोऱ्यातुनि माणिकमोतीं फुटुनि झाल्ले सडे ॥ ३ ॥
नीलनभीं घननील नवुनि करि सुमनीं स्वागत कुडा ।
गोमेदाच्या नटे फुलांनीं बरसातित तेरडा ! ॥ ४ ॥
कडेपठारीं खेळ मारुतासह खेळे हिरवळ
उधळित सोनें हसे नाचरें नालिश सोनावळ ! ॥ ५ ॥
शारदसमयीं कमलवनाच्या तरल्या शय्येवरी ।
मदालसा स्वच्छंद लोळती जलदेवी सुंदरी ! ॥ ६ ॥
कविराव्यातुनि तर्श जींतुनी सजते माधवी झरी ।
आमोद उधळीत फुलें ती बकुळीची मंजरी ॥ ७ ॥
हिरव्या पिवळ्या मृदुल दलाच्या रम्य गालिच्यावरी ।
स्वप्ना गुंगति गोकर्णींची फुलें निळीं पांढरीं ॥ ८ ॥
वृक्षाच्या राईंत रंगती शकुंत मधुगायनीं ।
तरंगिणींच्या तटीं डोलती नाग केतकी वनीं ॥ ९ ॥
फुलपाखरांवरुनि विहरती पुष्पवनांतिल परी ।
प्रसन्नता पसरात वाजवुनि जादूची पावरी ॥
शितानाईच्या गोड हातचे पोहे जे काननीं ।
रागानें दे नाइलवेटा क्वडा भिरकावुनी ॥ ११ ॥
रोप त्याचीं बनुनि पसरलीं नाचत चोहींकडे ।
अजुनि पहा या ! मंडित त्यांनीं कांकणचे हे सडे ! ॥ १२ ॥

इतिहासाला वार्ता ज्याची श्रुत नाहीं जाहली ।
दंतकथासहि विस्मृति ज्याची होउनिया राहिली ॥ १३ ॥
" झिम्मा खेळे कोंकणचा तो नृपाळ " म्हणती मुली
" गळे वसतीं टपटप जेव्हां आम्ब्याची डाहळी ! " ॥ १४ ॥
कुठें आढळे फळभारानें लवलेली आवळी ।
कुठें गाळिती भुळभुळ अपुलीं पक्व फळें जाभळी ॥ १५ ॥
कुठें हलवितो पिंपळपानें पिंपळ पारावर ।
कुठें वडाच्या पारबीवर झोके घे वानर ! ॥ १६ ॥
कुठें वेहड्यावरि राघूस्तव विरही मैना झुरे ।
प्राणविसावा परत न आला म्हणुनि चित्त बावरे ! ॥ १७ ॥
मधमाशांची लोंबति पोळीं कुठे सात्विणावरी ।
रंग खेळती कुठें प्रमोदें पांगारे, शेवरी ! ॥ १८ ॥
पोटीं साखरगोटे परि वरि कटक बाहेरुनी ।
झुले कुठें तो फणस पुरातन रहिवासी कोंकणी ! १९ ॥
कोठें चिंचेवर शठ आंबा करि शीतळ साउली ।
म्हणुनि कोपुनी नदीकिनारीं रातबी राहिली ! ॥ २० ॥
निर्झरतीरीं रानजाइच्या फुलत्या कुंजातुनी ।
उठे मोहमय संगीताचा अस्फुट कोठें ध्वनी ! ॥ २१ ॥
कुठें थाट धनदाट कळकिचा, त्यांत सचरे कुणी ।
पुंगि बजावित फदि मुशाफर दर्यापुर सोडुनी ! ॥ २२ ॥
कुठें सुरंगीमुकुलकुलाच्या सस्मित वदनातुनी ।
दरवळलेल्या परिमळ सेवित फिरति अप्सरा वनीं ! ॥ २३ ॥
कोराटीचीं, नादवटीचीं, नेवाळीचीं फुलें !
फुलुनि कुठें फुलबाग तयानीं अवघे शृंगारिलें ! ॥ २४ ॥
नीललोचना कोंकणगौरी घालुनि चैत्रांगणीं ।
हिंदोळ्यावरि बसविति जेव्हां अंबा शुभदायिनी ॥ २५ ॥
हळदीकुंकू तदा वाटिता नसे प्रसादा उणें ।
पिकलीं म्हणुनी रानोरानीं करवंदें तोरणें ॥ २६ ॥

औदुंबर तरु अवधूताचा छाया दे शीतळ ।
शिवयोग्याचा वेल वाढवी भावभक्तिचें बळ ॥ २७ ॥
वघुनि पाढरी भूतपाळ वेताळ काढितो पळ ।
आइन किंजळ करिती मानिकमनमळा दुर्बळ ! ॥ २८ ॥
गडागडावर निवास जेथें माय भवानी करी ।
राहे उधाळित फुलें तिथे खुरचाफा चरणावरी ! ॥ २९ ॥
पानफुलाच्या वाहुनि माळा अंजनिच्या नदना ।
तिजवर वरुनी वैधव्याच्या रुइ चुकवी यातना ! ॥ ३० ॥
'चिंव चिंव' शब्दा करित निंगावर खार भराभर पळे ।
मेंडि -उडिणींवरी बैसुनी करकरती कावळे ॥ ३१ ॥
लज्जारंजित नवयुवतीच्या कोमल गालासम ।
रगुनि काजू, भरले त्यांनीं गिरि डोंगर दुर्गम ! ॥ ३२ ॥
तिथें मडलाकार मनोहर नर्तन आरभुनी ।
रुसल्या सखिची घुमत पारवा करितो समजावणी ! ॥ ३३ ॥
हसे उपवनीं अर्धोन्मीलित सुवर्ण चपककळी ।
पाडुनि तुळशींवरी चिमुकली हलती निज साउली ! ॥ ३४ ॥
केसर पिवळे धवल पाकळ्या, परिमल अबर भरी ।
घालित रुंजी भ्रमति भृंग त्या नागचंपकावरी ! ॥ ३५ ॥
सौगंधिक उच्छ्वास सोडिती प्राजक्ताच्या कळ्या ।
लाजत लाजत हळुच उघडिता निज नाजुक पाकळ्या ॥ ३६ ॥
त्या उच्छ्वासा पिउनि निजेचा स्वाद हर्षनिर्भरीं ।
होउनिया बेभान नाचतो निळावतिच्या घरीं ! ॥ ३७ ॥
धुंद सिंधुला मारवेलिची मर्यादा घाटुन ।
उभीं सैकतीं कोंकणदेवी शरित तळकोंकण ॥ ३८ ॥
निकट माजलीं निवडुगाचीं वेटें कटकमय ।
आश्रय ज्याचा करुनि नादती कोंचिंदे निर्भय ॥ ३९ ॥
मागें त्याच्या डुले नारळी पोफळिचें आगर ।
पुढें विराजे निळावतिचें निळेंच जलमंदिर ! ॥ ४० ॥

राष्ट्रदेविचें निसर्गनिर्मित ऐसें नंदनवन ।
सह्याद्रीच्या तळीं शोभतें हिरवें तळकोंकण ! ॥ ४१ ॥

इ. स. १९२१

## ५

## आंगरेकालीन विजयदुर्ग ऊर्फ घेरिया

जाम्या खडकावरीं कालवें त्यांवरुनी खेकडे ।
पहात फिरती जियें ढाळत्या स्वप्रतिबिंबाकडे ॥ १ ॥
कमलमीन भयहीन उघडुनी निज पाकळि पाकळी ।
नवल करीती कुणी रेखिल्या पुलिनीं रंगावळी ॥ २ ॥
तेथें होता दुस्मानाला अखंड वितरुनि भया ।
दर्यावर दावीत दरारा विजयवंत घेरिया ॥ ३ ॥
उत्तरेस आ पसरुनि बसला प्रचंड रत्नागिरी ।
दक्षिणेस करवीरकरांची शिवलंका सागरीं ॥ ४ ॥
मध्यें शोभे मरकतगिरिच्या मणिमय सिंहासनीं ।
सत्ताविस दुर्भेद्य गडांचा राजा तळकोंकणी ॥ ५ ॥
शिरीं पाचुचा किरीट हिरवा भेदी गगनाप्रती ।
द्रवमय होउनि इंद्रनीलमणि चरणरजा क्षालिती ॥ ६ ॥
दोन बाजुला हुकुमी बंदे शौर्याचे सागर ।
मर्द खडे यशवंत देवगड वाराया चामर ॥ ७ ॥
मध्यें विलसे घेर तिहेरी कोटाचा घालुनी ।
सत्ताविस रणमस्त हुड्यांचा राजा तळकोंकणी ॥ ८ ॥
प्रशांत उत्तर तटीं पसरलें वैजयंतिचें जळ ।
चाले दक्षिणतटीं जलधिची खडकातुनि खळबळ ॥ ९ ॥
पूर्व दिशेला खंदक नेई आस अरीची लया ।
पश्चिमाब्धिवर दावि दरारा विजयवंत घेरिया ॥ १० ॥

साजसकाळीं सोनावंती कुरवाळीते करीं ।
अस्मानाला लावुनि झुल्त्या जरतारी झालरी ॥ ११ ॥
उधळुनि सविनय फुलें फेनमय करित मंजुगायन ।
घेति सदोदित सिंधुकन्यका चरणावरि लोळण! ॥ १२ ॥
समीप शोभति शेवालाची शाल पांघरुनि शिळा ।
क्षमशा याचित तिथें राहिला भयार्त सागर निळा! ॥ १३ ॥
निळ्या मस्तकांवरीं सावरुनि निळें नभोमंडळ ।
चमत्कार हा बघे कौतुकें निळाच सह्याचळ! ॥ १४ ॥
रणफंदी जरि खंदि शिबंदी बुरुजाबुरुजावरी ।
ठायीं ठायीं हेटकऱ्यांचा खडा पाहारा तरी ॥ १५ ॥
तटीं तटीं विक्राळ वाघिणी डोकावुनियां पुढें ।
उघडुनि जबडे नजर भयंकर लाविति दर्याकडे ॥ १६ ॥
आशेचा अवकाश शतावधि चाप खडाखड उडे ।
निळ्या सागरीं निळाच पाउस सीमेपरता पडे! ॥ १७ ॥
गोलंदाजी बरकंदाजी गुणीं न अणुही उगा ।
लावि पिटाळुनि दूर अनाहुत पाण्यांतिल पाहुणा ॥ १८ ॥
शिवशाहीचा कदीम सेवक, कोकणचा जागली ।
धारकरी समशेरजंग जगिं कीर्ती विस्तारली ॥ १९ ॥
मत्स्य रुपेरी जिथें खारवी पसरुनि पुळणीवरी ।
चांदीनें मढविती आपुलें प्रियबंदर सारवरी ॥ २० ॥
घुमुनि सागरीं तिथें गर्जना करि भूशिर त्रोरिया ।
गाजी गोलंदाज आमुचा विजयवंत घेरिया ॥ २१ ॥
न्हइंदरचें गुलजार पांखरूं भिरभिर जेथें फिरे ।
भीरु भेकरें उभ्या दुपारीं निर्भय चित्तें फिरे ॥ २२ ॥
पानफुटींवर टांगुनि तेथे कंदिल चिमणे चिनी ।
खद्योतांचे दिवे चिमुकले वृक्षांवर लावुनी ॥ २३ ॥
नाचत चंदनहिरा वनाई गाणें गाती वनीं ।
बाका बरकंदाज घेरिया राजा तळकोंकणीं! ॥ २४ ॥

उमलति अंग त्यात नव्यानें सचरलें यौवन ।
पिकल्या अळुसम जिचे शोभती कांवळेच जोबन ॥ २५ ॥
चारित गाई वना मागनी फिरता ती सावळी ।
जिथ प्रीतिचा मादक पेला पिउनि जाहली खुळी ॥ २६ ॥
गोमाऱ्याची तिथ पावरा बोल्तसे लीलया ।
'धन्य धारकरि वैजयतिचा विजयवत घरिया' ॥ २७ ॥
राखित पहिलें द्वार उभा बजरगब्ली मारुती ।
दुसऱ्या द्वारावरी गाजती साहेबी नौबती ॥ २८ ॥
तिसऱ्या द्वारीं फरा सदोदित समशेरींचा उभा ।
आत राहिले धनि दुर्गाचे राखित कांकणसुभा ॥ २९ ॥

इ स १९२२ —'गीतमाधव' मधून

## ६

### तारापूरचा रणसग्राम

तुडुम् तुडुम् हा झडे नगारा । एल्गाराचा देत इशारा !
भगवा झेंडा उडे फरारा । एल्गाराचा देत इशारा !
मर्द मराठे ! उठा ! उठा तर ! गर्जत हर ! हर ! चला करा सर
बुलदनाका गढ तारापुर ! ॥ १ ॥
तीन गाजुला खदक खोल । चवथ्या गाजुस पाणी लोल
आत जिवाचें घ्याया मोल । उड्डाणोत्सुक आयस गोल ।
भय न तयाचें तुम्हास तिळभर । आद्यशक्तिचे तुम्हीं किंकर ।
उठा ! करा सर गढ तारापुर ! ॥ २ ॥
धर्मरक्षिका माराष्ट्राची । प्रसन्न अम्बा तुम्हा साची
वर पुण्याई शिरपायाची । भीति न उरवी फिरगियाची ।
सैतानी अवलाद भयकर । कहर उडविते करुनि इथें घर ।
करा तिचा सर गढ तारापुर ॥ ३ ॥

अयंत्राची तमा कुणाला ? । क्वचिदिल पापी नादानाला !
अयंत्राची तमा कशाला । शिवशाहीच्या रणमर्दाला ?
सुलतानी जे धर्म जगावर । अन्य धर्म ज्या सह्य न पळभर ।
गुलाम त्याचे चिरा चराचर ॥ ४ ॥
महाराष्ट्र सद्धर्मरक्षणीं । वेंचुनि गेले तनुमनवाणी
बघति तुम्हा ते पूर्वज वरुनी ।
पहावया हा अपूर्व सगर । वरवर चढतो नभीं दिवाकर ।
मर्द मराठे ! उठा ! उठा तर ! ॥ ५ ।
साडीमधल्या माडीमाजीं । सूत्रधार रणधीर चिमाजी
असख्य त्याच्या ताबिन गाजी । । 'कल्‍अरीची' म्हणती 'भाजी'
पवार शिंदे शूर होळकर । फौजदार सर्दार मातबर ।
एल्गाराला उठले सत्वर ! ॥ ६ ॥
एकामागुनि एक अतर्रे । सुरुग नामी उडती सारे
बद गडाचीं दोन्ही द्वारें । तगास पडली परि गिहारें
हाल्ला लागला गर्जत 'हर ! हर ! ' । मराठियाचा सेनासागर ।
डुनवायाला गढ तारापुर ! ॥ ७ ॥
सुरुगनिर्मित दारीं दारीं । निघे घुसाया सेना सारी
गनिमाचा परि मार भारी । करुनि करामत दावी न्यारी !
वरुनि कोसळे आग भयकर । थरकुनि वोले मराठि लष्कर ।
अजिंक्य बाका गढ तारापुर ! ॥ ८ ॥
तुडुम् तुडुम् तरि झडे नगारा । एल्गाराचा देत इशारा !
भगवा झेंडा उडे फरारा । एल्गाराचा देत इशारा !
चढले तेणें स्फुरण अनावर । गर्जत चाले पुनरपि लष्कर ।
करावया सर गढ तारापुर ! ॥ ९ ॥
सदकावरी साक् पडती । त्यांवरुनी रणधीर धावती !
कित्ती अधोगति जाता घेती । तमेच परि सावरुनी उठती
गर्जत 'हर हर ! जय जय शंकर !' । मागहूनि धावे लष्कर ।
करावया सर गढ तारापुर ॥ १० ॥

गडी विनीचे हिंमतदार । क्षणात झाले सदकपार!
*सुगत न एकहि परि सिंडार । वर्षति गोळ्या तिथे अपार!*
अगणित होके उडति भराभर । आतित राहे आग निरंतर ।
बुलदनाका गढ तारापुर ॥ ११ ॥

गोळ्याची त्या तमा कुणाला? । कचदिल पापी नादानाला
होक्याची त्या तमा कुणाला? । पिंडचि ज्याचा गुलाम त्याला!
शाणव कुळिंचे समरधुरंधर । सिंडारावरि घुसले सत्वर!
*करावया सर गढ तारापुर* ॥ १२ ॥

फर्री घेउनी फिरग नगी । धावत आला मस्त फिरंगी
सिंडारी रण माजवि जगी । खिस्त गुरूचा चेला ढगी ।
तळहातावर घेउनिया शिर । लढे फिरंगी दावी क्षणभर ।
अजिंक्य नाका गढ तारापुर ॥ १३ ॥

*तुडुम् तुडुम् तरि झडे नगारा । एल्गाराचा देत इशारा!*
*भगवा झंडा उडे फरारा । एल्गाराचा देत इशारा!*
तळहातावर घेउनिया शिर । लढति भवाचे भगवे किंकर ।
करावया सर गढ तारापुर ॥ १४ ॥

फिरंगियाचा नुतरे ताठा । हटे न मागे मर्द मराठा
*असेल ज्याचा सत करटा । अपेश त्याचा ठरला वाटा!*
रणात पडले किती वीरवर । सिंडारीं तरि झुंज मातब्बर ।
बुलन्दनाका गढ तारापुर ॥ १५ ॥

उपाय सारा करा अपाया । सीमेपरत माणुस जाया!
*तरिही ईर्ष्या मनीं शिपाया । भगवी दीक्षा गढास द्याया!*
इरेस आले मराठि लष्कर । तटास लाउनि शिड्या भराभर ।
झटे घ्यावया गढ तारापुर ॥ १६ ॥

करावयाला मर्दामर्दा । शिड्यावरोनी झाली गर्दा!
शिड्याच लाटुनि ता रिपु दर्दी । खचवि मराठी हिंमत अर्धी ।
विजयवंत नित सत झेवियर । फिरंगियाचे गर्जे लष्कर ।
अजिंक्य नाका गढ तारापुर ॥ १७ ॥

तुडुम् तुडुम् तरि झडे नगारा । एल्गाराचा देत इशारा!
भगवा झेंडा उडे फराग । एल्गाराचा देत इशारा!
चेव येउनी उठले वेडर । शिवशाहीचे उग्र हरिग ।
करावया सर गढ तारापुर ॥ १८ ॥

समर्थ गुरुचे समर्थ चेले । एल्गाराला तयार झाले!
नर्केदाजी दुरुस्त चाले । फिरंगियाचे फिरले ताले!
रक्षु शकेना सत झेवियर । धुतोड दुस्मन् मरुनि भगभर ।
शिडी लागली पुनरपि सत्वर ॥ १९ ॥

निशाण भगवें घेउनि हातीं । चढे तटावर एक पदाती
लागुनि गोळी परी ललाटीं । गतप्राण तो पडे खालतीं।
चढले दुसरे जगनहादर । ठरे न एकहि तरी तटावर ।
बुलंद बाका गढ तारापुर ॥ २० ॥

मर्दानें बहु आले कामीं । क्षणभर पडली शिडी रिकामी!
गाजवावया तोंच मर्दुमी । धीट धारकरि उठले नामी।
उदार होउनि निज जीवावर । चढुनि तटावर करिती सत्वर ।
भगवा दीक्षित गढ तारापुर ॥ २१ ॥

ढालेवरतीं झेलित गोळी । काबिज केली प्रथम सफेली ।
ढालेवरतीं झेलित गोळी । गढात शिरले उतरुनि खालीं!
गनिमाला तव चिरुनि चराचर । खिंडारातुनि घुसलें लष्कर ।
करावया सर गढ तारापुर ॥ २२ ॥

आतिल मेढेकोट फोडिला । उगारिला अरि सर्व तोडिला!
जनार्मर्दिनें बुलंद किल्ला । फिरंगियाचा काबिज केला!
विजयानंदें गर्जे लष्कर । 'असो कितीही वसई मातबर ।
दशा अखेरिस हीच तिचिही पर' ॥ २३ ॥

जामुद सुटले कळवायाला । उत्रपतीला श्रीमंताला ।
धर्मद्वेष्टा कटुनी मेला । स्वामींच्या यश तलवारीला!
भगवा झेंडा धरुनि शिरावर । शिवशाहीचा बनला किंकर ।
बुलंद बाका गढ तारापुर! ॥ २४ ॥

इ.स.१९२५

## जयकृष्ण केशव उपाध्ये

[ इ. स. १८८३–१९३५ ]

### उत्कंठिता

त्याच्याच पावलाचा । हा नाद ओळखीचा ।। ध्रु ।।
ही शांत रम्य वेळ । नभिं चंद्रमा उदेला । केव्हाच यावयाचा ।।
अजि भाग्य लोचनांचें । पाहीन मोहनातें । आला सखा जिवाचा ।।
कमलें सरांत खुललीं । कुसुमें वनात फुललीं । सत्कार हा तयाचा ।।
जरि येइ तो लपूनी । तरि सृष्टि ही हंसूनी । कळवीच मार्ग त्याचा ।
दूरावल्या सुखाला । बहु जीव हा भुकेला । ये काल भोगण्याचा ।।
येतो सखा हसूं का । क्षण काहिं वा रुसूं का ? । रुसवा हसावयाचा ।।
लटकें रुसून काहीं । क्षण बोलणार नाहीं । हा मान मानिनीचा ।।
कवटाळुनी तनूला । कुरवाळिता हनूला । रुसवा टिके कशाचा ? ।।
मग ही कराब्जमाला । अर्पीन राजसाला । भर पूर्ण तो सुखाचा ।।
हृदयात लोचनांनीं । घेईन साठवोनी । आनंद तो जिवाचा ।।
विसरून जीवभावा । देईन आत्मदेवा । तांबूल चुंबनाचा ।।
मनबुद्धिइंद्रियांनीं । जाईन त्या मिळूनी । विरहास ठाव कैंचा ।।



## गुणवंत हणमंत देशपांडे

[ जन्म इ. स. १८९६ ].

गोंधळी मराठा गडी। दास्यदेहुडीं। गाइ गाणें
निज महाराष्ट्र बोलीनें। उज्वल ! ॥ १ ॥
येइ गे भवानी आई। गोंधळा
शिवनेरीच्या शिवबा ये। गोंधळा
तानाजी ! बाजी ! या हो। गोंधळा
निज सेनेसह रणधीर। भाऊ ! मल्हार ! । भरारी ! या
या उदोकार गर्जाया। उदयाचा ! ॥ २ ॥
परदास्य निशा चौफेर। पसरली
स्वातंत्र्यभक्ति दिवटी ही। उजळली
कुळदैवत अंबाबाई। पूजिली
मांडिला गोंधळ स्वैर। कथा साचार। आयकावी
गतवैभवस्मृति जी देई। सकळिकां ! ॥ ३ ॥
गेले राम अयोध्या गेली। विलयाला !
स्मृति मात्र तयांची राही। आजला
स्मृति दुःखद तरि ती व्हावी। स्मरणाला
स्मृति दुःखद तरि ती होई। स्वभाव न राही। प्रकृतिचा
स्मरणीय पुन्हां स्मरण्याचा। सर्वथा ॥ ४ ॥
गोकुळीं कृष्ण भगवान। जन्मले
गोपिका-रुचिर लावण्य। विकसले
प्रेमाचे प्रेमळ रंग। उधळिले
तो नंदलाल रंगेल। खेळला खेळ। कौतुकाचे
हो स्मरण आजही त्यांचें। पावन ! ॥ ५ ॥
शतकौरव पांडव राजे। गजपुरीं
नांदले धरुनिया वैर। अंतरीं
झुंजले भयंकर झुंज। आसुरी !
झुंजले आसुरी झुंज। समरमदरंग। वीर त्याले
स्मृतिशेष परी ते झाले। सकळही ! ॥ ६ ॥

शशिगुप्त हर्ष नृप भोज । नादले
यश विभव भरतभूमीचें । वाढलें
वैखरी ललितपद चपल तदा । नाचले
प्रासाद गगन चुंबिती । मतगज झुलती । महाद्वारीं
नौबतिच्या झडती फेरी । गोपुरीं ! ॥ ७ ॥
गाताति साम सन्मत्र । ब्राह्मण
गर्जती यशोगुण गान । चारण
वर्णिती पराक्रम कवनीं । कविजन !
दुदुभी गर्जनी घोर । भेरि बभोर । भरे गगनीं
प्रतिनाद तयाचा अजुनी । स्मरतसे ! ॥ ८ ॥
पृथुराज सकल जगतात । विख्यात
दावुनी शौर्य समरात । अद्भुत
जलवलयांकित धरणीला । शासित
तें वैभव त्या कालींचें । शौर्य समरींचें । कोण साचें
वदु शकेल अपुल्या वाचें । सखही ! ॥ ९ ॥
बदलला काळ तो थोर । जेधवा
रिपु घालिति घिरट्या स्वैर । तेधवा
संग्राम माजले घोर । तेधवा
लोपलें तदा स्वातंत्र्य । होई परतंत्र । देश सारा !
दैन्याचा सुटला वारा । चहुकडे ! ॥ १० ॥
परदास्य निशातम घोर । दुस्तर
सारुनी दूर चौफेर । सत्वर
उगवला जीवनाधार । भास्कर !
नवजीवन जगतीं भरे । तेज संचारे । दिशा दाही
ऐक्याची मुक्तिची द्वाही । चहुकडे ! ॥ ११ ॥
दिनरात्र भूप भाग्याचा । भूवर
तळपला समग्रमार्तंड । निर्भर
ध्वज रोंवी स्वातंत्र्याचा । गुणवर

सौभाग्य पुन्हां लाभलें । दिवस पातले । वैभवाचे
झळक्ती कळस सोन्याचे । मंदिरीं ! ॥ १२ ॥

मावळा कांबळीवाला । मावळा
शूरांत शूर तो झाला । मावळा
दरडावी सुलतानाला । मावळा
मावळा शूर सरदार । छाति भरदार । नजर करडी
फोडितो शत्रुची नरडी । संगरीं ! ॥ १३ ॥

शिंद्यांची दिल्लिंत चाले । हुकुमत
बंगाल रघूजी राजे । जिंकत
पेशवे रोविती झेंडा । अटकेत
चहुंकडुनी चढला थेट । मराठी थाट । भारताला
साम्राज्य चढे कळसाला । तेधवा ! ॥ १४ ॥

क्षय पुण्याईचा झाला । अवचित
उगवला सूर्य मावळला । अवचित
ध्वज उभारिला कोसळला । अवचित
परदास्यघूक ओरडे । वीज कडकडे । अवनतिची
पसरली रात्र काळाची । भेसुर ॥ १५ ॥

पुण्याचा सनय होता । जोंवर
उत्कर्ष होय राष्ट्राचा । तोंवर
उलटली घडी दैवाची । नंतर
तें स्मरण कशाला आता । संपली कथा । वैभवाची
गेलेल्या स्वातंत्र्याची । सुनकर ! ॥ १६ ॥

भूतकाल वैभवशाली । लाभला
पुढलाही ये भाग्याचा । त्याजला
नियम हा हृदयिं ठेवावा । चांगला
आपदा नसे शाश्वत । साह्य भगवत । दुर्बळाला
कर्तव्यपरा धीराला । निश्चयें ! ॥ १७

उदयोस्तु सदा अंबेचा । उदयोस्तु !
उदयोस्तु सदा शिवबाचा । उदयोस्तु !
उदयोस्तु समरगाजींचा । उदयोस्तु
उदयोस्तु जन्मभूमीचा । वदा महाराष्ट्र दौलतीचा । गलेल्या स्वातंत्र्याचा
उदयोस्तु ! ॥ १८ ॥

इ. स. १९२२

## बलवंत हणमंत पळशीकर

[ जन्म इ. स. १९०१ ]

### मानसपूजा

स्वेदकणाच्या मौत्तिकमाला खुलता निटिलावरी ।
कशाला हार फुलाचा करीं ? ॥
रम्य उषेची कोमल काती प्रभात समयातली ।
रगली नाजुक तव पाउली ॥
तींच पाउलें सदा चिंतिता देवी! हृदयातरीं ।
अन्यथा माझी नच वैखरी ॥
नित्रासम ती निश्चल झाली हरिवचना ऐकुनी ।
करी मग पूजा मनिच्या मनीं ॥

इ. स १९२४ —मनोरजन

## आत्माराम रावजी देशपांडे (अनिल)

[ जन्म इ. स १९०१ ]

### १

### आवाहन

घघ घटिका भरली आता आयुष्याची !
उगवली निजेची कोर निराश चकोर करुनि मावळली
उमलली कळी, क्षण खुलले, उगिच खुलविली, गळुनि ना पडली !
दवर्बिंदु निमिष चमकला, अश्रु मिसळला, सहजता गेली
क्षणभरी मुखावरि हास्य, विलसले लास्य, खिन्नता आली
एकेक घडी मोलाची, खुल्या बोलाची, आजवर होती
निर्बंध, चहुकडे बध, आता सबध, कशाला जगतीं ?
करि त्वरा आता पाखरा, जरी तू खरा, निघुनि जाण्याची
स्वर्गात बसुनि मी गात वाट किती पाहात तुझ्या येण्याची

इ. स. १९२२ — 'फुलवात' मधून

२

## हिंवाळा

चढली शिशिर ऋतूची कळा । आली सृष्टिवरी अवकळा
सुटले सोसाट्याचे माघामधले वारे । गोठलें हिमाद्रिंत गंगाजल कीं सारें
भरली हरिणांना हुडहुडी । ससेही देउनि बसले दडी
*सृष्टीला भरलें हींव थरथरे अंग । लोपले धुक्यातच सर्व उदेचे रंग*
मिटल्या वेलीवरच्या कळ्या । फुलांच्या झडल्या कीं पाकळ्या
उपवनिंचा गेला बहर सर्व ओसरुनी । कोपांतच पडलीं फूलपाखरें मरुनी
गारठल्या राघू मैना । पसरे फुलांफुलांवर दैना
झाडांची गळली पात लता भयभीत । कंठातच थिजलें कोकिलमनिंचें गीत !

इ. स. १९२५ — 'फुलवात' मधून

* * *

३

## पहिला पाऊस

येत हा पाऊस येत पाऊस । मातीचा सुटला सुप्त सुवास
झाडांवात वाहे उठे वादळ । आभाळास मिळे पृथ्वीची धूळ
मेघांनीं भरून आकाश वाके । भूमीस आपल्या छायेंत झाके
अवनित लवे वीज साजिरी । होतसे मीलन अभ्रांच्या सरीं
गरजे ढगसे आसुरलेला । पहिला पाऊस उल्हासलेला
आला हा पाऊस आला हा पाऊस । मातीचा भरला उन्मत्त वास

इ. स १९४७ — 'येतं व्हा' मधून

# वामन मंगेश दुभाषी (ऋग्वेदी)

[ इ. स. १८७७–१९४२ ]

## अभंगगीतांजली

### गीत याविसावें

सर्वांमार्गे कोठें सांग लपलासी । मार्ग प्रतिक्षिसी कोणाचा तू ॥
गणोनि न तूतें धूलीच्या पायांनीं । तुजसि लोटोनी जाती लोक ॥
पूजापात्रीं माझ्या कुसुमें घालोनी । बैसलें येवोनी तरुमूलीं ॥
जाता येता माझीं पुष्पें नेती जन । झालें पुष्पहीन पूजापात्र ॥
गेला प्रातःकाल माध्यान्हहि गेला । आता प्राप्त झाला संध्याकाल ॥
अंधार पडता नेत्र मिटतील । मजसि येईल घोर निद्रा ॥
जन सारे घरा जाता परतोनी । मजला पाहोनी हसतील ॥
वाटे लज्जामुख पल्लवें झाकोनी । जैसी भिकारीणी बैसलेंसे ॥
काय तूं वाछीसी विचारीतिं जन । तयासि कथन काय करूं ॥
निरुत्तर येथें बैसले श्रमित । नेत्र अवनत करुनीया ॥
कैसें सांगू जना तुज मी वांछितें । मार्ग प्रतीक्षीतें तूझा ऐसे ॥
लागलासे ध्यास तुझा रात्रंदिनीं । मज तू येवोनी भेटशील ॥
राजैश्वर्य तूझें परि माझें दैन्य । करीन अर्पण तूझ्या पायीं ॥
सागू कैसें जना अंतरींचें गुह्य । वियोग असह्य झाला मज ॥
तुझीया प्रेमाचा अभिमान मनीं । सदा अभागिनी वागवीन ॥
तृणासनिं येथें बैसोनि गगनीं । न्याहाळिता मनीं भास झाला ॥
स्वप्नाभास झाला मजकडे येसी । प्रेमें भेटायासी ऐसा प्रभो ॥
यापरि विपूल सिद्धता करोनी । येसी का धावोनी अकस्मात ॥
तुझ सर्व तेज प्रदीप्त जाहलें । रथावरि हाले स्वर्णध्वज ॥
ऐकू येती गोड आलाप वेणूचे । गोड संगीताचे तुझ्या संगें ॥
तुझिया प्रतापें वसुधरा हाले । आनंदानें डोले प्राण माझा ॥

स्रवति अजस्र लक्षविध जेथ । शुद्ध अविरत कर्मधारा ॥
देशोदेशीं सर्व दिशामाजि कर्में । पूर्णत्वार्थ नेमें धाव घेती ॥
जेथ न बुझाला ओघ विचाराचा । तुच्छ आचाराच्या वाळवंटीं ॥
जेथ पौरुषातें वाव मिळे सदा । कर्तृत्व शतधा प्रगटतें ॥
सकल कर्मांची चिंता तू वहासी । योग्य मार्गी नेसी जना येथ ॥
करीं निजहस्तें निर्दय आघात । चेतवी भारत तेथ स्वर्गी ॥
स्वर्गी या उत्तम जागवीं भारता । प्रभो विश्वनाथा मायबापा ॥

इ. स १९२८

## गोविंद रामचंद्र हिंगणेकर

[इ. स. १८८८–१९३१]

### जिंकली अखेर आज खरी !

मरुभूमीवर सुधाजलाची घनवृष्टी झाली !
नवजीवन सचरे ! क्षणार्धी मुखकमलें खुलली ॥ १ ॥
दु स्वप्नें वितळलीं ! उदेला मगलमय सविता ।
बाजी उठुनी नसे, लाभलें नवयौवन आता ॥ २ ॥
हर्षभरें पाहिलें सकळिका चिंता जाय दुरी ।
भ्रात न कोठे उरे जिंकली अखेर आज खरी ! ॥ ३ ॥
परमेशा वदिलें अतरीं अतुल हर्ष दाटे ।
अनिर्वाच्य आनद लोचना बाष्पपूर लोटे । ॥ ४ ॥
प्रतिध्वनीहह उचबळे तो हर्षोदधि भव्य ।
श्रुतिस्मृतींचे वर्णी नादले मत्र पुन्हा दिव्य ! ॥ ५ ॥
कृतार्थतेनें जीव तोषला नमिला शिवराणा ।
प्राण व्यसनीं सुखी राहिला जो राष्ट्रोद्धरणा ! ॥ ६ ॥

रणांगणा वाहिला फुलाजीराव वधुराज ! ।
प्रणाम तोही तयास झाला शेवटचा आज ! ॥ ७ ॥
मुलें माणसें प्रिय तीं आता आठवलीं घरचीं ।
स्मृतिपटलावरि राग लागली प्रेमळ जीवाची ॥ ८ ॥
प्रभुपायीं वाहिलीं जनें ती भेट मनोमय ही ।
अखेरची या देहीं ! मिळणें संधि पुन्हा नाहीं ! ॥ ९ ॥
यमधर्मा ! अनमान आता का ? रोष मनीं न धरी ।
नेली माझी करी आपली तूही कामगिरी ! ॥ १० ॥
अतर्क्य हे वदुनि भागला देह पडे खाली ।
गात्रें झालीं थंड गतीही श्वासाची थक्ली ॥ ११ ॥
आणि जियेची प्रभा फाकली अविनाशी जगतीं ।
विझली उद्दीप्त ती अखेरी दिव्यतमा ज्योती ॥ १२ ॥

—पावनखिंड (इ. स. १९२७), भाग सातवा, ओळी १४७-१७०

## हरिहर गुरुनाथ सलगरकर (कुंजविहारी)

[ जन्म इ. स. १८९६ ]

### भेटेन नऊ महिन्यानीं

मनिं धीर धरी शोक आवरी जननी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥ ध्रु ॥
या न्यायाची रीत मानवी असते । तरि ठरते येच्छा चुकते ॥
किति दुर्दैवी प्राणी असतिल असले । जे अपराधाविण मेले ॥
लाडका बाळ एकुलता । फाशीची शिक्षा होता । कवटाळुनि त्याला माता ।
अति आक्रोशे रडते येविलपाणी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥ १ ॥
किति वेळ असा शोक करिसि ग अवला । दे निरोप मज जायाला ॥
होईल पहा विफल तुझा आकान । बाहेर उभे यमदूत ॥

ते चाकर सरकाराचे । नच उलटे काळिज त्यांचें । परि शरमिंदे अन्नाचे ।
तुजपासुनिया नेतिल मज ओढोनी । भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ २ ॥
तुज सोडुनि मी जाइन कां गे इथुन । परि देह परस्वाधीन ॥
वच बोलति हे बोल मुक्या भावाचे । मम दोरखड दंडाचे ॥
अन्नपाणि सेवुनि जियलें । हें शरीर ज्या पोशियलें । परदारिंच देश तो लोळे ।
स्वातंत्र्य मला मिळेल मग कोठोनी । भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ ३ ॥
का परक्याला बोल उगिचं लावावा । दैवानें धरिला दावा ॥
लाभेल कधीं सांग कुणाला जगतीं । या जळत्या घरिं विश्रांती ॥
घेउनी उशाला साप । येईल कुणाला झोप । हा सर्व ईश्वरी कोप ।
ही परवशता करिते भयंकर करणी । भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ ४ ॥
मज फाशीची शिक्षा दिधली जाण । न्यायाचा करुनी खून ॥
या मरणाची मौज कशी वच असते । सांगेन तुला मी माते ॥
मी राजपुत्र दिलदार । घेऊन करीं समशेर । भोंवतीं शिपाई चार ॥
करितील अता स्वागत जन मैदानीं ।.भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ ५ ॥
मजसाठिं तिथें सिंहासन निर्मियलें । त्या एका खांबावरलें ॥
मी वीर गद्दी चढेन गे त्यावरतीं । इतराची नाहीं छाती ॥
इच्छिली वस्तु द्यायाला । अधिकारी तैनातीला । प्राणापरि जपती मजला ।
या दुनियेची दौलत लोळे चरणीं । भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ ६ ॥
या सर्वांचें मजवर भारी प्रेम । देतात खडी ताजीम ॥
हें वैभव मीं विकत घेतलें सारें । देउनी मोल जीवाचें ॥
या गळ्यातला गळफास । देईल घडीभर त्रास । लाभेल मुक्ति जीवास ।
वरि जाइन मी लाथ जगा हाणोनी । भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ ७ ॥
या देहाची करु कशाला चिंता । होइल तें होवों आता ॥
कुणि करुणेचे सागर हळहळतील । कुणि हंसणारे हंसतील ॥
अश्रूंनीं न्हाऊं घाला । प्रेमाचें वेष्टन त्याला । मानीचा मोहक पुतळा ।
जाईल पहा क्षणात मातींत मिळुनी । भेटेन नऊ महिन्यांनीं ॥ ८ ॥
सांगतों तुला शपथ घेउनी आई । मरणाला भ्यालों नाहीं ॥
आठवी मनीं श्रीगीतेचें सार । की नश्वर तनु जाणार ॥

हृदयाचे मोजुनि ठोके । बघ शांत कसे आहे तें । वाईट वाटतें इतुकें ।
तव सेवेला अंतरलों मी जननी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥ ९ ॥
माउली तुझा नव्हे नव्हे मी कुमर । पूर्वीचा दावेदार ॥
तव सौख्याच्या वाटेवर निर्मियले । दुःखाचे डोंगर असले ॥
नऊ मास भार वाहुन । बाळपणीं बहुपरि जपुन । ससार दिला थाटुन ।
परि बनलों मी रचित अभागी प्राणी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥ १० ॥
मम बाळ गुणी वृद्धपणीं बहु साल । आम्हाला साभाळील ॥
तव ममतेचे बोल ऐकिले असले । परि सारें उलटें झालें ॥
माउली विनती तुजला । साभाळ तिला बाळाला । नच वजवे तिकडे मजला ।
हा कठिण गमे प्रसग मरणाहूनी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥ ११ ॥
लाभतें जया वीरमरण भाग्याचें । वैकुंठपदीं तो नाचे ॥
दे जन्म मला मातृभूमिचे पोटीं । पुन्हा पुन्हा मरण्यासाठीं ॥
मागेन हेंच श्रीहरिला । मातृभूमि उद्धरण्याला । स्वातन्त्र्यचरणिं लढण्याला ।
तव शुभ उदरीं जन्म पुन्हा घेवोनी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥ १२ ॥
मग यमदूतें ओढुनि त्याला नेलें । न्हायाचें होउनि गेलें ॥
परि त्या ठायीं शब्द उमटती अजुनी । भेटेन नऊ महिन्यानीं ॥
रात्राला फुटतिल फाटे । मृदुमुमसम होतिल काटे । हिमगिरिला सागर भेटे ।
परि परवशता सुखकर झाली नाहीं । दे कुजविहारी ग्वाही ॥ १३ ॥

इ. स. १९२६ —'गीतगुंजारव' मधून

# गोपाळ गंगाधर पोतदार ( मनोहर )

[ जन्म इ. स. १८९६ ]

## १

## दुर्दैव

दर्या तुफान अफाट । वरि नाचरीहि लाट !
पाऊस भरमसाट । घुमवीत वात पाठ !
काळोख हाय दाट । उमजे मुळीं न वाट !
चल साजणी घराला । कवळी गळ्यास माला ! ॥
पसरेहि काळरात । दावीत वीज दात !
अंधार आभाळ ग्रात । रडते अभागि प्रीत !
गेले थकून हात । वरि कमनशीन मात !
चल साजणी घराला । कवळी गळ्यास माला ! ॥
ओठास लावि ओठ । कवळी गळ्यास घट्ट
डोळ्यात पाहि नीट । आता पुन्हा न भेट
बांधी न लग्नगाठ । जगतात प्रीत धीट
जाऊ चला घराला । बेभान मर्द झाला ! ॥
दर्यात या फिरावें । दुनियेस वीसरावें
नयनीं स्वरूप भरावें । मनि प्रेमगीत गावें
प्रिय प्रीतिच्याच नावें । ऐसे मरूनि जावें
जाऊ चला घराला । कवळी गळ्यास बाला ! ॥
गेली बुडून नाव । उरलें जगीं न नाव
दुर्दैव घालि घाव । मग होइ एक राव
जीवा कशास हाव । जगली न प्रेमगाव
दारुण प्रेमलीला । रडवी मनोहराला ! ॥

इ. स. १९२२

२

## कुमार-गायन

दोन आले सुकुमार बाल गात । गोड रामायण वाल्मिकीप्रणीत ॥
सभा ऐके गभीर शांतवृत्त । बालवाणीचें वीरकरुणवृत्त ॥ १ ॥
प्रणति चरणीं रघुवरामणी रामा । वीरविक्रांता, नृपति पूतधामा ॥
प्रजारजनिं गाठली उच्च सीमा । विश्व वदी आदरें रामनामा ॥ २ ॥
अग्निदिव्याचा घोर तो प्रसंग । बाल्वाणीनें करुणरसा रंग ॥
पुशीं डोळे हनुमान महावीर । शांत निश्चल श्रीराम महाधीर ॥ ३ ॥
अश्रु आले सौमित्रिलोचनांत । भरतशत्रुघ्न ऐकवे न गीत ॥
बसे आक्रंदित रामचंद्रमाता । 'कुठे माझी अजि शोधु दीन सीता?'॥४॥
वीर रडती, पुसतात मनिं डोळे । रामचंद्राचें वदन म्लान झालें ॥
गीत थावे, सुकुमार बाल दोन । सभास्थानीं बघतात निरखून ॥ ५ ॥
रामराजाला पुसति बाल दोन । कुठें वैदेही बैसली लपून ? ॥
वीरपुरुषाचे नेत्र भरुनि आले । कुठें वैदेही ? शब्द राम बोले ॥ ६ ॥
कंठ बाळाचा येतसे भरून । पुसति झाला कां वृथा निष्करुण ॥
त्याग कैसा केलात जानकीचा ? । होत गद्‌गद मग दोन बाल्वाचा ॥ ७ ॥
देव राणीचा त्याग कसा केला ? । कुसुमसुकुमारी पूत जनकबाला ॥
हृदय रामाचें मृदुल फार ख्यात । कसा केला हो जानकीचा घात ? ॥ ८ ॥
प्रजारंजन हें ध्येय रघुवंशीं । राजरंजन हें ध्येय ना प्रजेसी ॥
प्रजेसाठीं अन्याय घोर केला । जानकीचें कां स्थान प्रजीमेला ? ॥ ९ ॥
असो ऐशा धिःकार या प्रजेला । व्यथा रामायणवीरमानसाला ॥
रामचंद्राला शोक आवरेना । सभा लज्जेनें खालिं घालि माना ॥ १० ॥

इ. स. १९४४

# वि. स. खांडेकर

[जन्म इ. स. १८९८]

## १

### घरिं एकच पणती

घरिं एकच पणती मिणमिणती ।
    म्हणु नको उचल चल लगबग ती ॥
अगणित बाधव तव अधारीं ।
किर्र रान! भय भवती भारी ।
चरणिं जिवाणू मरे शिरशिरी ।
    यमदूत न कीटक किरकिरती! ॥ १ ॥
काळोखाच्या भयाण लाटा ।
उठती फुटती वारा वाटा ।
फेंस पसरला सारा काठा ।
    कुणि म्हणो तारका लुकलुकती! ॥ २ ॥
दिवे विजेचे धनिकमंदिरीं ।
प्रकाश पाडिति परोपरि जरी ।
स्नेहशून्य ते सदा अंतरीं ।
    का करिसि तयांची शिरगणती? ॥ ३ ॥
अखंड नंदादीप ज्योती ।
दगडी देवा सोबत करिती ।
नच बाहेरी क्षणभरि येती ।
    अप्सरा विलासी नसति सती! ॥ ४ ॥
धाव म्हणुनि तव घेउनि पणती ।
हृदय नाचु दे लिंबलोणती ।
सोन्याचें घर–दिसते माती ।
    रे पाहसि मागें वळुनि किती? ॥ ५ ॥

पहा पुढे या दीन लोचनीं ।
रविकिरणाचे स्मरण होउनी ।
आशा नाचे ज्योत दुज्या क्षणीं ।
जरि विझे तरि करी कोण क्षिती ? ॥ ६ ॥

इ. स. १९३४ —'उल्का' कादंबरींतून

२

काळरात्र

कड्कड कड्कड वीज कडाडे, कळे न कोठें पडे ।
झोप परि डोळ्यावरली उडे ॥
अंबरीं कोंडिल्या पजरिं कुणि वाघिणी ।
बाहेर येति त्या आता चवताळुनी
उसळती बिळातुनि पिवळ्या या सर्पिणी ।
वाऱ्याचे फूत्कार भयंकर कोसळती कीं कडे
बापडें मन खालीं सापडे ॥
काळरात्र विक्राळ मांडिलें तांडव चोहिंकडे ।

धरी मूर्तिमान मज लागे संजीवनी ।
फळमाळि तर निरस हास्य हें करिल काय बापडें ! ।
जोवरी कुशीत निजलें दडे ! ॥

इ. स. १९३५ —'मनमोहन' मधून

## खंडेराव भीमराव कुलकर्णी

[ जन्म इ. स. १९०७ ]

### श्रावण

श्रावण शिरवे सरसर गळती घुमला नभि नाद ।
आकाशाची गंगा सुटली फुटला जणु बांध ॥ १ ॥
भूमी धुपली जलधारांनीं गढुळलें पाणी ।
निघळत जाई भरवेगानें ओहोळच बनुनी ॥ २ ॥
हिरवळलेलीं कुरणें सुंदर गांवशिवाराचीं ।
बांधावरचीं फुलरंगी तीं भाटें गवताचीं ॥ ३ ॥
वनवेलींना तोंडें फुटलीं नवीन गोंड्यांचीं ।
तुषार त्यावर उडुनी शोभे माळ मोत्यांची ॥ ४ ॥
झाडाच्या डोलींत जाउनी लपलेले पक्षी ।
तोंड काढुनी वर्षावाची मौज जणू लक्षी ॥ ५ ॥
थरथरती देहात झुंबीनन शिरशिरिनें भारी ।
धीत सोडुनी धावत जाती वृक्षाच्या खालीं ॥ ६ ॥
बुरूज पडले त्यात उगवलीं रानें गवताचीं ।
जुनाट होत्या शिळा, भव्यता दावित पूर्वींची ॥ ७ ॥
भिंती पडक्या खिंडाराची भेसुरता भासे ।
वानराई त्या खिंडारातुन डोकावुनि हासे ॥ ८ ॥

## वासुदेव गोविंद मायदेव

[ जन्म इ. स. १८९४ ]

### गाइ घरा आल्या

गाइ घरा आल्या । घणघण घटानाद
कुणीकडे घालू साद । गोविंदा रे ? ॥ १ ॥
गाइ घरा आल्या । धूळ झाली चहूंकडे
घनश्याम कोणीकडे । माझा गेला ? ॥ २ ॥
गाइ घरा आल्या । वांसरें हंबरतीं
कुणीकडे बालमूर्ती । कृष्ण माझा ? ॥ ३ ॥
गाइ घरा आल्या । ब्रह्मानंद वासरांना
काय करूं माझा कान्हा । चुकला का ? ॥ ४ ॥
गाइ घरा आल्या । घोटाळती पाडसाशीं
हाय ! नाहीं हृषीकेशी । माझ्यापाशीं ! ॥ ५ ॥
गाइ घरा आल्या । पाडसास हुंगीतात
माझा मात्र यदुनाथ । दुरावला ! ॥ ६ ॥
गाइ घरा आल्या । आवरेना मुळीं पान्हा
राहणार भुका तान्हा । वासुदेव ! ॥ ७ ॥
गाइ घरा आल्या । दूध वाहे झुरुझुरु
माझ्या जीवा हुरुहुरु । मुकुंदाची ! ॥ ८ ॥
गाइ घरा आल्या । दूधवाटी राहियेली
कुणी माझा वनमाळी । गुतवीला ? ॥ ९ ॥
गाइ घरा आल्या । झालि थाई कातरवेळ
अजुनि कां घननीळ । ये ना घरा ? ॥ १० ॥
गाइ घरा आल्या । लावियेली सांजवात
बाळा दामोदरा रात । झाली न का ? ॥ ११ ॥

गाइ घरा आल्या ! पाल चूकचूक करी
रात्र अवे माझा हरी । असे तेथें ॥ १२ ॥

इ स १९२९ —' भावतरंग 'मधून

## गजानन लक्ष्मण ठोकळ

[जन्म इ स १९०९]

### भिकारीण

मज दीनेची कींव येउ द्या काहीं । घाला हो भिक्षा माई ! ॥
हे ऊन किती कडक तापते बाई । आगाची फुटते लाही ॥
या तीन दिसापासुनि खाया काहीं । शीतही मिळालें नाहीं ॥
मी कितीतरी फिरलें दारोदार । घेउनी कडेवर पोर ॥
कंठात गुतले प्राण । जाहला जीव हैराण । भीक मागण्याला त्राण ।
काहींच बरें आता उरलं नाहीं । घाला हो भिक्षा माई ! ॥ १ ॥
ज्या दिवशीं हें कुंकू माझं पुसलें । मज आभाळ उघडें पडलं ॥
दो महिन्याचें सोनें घेउनि बाळ । वणवणलं रानोमाळ ॥
मीं आजवरी वाचविलें बाळाला । चिंचेचा खाउनि पाला ॥
पण आता फुटेना पान्हा । वाचवा लान्हा तान्हा । देखवे न याची दैना
तिळतीळ तुटें माझें काळिज बाइ । घाला हो भिक्षा माइ ! ॥ २ ॥
दो दिवसाचा शिळा वाळला तुकडा । चालेल आम्हाला वाढा ॥
तो खाउनिया बाळाला भरवीन । मांडीवर मग निजवीन ॥
का माई हो असा लावता दार । नाहिं मी पुन्हा येणार ॥
बाळा चल पुढती जाऊं । पोटनिल्याणे नच पाहूं । हा मुकाच घे तुज खाऊ
चल भीक आता आपण मागायाला । देवाच्या गाउ घराला ॥ ३ ॥

इ स १९२८

# माधव त्र्यंबक पटवर्धन ( माधव जूलियन )

[ इ. स. १८९४–१९३९ ]

## प्रेमाची दक्षिणा

जीव तूझा लोभला । माझ्यावरी रे शोभना ।
या ऋणाची विस्मृती ती । ना कधीं होवो मना ॥
का मुळीं कोणी करावें । प्रेम एकाद्यावरी ।
हें तुझें सौजन्य पाणी । आणितें या लोचना ॥
ज्योति लागुनीहि तूझी । पेट मी घेईंच ना ।
नित्य खोंचूनी तरी । मारू नको तू टोमणा ॥
बर्फ हें जेणें द्रवे । तेणेंच पाणी आटतें ।
लागणीला जन्म दे का । मागणीची घोषणा ॥
शक्तिच्या राज्यात सत्ती । शोभते शोभो तिथें ।
प्रीतिला स्वातंत्र्य आधीं । पाहिजे का होय ना ॥
जन्मता सान्निध्य लाभे । नित्य तें कैचें परीं ।
नर्मदा शोणास नेई । दूर दैवी योजना ॥
आपुल्यामध्यें पडू दे । शैलराजी सह्य ही ।
भेटती दूरांतरें । सप्रेम कृष्णाकोयना ॥
चालल्यें एका दिशेनें । थोडकें का हें असें ।
सागरीं एकाच भेटू । अतकार्ली मोहना ॥

इ. स. १९३३ —'गज्जलाजली' मधून

सांगे तसें मुलींना । 'आम्हांस नाहिं आई' ॥
ते बोल येति कानीं । 'आम्हांस नाहिं आई' ॥ १२ ॥
आई ! तुझ्याच ठायीं । सामर्थ्य नंदिनीचें ॥
माहेर मंगलाचें । अद्वैत तापसाचें ॥ १३ ॥
गांभीर्य सागराचें । औदार्य या धरेचें ॥
नेत्रांत तेज नाचे । त्या शांत चंद्रिकेचें ॥ १४ ॥
वात्सल्य गाढ पोटीं । त्या मेघमंडळाचें ॥
वास्तव्य या गुणांचें । आई तुझ्यांत सारें ॥ १५ ॥
गुंफूनि पूर्वजांच्या । मीं गाइले गुणांला ॥
सान्या सभाजनानीं । जरि वानिलें कृतीला ॥ १६ ॥
आई ! करावया तू । नाहींस कौतुकाला ॥
या न्यूनतेमुळें ही । मज त्याज्य पुष्पमाला ॥ १७ ॥
पंचारती जनांची । ना तोषवी मनाला ॥
परि जीव बालकाचा । तव कौतुका भुकेला ॥ १८ ॥
येशील तू घराला । परतून केधवा ग ! ॥
दवडू नको घडीला । ये ये निघून वेग ॥ १९ ॥
हे गुंतले जिवाचे । पायीं तुझ्याच धागे ॥
कर्तव्य माउलीचें । करण्यास येइ वेग ॥ २० ॥
रुसणार मी न आतां । जरि बोलशील रागें ॥
ये रागवावयाही । परि येइ येइ वेगें ॥ २१ ॥

इ. स. १९२२ —'पाणपोई' मधून

## २

### ताम्हनाचे निनाद

कुळाकुळांतुनि घराघरांतुनि जन्मतात बालकें ।
ताम्हनें वाजतात कौतुकें ॥
कुसवाच्या पलिकडे गजर ते लगेच होती मुके ॥

# यशवंत दिनकर पेंढरकर

[जन्म इ. स. १८९९]

## १

### आई

'आई!' म्हणोनि कोणी । आईस हाक मारी ॥
ती हाक येइ कानीं । मज होय शोककारी ॥ १ ॥
नोहेच हाक मातें । मारी कुणी कुठारी ॥
आई कुणा म्हणू मी? । आई घरीं न दारीं ॥ २ ॥
ही न्यूनता सुखाची । चित्ता सदा विदारी ॥
स्वामी तिन्ही जगाचा । आईविना भिकारी ॥ ३ ॥
चारा मुखीं पिलांच्या । चिमणी हळूच देई ॥
गोठ्यात वासरांना । या चाटतात गाई ॥ ४ ॥
वात्सल्य हें पशूंचें । मी रोज रोज पाही ॥
पाहून अंतरात्मा । व्याकूळ हाय! होई ॥ ५ ॥

सांगे तसे मुलींना । 'आम्हास नाहिं आई' ॥
ते बोल येति कानीं । 'आम्हास नाहिं आई' ॥ १२ ॥
आई ! तुझ्याच ठायीं । सामर्थ्य नदिनीचें ॥
माहेर मंगलाचें । अद्वैत तापसाचें ॥ १३ ॥
गांभीर्य सागराचें । औदार्य या धरेचें ॥
नेत्रात तेज नाचे । त्या शांत चंद्रिकेचें ॥ १४ ॥
वात्सल्य गाढ पोटीं । त्या मेघमंडळाचें ॥
वास्तव्य या गुणाचें । आई तुझ्यात साचें ॥ १५ ॥
गुंफूनि पूर्वजांच्या । मीं गाइले गुणाला ॥
सार्‍या सभाजनांनीं । जरि वानिलें कृतीला ॥ १६ ॥
आई ! करावया तू । नाहींस कौतुकाला ॥
या न्यूनतेमुळें ही । मज त्याज्य पुष्पमाला ॥ १७ ॥
पचारती जनाची । ना तोषवी मनाला ॥
परि जीव बालकाचा । तव कौतुका भुकेला ॥ १८ ॥
येशील तू घराला । परतून केधवा गे ! ॥
दवडू नको घडीला । ये ये निघून वेगें ॥ १९ ॥
हे गुंतले जिवाचें । पायीं तुझ्याच धागे ॥
कर्तव्य माउलीचें । करण्यास येइ वेगें ॥ २० ॥
रुसणार मी न आता । जरि बोलशील रागें ॥
ये रागवावयाही । परि येइ येइ वेगें ॥ २१ ॥

इ. स. १९२२ —'पांगपोई' मधून

## २

### ताम्हनाचे निनाद

कुळाकुळातुनि घरांघरातुनि जन्मतात बालकें ।
ताम्हनें वाजतात कौतुकें ॥
सुखवाच्या परिकडे गजर ते ल्गेच होती मुकें ॥

परतु शतकापूर्वी एका पतोजीच्या कुळीं ।
ताम्रनावरी झडे जी पळी ॥
तीच चौघड्यावरली ठरली टिपरी भूमडळीं ॥
गजर वाढता वाढत गेला पुढतीं दाही दिशा ।
उतरली सत्ताधाची नशा ॥
अभ्युदयाचा येइ भरवसा पराभूत मानसा ॥
झोंप उडाली निजलेल्यांची, आता दृष्टी मिळे ।
लागले चालाया पागळे ॥
जडमूढामधि चैतन्याचे दीपकळे झळकले ॥
साम्राज्यावर सूर्य जयाच्या कधींच ना मावळे ।
तयाच्या पाशातुन मोकळे ॥
व्हाया स्फुरले बाहु घरोघर त्याच ताम्रनामुळें ॥
दुबळ्याना अवसान लाभलें, ससे सिंह जाहले ।
जयानीं अन्याय न साहिले ॥
मीरहि धैर्यें त्याले भालीं हौतात्म्याचे टिळे ॥
जन्मा येउनि कर्तृत्वानें स्वकुळा उद्धारिती ।
आपुल्या पितराना सुखविती ॥
परतु बालक कितिसे देती इतिहासाला गती ॥
तोच जन्मला परिस्थितीचे लगाम धरुनी करीं ।
ठेवुनी नजर भविष्यावरी ॥
'वर्तमान' जड भिंत चालवी ज्ञानयोगियापरी ॥
तोच जन्मला पेटवि जो प्रक्षोभ जनाच्या उरीं ।
जयाची तेज अशी वैखरी ॥
राष्ट्रपिता, सारथीच साक्षात् योगेश्वर संगरीं ॥
तोच जन्मला, दिग्गज चरन्या वारितात ज्यावरी ।
गातसे काळहि भाटापरी ॥
तोच जन्मला मरुनही जो चिरंजीव भूवरीं ॥

सांगा कोण यापुढतीं । तीं कलिंगडें कोरून ?
सजवील नूर नयनाचा । कीं सुरमा घालुनि कोण ?
रस्त्यावर माडुनि खाटा । हुक्क्यासह मारिल बाता । हिंडेल कोण वा आता
घालून चमेली माळा । कादरखा काबुलवाला ॥ ३ ॥
करु नका गलबला अगदीं । झोपला असे हा वीर !
जन्मात असा पहिल्यानें । पहुडला शांत गंभीर !
राहणें जिथें तरि मागें । ह्या दोन पावलें दूर !
जा पळा पंचनाम्याला । तो आला डगलेवाला । अडकाविल कीं साक्षीला ।
मग म्हणाल 'पुरता भवला । कादरखा काबुलवाला' ॥ ४ ॥

इ. स. १९२२ — 'झेंडूच्या फुलां' मधून

## २

### भावना आणि जीवन

तीर घुसुनि पसात, ऊर बबाळ जाहला जरी ।
जखमी जीवन तरी पाखरू कठी वाऱ्यावरी ! ॥ १ ॥
गोता बसुनी तुटला दोरा पलटी खाई तरी ।
गिरक्या मारित पतंग हिंडे अधांतरीं भिरभिरी ॥ २ ॥
पिचला पावा गळ्यात गेली ओघळुनी माधुरी ।
दीड वितीचा देह लाकडी तरी जग बेसुरी ॥ ३ ॥
तुटले नाडे दोर, फाटलें शीड, सुकाणू सुटे ।
तुफान लाटांवरी नाचतें तारू तरि एकटें ! ॥ ४ ॥
झडे पालवी, गळे फुलोरा, पडल्या फांद्या तरी ।
वर्षावर्षें खोड ताठचे ताठच जागेवरी ॥ ५ ॥
ओर उन्हाळुनि झरा आटला थेंब टिपुस ना उरे ।
तसेंच उघड्या माळावरती पात्र कोरडें फिरे ॥ ६ ॥
पिढ्यापिढ्यांच्या संसाराची राख जाहली जरी ।
गृहलक्ष्मी तरि फाळ कटिते पडक्या भिंतींवरी ! ॥ ७ ॥

निष्ठुर याला जीव तुडवुनी पायाखालीं जाय ती ।
पाकपाकळ्या तुटून पडल्या देठातुनि खालतीं ॥ ८ ॥
वाऱ्यावरतीं उडून गेला सुगंध मैलागिरी ।
पराग वाळुनि जीवन झालें निर्माल्याचे परी ॥ ९ ॥
तरी कशाला दुर्दैवा हें विनाभावना जिणें ? ।
धन्य खरोखर मरण, जरी ते अशा क्षणीं लाभणें ॥ १० ॥

— 'गीतगंगा' मधून

## ३

## प्रेमाचें ऐक्य

घाली गुंजनगीत गात भरती रुंजी जरी भृंग हा ।
प्रेमानें हसते तरी कमळिणी सूर्याकडे ही पहा ॥
आणी जीवन सागरास सरिता प्रेमें जरी वाहुनी
त्याचें लक्ष तिच्याकडे न झुरतो तो चंद्रिका पाहुनी ॥ १ ॥
रानोमाळ किती झरे झरझरा वाहोनि हे चालले ।
येथें चातक मान हा तडफडे पाणी न त्याला मिळे ॥
रूपाची पिवळीच पात नुसती ही कोवळी केतकी ।
प्रेमें नाग तिला सदैव विळखा घाली परी घातकी ॥ २ ॥
वस्तूचे असता विलक्षण असें वैचित्र्य विश्वांतरीं ।
जीवाची क्षणमात्र एकमुखता होणार कैशी तरी ॥
एकाचें दुसऱ्यावरीं मन परी अन्यत्र त्याचें बसे ।
ज्याचें त्या न मिळे, कुणास मिळतें जें त्या नकोसे असे ॥ ३ ॥
प्रेमाची असता अशी विषमता विश्वात चोहीकडे ।
जीवाचें अपुल्याच ऐक्य जुळलें धन्यच हें केवढें ॥

— 'गीतगंगा' मधून

साणार कोण यापुढतीं । तीं कलिंगडें कोरून ?
सजवील नूर नयनाचा । की सुरमा घालुनि कोण ?
रस्त्यावर,माडुनि साटा । हुक्क्यासह मारिल बाता । हिंडेल कोण बा आता
घालून चमेली माळा । कादरखा काबुल्याला ॥ ३ ॥
करु नका गल्लका अगदीं । झोंपला असे हा वीर !
जन्मात असा पहिल्यानें । पहुडला शांत गंभीर !
राहणें जितें तरि मागें । न्हा दोन पावलें दूर !
जा पळा पचनाम्याला । तो आला डगलेवाला । अडकाविल कीं साक्षीला ।
मग म्हणाल 'पुरता भवला । कादरखा काबुल्वाला' ॥ ४ ॥

इ. स. १९२२ —'झेंडूच्या फुलां' मधून

## २

### भावना आणि जीवन

तीर घुसुनि परांत, ऊर बचाळ जाहला जरी ।
जखमी जीवन तरी पाखरू कठी वाऱ्यावरी ! ॥ १ ॥
गोता बसुनी तुटला दोरा पलटी खाई तरी ।
गिरक्या मारित पतंग हिंडे अधांतरीं भिरभिरा ॥ २ ॥
पिचला पावा गळ्यात गेली ओघळुनी माधुरी ।
दीड वितीचा देह लाकडी तरी जग वेमुरी ॥ ३ ॥
तुटले नाडे दोर, फाटलें शीड, सुकाणू सुटे ।
तुफान लाटांवरी नाचतें तारू तरि एकटें ! ॥ ४ ॥
झडे पालवी, गळे फुलोरा, वठल्या फांद्या तरी ।
वर्षावर्षे खोड ताठचें ताठच जागेवरी ॥ ५ ॥
ओघ उन्हाळुनि झरा आटला थेंब टिपुस ना उरे ।
तरीच उघड्या माळावरती पात्र कोरडें फिरे ॥ ६ ॥
पिढ्यापिढ्यांच्या संसाराची राख जाहली जरी ।
गृहलक्ष्मी तरि काळ कठिते पडक्या भिंतीवरी ! ॥ ७ ॥

निष्ठुर घाला जीव तुडवुनी पायदळीं जाय ती ।
पाकपाकळ्या तुटून पडल्या देंठातुनि खालतीं ॥ ८ ॥
वाऱ्यावरतीं उडून गेला सुगंध मैलागिरी ।
पराग वाळुनि जीवन झालें निर्माल्याचे परी ॥ ९ ॥
तरी कशाला दुर्दैवा हें विनाभावना जिणें ? ।
धन्य खरोखर मरण, जरी ते अशा क्षणीं लाभणें ॥ १० ॥

—'गीतगंगा' मधून

## ३

## प्रेमाचे ऐक्य

घाली गुंजनगीत गात भवती रुंजी जरी भृंग हा ।
प्रेमानें हसते तरी कमळिणी सूर्याकडे ही पहा ॥
आणी जीवन सागरास सरिता प्रेमें जरी वाहुनी
त्याचें लक्ष तिच्याकडे न झुरतो तो चंद्रिका पाहुनी ॥ १ ॥
रानोमाळ किती झरे झरझरा वाहोनि हे चालले ।
येथें चातक मात्र हा तडफडे पाणी न त्याला मिळे ॥
रूपाची पिवळीच पात नुसती ही कोवळी केतकी ।
प्रेम नाग तिला सदैव विळखा घाली परी घातकी ॥ २ ॥
वस्तूचे असता विलक्षण असें वैचित्र्य विश्वांतरीं ।
जीवाची क्षणमात्र एकमुखता होणार कैशी तरी ॥
एकाचें दुसऱ्यावरीं मन परी अन्यत्र त्याचें बसे ।
ज्याचें त्या न मिळे, कुणास मिळतें जें त्या नकोसे असे ॥ ३ ॥
प्रेमाची असता अशी विषमता विश्वात चोहीकडे ।
जीवाचें अपुल्याच ऐक्य जुळलें धन्यत्व हें केवढें ॥

—'गीतगंगा' मधून

## सोपानदेव चौधरी

[ जन्म इ. स. १९०७ ]

### १

### देवाच्या दारीं

आज रामाचा जन्मदिवस येई । मंदिरीं जाया उडत एक घाई ॥
रामनवमी पातली चैत्रमासीं । म्हणुनि गेलों प्रभुरामदर्शनासी ॥ १ ॥
एकतारीचा सुर येइ कानीं । ताल चिपळ्यांचा रंग देत गानीं ॥
मुखें गर्जत 'जय रामकृष्णहारी' । एक चोखा देखिला महाद्वारीं ॥ २ ॥
गोड तुकयाचे गाउनी अभंग । रामभजनीं जाहला पुरा दंग ॥
खऱ्या भावाचा विमलभक्तिप्रेमा । फोडि टाहो 'जय दाशरथे रामा' ॥ ३ ॥
घालि लोटांगण भजन संपवीलें । स्वतःभंवतीं मग प्रदक्षिणा चाले ॥
मजकडे तो फेकितां दृष्टिक्षेप । मुखें वदला 'जोहार, मायबाप' ॥ ४ ॥
म्हणे दादा तुम्हि फार भाग्यवान । तुम्ही ब्राह्मण मी असे हीन दीन ॥
अभाग्याची या विनंती तुम्हांला । प्रभूकंठीं हा हार एक घाला ॥ ५ ॥
'हार चोख्याचा' वदा हेच बोल । पुजारी जरि केरांत टाकतील ॥
कापुराची ही ज्योत लावुनीयां । राख हृदयाची वदा रामराया ॥ ६ ॥
फिरुनि गर्जे तो, 'रामकृष्ण हारी' । करुण वाणी मम बैसली जिव्हारीं ॥
हळुंच वदलों मी 'तूंच जाइ आंत । देवभक्ताला काय जातपात ?' ॥ ७ ॥
'काय भलतें बोलतां मायबाप ? । कुठें फेडूं हे मूर्तिमंत पाप ?' ॥
वदुनि दीनवचें अश्रु दोन ढाळी । 'असें नाहीं होणार कधीं काळीं ॥ ८ ॥
मंदिराचीं अंगणें झाडण्याचें । लाभलें हें मज वतन वैभवाचें ॥
वाडवडिलांचें पुण्य सांठलेलें । कसें फासूं मी आज त्यास काळें ?' ॥ ९ ॥
भक्तिभावें त्यां करुनि नमस्कार । प्रभूकंठीं घातला पुष्पहार ॥
कर्पुराच्याही ज्योति लावुनियां । धूर त्यांचा वदतसे रामराया ॥ १० ॥

'कितिक पापी जन मंदिरात येती। लोकलाजेस्तव रामनाम घेती॥
तुझ्या भेटीची आस जया भारी। खरा ब्राह्मण तळमळे पहा द्वारीं' ॥ ११ ॥
इ. स. १९२९ —'काव्यकेतकी' मधून

## २

### भारतभाग्यविधाता

गानाच्या लहरी क्षणात विरल्या कोठें नभोमण्डळीं ?।
भक्तीमौक्तिक अश्रुबिंदु बनले रत्नाकराच्या तळीं ॥
कंठाची तर वर्णवे न अजुनी कोणासही माधुरी।
प्रेमानें परि रामनाम उठवी। रोमाञ्च आगारीं ॥ १ ॥
नादब्रह्म तशीच पूर्ण भरली भक्तीसुधा गायनीं।
मोदानें श्रुति राममंत्र जपती सप्तस्वराच्या मनीं ॥
नित्याच्या नव जन्म वा मरण या साङ्गनि खाऱ्या रिती।
मृत्यूनें जगुनी स्वतः जगविलें त्या गानविप्रप्रती ॥ २ ॥
इ. स. १९३२

## गोपिनाथ गणेश तळवलकर

[इ. स. १९०७]

## १

### बाळ जातो दूर देशा

बाळ जातो दूर देशा मन गेलें वेडावुन।
आठव पळोपळ ॥ १ ॥
ध्यान लागेना कामाला, वृत्ति होय वेड्यावाणी।
डोळ्याचें न खळे पाणी ॥ २ ॥

आणा दूध जिनसा नव्या आणा ताजा भाजीपाला।
माझ्या लाडक्या लेकाला ॥ ३ ॥
त्याच्या आवडीचे चार करु पदार्थ सुंदर।
काहीं देऊं बरोबर ॥ ४ ॥
त्याचें बघा ठेविलें का नीट सामान बांधून।
काहीं राहिल मागून ॥ ५ ॥
नको जाऊं आता बाळा कुणा बाहेर भेटाया।
किती शिणविसी काया ॥ ६ ॥
वाऱ्यासारखी धावते वेळ भरभरा कशी।
गाडी थाबेल दाराशीं ॥ ७ ॥
पत्र धाड वेळोवेळीं, जप आपल्या जीवास।
नाहि मायेचें माणूस ॥ ८ ॥
उच्च भरारि घेउन घार हिंडते आकाशीं।
तिचें चित्त पिलापाशीं ॥ ९ ॥
बाळा तुझ्याकडे माझा जीव तसाच लागेल।
स्वप्नीं तुलाच पाहील ॥ १० ॥
बाळ जातो दूर देशा ! येऊन उमाळा।
लावी पदर डोळ्याला ॥ ११ ॥

इ. स. १९२९ 'दूर्वांकुरा' मधून

## २

### भय्याजी

रजनीचें अवगुंठन पडलें साऱ्या विश्वावरीं।
दाटले मेघहि गगनोदरीं ॥
सोडुनी गाव ही उच्च इमारत जुनी।
किर्रर्रर रान हें माजे चौबाजुंनी।
खळखळा वाहते मधेंच जलवाहिनी।

पिसाट वारा तरुपर्णांतुन फिरुनी भय दावी ।
माजली भेसुर कोल्हेकुई ॥
या स्थळींच करिती भय्याजी पाहरा ।
पिळदार मिशानीं दिसे उग्र चेहरा ।
ध्वज शुभ्र फडक्वी वदनावरतीं जरा ।
आवाजामधिं मेघगर्जना नयनीं विद्युल्लता ।
देह हा पोलादी तत्त्वता ॥
अंगात कोपरी कसलेलें धोतर ।
मखमली चिमुकली टोपी डोक्यावर ।
पायात वाजती चढाव ते करकर।
नंदिल घेउनि दंडा फिरवित भय्याजी चालती ।
हादरे भूमि तयाभावतीं ॥
कधिं तुलसीजींची चौपाई गाउनी ।
कधिं गोड बासरी मौजेनें छेडुनी ।
ते दिवस वठिती जीवाला रिझवुनी ।
कोस शेकडों दूर राहिले दयिता अन बालकें ।
त्यामुळें सुख झालें पारखें ॥
अन् सुहृदाची त्या स्मृति होता कधितरी ।
ते उदासवाणे बसती कोठतरी ।
नि श्वास सोडिती टक लावुनि अंबरीं ।
दोन आसवें भय्याजींच्या पडती नेत्रांतुनी ।
येति मग भानावरती क्षणीं ॥

इ. स १९३० —आनद

* * *

## दामोदर अच्युत कारे

[ जन्म इ. स. १९०९ ]

### उष:काल

जें जें मंगल वा पवित्र भरलें संपूर्ण विश्वांत या ।
प्रातःकाळिंच सृष्टि व्यक्त करिते सौंदर्ययोगें तया ॥
भासे या समयीं कुणी द्युतिमती ओजस्विनी देवता ।
अंगांगांत समावुनी न निथळे पावित्र्य निर्व्याजता ॥ १ ॥
वारा ये झुळझुळ मंद निमिषीं काया गमे भारली ।
लीलेनें पवनीं तरंगत मुदें गाई विहंगावली ॥
येई जाग हळू प्रसन्न मधुरा विश्वाचिया जीवना ।
सारे; ई हृदयीं उदात्त तमशा उद्दीपवी भावना ॥ २ ॥
संसारातप सोसुनी निशिदिनीं ये ग्लानि देहीं मनीं ।
प्रत्यूषीं परि कर्णि कूजन शिरे आशास्वरें घेउनी ।
जाता संपुनिया जसा प्रलय, ये शांती तयामागुन ।
रात्रीमागुन ही प्रभात जगना देई पुनर्जीवन ! ॥ ३ ॥
विश्वाचें जणु रम्य शैशव गमे आहे उष:काल हा
खेळे हास्य मुखीं निरागस खुलें तेणेंच हें गोड अहा ॥

इ. स. १९२५

# के. ना. काळे

[ जन्म इ. स. १९०४ ]

## १

## निर्हेतुक प्रेम

जाहली घाई। साग ना सुचत नच कांहीं ॥ ध्रु ॥
युवराजाची खाशी स्वारी। दारावरुनी आज दुपारीं।
जाइल म्हणुनी तया अवसरीं। सजव मला आई।
साग ना सुचत नच काहीं ॥ १ ॥
अगीं धारू काय भूषणें। वेश रचू मी कुण्या तऱ्हेनें ?।
तोडे किंवा गेंद पैंजणें। घालु ग पायीं।
साग ना सुचत नच काहीं ॥ २ ॥
आश्चर्यानें होऊन बावरि। नवशी का गे अशी भिरभिरी ?।
गेल स्वारी कधीं नच वरी। कळत का नाहीं ?।
साग ना सुचत नच काहीं ॥ ३ ॥
जरी मना हें पुरतें ठावें। तरी पुन्हा ते तिकडे धावे।
कामधाम मग कसे सुचावें। स्वस्थता नाहीं।
साग ना सुचत नच काहीं ॥ ४ ॥
क्षणात जातिल नयनापुढुनी। नवता नवता मात्र दुरूनी ।
मृदु मुरलिध्वनि येइल कानी। कळतसे हेंही।
साग ना सुचत नच काहीं ॥ ५ ॥
असो कसेही परा तयाची। स्वारी इथुनी अजि जायाची।
वस्त्रभूषणें लेइन उंची–। म्हणुन मी घाई।
साग ना सुचत नच काहीं ॥ ६ ॥

* * *

दारावरुनी युवराजाचा । सुवर्ण रथ ग ! गेला साचा ।
चमकत किरणीं तरुण रवीच्या । काय नवलाई ।
सांग ना सुचत नच काहीं ॥ ७ ॥
केला बुरखा मी बाजूला । हृदयावरची माणिकमाला-।
काढीं, मार्गी फेकी तिजला । भान नच राही ।
साग ना सुचत नच काहीं ॥ ८ ॥
आश्चर्यानें होउन त्रावरि । बघशि का गे अशी भिरभिरी ।
उचलिल स्वारी कधीं नच वरी । कळत का नाहीं ! ।
साग ना सुचत नच काहीं ॥ ९ ॥
रथचक्राच्या पडता खालीं । असंख्य ठिणग्या घेती उसळी ।
साक्ष रक्तिमारूपें उरली । धुलीमधीं पाही ।
साग ना सुचत नच काहीं ॥ १० ॥
काय अर्पिते प्रेमी बाला । आणि अर्पिलें तिनें कुणाला ।
कळावयाचें जड जगताला । कधींही नाहीं ।
साग ना सुचत नच काहीं ॥ ११ ॥
असो कसेही, गोष्ट घडली- । युवराजाची स्वारी गली ।
रथमार्गी मीं माळ फकिली । काय नवलाई ! ।
साग ना सुचत नच काहीं १२ ॥

* * *

## २

### अमरपथाचा यात्रेकरू

अमरपथिचा यात्रेकरु तो । जीवनमार्गावरुनी जातो
आयुष्याचा उतार उतरुनि । अगम्य दिशि फिरतो ॥ १ ॥
असत्‌सताच्या तम प्रकाशीं । रज कणाच्या उठती राशी
अवगुंठुनिया भूस्वर्गाशीं । विश्वसुंदरी शाल जणू घे, दुनेतश्यामशशी ॥२ ॥

प्रयाण दिस ते दूर बहू ते । वाट तेथची पुढें भासते । सुरगंगेची पडछाया ते ।
दिक्काल्पना निधुनि जाते । जन्मातरिची पायवळीं जणुं, पुढती विस्तरते ॥ ३ ॥
धवलत आहे निशा भोवती । त्याच्या जीवनदेशासम ती । तिमिरा उजळीं तेजःकाती ।
विरलतमें अवगुंठित धरिती । झाली वाटें चमकुनि उठती ।
यात्रिकरुच्या पद्धातें या वाट विराजे ती ॥ ४ ॥
तपोवनींचा दिसे तापसी । ब्रह्मरश्मिची तेजोराशी
साधुलाची चंद्रिका जशी । अघअनघाची स्कधीं पडशी
अनुभव भविंचा भार झेलुनी । कमर गेली कमान बनुनी
स्नेही गेले पुढत निघुनी । साथी येती दूर मागुनी
सगें नव्हता कोणी स्नेही । नव्हता कोणी सागाती ही
वठलेला वट विजनीं एक । पडला होता दावित धाक
निःशब्दाचे अनुचित नाद । त्याचा तेथें ये पडसाद
मार्गी पडती मद पाउलें । होते अध्वश्रम बहु झाले
पुष्पपल्लवीं विहित वृक्ष तो । सुरकुतलेला पथिका हसतो
जुनाट तरुचें शुष्क खोड तें । विजनामध्यें पडलें होतें ।
मार्गावरुनी डावलुनी ते । शिशिर ऋतूतिल खोड मानवी, तेथें सचरतें ॥ ५ ॥
तेजच्छायांनी भूवर ते । मत्र गूढ जे लिहिले होते
एकदृष्टिनें उकलायाते । स्वजनशून्य तो एकाकी नर, धुडी विजनातें ॥ ६ ॥
लुप्त होउनी एका जागीं । प्रकटे गगनी अन्य विभागीं
मावळत्या चद्रासम चाले, नर तो निजमार्गी ॥ ७ ॥
सभोवताली दृष्टी वळवुन । चालतसे तो निजमार्गातुन
अनतागर्णी एक विचारें, जाई तो निघुन ॥ ८ ॥
वरती नमला चद्र अंबरीं । शात चद्रिका भूवरिं पसरी
पीयूषाचा अभिषेक जणू भूवरतीं त्रितरी ॥ ९ ॥
अतल सरोवर दिसतें पुढतीं । रम्य कुमुदिनी त्यात हासती
आनदोनी खिदळत डुलती । अशा शिशूंच्या नयननीलिमा नाचे ज्यावरतीं ॥ १० ॥

गहनतांगणीं आकाशांत । मेघखंड लघु एक क्रीडत
मधुचंदेरी किनरी मिरवित । सुरनौका जणुं अगाधांतुनी, उतरे डौलांत ॥११॥
आयुष्याचा उतार उतरुनि । अमरपंथिची यात्रा करुनी
अगम्यतेच्या उदरीं जन्मुनी । अगम्य अटवीमध्यें यात्रिक, जाय कुठें
निघुनी ॥ १२ ॥

## विनायक लक्ष्मण बर्वे (आनंद)

[ इ. स. १८९६–१९४८ ]

### १

### कोंकणघरट्याकडे

लांबलांबच्या माळावरुनी । थाती भुरभुर पंख हालवुनी । एकसारखें खेळे नयनीं ।।
हर्षभराचें रडें । निघाली कोंकणघरट्याकडे ॥ १ ॥
कोंकणमाई बार मोजिते । बाळ तियेचें तिलाच दिसतें । पळापळाला मन बावरतें ।
दिसोत डोंगरकडे । निघाली कोंकणघरट्याकडे ॥ २ ॥
सागरवीची लाडुकवाणी । चिल्मालील पायाला धरुनी । तो क्षण येइल किति वेळानीं ।
स्नेहें मन तडफडे । निघाली कोंकणघरट्याकडे ॥ ३ ॥
खाडि किनारा बसेल फवलुन । पुळणीवरतीं लोळत राहिन । सागरांतल्या
क्षितिजा पाहुन ।
सांडिन जग रोकडें । निघाली कोंकणघरट्याकडे ॥ ४ ॥

इ. स. १९२९

### २

### नंदकरी

लाल पागुटे वरी उपरणें बांधितरो रेचुन । नंदकरी येतरो गजुन ॥

पचमात ओरडे धन्याला घरात न्याहाळुन। नदी हलवी मान भिजुन ॥
शुनेर चिंध्या पाठाणावर घडा घुंगुरमाळ। मागी तांदुळ पैसा डाळ ॥
रानीं नदी गावकऱ्याच्या रानोरानीं पोळ। खाई पिकाना जसा टोळ ॥
नदऱ्याच्या आयापोरी विकनी निऱ्येपोत। फसवुनी सर्वा हातोहात ॥
नदकरीं उदीर हुडकती उरलुनि शेते पार। खिमा खायया टळे दुपार ॥
दुसऱ्या गावीं जाता सारें बैलावर भरताड। आतीं मुसळें पोरें द्वाड ॥
ओझ्याच्या भारानें दडपुन बसला खालीं बैल। वेग पुऱ्या तासाला मैल ॥
पेंढाऱ्यासम छळतिल सारी कोंकणगावाला। इडापिडा गोगरिबाला ॥
तरी हवा हा सालोसालीं भाळाच्यासाठीं। हौस नदीची तर मोठी ॥
इ. स. १९३१

## ३

## शिवामूठ

सळ सळ सळ पाऊस कोसळे हिसाळताती मळे।
डमलले सोनटक्याचे कळे ॥
अगणात साचल्या जलावर पागोळी खळखळे। •
बुडबुडा इकडुनि तिकडे पळे ॥
अळवावरतीं जळथेंबाचे रुपे दिसे ना दिसे।
वाटते झळझळ खालीं फसे ॥
इवलाले गवताचे अंकुर ओथंबुन डोलती।
जलावर छाया हेलावती ॥
किरणजाल अलगेच फेंकिती झेंप निसर्गावर।
झळकती जलबिंदूचे सर ॥
रस्तोरस्तीं नीर तुनले; ओचे उचलुनि करीं।
निघाल्या शुचिर्भूत सुंदरी ॥
'डुब' वाजे पाऊल जलावर पैंजण झंकारती।
भोंवतीं वृक्षलता हालती ! ।

नखानखावर रंगे मेंदी जडीवली पोवळी ।
फुटे कीं अंगुलिना पाकळी ॥
पर्जन्याची सर उमवाया कुणी स्थीर राउळीं ।
दिसे कीं दारातिल कर्दळी ॥
नारिंगी काचोळी रुतल्या करात परडी धरी ।
नेसली पीतांबर भरजरी ॥
शेंदुर भाळीं, गालीं लाली, अधरावरली ज्ुळी ।
जशी कीं जासवंदिची कळी ॥
कुणी श्यामला दागदागिने नव्यानेंच लेवुनी ।
चालली जलधारा साहुनी ॥
पेहराचुनी हिरवीं वस्त्रें एक यामिनी सुनी ।
निघाली पूजा सरसावुनी ॥
गळ्यात हिरवी पोत बागडी हिरवी टिकली दिसे ।
चंद्रमा गालावरतीं असे ॥
गरिबाची ही भीरू बाला देवळात पातली ।
वन श्री श्रावणमासातली ॥
धूप कर्पुराच्या आमोदें गाभारा कोंदला ।
सभोतीं सुवास हेलावला ॥
पिंडीवरलें दूध जलातुन ओघानें धावते ।
निदलही त्यामधुनीं वाहते ॥
वेलाचा फुलवरा सांचला नीराजन तेवती ।
उदाच्या काड्या झेपावतीं ॥
मोठ्या घरच्या सुना बालिश मिठाळल्या भोंवतीं ।
मुखानें सस्मित गुज बोलतीं ॥
गरिबाऊ एकली नवोढा दूर कोपऱ्यामधीं ।
राहिली पूजेसाठीं उभी ॥
थोराच्या रमण्यात तियेला वाव मिळाया कुठें ।
उभीच्या उभी राहिली तिथें ॥

उभी राहिली किती वेळ पण जागा तिज ना मिळे ।
तियेचा हेत कुणाला कळे ? ॥
मनीं मुकीं खोळुन राही पूजा देवाजिची ।
वदे ना मूक जात गरिबिची ॥
दुपार टळली तरी पुजना अवसर तिज ना मिळे ।
तियेच्या तसल्या गरिबीमुळें ॥
फुलात झुरती शकर घेता श्रीमती पूजन ।
निघाल्या पूजक नारीजन ॥
देवालय राखिता गुरव पातला तिथें तोंवरी ।
कराया कुलूप दारावरी ॥
भीरु बाला निघे त्वरेनें पूजन केल्याविना ।
आणुनी थेंब थेंब लोचना ॥

* * *

४

## गोपाल

रस्त्यापाशीं निशाण रोवुन माडितसे देवता ।
तम्राकूला चुना लावुनी खात बैसला स्वत ॥
झाडाखालीं मूल चिरगुटें चार खुट रोविले ।
उशास रेडा म्हैस भोंवतीं आई बाइल मुलें ॥
चाद रवी चादण्यादिकांचा जडाव याच्या घरा ।
सुगध देई खुल्या महाला आम्र्याचा फुलवरा ।
वृक्षवराची गर्द पालवी खिडक्यांची झालर ।
बुध्यामधले रातकिडे गातात गीत सुस्वर ॥
अरच्या रात्रीं गोडा मासा डोहातिल मारणें ।
दिसा डोंगरातून गवत सर्पणादिका चोरणें ॥

पेटवून परसा निजलेली तिथे मुलें माणसे ।
तिथे झड्या कुत्र्याला येई सुकार्याचें पिसे ॥
आठ दिवस हा एका स्थानी नांदणार ना कदा ।
रस्त्याच्या लगत्यान बिन्हाडें बदलणार सर्वदा ॥

## गणेश हरी पाटील

[जन्म इ. स. १९०६]

### १

### पाटील

अबलख घारवरी बैसुनी येतो हा पाटिल । शिरीं भरजरी खुले मदिल ॥
मदीलाची कड जरतारी किंचित मानेवर । झुरुनी खुलते वरचेवर ॥
गंध टिळा भालावर, झुलती कानामधि चाकडे । मिशाचे गालावर आकडे ॥
लाल झाक डोळ्यात जराशी हुकुमी तोऱ्यावर । बोलतो काढुनि करडा स्वर ॥
रमत रमत वेशींत गावच्या शिरतो मग पाटील । मद्दळी चपापती तेथिल ॥
जी जी करिती मुजरे हुजरे सदरे जणु वेस्कर । खाल्ती लवुनि अपुलें शिर ॥
खवरबात गावची विचारुन चावडींत पाटिल । हळू मग टाकितसे पाउल ॥
हुकुम घ्यावया खडे जाहले रामोशी वेस्कर । पुढें करि कुळकर्णी दप्तर ॥

* * *

## २

## लुटारूंचें गाणें

वेळ किती ही नामी । गोंधळ घालूं या मंडळी । उगवला शुक्र नभोमंडळीं ॥ ध्रु ॥
हा मानवलेला चांद जात भेटाया ।
जगभर पसरे त्याची विगट छाया ।
पाढरी फटक ही उगवत लागे व्हाया ।
चैतपुनव आजला वाजवूं सनळ या देवळीं । उगवला शुक्र नभोमंडळीं ॥ १ ॥
तळ असेलही उठविला गाडिवानानीं ।
घाटातुनि खळखळ जातिल गाड्या निघुनी ।
मधु पडेल घुंगुरमाळाचा रव कानीं ।
भंडारा उधळून भरूं या खंडोबाची तळी । उगवला शुक्र नभोमंडळीं ॥ २ ॥
ही अजुन घोरते किर्रकिर्र वनराई ।
वेताळ गस्त नुक्ताच घालुनी जाई ।
जाळींत वाघ कानोसा घेउन पाही ।
गजर करूं देवाच्या नावें 'जय मल्हारी बळी' । उगवला शुक्र नभोमंडळीं ॥ ३ ॥
जाईल विझुन एकेक नभींचा तारा ।
वाहील पठारावरी झुळझुळू वारा ।
येतील चराया गुरें रानचा चारा ।
रामपहारा नको घडाया पाप हातुनी मुळीं । उगवला शुक्र नभोमंडळीं ॥ ४ ॥
जावोत सुखानें वाटसरू मुक्कामा ।
पाप्याना आम्हा करो परमात्मा क्षमा ।
सत्कर्मिं यापुढें येवो तनु ही कामा ।
घरास जाउन मुलामाणसा भेटूं, उजळू कुळी । उगवला शुक्र नभोमंडळीं ॥ ५ ॥

इ. स. १९३१ —यशवंत

## बाळकृष्ण मार्तंड दाभाडे

[जन्म इ. स. १९०९]

### वादळ

अंधार मातला नयना काहिं दिसेना ।
आकाशीं दैना ताऱ्यांची बघवेना ॥
घनकृष्ण मेघ नभिं जमले हा हा म्हणता ।
बेफाट जाहली सुरू तयाची सत्ता ॥
गडगडाट भीषण चाले आकाशांत ।
*विजलीची फाके प्रभा क्षणोक्षणिं त्यांत ॥*
पशुपक्षी झाले स्तब्ध रात्रिच्या काळीं
शोधिती निवासस्थान कोटरें जाळीं ॥
भेसूर केंकर्णे निबिड वनांतरिं चाले ।
बेफिकीर डौले वृक्षराज परि डोले ॥
घुमडाचे चाले घू घू । भोंवतीं ।
सैराट वाहतो वायू । भोंवतीं ।
हैराण मेदिनी होई । भारतीं ।
कडकडाट होता चपला क्षणिं कोसळली ।
तो वृक्षराज उन्मळुनी पडला खालीं ॥

इ. स. १९३१

## दत्तप्रसन्न कारखानीस

[ जन्म इ स १९०८ ]

### छोट्या वहिणीस

राग का ग आला माझ्या आज सोनुलीला ? दुखविलें कुणी या माझ्या लाडक्या फुलाला ? ।

नेत्रयुग्मिं ओघळली ही रम्य अश्रुमाळ ।
आणि चिंब चिमणे झाले गाल लाल लाल ।
रक्तवर्ण मुखमंडल किती शोभलें विलोल ।
गोड चारुता ही सहली नाहि का कुणाला ? ॥ १ ॥
हास्यचंद्र मेघांतरि तव कोठल्या दडाला ? ।
कुणि ग स्तब्ध केले माझ्या गान–कोकिळेला ? ।
कुठें लुप्त झाल्या न कळे रुचिर बाल–लीला ।
दृष्ट कुण्या चांडाळाची लागली मुलीला ? ॥ २ ॥
राहिं तू उगी ग माझी तान्हुली गुणाची ! ।
सांगु काय चिउमाउची गोष्ट तुज मजेची ? ।
आणु का गडे ! तुज 'गो गो' शपथ या गळ्याची ! ।
बोल पाहु छकुले जाऊं भूर फिरायाला ! ॥ ३ ॥

इ. स १९३२

## पांडुरंग जिवाजी सवनीस

[ जन्म इ. स. १८९२ ]

### पाटीवाली

ओझें डोईभर चाले भरभर । बळकट बांधियेलें बाळ पाठीवर ।
भुकेलें तान्हुलें रडाया लागलें । उगी उगी म्हणत ती माता वाट चाले ॥

राबे सर्व दिन नाहीं उन तान । बाळमुखा मधें मधें लावी शुष्क स्तन
उन्हानें सुकली फळी करपली । लटलटा मान हाले खालीं पडलेली ॥
गळालें शरीर उरीं धरी पोर । डोळ्यांतुनी पडतसे पावसाचा पूर ॥
तीन आणे गांठीं एकुलते पोटीं । दोन जीव घरीं आले प्राण कंठीं ॥
नाचण्याचे पीठ तेल तिखट मीठ । दिडकीचें मनीं योजी जेवण्याचा बेत
दुध वाटीभर आणोनी लवकर । पाजीन या सपाजीला माझ्या पोटभर ।
गोड आशा मनीं म्हणतील धनी । लई कष्ट झाले तुला मुख कुर्वाळुनी
दिसे काय परी धनी उभा दारीं । असे पुरा झिंगलेला डोळे तो वटारी
बरलो फल्लाल काढ पैसे चल । बिलगला अंगालागीं पुरा तो बेताल ॥
गांठींचे घे पैसे मारी तिला ठोसे । उपवासी बाळ भरी कलालाचे खिसे
बाळा आली ग्लानी मुर्च्छित जननी । पिता सर्व रात्र गाई वेडीं वेडीं गाणीं
मौन पाही जगत्पिता अनंत नेत्रांनीं ॥

इ. स. १९३३ —' सुगी ' मधून

## रा. अ. काळेले

[ जन्म इ. स. १९०७ ]

### गेलि कुठे तरि आई ?

सांग ना ताई, अशि गेलि कुठें तरि आई ? ।
काल तिला तर उठवत नव्हतें । म्हणती ती खिळली शेजेतें ।
आज सकाळीं उठुनि पहातें । गेली तीं आई ।
सांग ना ताई ! ॥ १ ॥
तूं नि मीच ना इथली सारी । खिडक्या दारें नीट लाविलीं ।
वाट कशी मग तिला मिळाली । जावि कशी बाई ।
सांग ना ताई ! ॥ २ ॥

आजकाल मी हट्ट न केला । रडलें नाहीं ठाऊक तुजला ।
तिनें बरोबर मग का मजला ॥ घेतलं नाहीं ।
सांग ना ताई ! ॥ ३ ॥
आई कुठं गली असताना । उगी करवी तूच मला ना ।
आईसाठीं तूच मग पुन्हा । रडसी का ही ! ।
सांग ना ताई ! ॥ ४ ॥
बाहुलि माझी तूच फोडिली । चिमणी माझी तूच हरविली ।
अंगे ल्याडे तूच लपविली । कुठें तरी आई ।
सांग ना ताई ! ॥ ५ ॥
बरें बरें जरि खाऊ न दिला । घेइ ताई तरि गोड गोडुला ।
पापा माझ्या दोन्हीकडला । दावि परी आई ।
सांग ना ताई ! ॥ ६ ॥
कवटाळुनि छकुलीला पोटीं । किती शहाणी ताई मोठी ।
होउनि छकुली वेडि धाकटी । रडली धाई ॥ ७ ॥

इ. स. १९३४ —' वाग्वसंत 'मधून

* * *

## व्यंकटेश शंकर वकील

[ जन्म इ. स. १९०६ ]

### २

### यक्षकन्या

नाद निर्झरिणी झुळझुळताना
दृष्टी जडली
प्रेमसमाधी मला साधली
धाट चंद्रिके—

चकोरदृष्टी आशा भरली
तुजवरि खिळली
गीत संपलें
शेवटला—
सूर विराला मंजुळवाणा
वनवायूनें दूर पळविला
स्तब्ध जाहलें जिकडे तिकडे
अन् तू मी दोघे
मनोरामधिं शङ्का व्याकुल
त्वन्नयनीं परि मिस्किल हासे—
क्षणीं चमकलें
क्षणीं लोपलें
जणु जलाशयामधिं सुंदर मासे
वरतीं आले
रविकिरणामधिं अहा चमकले
खोल पळाले
धडपडले ना ग मम हृदयीं !
अशी निर्दये केंवि मुग्धता ?
बोल बोल ग
काय वाटलें खुलास हृदयें साग गडे ग !

ह स १९३२ —वागीश्वरी

## २

### मेघाचें आयुष्य

जगुनि जिंकिता मिळे यशोधन
मिउनि मरता गभ्रास-
उदरिं शुक्तिच्या व्हाल मौक्तिक

रमणी शृंगारास्तव झटणें
कधीं न मुक्तता जलबिंदूला
मौक्तिकदेहीं
विराटदेहीं मीलन—
नकोच आशा कल्पवरी ती!
लढुनी मरणें
श्रेय साधणें—
तुमच्या मरणीं गीतें गातिल
निर्झर शाहिर!
मुकुलित कलिका
विकसित होतिल!
चातक होतिल तृप्त पिपासु
तृप्त धरित्री होइल आर्द्री!
जीवन येइल—
तृणतरुवेली सरिता वापी
याच्या हृदयीं
अखेर मीलन सरितोद्यानीं—
विराट देहीं—
पुण्य जीवन धन्य जीवन
लढा लढा रे
विराट देहा मनीं आठवा
पुढें सरा रे

६ स. १९३२ —वागीश्वरी

३

वरदान

हिरवें पिवळें रान स्यातुनी इवलासा ओहळ
मुरड घेउनी वाट काढितो जल वाहे झुळझुळ ॥ १ ॥

रमणी शृंगारास्तव झटणें
कधीं न मुक्तता जलबिंदूला
मौक्तिकदेहीं
विराटदेहीं मीलन—
नकोच आशा कल्पवरी ती !
लढुनी मरणें
श्रेय साधणें—
तुमच्या मरणीं गीतें गातिल
निर्झर शाहिर !
मुकुलित कलिका
विकसित होतिल !
चातक होतिल तृप्त पिपासु
तृप्त धरित्री होइल आर्द्री !
जीवन येइल—
तृणतरुवेली सरिता वापी
याच्या हृदयीं
अखेर मीलन सरितोद्यानीं—
विराट देहीं—
पुण्य जीवन धन्य जीवन
लढा लढा रे
विराट देहा मनीं आठवा
पुढें सरा रे

इ. स. १९३२ —वागीश्वरी

३

वरदान

हिरवें पिवळें रान त्यांतुनी इवलासा ओहळ
सुरड घेउनी वाट काढितो जल वाहे झुळझुळ ॥ १ ॥

चकोरदृष्टी आशा भरली
तुजवरि खिळली
गीत संपलें
शेवटला–
सूर निराला मंजुळवाणा
वनवायूनें दूर पळविला
स्तब्ध जाहलें जिकडे तिकडे
अन् तू मी दोघे
मनोनामधि शांत व्याकुल
त्वन्नयनीं परि मिस्किल हासे—
क्षणीं चमकलें
क्षणीं लोपलें
जणु जलाशयामधिं सुंदर मासे
वरतीं आले
रविकिरणामधिं अहा चमकले
खोल पळाले
धडपडले ना ग मम हृदयीं !
अशी निर्दये केंवि मुग्धता ?
बोल बोल ग
काय वाटलें खुलास हृदयें सांग गडे ग !

इ. स. १९३२ —वागीश्वरी

२

मेघाचे आयुष्य

जगुनि जिंकिता मिळे यशोधन
भिउनि मरता गर्भवास–
उदरिं शुक्तिच्या व्हाल मौक्तिकें

रमणी शृंगारास्तव झटणें
कधीं न मुक्तता जलबिंदूला
मौक्तिकदेहीं
विराटदेहीं मीलन—
नकोच आशा कल्पवरी ती !
लढुनी मरणें
श्रेय साधणें—
तुमच्या मरणीं गीतें गातिल
निर्झर शाहिर !
मुकुलित कलिका
विकसित होतिल !
चातक होतिल तृप्त पिपासु
तृप्त धरित्री होइल आर्द्री !
जीवन येइल—
तृणतरुवेली सरिता वापी
यांच्या हृदयीं
अखेर मीलन सरितोघानीं—
विराट देहीं—
पुण्य जीवन धन्य जीवन
लढा लढा रे
विराट देहा मनीं आठवा
पुढें सरा रे

इ. स. १९३२ —वागीश्वरी

## ३

### वरदान

हिरवें पिवळें रान त्यातुनी इवलासा ओहळ
सुरड घेउनी वाट काढितो जल वाहे झुळझुळ ॥ १ ॥

वनराईच्या गर्द सावल्या, ऊन चमचमे वरी।
रानपाखरें भुर्रर उडोनी गिरगिरती अंबरीं ॥ २ ॥
घालुनि पिवळ्या गर्द फुलांचा सडा रानसाभळी।
दो काठावर उभ्या ओणव्या रूप न्याहाळित जळीं ॥ ३ ॥
दमल्या चरणीं शिणल्या नयनीं विसाव्यास ये झणी।
गर्द सावली पाहुनि बसला वीर शिकारी कुणी ॥ ४ ॥
दो हातानीं ओंजळ भरुनी होई शीतल जळ।
धूलीरंजित वदन धुवोनी क्षणात करि निर्मळ ॥ ५ ॥
रक्तवर्ण वदनात म्लानता, सुनील नयनीं श्रम।
संध्यास्नानें नादे जैसा दगात गगनीं तम ॥ ६ ॥
रमणचुंबनें खुलुनि वठावे गोड गोडसे हसे।
गाल फुगवुनी रुसुनी बसल्या रमणीवदनीं जसे ॥ ७ ॥
तशा दगावर छटा पसरल्या अभा दिसे साजिरी।
निळ्या अंबरीं साज लाजरी रंगपंचमी करी ॥ ८ ॥
झाकळलेल्या जळीं टाकते प्रकाश संध्या चुळ।
तरुशाखांवर बसुनि घालिती स्वाद विहंग मंजुळ ॥ ९ ॥
धावा धावा आर्तरवानें विस्मित झाला मनीं।
करुणनदना क्रूर गर्जना लोपुनि टाकी क्षणीं ॥ १० ॥
गरीब दुबळा साळा मानव कराल दाढापुढें।
जंगलच्या राजाच्या मेवा क्षणात होइल मढें ॥ ११ ॥
ओंजळ ओतुनि दुजी जलामधिं उठे तसा तातडी।
उडी घातली मरणसंकटीं, धनीं यशाचा गडी ॥ १२ ॥
भुज वृत्राची पुरंदरासह वेदकालवर्णित।
वज्राघातें मेघमंडलें नभात झाली नत ॥ १३ ॥
पुरुषार्थांची वीज तळपली स्वार्थभाव नें ल्या।
निगूढ झाली कर्तव्याची पाठराखणी दया ॥ १४ ॥
शौर्यसंपदा शिगोशींग ही हृदयमंजुषेमधीं।
धैर्यधनाचे साठवलेले दोन्हीं नयनीं निधी ॥ १५ ॥

तेज ढगाचीं शकलें करुनी लुप्त क्षणीं जाहलें ।
तमपटलानें गगन झाकलें अश्रु दोन ढाळले ॥ १६ ॥
उदयभान तानाजी यापरि वन्य शिकारी मृत ।
दुबळा काळा मानव अजुनी ससारीं जीवित ॥ १७ ॥
क्षुद्रमृत्युचा नेना फुटुनी कर्तव्याच्या क्षणीं ।
निज प्राणाचें देणं देतों ईश्वरच्या ॠणी ॥ १८ ॥
जितजेता वा वर्णभेद ही मानवनिर्मित प्रथा ।
आठव वीरा उरे न, झाली उज्वल जीवनकथा ॥ १९ ॥
समतेदेवी तुझ्या पूजनीं निजप्राणांचीं फुलें ।
मरणाच्या परडींत घालुनी वरदाना मिळविलें ॥ २० ॥
जयोस्तु समते तुझ्या गाधळा झडो जीवसबळ ।
शेषशिरावर जयघोषानें चळो धरामंडळ ॥ २१ ॥

*　　*　　*

४

## सजीवन

आरक्त जाहला श्रांत पथिक दिनमणी । क्षण उभा राहिला अपरेच्या अगणीं ॥
तुडविर्णे नभाची वाट सपल्यावरी
जाहला मग्न तो निजप्रियाचुंबनीं । तमजाल विणित ये चेटकिणी यामिनी ॥ १ ॥
एकांत कोठडी काळोखाचें घर । त्या भिंति रंगल्या धूळीनें धूसर
शृंखलाबद्धपद बदि श्रांत एकला
सनिध तयाच्या वाऱ्याला नव्ह थारा । वरि झरोक्यातुनी नचतो चद्र बिचारा ॥ २ ॥
अंतिम तिमिर हा आयुष्या लाभला । अंतिम सर्ग हा जीवनकाव्यातला
उद्‌ईक उघडणें मृत्यूचा दरवाजा
रवि साक्ष उद्याच्या अक्षय दिव्य प्रकाशा । रवि साक्ष उद्याच्या पूर्णविरामा नाशा ॥ ३ ॥

एकेक क्षण सरे युगायुगाच्या परा । 'सरणार रात कधिं ?' तळमळ चित्तांतरीं
राधिका जनरीं कृष्णाविण विरहिणी
तिजसमान लागे हृदयाला हुरहुर । 'नेतील कधीं मज फाशांघावर ?' ॥ ३ ॥
तुज निर्भयतें या लोचनांत आसन । तुजसाठीं शौर्या हृदयीं सिंहासन
'हो क्रांति चिरायु' सिंहगर्जना करी
करि झणत्कार त्या पादबद्ध शृंखला । पण मद पडत परि चित्तोदधि
खवळला ! ॥ ५ ॥
घे मायभवानी महिषासुर तुज बळी । ग समरचंडिके पूजा तुज आगळी
द्यावया न जवळीं आणिक काहीं दुजें
नैवेद्य अर्पितो निज प्राणाचा तुला । वरदान देवते क्रांतीचें दे मला ! ॥ ६ ॥
परदास्यशृंखलाबद्ध देशमाउली । परसत्तापीडित माता मम गांजली
परदास्यनिशेचा अंत आता होऊं दे
उदयोस्तु उषाच्या स्वातंत्र्याच्या रवे । तव स्तवनगायना सज खगांचे थवे ॥७॥
आरक्त रविवरा रुधिराची अंजली । वाहीन तुला मी गाउनि स्तोत्रावली
कंठांत बांधुनी रज्जुपाश मृत्युचा
घेइन प्रभो तव एक लाख दर्शनें । फेडीन माझिया नेत्रांचें पारणें ॥ ८ ॥
नच मिटली रात्रीं नेत्रांचीं उत्पलें । नच उघत सतत पडत मन पावलें
नयनांच्या नीडीं निद्रेला नच थारा

क्षणिं उडुनी गेला जीवविहग अमरीं । क्षणिं पद्मरवारा स्पर्श
कुडीला करी ॥ १२ ॥
विश्वात दुमदुमो तुझा यशोडिंडिम । संदेश कथाया वीरा तव अंतिम
'कर्तव्यपथाचा अंत कालसदनांत'
ऋण मृत्यु पटविणें वीरानें जीवनीं । निजदेशविमोचनकार्यां समरांगणीं ॥ १३ ॥
निश्वात वाहतो मंदमंद समीरण । नीडात स्फुरे मधु मंजुळ खगकूजन
तृणतरू हासती रविकिरस्पर्शासवें
या फुलाफुलावरि चाले अलिगुंजन । सृष्टींत नादतें पुनश्च संजीवन ॥ १४ ॥
इ. स. १९३२ —वागीश्वरी, कडवीं १, ६–१८

## दत्तात्रय दामोदर पेंडसे

[जन्म इ. स. १९००]

### तुफान

दर्याला विक्राळ आलें तुफान । लाटांचें भेसूर चाले थैमान
भरुन अंगीं कापरें । नभीं न सूर्य संचरे
नारवा छातीचा भीती न त्यास । कोळीण लागत उभी उदास ॥ १ ॥
दर्याला विक्राळ आलें तुफान । कडाड चावतो दांत सैतान
घे लाग पाताळभेट । उफाळे ती नभीं थेट
ढगरेड्यावर यमाचें ठाण । वीज पाश फेकी ओढाया प्राण ॥ २ ॥
दर्याला विक्राळ आलें तुफान । बळी घ्याया झाला काळ बेभान
यमाची दूतिका लाट । धावते पिशी बेफाट
टकरा खडका देता हो चूर । किनारीं नाजूक धडधडे ऊर ॥ ३ ॥
दर्याला विक्राळ आलें तुफान । नावरे करून व्यर्थ सुकाण
आभाळ भयाण काळें । मोकाट तारु ज्हालें
रोरावे भरारा वारा नाचत । शीड फडाडुनी दोरा काचत ॥ ४ ॥

दर्याला विक्राळ आले तुफान । सोसावे होडी की घोडी तुफान
टपोरीं मोत्यें वरून । उधळी मोदें वरुण
प्रीतीभेट इंद्रधनु पाहातें । चुंबी किनाऱ्याला हासत लाट ॥ ५ ॥

इ. स १९३७ —सह्याद्रि

## द. कृ. पेंठे

[ जन्म इ. स. १९१४ ]

### अंगाई गीत

चल नीज गडे नीज गडे अंगाई । गाउनी निजविते आई ॥
तो गगनींचा सूर्य नाहिसा झाला । त्या जागीं चांद उदेला ॥
ही कोर दिसे भिवयासम बाळाच्या । चांदण्या जणू डोळ्यांच्या ॥
मी गातें जें गोड गळ्यावरि गीत । नदि देते मंजुळ साथ ॥
तुज निजवीतें रातकिड्याचें गाणे । किरकिर या मधु शब्दानें ॥
त्या वेणूच्या वनातुनी येशील । नीज नीज आता बाळ ॥
रवि येइल तो गुलाल फेकित गगनीं । जागवील सारी धरणी ॥
मग पक्ष्याची किलबिल येइल कानीं । जाईल झोंप तव उडुनी ॥
तुज झोंप मुळीं शांत लागते कोठें ? दचकून जरा चाळवते ॥
की गमतीचें स्वप्न काहिं तुज पडतें । अस्पष्ट मुखावरि दिसतें ॥
त्या स्वप्नानें गोड किती हसतोस । खळि पडते या गालास ॥
तू आनंदी तुजला आज उद्याचें । भय भेद न वाटायाचे ॥
घे निद्रेच्या अंकावरती झोंप । निजला का माझा भूप ॥

इ.स. १९३७ —'गमत व कुसळें' ( इ. स. १९४३ ) यातून

# राजाराम नीलकंठ बढे

[ जन्म इ. स. १९१२ ]

## १

### मारवाडवासिनी

निळी बुन्र्याची डोईवरुनी घेउनिया ओढणी ।
कुठें चालली मदगामिनी अवगुंठित चांदणी ? ॥
दो बोटांनीं डोळ्यापुढला पदर जरा सारुनी ।
फिरुन् फिरुन् का चोरुनि बघशी बाई बुरख्यांतुनी ? ॥
नवनितकोमलकांचनकाया वस्त्रांतरिं दडवुनी ।
अमोलरत्नें विभूषणानीं देह तसा मढवुनी ॥
गळ्यात पेटी हार अगठी बोटीं शोभे तिला ।
कुठुनी जागा अगावरती तिळही ठेवायला ?
हस्तिदंति पाटल्या गोठ नव बदहि दडावरी ।
अन्य न उपमा सौंदर्याला नवही खद्यांतरीं ॥
पायीं पैंजण निंदि निजनरा नथ नाकीं नवतिला ।
आगीं कंचुकी भव्य लेंहगा कटिवर गुडाळला ॥
वेहद्द वाढलें उदर पदर नावरी ।
शृंखला रुपेरी लोळतसे त्यावरी ।
ती विशाल नाभी वैभवशोभा धरी।
शोधायातें रसिक नजर जर अचुक वळे कोमला ।
फसवायातें भवरा जणु तो यौवनगगतला ॥
कुठवर बाई उभी राहसी वाट अशी पाहसी ? ।
राणाजीतें येता बघता क्षणात का निचकशी ? ॥
छुमछुम् छुमछुम् नुपुरनाद तो, मन् स्वप्निं फ्ला. ।
झाक बाजुला किल्ल्याचा अन् झोक तोल निस्तुला ॥

भुजलता गवाक्षातुनी कधीं पाहणें ।
मदधुद मदपद टाकुनिया चालणें ।
भेसूर कंठ कोकिळे तुझी गायनें ।
दूर पळे आनंद तरीही ऐकिन गे सुंदरी ।
करुनि टाक 'दिल जागबाग' मम छेडुनि बागेसरी ॥
मारवाडवासिनी प्रेमला रसिक मनोहारिणी ।
कधीं भासशी मला भामिनी महिषासुरमर्दिनी ॥
अहा अंगना, अनंग कुट्टनी ? पूर्ण अंग व्यापिते ।
'अर्धांगी' तिज म्हणावयातें जिव्हा चंचल भिते ॥

—'उपहासिनी' मधून

## २

### बहर

बंदिस्त जिवाची किलबिल क्षण थांबली ।
वाहतो पवन या अशा चोरपावली ? ॥ १ ॥
होणार काय तरि आज उपवनांतरीं ? ,
म्हणतात येतसे बहर आपुल्या घरीं ॥ २ ॥
तो दूत फुलांचा आला मधुसौरभ ।
संदेश सांगतो सकला सुगंदुर्लभ ॥ ३ ॥
आतूर पारवा ऐक हृदय दाबुनी ।
येणार बहर रे उद्या तुझ्या काननीं ॥ ४ ॥
भिरभिरा पाहती बंदिवान पाखरें ।
ती शोभा-नयनीं रक्ताश्रूचे झरे ॥ ५ ॥
मनहंस सारसा फडफड फडफड करी ।
येणार बहर लाडका आपल्या घरीं ॥ ६ ॥
परतंत्र पाखरें पंजरात कोंडलीं ,
बागेंत तयांच्या धूळधाण चालली ॥ ७ ॥

रडवाया येइल समीर दूतापरी ।
हासून सागतो बहार आली घरीं ॥ ८ ॥
बाहेर बहरली बाग आग अतरीं ।
धडक्तें हृदय ओततात्त अश्रुसरी ॥ ९ ॥
तरुल्ता बहरल्या नटली ती वाटिका ।
जित जीवा शोकातिका नवी नाटिका ॥ १० ॥
चच मिटून डोळे लुटलेलें वैभव ।
अन् घुमव सारखा दिगत तो स्तुतिरव ॥ ११ ॥
कीं बहार आली बहार आली नवी ।
त्या साम्राज्यावर विझेल कैसा रवी ? ॥ १२ ॥
मोडशील कैसा चोचीनें ते गज ? ।
धरतात सुटाया का वेड्या सावज ? ॥ १३ ॥
फडफडवि पस तो पुन्हा उडाया वरी ।
आदळला खालीं हताश धडपड करी ॥ १४ ॥
कधिं पाहिन डोळा भरून माझ जग ।
स्वच्छद भरारी घेउनि लंघिन नभ ॥ १५ ॥
ठायींच तळमळे हाय विचारा खग ।
अन् बहार आली तिथे होय तगमग ॥ १६ ॥

—' क्रातिमाला 'मधून

## २

## मुचकुंदाची झोप

कुठे एकदा दानवदमनीं गाजविता विक्रम ।
युगायुगाची घेशी निद्रा परिहराया श्रम ॥ १ ॥
*गिरिकुहरीं निर्जन घनतिमिरीं झाकुनि अंत पट ।*
कसा कळावा तुला जाहला सृष्टीचा पालट ॥ २ ॥

वृक्षराजि वनलता खुरटल्या तसे मानवी जग ।
विश्वशतेत दाखळले खाली अनंत उन्नत नग ॥ ३ ॥
मैनाच्या मुरगळीत माना ल्पती शुक कोकिळा ।
स्वातंत्र्याची गीतें विरलीं तिचा दाबिता गळा ॥ ४ ॥
अहिंसामयी शीतल छाया पसरे विश्वांतर ।
परक्यातें मोकळें टाकले स्वैर लुटाया घर ॥ ५ ॥
चिरमृताला कुठें आपल्या स्वातन्त्र्याची क्षिती ।
मनास मेल्या कशी असावी स्वातंत्र्याची स्मृती ? ॥ ६ ॥
उठा राजदूतांनो नातर सपुन जाइल सुगी ।
पिळून घ्यावा जीव जांवरी असेल ती धुगधुगी ॥ ७ ॥
जगताच्या अधिराज्यतृष्णेनें माजतात यादवी ।
भूगोलाचे रंग बदलते साम्राज्यें नवनवीं ॥ ८ ॥
रक्तरंगि रंगली पश्चिमा पूर्वेवर ये छटा ।
रंग तिकडचा इकडे उठवी युद्धाचा बावटा ॥ ९ ॥
नियतीची नवविलास नौका डुले रुधिरसागरीं ।
आक्रन्दनसंगीत तरळते समीरलहरींवरी ॥ १० ॥
पहा चालला अभिमानाचा मावळतीला रवी ।
रणपची गातात मिळुनिया अखेरची भैरवी ॥ ११ ॥
कुठल्या संकेतानें कपटी चांद हासतो नभीं ? ।
स्वार्थहेतुनें अंधारातहि दिवटी सेना उभी ! ॥ १२ ॥
राजनिष्ठ भारता केवढी गड्या तुझी थोरवी ! ।
डुबळ्या जीवा ! ये ये व्हाया रणयागातिल हवी ॥ १३ ॥
धावण्यास धावशील फसता संकटात तव प्रभू ।
आतुरतेनें जरी पाहते पराधीन मायभू ! ॥ १४ ॥
श्वासानें स्थापिलीं उलथलीं साम्राज्यें भूपती ।
अमर समर तें तरी झोपला का सुरसेनापती ? ॥ १५ ॥
मेलि न अजुनी मनें काळजी निद्रा जरी सचरे ।
मनामनाच्या निराशकुहरीं जळती ठिणगी स्फुरे ॥ १६ ॥

निराशेंत या तीच एवढी आशा हृदिं नांदते।
ऊठ ऊठ हे नव्या युगाच्या विजयी सेनापते! ॥ १७ ॥
उघडतांच तूं कोपनेत्र ते काळयवन जाळला।
बुद्धिसंभ्रमें इतिहासाचा विसर पडावा तुला ! ॥ १८ ॥
डिवचायातें शौर्य तुझें ही लाथ घातकी पुरे।
जाग झोपल्या पराक्रमा रे! आशा एकच उरे ॥ १९ ॥
उघडि नेत्र ही मुचकुंदाची झोंप सरूं दे आतां।
दिग्विजयाचें दिसुं दे डोळा वैभव तें भारता ॥ २० ॥

— ' क्रांतिमाला 'मधून

## ४

## करवंदीमागें

करवंदीमागें उभी लाजरी पोर।
कीं ढगाआड ती लपे विजेची कोर ॥ १ ॥
चालली करुनि अभिसार कुणा भेटाया?।
डोकावुनि बघती तुला तरूंच्या छाया ॥ २ ॥
हुडकती रातदिन अशी मीन आनंद।
कुंजांत कोठल्या लपला गे गोविंद ॥ ३ ॥
हा अवखळ वारा जन्माचा छळवादी।
प्रणयाचे भरतो सूर भावसंवादी ॥ ४ ॥
चाहूल तुझी ऐकिली लतावेलींनीं।
कुजबुजती कलिका परस्परांच्या कानीं ॥ ५ ॥
थरकांप जिवाचा असा नाच नयनांचा।
पावलोपावलीं गडे फुलांच्या ठेचा ॥ ६ ॥
बसवेल कुठवरी उगे मुखर नुपुरांना?।
हलुहळूं गुंजली मधुशब्दांची वीणा ॥ ७ ॥

का उगाच चाळा गडे असा पदराशीं ?।
लाजेचा चाले विलास मृदु गालाशीं ॥ ८ ॥
कुरवाळुनि तुजला देत धीर जलवती ।
शिकविते बोल प्रीतिचे रग रसवती ॥ ९ ॥

—'माझिया माहेरा जा' मधून

* * *

५

## साज वेळ

गेला दिवस निघोनी झाली बाई साजवेळ ।
दुरावल्या अंतरात, पुरे पाखराचा खेळ ॥ १ ॥
मदमद पावलानें कोण निघाली राउळा।
दिपकळीच्या तेजात, दिसे म्लान चंद्रकळा ॥ २ ॥
तिरपा दिव्याला हात, दुज्या हातात पणती ।
आसवाच्या पापण्यात, डुले आसवाचें मोती ॥ ३ ॥
छायाप्रकाशाची वीणा, गुंफिते ही दीपकळी ।
तुझ्या विरहाचा आसू, लवे पापणीच्या तळीं ॥ ४ ॥
म्लान पिवळ्या झावीत, दिसे गुलाबाची छटा ।
गालावरी ओघळला, तोच एकटा चोरटा ॥ ५ ॥
कशी पुसू पाहायाला, गुंतलेले हात दोन्ही ।
लाज उरीं रडताना, मोति पाहतील कोणी ॥ ६ ॥
आसवानीं विझेल ही, हातामधली पणती ।
टाळायातें अमंगला म्लान करिते कलती ॥ ७ ॥

* * *

# वि. वा. शिरवाडकर ( कुसुमाग्रज )

[जन्म इ. स. १९१२]

## १

### पाचोळा

आडवाटेला दूर एक माळ । तरू त्यावरती एकला विशाल ॥
आणि त्याच्या विलगोनिया पदास । जीर्ण पाचोळा पडे तो उदास ॥ १ ॥
उषा येवो शिंपीत जीवनासी । निशा काळोखी दडवु द्या जगासी ॥
सूर्य गगनातुनि ओतु द्या निखारा । मूक सारें हें साहतो बिचारा ॥ २ ॥
तरूवरचीं हसतात त्यास पानें । हसे मुठभर तें गवतही मजेनें ॥
वाटसरु वा तुडवीत त्यास जात । परी पाचोळा दिसे नित्य शांत ॥ ३ ॥
आणि अंतीं दिन एक त्या वनात । येइ धावत चौफेर क्षुब्ध वात ॥
दिसे पाचोळा घेउनी तयातं नेइ उडवुनि त्या दूर दूर कोठें ॥ ४ ॥
आणि जागा ही मोकळी तळाशीं ।
पुन्हा पडण्या वरतून पर्णराशी ॥

— 'विशाखा' मधून

## २

### सात

वेडात मराठे वीर दौडले सात ।
'श्रुति धन्य जाहल्या श्रुनी अपुली वार्ता
रण सोडुनि सेनासागर अमुचे पळता
अबलाहि घरोघर खन्या लागतिल आता'
भर दिवसा आम्हा दिसू लागली रात । वेडात मराठे वीर दौडले सात ॥ १ ॥
तें कठोर अक्षर एक एक त्यातील
जाळीत चालले कणकण ताठर दील

'मावारी वळणे नाहिं मराठी शील
विसरला महाशय काय लाविता जात?' । वेडात मराठे वीर दौडले सात ॥ २ ॥
वर भिवई चढली दात दाबतीं ओठ
छातीवर तुटली पटबंधाची गाठ
डोळ्यात उठें काहूर ओलवे काठ
म्यानातुनि उसळे तरवारीची पात । वेडात मराठे वीर दौडले सात ॥ ३ ॥
जरि काल दाविली प्रभु गनिमाना पाठ
जरि काल विसरला जग मराठी जात
• हा असा धावतो आज अरीशिबिरात
तव मानकरी हा घेउनि शीर करात । वेडात मराठे वीर दौडले सात ! ॥ ४ ॥
ते फिरता बाजुस डोळे किंचित ओले
सरदार सहा सरसावुनि उठले शेले
रिकिबींत टाकले पाय झेलले भाले
उग जात धुळीचे दूर क्षणीं क्षितिजात । वेडात मराठे वीर दौडले सात ! ॥ ५ ।
आश्चर्यमुग्ध टाकून मागुती सेना
अपमान बुजविण्या सात अर्पुनी माना
छावणींत शिरले थेट भेट गनिमाना
कोसळल्या उल्का जळत सात दर्यात । वेडात मराठे वीर दौडले सात ! ॥ ६ ।
खालून आग वर आग आग बाजूनीं
समशेर उसळली सहस्र क्रूर इमानी
गर्दीत लोपले सात जीव हे मानी
खग सात जळाले अभिमानी वणव्यात । वेडात मराठे वीर दौडले सात ! ॥ ७ ॥
दगडावर दिसतिल अजुनि जेथल्या टाचा
ओढ्यात तरंगे अजुनि रंग रक्ताचा
क्षितिजावर दिसतो अजुनि मेघ मातीचा
अद्याप विराणी कुणि वाऱ्यावर गात । वेडात मराठे वीर दौडले सात ! ॥ ८ ॥

इ. स. १९३६ —सह्याद्रि

* * *

३

## गर्जा जयजयकार

गर्जा जयजयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार ।
अन् वज्राचे छातीवरती घ्या झेलून प्रहार ॥
खळखळु द्या या अदय शृंखला हातापायात ।
पोलादाची काय तमा मरणाच्या दारात ? ॥
सर्पांनो उद्दाम आवळा करकचुनिया पाश ।
पिचेल मनगट परी उरातिल अभंग आवेश ॥
तडिताघातें कोसळेल का तारांचा संभार
कधींही तारांचा संभार ॥ गर्जा जयजयकार ॥ १ ॥
क्रुद्ध भूक पोटात घालु द्या खुशाल थैमान ।
कुरतडु द्या आतडीं करू द्या रक्ताचें पान ॥
संहारक काली तुज देती बळीच आव्हान ।
बलशाली मरणाहुन आहे अमुचा अभिमान ॥
मृत्युंजय आम्ही ! आम्हाला कसलें कारागार ।
अहो हें कसलें कारागार ॥ गर्जा जयजयकार ॥ २ ॥
पदोपदीं पसरून निखारे आपुल्याच हातीं ।
घेउनिया बेहोष धावलों ध्येयपथावरतीं ॥
कधिं न थांबलों विश्रांतीस्तव पाहिलें न मागें ।
बांधु न शकलें प्रीतीचे वा कीर्तीचे धागे ॥
एकच तारा समोर आणिक पायतळीं अंगार ।
होता पायतळीं अंगार ॥ गर्जा जयजयकार ॥ ३ ॥
श्वासांनो जा वायूसंगे ओलांडुन भिंत ।
अन् आईला कळवा अमुच्या हृदयातिल खंत ॥
सांगा वेडीं तुझीं मुलें हीं या अंधारात ।
बद्ध करांनीं अखेरचा तुज करिती प्रणिपात ॥

तुझ्या मुक्तिचें एकच होतें वेड परी अनिवार ।
तयाना वेड परी अनिवार ॥ गर्जा जयजयकार ॥ ४ ॥
नाचविता ध्वज तुझा गुतले शृंखलेंत हात ।
तुझ्या यशाचे पवाड गाता गळ्यात येतात ॥
चरणाचे तव पूजन केलें म्हणुनि गुन्हेगार ।
देता जीवनअर्घ्ये तुला ठरलां वेडे पीर ॥
देशिल ना पण तुझ्या कुशीचा वेड्याना आधार
आई वेड्याना आधार ॥ गर्जा जयजयकार ॥ ५ ॥
कशास आई भिजविसि डोळे उजळ तुझे भाल ।
रात्रींच्या गर्भीत उद्याचा असे उष काल ॥
सरणावरतीं आज आमुचीं पेटतात प्रेतें ।
उठतिल त्या ज्वालातुन भावी क्रांतीचे नेते ॥
लोहदंड तव पायामधले खळाखळा तुटणार ।
आई खळाखळा तुटणार ॥ गर्जा जयजयकार ॥ ६ ॥
आता कर ओंकारा ताडव गिळावया घास ।
नाचत गर्जत टाक खळींच्या गळ्यावरी फास ॥
रक्तमास लुटण्यास गिधाडें येउ देत क्रूर ।
पहा मोकळें केलें आता त्यासाठीं ऊर ॥
शारिराचा कर सुखेनैव या सुखेनैव संहार ।
मरणा सुखेनैव संहार ॥ गर्जा जयजयकार ॥ ७ ॥

इ. स. १९३९ —'विशाखा' मधून

४

अनामिकास

अनामवीरा जिथें जाहला तुझा जीवनान्त ।
स्तंभ तिथें ना कुणी बांधला, पेटली न वात ॥ १ ॥

धगधगता समराच्या ज्वाला या देशाकाशीं ।
जळावयास्तव संसारास्तव उठोनिया जाशी ॥ २ ॥
मूकपणानें तमीं लोपती संध्येच्या रेषा ।
मरणामध्यें विलीन होशी ना भय ना आशा ॥ ३ ॥
जनभक्तीचे तुझ्यावरी नच उधळले भाव ।
रियासतीवर नसे नोंदलें कुणी तुझें नाव ॥ ४ ॥
जरी न गातिल भाट डफावर तुझें यशोगान ।
सफल आहलें तुझेंच हें रे तुझेंच बलिदान ॥ ५ ॥
काळोखातुनि विजयाचा ये पहाटचा तारा ।
प्रणाम माझा पहिला तुजला मृत्युंजय वीरा ॥ ६ ॥

—' किनारा ' मधून

५

## निरोप

गर्दीत नागासम ती निघोनी । चाले, उरेना लव देहभान ॥
दोन्हीं करानीं कवटाळुनीया । वक्षःस्थळीं बालक ते लहान ॥ १ ॥
त्या गौर गालावर रक्तरेषा । हेलावती कुंतल शुष्कभालीं ॥
विच्छिन्न वस्त्रातुनि यौवनाची । ओसंडते मुक्तपणें नव्हाळी ॥ २ ॥
लज्जा न संकोच नसो न भीती । हो दग्ध तें स्त्रीपण संगरात ॥
आता उरे जीवनसूत्र एक । गुंतून राहे मन मात्र त्यात ॥ ३ ॥
बाजार तेथें जमला बळींचा । तेथेंहि जागा धनिकास आधीं ॥
आधार अश्रूसहि दौलतीचा । दारिद्र्य दुःखा दुसरी उपाधी ॥ ४ ॥
चिंध्या शरीरावर सावरोनी । राहे जगावात ध्रुवा उभी ती ॥
कोणीं पहावें, अथवा पुसावें । एकाच शापातुनि सर्व जाती ॥ ५ ॥
निर्धार येतां कसला मनाशीं । संपातुनी ये ठिणगीप्रमाणें ॥
फेकूनिया बाळ दिलें विमानीं । न्हावें पुढें काय प्रभूच जाणें ॥ ६ ॥

झाला इशारा, जन दूर झाले । आवेगुनी झेपावत तें विमान ॥
अश्रू, उसासे, ध्वनि, हुदके ते । वेगात गेलें गगनात यान ॥ ७ ॥
जा पाखरा, जा वणव्यातुनी या । पृथ्वीच आई पुढती तुझी रे ! ॥
आकाश घेईल तुला कवेंत । चारी दिशांचा तुज आसरा रे ! ॥ ८ ॥
ठावें न कोठें मग काय झालें । गेलें जळोनी मन मानवाचें ॥
मागल्य सारें पडलें धुळींत । चोहींकडे नर्तन हिंसतेचे ॥ ९ ॥
जें जें गमे सुंदर जीवनात । त्याच्या शवाचा रच हो धरेला ॥
जो धर्म व्हावा सकला प्रकाश । त्यातून अंधार भयाण आला ॥ १० ॥
झाले रिकामे करपाश आता । शून्यात सारेंच मिळूनि जाई ॥
सबध सर्पे—म्हणशील केव्हा । होती मलाही कुणि एक आई ॥ ११ ॥
काहीं असे बोल कुणास ठावे । आले न आले तिचिया मनात ॥
पाही परंतू नभि जेधवा ती । आनंद नेत्रांमधल्या जळात ॥ १२ ॥

—' किनारा ' मधून

## डॉ. शंकरलाल जानकीलाल पुरवार ( कृष्णामित्र )

[ जन्म इ. स. १९०५ ]

### शेतकरी

मुलें चिमुकलीं भाउ नायको सारें घरदार ।
कष्ट उपसती शेतामध्ये निशिदिनिं अनिवार ॥ १ ॥
पिकता राशी धान्याच्या किति मिळेल आपणाला ।
विचार असला कधीं न शिवतो माझ्या हृदयाला ॥ २ ॥
हिरव्या रोंड्यातुनीं कारळी कणसें बाहेर ।
पडता होतो सकल श्रमाचा माझ्या परिहार ॥ ३ ॥
वान्यावरतीं नाचु लागता दौलत मोत्याची ।
धुमारूळ हृदयात घालते लाट मोदाची ॥ ४ ॥

चारित असता फळें गोजिरी श्रमसाफल्याचीं।
मोत्र तुषारी शमून जाते ज्वाला चितेची ॥ ५ ॥
मनात म्हणतो घेउ सरी तिज, मुला भीकबाळी।
डोक्यासाठीं मुंडासे आणि एक गाय काळी ॥ ६ ॥
मधुस्वप्नाच्या रगीं ऐशा रंगुनिया जातां।
सुख तितकेंही लाभु न देती कुणी मदिय हाता ॥ ७ ॥
स्वर्णकणाना बघून जमती पक्षी खादाड।
धावुन येती सगेसोयरे पसरुन भोकाड ॥ ८ ॥
सारा बलुता कुणी मागती कुणी दिढी काढी।
अन् धर्माच्या नावाखालीं झोळि कुणी काढी ॥ ९ ॥
साहुकारही येती आपुलं घेउन वहीखातें।
सर्व भक्षुनी असते ज्याचे सदैव पोट रितें ॥ १० ॥
पिढ्यामागुनी पिढ्या संपती देणें देताना।
खात्याचें परि तोंड कधी नच दिसते बुजताना ॥ ११ ॥
मानवउदरीं स्वार्थ जन्मला स्वार्थोदरि खातें।
बीज बियाणें जसे त्यावरी जन्माला येतें ॥ १२ ॥

—' विराट मानव 'मधून

* * *

## श्रीकृष्ण पोवळे

[ जन्म इ. स. १९२१ ]

### न्याया

व्योमात भटकती तारे ध्येयविहीन।
ग्रह फिरती सूर्याभवतीं फेर धरुन।

अन अविरत फिरतो सुर्येहि अपुल्या भवतीं ।
सुख कोठें, अपुलें ध्येय बघे शोधून ॥ १ ॥
सुख आहे कोठ ? बघ शोधून जगात ।
सुख आहे कोठ ? बघ शोधून नभात ।
सुख मिळेल होउनि काय गुंग मद्यात ।
सुख मिळेल तुजला त्यागानें जळण्यात ॥ २ ॥
ही सम्राटाच्या असे तनूची माती ।
असतील यामध रूपगर्विता युवती ।
हा सूर्य तळपतो वैभवात व्योमात ।
होणार कधीतरि थंड तयाची ज्योती ॥ ३ ॥
न स्वप्न मनोहर शोभे ताजमहाल ।
पाहुनी गुगुनी काळ धरितसे डोल ।
भ्रम तुझा मानवा ! काळ हसे गालात ।
एकेक चिरा पाडुनी करील्च धूळ ॥ ४ ॥
स्वार्थांध नृपा हा का आवेश ? प्रमत्ता ।
गरिबाच्या शीर्षी व्यर्थ हाणिसी लाथा ।
सुख, मूर्खा, यात न तुज केव्हाहि मिळेल ।
काळाचा अजुनी रिता न झाला भाता ॥ ५ ॥
हें जीवन म्हणज असे मनोहर स्वप्न ।
होऊन राहिला जो तो त्यामधि मग्न ।
कल्पनेंत अपुल्या निर्मी ता सुखदु ख ।
अन मृत्यू म्हणज स्वप्नामधलें स्वप्न ॥ ६ ॥
सुख तुला पाहिजे तर तू विसर जगाला ।
सुख तुला पाहिजे तर तू विसर स्वत ला ।
विसरून स्वत ला हा स्वप्नीं रममाण ।
सुखसरितेच्या मग दिसतिल मोहक लीला ॥ ७ ॥
व्योमात पसरले तारे स्वैर अनंत ।
तेजाळ क्षणीं, तर होतीं मग क्षणात ।

आशेच्या झाल्या ठिकऱ्या काय कुणाच्या?।
का भग्नाकांक्षा फिरती ईशमनात ॥ ८ ॥
स्वर्गांतहि का हा एसा भेदाभेद ।
एकास नरक तर अन्या स्वर्गास्वाद ।
दळभद्र असलें सुरा आपण लाथाडू ।
मग नरकीं भोगू स्वर्गांमधला मोद ॥ ९ ॥
रुपाचें झळके तेज तव तनूभवतीं ।
तू रुपगर्विता—मी तर क्षुद्र पदार्ती ।
संयोग केविं मग होइल? न मुळीं शत ।
मातीमधि मीळून होइल मेल्यानंतीं ॥ १० ॥
नभ निरभ्र झाल मग पडुनी पाऊस ।
मातीला येई कसलासा मधुवास ।
कुणितरी म्हणाले हळु माझ्या कानात ।
मृत जीवाचे हे सुगंधयुत निःश्वास ॥ ११ ॥
का पापापुण्याची तुज वाटे भीती ।
जर कर्म आपुल्या नाहीं मुळिही हातीं ।
सैतान कुणी जो घेत कर्म करवून ।
तें पापपुण्य बा असल त्याच्या माथीं ॥ १२ ॥
पण सांग अगोदर काय पुण्य अन् पाप ।
जीवाला होतो तुझ्या ज्यामुळे ताप ।
हे पापपुण्य ही कल्पाच कल्पकतेची ।
मगळेच जीव हे भाळे आणि निष्पाप ॥ १३ ॥
ता देव रंगला देवींच्या समवेत ।
पण करीत नसशी नू पापास्तव खेद ।
कर करायचं त तू निश्चिंत खुशाल ।
तें पापपुण्य मग रंगु झाल्यावर अंत ॥ १४ ॥
का व्यर्थ ठेविशी आशा गाढ मनात ।
मेल्यावर भोगू विलास वर स्वर्गांत ।

तव आगा वेडा, खुळीच तव कल्पकता ।
छे, वृथा दिलें तुज दुःख, मागुनी सत्य ॥ १५ ॥
—'अनिलपराग' मधून

## श्री. ना. शिंदगी

[जन्म इ. स. १९३१]

### हमाल

मुंबापुरिच्या रस्त्यावर रोज हमाली मी करतां ।
सकाळसंध्याकाळ राबुनी पोट टीचभर मी भरतो ॥ ध्रु ॥
ओझें उचलुन दिनभर वाकुन रात्रीला भरता शीण ।
निमूट झाकुन फूटपाथवर शरीर देतो झोकून ॥
पहाट होता पोलिस तो । लाथा मारुन उठवीतो । डोळे चोळित मी उठतो ।
आळस झटकुन पोटासाठीं ओझें उचलाया सजतो ।
सकाळ संध्याकाळ राबुनी पोट टीचभर मी भरतो ॥ १ ॥
सकाळपासुन पिरपिर करुनी खुर्दा थोडा कमवावा ।
खुशाल त्यातिल थोडा थोडा रात्रीपर्यंत खर्चावा ॥
असा मामला चाले माझा कितीक वर्षें या शहरीं ।
संसाराची आणि उद्याची चिंता कसली नसे उरीं ॥
एकलकोंडा मसार । त्याला कसले घरदार । रस्त्याची कड हेच घर ।
रस्त्यावरच्या ससारमधि जिणं एकला मी जगतो ।
सकाळ संध्याकाळ राबुनी पोट टीचभर मी भरतो ॥ २ ॥
तुम्हासारखी जोडीदारिण ना नशिबीं, ना घरिदारीं ।
'दमून येई राया माझा' वाट ना कुणी बघणारी ॥
दुखले खुपले प्रेमानें कुणि मला न जगती पुसणार ।
रस्त्यावर जरि देह टाकला मजलागि न कुणि रडणार ॥

मी न कुणाचा कोण असे । कोणि न माझे लागतसे । जीवन भेसूर भासतसे ।
विडीकाडीच्या संगतीत परि क्षण दो सौख्याचे रमतो ।
सकाळसंध्याकाळ राबुनी पोट टीचभर मी भरतों ॥ ३ ॥

*

होते आईबाप आणखी बहीणभावंडे चार ।
होता अमुचा छोट्या गावीं छोटासा तो संसार ॥
आता काय हो पुसी तयाचें ? गेले सगळे मातींत ! ।
आणि टाकिलें मज दैवानें जन्मभरी या वाळींत ॥
रोजरोज हें आठवतें । पाणि न डोळ्याला ठरतें । अंतर अति हें कळवळतें ।
कुणा कळवळा दाटुन आतिल मजलागि न कुणि हळहळतो ।
सकाळसंध्याकाळ राबुनी पोट टीचभर मी भरतों ॥ ४ ॥

*

हातपाय जर थकले माझे, कोण सोडविल मम काम ।
लबाड जगती राबल्याविना देइल का कुणि मज दाम ॥
हातींपायीं जोवर रग ही असाच तोवर खपणार ।
आणि शेवटीं याच कडेला देहवृक्ष हा ढळणार ॥
येईल मग पोलीस पुन्हा । उच्चारिल अपशब्दांना । ओढिल दरदर पायांना ।
मुंबापुरिच्या हमरस्त्यावर भविष्य भीषण मी बघतों ।
सकाळ संध्याकाळीं राबुनी पोट टीचभर मी भरतों ॥ ५ ॥

## वसंत सबनीस

[ जन्म इ. स. १९२३ ]

### भारत माझा स्वतंत्र झाला

झरझर झरझर जा मेघांनो । गर्जत गर्जत दाहि दिशांना ।
दिसेल मानव ज्याला त्याला भारत माझा स्वतंत्र झाला ॥ १ ॥

गरुडा येथ थांब जरासा । ठेव बाजुला अमृतकुंभा ।
मार भरारी जा स्वर्गाला । स्वतंत्र भारत सांग जाहला ॥ २ ॥
परसत्तेशीं झुंजत असता । वीरमरण तें ज्यांस लाभलें ।
प्रणाम शतशः सांगा त्यांना । भारत अपुला स्वतंत्र झाला ॥ ३ ॥
जलदेवींनो ! नकाच थांबू । पाताळाप्रति लगबग धांवा ।
जाग करुनी त्या शेषाला । सांगा भारत स्वतंत्र झाला ॥ ४ ॥
स्वातंत्र्याच्या वाऱ्यांनो जा । गिरिकुहरीं संदेश पोंचवा ।
पत्थरातुनी घुमवा बोला । भारत माझा स्वतंत्र झाला ॥ ५ ॥
थांब पांखरा जा पूर्वेला । क्षितिजाची ही लंघुनि सीमा ।
येइल भास्कर सांग तयाला । भारत आतां स्वतंत्र झाला ॥ ६ ॥
ध्वजा उंच जा हिमालयावर । जेथुनि दिसतिल अवघे सागर
जाउनि तेथ सांग जगाला । भारत माझा स्वतंत्र झाला ॥ ७ ॥
पारतंत्र्य रे ज्याच्या माथीं । भारत त्याच्या उभा पाठिशीं ।
मुठीं द्यावया अन्यायाला । भारत माझा स्वतंत्र झाला ॥ ८ ॥

## मधुकर केशव नाईक

[ जन्म इ स १९२६ ]

### अबलांची ही सबल कहाणी

मदांधतेची पिउनी मदिरा । कृष्णकूरला ओंकित भवतीं ॥
कोसळला तो अधम खलांचा । जथा खान त्या गावावरतीं ॥ १ ॥
शर्थ जाहली प्रतिकाराची । मदांधतेनें परी जिंकिले ॥
धर्म शील मग पुरुष स्त्रियांचें । हिरावण्याला जेते सजले ॥ २ ॥
विझल्या आशा दिसे ललाटीं । नाश रेखिला सर्वस्वाचा ॥
आर्तस्वरें त्या दीन द्रौपदी । करिता धावा गिरिधारीचा ॥ ३ ॥

स्वयं अर्चना परतु माझ्या । बलिदानाची ये तमवेला ॥
जलप्रागना म्हणुनि क्षणभर । जलाशयावर आल्या अबला ॥ ४ ॥
निमिषामध्यें जलनर्तीच्या । कुशींत त्यांनीं ठाव घेतला ॥
मुक्त घोषही करुनि जलाचा । धीर तिनें त्या सतींस दिधला ॥ ५ ॥
ध्वनी गभिर तो पडता कानीं । दुष्टाची त्या नशा उडाली ॥
खोल कुठेतरि अत करणीं । । अनुतापाची वीज तळपली ॥ ६ ॥
परत अधोमुख नृपास फिरले । अनलाची ही सकल कहाणी ॥
गे मानसा जा ऐकायाला । जलाशयाच्या तीर्थस्थानीं ॥ ७ ॥

## गो. म कुलकर्णी

[ जन्म इ. स. १९१४ ]

### स्मृतिशेष साम्राज्य

एकदा नादली जेथं रम्या नगरी । त्या तिथे उगवती झुडप किति काटेरी ॥ १ ॥
या दगडानाही फुटता कद दु खाचा । कण्ठतात कहाण्या मरगळलेल्या वाचा ॥२॥
येथंच निलसलीं पदकमलें गमाचीं । पाण्यात मिसळलीं अर्घ्ये दिव्य ऋषींची ॥३॥
येथंच भेटली अयोध्येस किष्किधा । येथुनीच सुटलें आव्हान गयगा युद्दा ॥४॥
येथंच तपस्वी वैंची विद्यारण्य । फलभार घेउनी सामोरे ये पुण्य ॥५॥
ज्या गुहेंत घुमला ध्वनी वेदमत्राचा । निसतात आजला तिथें शिळाच्या
त्वाचा ॥६॥
सुमसेज सजविली प्रमद्वरानीं जेथ । त्या स्थळीं विलासी भग्न आजला जोर्त ॥७॥
मातींत मिसळले सुगध शोणित ओघ । ते हिरे जाहले गारगोटिचे ढीग ॥८॥
कट कारस्थानें लोप घोष हैदास । वाऱ्यावर विरला गर्वोद्धत आवेश ॥९॥
ही छिन्न जाहली मुद्रावळ देवाची । मागते पुराण दुबळ्याच्या कर्माची ॥१०॥

३

बांधून आपुल्या काळयत्र मणिबंधी । रोधू न शके कुणि क्षणहि काल स्वच्छंदी ।
जो लहरीवरनी नाचवि जीवित नौका । उमळता तयाला काय किनारा गेर्धा ? ॥

४

चिंतनात सरता निमिष पळे घटकात । कल्पना रंगल्या सहज भावकणिकात
नादात उरीच्या लाटा अन् लहरीच्या । अस्तित्व विसरलों भरतालिल निमिरात ॥

५

सतत धरेच्या पोटीं हिरवीं स्वप्नें । अतृप्त जिवाच्या ओठीं स्फुरतें गाणें
आकळ लाभतं जेव्हा ज्यास हवें तें । कोणते जगाला देईल तो नजराणे ?॥

६

तो आला माझ्या दारीं वेळिं अवेळीं । याचना तयानें परि न कशाची केली
आयष्टतें होतें एकच त्याचें गीत । मज स्मरतें त्याचें ध्रुवपद वेळोवेळीं॥

## अनंत जयवंत जगताप ( जयवंत कुमार )

[ जन्म इ. स. १९२४ ]

### आलीस तू माझ्या घरीं

आलीस तू माझ्या घरीं
तुझ्या स्नेहाळ दृष्टीनें
उजरहा उजळला
आणि चैतन्य पगला ॥ १ ॥

आलीस तूं माझ्या घरीं
तुला पाहुनी शुभांगे
दाही दिशा उजळल्या
मनीं चांदण्या लाजल्या ॥ २ ॥

आलीस तूं माझ्या घरीं
पारिजात हासुनिया
फुलें फुलीं बागेंत
करी तुझेंच स्वागत ॥ ३ ॥

आलीस तू माझ्या घरीं
आला आम्याला मोहर
स्वर्गसुखें सर्वें नेत
तुला देखोनि हर्षंत ॥ ४ ॥

आलीस तू माझ्या घरीं
सुगधानें गे त्याचिया
उधळीत हास्यफुलें
मन माझें धुंदावलें ॥ ५ ॥

आलीस तू माझ्या घरीं
फुले प्रीतिचा गे दीप
लागल्या गे साजरात
हृदयींच्या मदीरात ॥ ६ ॥

आलीस तू माझ्या घरीं
सोनियाच्या पावलानें
वाद्यें मगल वाजती
घरीं ज्योती उजळती ॥ ७ ॥

आलीस तू माझ्या घरीं
प्रकाशात उज्वलल्या
दीप घेउनी तेजाचा
फुले संसार प्रीतीचा ॥ ८ ॥

## प्रभाकर गुमास्ते

[जन्म इ. स. १९३०]

### बळी

शुभ्र फुलोरा नभिं तान्याचा । ज्योती धरतीवर थरथरती ॥
भेसुर हासे घूक तमातुन । काटे आगावरी दाटती ॥ १ ॥
निद्रा येउनि पहुडे वारा । स्वप्नामाजीं फुलें हासती ॥
नजर लावुनी पाताळाला । निवात सदनें डुलक्या घेती ॥ २ ॥
त्या समयाला एक गृहामधिं । मूक मनानें युगुल बैसलें ॥
व्याकुळलेली सुकलेली ती । त्याच्यापुढतीं गोंडस बाळें ॥ ३ ॥

चिंध्यावरतीं निजलेल्या त्या । मान बालकां जाणिव कसली ! ॥
शीतल पाणी पिउनी नुसतें । फुलवित स्वप्नें झोंपी गेली ॥ ४ ॥
सखोल नयनातुनी वाहती । पाझर अश्रूंचे दुःखांचे ॥
कधीं पुसे तो कधीं पुसे ती । थांबे परि ना स्पंदन त्याचें ॥ ५ ॥
अधर कापती मुस्कान्यांनीं । जीभ जाहली जड दोघांची ॥
परस्परांना अन समजावे ! । भाषा प्रेमळ नयनजलाची ॥ ६ ॥
लोचनांतलें जल अश्रूंचें । आटुन सारें विघ्न गेलें ॥
मिटल्या नयनीं भाव अनामिक । मार्ग तयांना दाटुन गेले ॥ ७ ॥
वज्राऐसा करुनी निश्चय । चिपाडापरी शरिरें उठलीं ॥
त्याच क्षणाला हृदयें कांपत । लकेर घूकाची भिरभिरली ॥ ८ ॥
पाठीवरती हात फिरवुनी । कथूं लागला पती तियेचा ॥
शशांककिरणें न्होउन आली । परिसायाला कातरवाचा ॥ ९ ॥
'सौख्याचा या आनंदाचा । क्षण न मिळाला माझ्या हातुन '
अबोल झाली जीभ तयाची । नयनीं आलें सलिल भराउन ॥ १० ॥
'मुक्या मनानें ओझीं वाहुन । जखमा तुमच्या खांद्यावरतीं' ॥
स्फुंदत स्फुंदत बोले भार्या । 'त्या माझ्या हृदयाला खुपती' ॥ ११ ॥
निद्रावश मग सान बालका । हळूंच उठवून सांगे माता ॥
मुखीं उद्याला आपण सारे । आता न राहिल कसली चिंता ॥ १२ ॥
स्नेहांवाचुन दीपामधली । सतेज दीप्ती विझुनी गेली ॥
भेसुर हांसत तमरूपानें । मूर्ती काळाची अवतरली ॥ १३ ॥
शुभ्र फुलोरा नभिं तान्यांचा । ज्योती आकाशीं थरथरती ॥
भेसुर हासे घूक नभांतुन । कांटे आंगावरी दाटती ॥ १४ ॥
क्षीण दिव्यांच्या प्रकाशातुनी । पाच आकृती स्तब्ध चालल्या ॥
चिरशांतीयुत सदन शोधण्या । सरिताकांठावरती आल्या ॥ १५ ॥
परस्परांचीं मुखें न्याहाळित । अश्रू गाळित उभे बिचारे ॥
मुलें बिलगतां मायकुशीला । मूकपणानें पिता हुंबरे ॥ १६ ॥
महतान्यांशीं खेळत खेळत । काळ चालल्या जलद तमांतुन ॥
कठोर निजकार्याची जाणिव । येइ पित्याच्या उरात उमलुन ॥ १७ ॥

मायकुशीतुनि मुलें ओढतां । अंधारासहि आला गहिंवर ॥
अथांग सलिलीं त्यांस फेकतां । उरीं नभाच्या उठलें काहुर ॥ १८ ॥
त्या पोरांच्या किंकाळ्यांनीं । थांबे गतकिड्यांची किरकिर ॥
अनंत तारे उसासताती । फुटुन चाललें पृथ्वीचें उर ॥ १९ ॥
जळतें मस्तक जळती काया । ठेवायाला तव अंकावर ॥
सरिते, दुबळे आलों आम्हीं । घाल आम्हावर मायापाखर ॥ २० ॥
अधर तयांचे हें पुटपुटतां । परस्परांना मिठी मारिली ॥
चिमण्यांना मग भेटायाला । जलात काया फेंकुन दिधली ॥ २१ ॥
उफाळलें जल, तुषार उठले । लाट भिडाया ये काठाला ॥
माझीं बाळें मला मिळालीं । सरिता वदली माणुसकीला ॥ २२ ॥

तृतीयखंड समाप्त

# कवि-परिचय

## प्रथम खंड

**सोमेश्वर चालुक्य** मराठी भाषेतील पहिली उपलब्ध कविता सोमेश्वर चालुक्याच्या मानसोल्लास या संस्कृत काव्यग्रंथात आहे. गुलबर्गा जिल्ह्यातील कल्याणी येथे सोमेश्वर इ. स. ११२६-११३८ या काळात राजा होता. त्याने इ. स. ११२९ च्या सुमारास मानसोल्लास लिहिला. हा ग्रंथ दक्षिणेकडे अभिलषितार्थ चिंतामणि या नावानेंहि ओळखला जातो. बडोदे सरकारनें या ग्रंथाचे दोन खंड प्रसिद्ध करून तिसरा खंड बडोदे येथील ओरिएन्टल इन्स्टिट्यूट सध्या छापत आहे. या संस्थेचे चालक श्री. भट्ट यांनी उपरोक्त संस्कृत ग्रंथातला प्रस्तुत उतारा पाठविला. राजा सोमेश्वराच्या अगोदरचा एक उपलब्ध मराठी ग्रंथ म्हणजे श्रीपतिकृत ज्योतिषरत्नमाला. परंतु या ग्रंथात पुढें नमून त्यातल्या ल्यखद्ध गद्याचेंहि अर्वाचीनीकरण झालेलें दिसतें.

सोमेश्वराने या कविता लोकगीत असल्याचें सांगितलें आहे. कानडी भाषेत सागरय नावाच्या ठेक्यावर म्हणण्याच्या लोकगीतांचा जुना उल्लेख आहे. तो या गीतांचा (शेवरच्या गीताखेरीज) प्रकार वाटतो. ही तत्कालीन प्रचलित लोकगीतें असल्यास सोमेश्वराने ती केवळ उद्धृत केलीं असें होईल. या कवितांत अनेक भाषांचें मिश्रण आहे. पहिल्या तीन ओळी शुद्ध प्राचीन मराठीत आहेत. 'मुररिपुममृत' ही ओळ जुन्या कानडीत असल्याचें काहीं तज्ज्ञांचें मत आहे. 'ज ब्रह्मणरकुळे' पासून पुढचा मजकूर अपभ्रंश भाषेत असून त्यांतील मजकुरांत दक्षिणेकडील भाषांतील शब्द असावेत. अन्य भाषांचें मिश्रण, मूळ उताऱ्यातच सभरपूर अशुद्धता, शब्द व कवितांचरण बरोबर न पाडले गेल्याची शक्यता इत्यादि कारणांमुळें या उताऱ्यांतील कित्येक शब्दांचा अर्थच लागत नाही. 'शिवरु,' 'ब्रह्मणेर' हे शब्दप्रयोग हिंदी व मारवाडी

आणि बंगाली या भाषांतील षष्ठीसारखे आहेत. महाराष्ट्रात स्त्रिया दळण दळताना ओव्या म्हणतात, असा उल्लेख सोमेश्वराच्या एका संस्कृत श्लोकात सापडतो व बाराव्या शतकात मराठींतून काव्यरचना होत असल्याची ही साक्षच म्हणता येईल

प्रस्तुत उताऱ्यात दशावताराचें वर्णन असून त्यातल्या कल्की अवताराचा उल्लेख संस्कृतात आहे दशावतारात रामाचें नाव मात्र नाहीं. मत्स्यावतार वर्णन जयदेवकवीच्या गीतगोविंदातील ' *प्रलयपयोधिजले धृतवानसि वेदम्। विहितवहित्रचरित्रमखेदम्* ॥ ' या ओळींची आठवण करून देतें ' वाणें ' या शब्दाचा जुना अर्थ वाहन असा आहे हा जुना अर्थ व ' शिबिका ' आणि ' शिवक ' या शब्दांतलें साम्य लक्षात घेता असे वाटतें कीं ' मनूची होडी वाहून नेली ' असा ' मनुशिवक वाणियले ' या शब्दांचा कदाचित् अर्थ असावा या समग्र उताऱ्याचा विशेष अभ्यास होणे अवश्य आहे

[ **संदर्भ** [ १ ] मराठी छंदोरचना ( इ स १९५० ), डॉ ना ग जोशी [ २ ] मराठी छंदोरचनेचा विकास ( अप्रकाशित ) डॉ ना ग जोशी. [ ३ ] श्रीपतिकृत ज्योतिषरत्नमाला, भारत इतिहास संशोधक मंडळ इतिवृत्त ( भा इ सं मं इ ) ( इ स १९१३ ) [ ४ ] *श्रीपतिकृत ज्योतिषरत्नमाला*, दक्षन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट बुलेटिन ( मार्च इ स १९५६ ), संपादक म्. जी पानसे ) ]

**मुकुंदराज** ' रत्नवनीच्या पहिल्या माळा ' असा महाराष्ट्रगीतात उल्लेख करून गोविंदाग्रजांनी ज्याला मराठीच्या आद्यकवीचा मान दिला तोच हा ' विवेकसिंधु'कर्ता मुकुंदराज प्रचलित विवेकसिंधूच्या अर्वाचीन भाषेमुळें कितपत प्राचीन आहे का नाहीं, तसेच त्याची अंबानगरी मराठवाड्यात का विदर्भात, इत्यादि अनेक प्रश्न वादग्रस्त आहेत. या ग्रंथाच्या अनेक हस्तलिखित प्रतींचें संशोधन करून प्रा कृ पा. कुलकर्णी यांनीं जास्तीत जास्त जुने पाठ असलेली आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध केली. या ग्रंथाची सगळ्यात जुनी हस्तलिखित प्रत इ स. १६५० ची असून मोळाच्या शास्त्राच्या पूर्वार्धात या कवीचा जुन्यात जुना उल्लेख आढळतो, अशी माहिती त्यांना मिळाली आहे व

ओवी छंदाचा उगम मुकुंदराजापासून झाला असा निर्देश असलेली एक ओवीहि उद्धृत केली आहे. अनेक जुन्या कवींनी 'विवेकसिंधूचा' अभ्यास केलेला दिसतो.

मुकुंदराजाच्या नावावर 'परमामृत' हा ग्रंथ व अनेक अभंग व पदे आढळतात. या नावाचे अनेक कवि होऊन गेलेले असल्यामुळे व सर्व काव्याची भाषा अर्वाचीन असल्यामुळें ते 'विवेकसिंधु' कर्त्याचे आहेत का नाहींत याबद्दल शंका वाटते.

[संदर्भ : [१] श्रीमुकुंदराजकृत विवेकसिंधु (इ. स. १९५७), प्रा. कृ. पां. कुलकर्णी. [२] सार्थ परमामृत (इ. स. १९३१), ज. र. आजगांवकर. [३] मुकुंदमुनिकृत गुरुमहस्त्र, महाराष्ट्र साहित्य पत्रिका (म. सा. प.) ज्ञानेश्वरी इ. स. १९५६, रा. ग. हर्षे. [४] महाराष्ट्र सारस्वत (म. सा.) चवथी आवृत्ति, वि. ल. भावे, पुरवणी डा. शं. गो. तुळपुळे.]

**गोरक्षनाथ** धुंडिराज मालूकृत 'नवनाथभक्तिसार' व 'नवनाथ-लीलामृत' या ग्रंथामध्यें उल्लेखिलेल्या नऊ नाथापैकीं गोरक्षनाथ हे एक होत. ज्ञानेश्वराच्या गुरुपरंपरेंत गोरक्षनाथ येतात. ती गुरुपरंपरा अशी.–आदि-नाथ–मच्छिंद्रनाथ–गोरक्षनाथ–गैनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञानेश्वर. गोरक्षनाथांनी ज्ञानेश्वराचे पणजे त्र्यंबकपंत यांना इ. १२०७ मध्यें उपदेश केल्याची आख्यायिका आहे. ज्ञानेश्वरादि बंधूंच्या अभंगांत गैनीनाथाचा उल्लेख आढळतो. या गैनीनाथांनीं 'गोरक्षगीता' हें प्रकरण लिहिलें. गोरक्षनाथांनी हिंदींत जास्त ग्रंथरचना केलेली दिसते. गुरव समाज त्यांच्या शिष्यसंप्रदायांत गणला जातो. इतिहाससंशोधक गो. का. चांदोरकर यांना मिळालेल्या काही त्रुटित पानांत प्रस्तुत उतारा होता. या उताऱ्यात ओवी व लयबद्ध गद्य यांचें मिश्रण दिसतें 'अमृतानुभव' व 'ज्ञानेश्वरी' यांच्यातील काहीं ओव्यांशीं या उताऱ्याचे साम्य दिसते तंजावर येथील 'सरस्वतीमहाल' ग्रंथा-लयाच्या सूचींत गोरक्षनाथाच्या काहीं पदांचा उल्लेख सांपडतो.

[संदर्भ. [१] मराठी वाङ्मयाचा इतिहास [म. वा. इ.] खंड पहिला (इ. स. १९३२), ल. रा. पांगारकर. [२] म. सा. [३] श्रीगोरक्षविरचित अमरनाथसंवाद, भा. इ. सं. मं. इ. (इ. स. १९१०), गो. का. चांदोरकर.]

## निवृत्तिनाथ-ज्ञानदेव-सोपानदेव-मुक्ताबाई

निवृत्तिनाथ (इ स १२७३-१२९८), ज्ञानदेव (इ. स १२७०-१२९६), सोपानदेव (इ स १२७७-१२९७) आणि मुक्ताबाई (इ स १२७९-१२९८) या चार भावडांनी अल्पवयात प्रगट केलेली बुद्धिमत्ता व कर्तृत्व याना जगाच्या इतिहासात क्वचितच तोड सापडेल मराठवाड्यातील पैठणजवळील आपगाव येथील विठ्ठलपत कुलकर्णी व रुक्मिणाबाई यांची ही मुले *या मुलांचे जन्मकाल चारपाच वर्षे अगोदरचे असल्याचेहि उल्लेख* आहेत विठ्ठलपतांनी एकदा सन्यास घेऊन पुन्हा गुरूच्या आज्ञेनुसार गृहस्थाश्रमात आल्यानतर त्याना ही अपत्ये झाली या 'घोर' अपराधाबद्दल पैठणच्या ब्रह्मवृदाने त्याना वाळीत टाकले व नंतर देहात प्रायश्चित घेण्यास सांगितले, आणि त्याप्रमाणे विठ्ठलपत व रुक्मणाबाई याना देहत्याग केला अशा प्रकार बाल्ययातच सामाजिक छळापायी मातापित्याच्या छत्राला अतर लेल्या या चार भावडाना स्वत लाही तत्कालीन समाजस्थितीत मोठ्या आपत्ति सहन कराव्या लागल्या ही पार्श्वभूमि लक्षात घेता या चार भावडाना *गाजविलेले कर्तृत्व आणि एन तारुण्याच्या भरात आयुष्याची केलेली समाप्ति* पाहून कुणालाहि हळहळ वाटल्यावाचून राहणार नाही 'तीन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे। वर्णा सूर्य तैसे प्रकाशले' असे यातल्या तीन बधूंचे यथार्थ वर्णन नामदेवाना एका अभगात केले आहे या तिघांच्या समाधि अनुक्रम त्र्यंबकेश्वर, आळंदी व सासवड येथे आहेत मुक्ताबाईंची समाधि तापी तीरी मेहुणगाव येथे असावी चौघाही भावडाच्या समाधीचे अभग नामदेवानी लिहिले आहेत चांगदेव, नामदेव, गोरा कुंभार, विसोबा खेचर इत्यादि सर्व समकालीन सतमंडळी चारी भावडाना फार मान देत असे आख्यायिका वरून दिसते

या चारी भावडामध्ये कर्तृत्वाने अग्र आणि अत्यत कीर्तिमान् म्हणजे *ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरामध्ये त्यांनी स्वत चा उल्लेख ज्ञानदेव असाच केलेला सरास आढळतो नंतरच्या काळात ज्ञानेश्वर असे नाव सापडते ही ओवी अशी – 'शके बारा शते बारोत्तर। त टीका केली ज्ञानेश्वर। सच्चिदानंदबाबा आदर। लेखकु जाहला॥' या ओवीने ज्ञानेश्वरीचा काल निश्चित केला*

असला तरी राजवाडेप्रतींत ही आढळत नाही व ही सच्चिदानंदबाबांनी रचिलेली असावी.

ज्ञानदेव या नावाचे अनेक कवि होऊन गेले असले तरी ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव यांची प्रतिभासंपन्न रचना त्या सगळ्यामध्ये विशेष उठून दिसते. ज्ञानेश्वरा व अमृतानुभव यांचा ज्ञानदेवांचे. चांगदेवपासष्टी हें प्रकरण व योगवासिष्ठ हा ग्रंथ यांचे कर्ते कोण हा विषय वादग्रस्त आहे. योगवासिष्ठांत 'जे तुवा गीता केली मऱ्हाठी' (१–३४ व तसेच १–८६) इत्यादि जे उल्लेख आहेत त्यावरून हा ग्रंथ ज्ञानेश्वरानंतरचा ठरतो. या ग्रंथाचें ज्ञानेश्वरीशीं बरेंच साम्य दिसतें. उदाहरणार्थ यातली 'चक्रांकातु ग्रवता' (१–३१५) ही ओवी ज्ञानेश्वरींत (९–२९) सांपडते. परंतु ज्ञानेश्वरीइतका हा ग्रंथ प्रगल्भ नाहीं आणि ज्ञानेश्वरीनंतर ज्ञानदेवांच्या हातून असला ग्रंथ निर्माण झाल्याचा संभव फार कमी वाटतो. मात्र हा ग्रंथ जुना आहे याबद्दल शंका नाहीं. क्रिस्तपुराणातील १।१।१२३–२५ या ओव्या पाहता या पुराणाचा कर्ता फादर स्टीफन्स यानें हा ग्रंथ वाचला होता, असें वाटतें. या ग्रंथातील 'भट्टाचार्य' 'भास्कर दर्शन' (४–३० व ४–३२) हे उल्लेख महानुभावांचे असावेत.

ज्ञानेश्वरी गेल्या सातशे वर्षांतील मराठी साहित्यांत 'एकमेवाद्वितीयम्' ठरलेली आहे. उच्च दर्जाचें काव्य, ओघवती वाणी, पांडित्य इत्यादि सर्व गुण तिच्यात आढळतात व उपमा, अलंकार, दृष्टांत इत्यादींनी ती तुडुंब भरलेली आहे. तिच्यांत शांतरस प्रमुख आहे व दहाव्या अध्यायांत 'देशियेचेनि नागरपणें। शांतु शृंगारातें जिणें' (१०–४१) असें सांगितलें तें साथ आहे. 'हे विश्वचि माझें घर' व 'आपपर जया नाहीं' (१२–२११ व १४३) यांत भावना कवीच्या होत्या असें ज्ञानेश्वरी वाचताना वाटते. म्हणूनच या कवीला 'माउली' ही अपूर्व पदवी दिली गेली. वारकरी पंथानें ज्ञानेश्वरीला मोठा मान दिला व 'ज्ञानबा तुकाराम' ही वारकऱ्यांची घोषणा महाराष्ट्रांतरेंहि ऐकू येते.

गीतेचें संस्कृत भाषेतलें तत्त्वज्ञान मराठींत आणण्याचें त्या काळाच्या दृष्टीनें क्रांतिकारक ठरणारें कार्य ज्ञानेश्वरांनी केलें. ज्ञानदेवांचा मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमान तींत ठिकठिकाणीं प्रत्ययाला येतो. त्यांनी 'माझा मराठाचि

बोलु ' ( ६–१४ ) ही प्रतिज्ञा प्रसिद्धच आहे मागल्या अध्यायात अवेच्या प्रार्थनेंतहि मराठींत साहित्यसोयाच्या ग्वाणी उघडव अशी त्यांची प्रार्थना आहे भास्करभट्ट, नरेंद्र, एकनाथ, कृष्णदास मुद्गल इत्यादि अनेक कवींना मराठीचा अभिमान प्रदर्शित केलेला असला तरी ज्ञानदेवाच्या ' देशियेच्या लावण्याच्या ' ( १०-४६ ) अभिमानापुढें तो फिका पडतो अल्पवयात ज्ञानदेवाना ज्ञानेश्वरीची रचना केली, हा चमत्कारच वाटतो ' तैशी दशेची वाट न पाता ' ( ६–४५१–५२ ) या त्याच्या ओव्या यासंबधात मोठ्या सूचक वाटतात

तेराव्या शतकातील मराठी भाषेचा नमुना म्हणूनहि ज्ञानेश्वरी महत्त्वाचा ठरत व तत्कालीन महानुभावीय वाङ्मयाशीं तिच्यातील भाषेच साम्य आह तिच्या नक्ला होता होता तिच्यात फार अशुद्ध व प्रक्षिप्त शिरल्या म्हणून एकनाथांनी उपलब्ध प्रतींच्या आधारें इ स १५८४ साली तिची सशोधित प्रत तयार केली व आताच्या प्रचलित ज्ञानेश्वरीचा पाठ तिच्यापासून आला आह यासबधींच्या एकनाथी ओव्या ज्ञानेश्वरींत साधारणत दिल्या जातात या ओव्यामध्यें काहीं प्रतींत ' जो ज्ञानेश्वरीपाठी । ओवी करील मन्हाटी । तर्णे अमृताच ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ' असे वजाविल आह प्रस्तुत मग्रहातील उतारे राजवाडेप्रतींतून घेतले आहेत ही प्रत एकनाथी ज्ञानेश्वरी पक्षा जुनी दिसत राजवाडेप्रतींत ' ळ ' ऐवजी सराम ' ल ' आढळता तत्कालीन महानुभावीय वाङ्मयात मात्र ' ळ ' आहे

ज्ञानेश्वरींतील अनेक उल्लेखावरून तत्कालीन स्थितीची कल्पना येत टाकसाळ व नाणीं ( ५ । २१ व २६ ), चामड्याच्या नाग ( ९ । ४४० । ५० ), सायाचा पधराचा कस [ ६ । ३४ ] इत्यादिंद्दल उल्लेख तींत आढळतात तेव्हांहि ' अधिकारिया रिगता गावो । होय जैसा उत्साव ॥ ' [ १८ । ७९२ ] असे होत असे व्यापारा सर्वकाळीं सारखेच असतात लोकांची घर पाडून देऊळ बाधायाचे व जनतेला नागवून अवडब घालायाचीं, अशी त्याची वृत्ति होती ( १३ । ७३० ). ज्ञानेश्वरींतील उपमा, विचार तत्कालीन स्थिति, निरनिराळ्या भाषांतून आलेले शब्द, ज्ञानेश्वराच तत्त्वज्ञान इत्यादि विषया *अनेक अगांपागांचें विवेचन अहमदनगरच्या वाङ्मयोपासक मडळाने प्रकाशित* केलेल्या ' ज्ञानेश्वरदर्शन ' या ग्रथात आह

ज्ञानदेवादि चारी भावंडानीं इतर सतकवींप्रमाणें अभंग रचलेले आहेत. परंतु पाठभेद, अर्वाचिनीकरण, प्रक्षिप्त अभंगाचा प्रवेश, इत्यादि अनेक दोष सर्वच सतकवींच्या अभंगात दिसतात व त्यामुळें पुष्कळदा अभंगाच्या कर्तृत्वा-बद्दल संदेह उत्पन्न होतो. ज्ञानेश्वराच्या नावानें असलेल्या अभंगापैकीं काहीं अभंग त्यांचे असावेत व काहीं अभंगाचें ज्ञानेश्वरीशीं साम्य वाटतें. एका जुन्या गाथेंत गुजराती रूपें असलेल्या नागलाणी नोंदींतला ज्ञानेश्वराचा अभंग आहे तर त्याच्या एका जुन्या चरित्रात कानडी अभंग आहे. 'देव करीं' हा अभंग 'मुमुक्षु' मासिकातून घेतला आहे. 'काय करिसी' हा अभंग नसून 'चंद्रकांत राजाची कन्या' या चालीमारखें तें पद आहे. ज्ञानेश्वरानीं भिंत चालविल्याच्या आख्यायिकेसंबधात 'चुन्तिल पाय चालतिल भिंती' व 'परि जडातें चेष्टविते' हे त्याच्या अभंगातील उल्लेख सूचक दिसतात. विठोबा हा कानडी देव असल्याचा उल्लेख 'कानडा हा विठ्ठल कर्नाटकु' या अभंगात सापडतो.

निवृत्तिनाथाची 'निवृत्तेश्वरी' व 'निवृत्तिसार' आणि सोपानदेवाची 'सोपानदेवी', 'पचीकरण' व 'प्राकृत गीता' या ग्रथाचे उल्लेख आढळतात. 'तीरें संस्कृताचीं गहनें' (ज्ञानेश्वरी ११।९) या उल्लेखावरून निवृत्तिनाथानीं काहींतरी ग्रथरचना केली होती, असे दिसतें. सोपानदेवाची गीतेवरील टीका उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या ग्रथालयात आहे. तिची भाषा अर्वाचीन वाटते.

मुक्ताबाई, जनाबाई व महदंबा या समकालीन असून मराठी भाषेतील आद्य ज्ञात कवयित्री होत. मुक्ताबाईचे उपलब्ध अभंग थोडे आहेत. ज्ञानेश्वराना रस्त्यांत कुणीतरी सन्याशाचीं मुलें म्हणून हिणविल्यावर ते खिन्न होऊन दार बंद करून घेऊन खोलीत बसले, त्या प्रसगावर लिहिलेल्या ताटीच्या अभंगात मुक्ताबाई लडिवाळपणानें व धीटपणानें ज्ञानेश्वरानाच चार शब्द सागते. ती तिघाहि भावाची लाडकी असणार. म्हणूनच 'त्रिवेणीचा ओघ जैसा एक ठायीं । तैशी मुक्ताबाई आम्हामध्यें ॥' असे तिच्याविषयींचे उद्गार नामदेवानीं ज्ञानेश्वरादि बधूच्या ताडीं घातले आहेत.

[संदर्भ · [१] प्राचीन मराठी सतकवि, खड पहिला (इ स. १९०७), (प्रा म. स.) ज. र. आजगावकर. [२] ज्ञानेश्वरी( इ स १९०९ ), सत्वा-

यौतेजक सभा धुळें (स. स. धु.), वि. का. राजवाडे. [३] श्रीशिवकल्याण-कृत अमृतानुभव विवरण (इ. स. १९३२) व अमृतानुभवाच्या इतर आवृत्या. [४] योगवासिष्ठ (इ स. १९१४) स. स. धु, गो. का. चांदोरकर. [५] पामरी प्रदीप (इ. स १९३५), म. सी. गुबध. [६] योगवासिष्ठ आणि संत वाङ्मय (इ. स. १०५४), डॉ. श. वि. पराजपे. [७] ज्ञानेश्वरदर्शन खंड १ व २ (इ. स. १९३४), अहमदनगर वाङ्मयोपासक मंडळ. [८] ओवीच्या अभंगांची सकल संत गाथा, (स.स.गा.) (इ. स. १९५५), गो. शं. गाहिरकर. ज्ञानदेवाचा गाथा (इ. स. १९२७), साखरेबुवा, ज्ञानदेव महाराजाच्या अभंगांची गाथा (इ. स. १९०६) गो. ना. दातार, इत्यादि गाथा. [९] मुमुक्षु (फेब्रुवारी इ. स. १९२७). [१०] ज्ञानेश्वरमहाराजांचे चरित्र (इ. स. १८८४), पुर्णेवेवव. [११] ज्ञानेश्वरांची प्रभावळ (ज्ञा. प्र.) (इ. स. १९२८), ल. रा. पांगारकर. [१२] म. सा.]

**चोखामेळा :** हे नामदेवकालीन पांडुरंगभक्त जातीने महार होते. चोखोबा, त्यांची पत्नी सोयराबाई, बहीण निर्मळा, मेहुणा बंका व मुलगा कर्म मेळा या सर्वांचे अभंग आहेत. पंढरपुराजवळ मंगळवेढे येथें वेठीने कामावर असताना गावकुस कोसळून त्यांना इ. स. १३३८ साली अपघाती मृत्यु आला असे म्हणतात. मोरोपंतांनी चोखोबाचे वर्णन असे केले आहे :

> गावा नच मानावा चोखा मेळा महार सामान्य ।
> त्याच्या करि साधूंचा चोखामेळा महात्मा मान्य ॥

[संदर्भ, [१] नामदेव गाथा (इ. स. १८९४), तुकाराम तात्या. [२] वारकरी सांप्रदायिक चोखा मेळा अभंग गाथा, दुसरी आवृत्ती (इ. स. १९२७), बा. ए. पाठक [३] ज्ञा. प्र [४] स. स. गा.]

**नामदेव :** महाराष्ट्रातील लोकमान्य संतकवींचे एक अग्रणी नामदेव पंढरपुरच्या शिंपी कुळातले. त्यांचे वडील दामाशेट व आई गोणाई. नामदेवांचा काळ इ.स. १२७०-१३५० असा समजतात. या मुदतीतील मराठी

नरहरी सोनार, जगमित्र नागा इत्यादि अनेक संतांचे ते समकालीन झाले. नामदेवाची आई, पत्नी, मुलें, दासी जनाबाई इत्यादि त्याच्या परिवारांतील सर्वांना अभंग रचिले आहेत, असें त्यांना मुलवृत्तांतपर अभंगांत नमूद केलें आहे असें असूनहि नामदेवाची अधिकृत गाथाच उपलब्ध नाहीं

नामदेवाच्या गाथ्यामध्यें चरित्रपर, आळंदीचें व ज्ञानेश्वरादि भावंडांच्या समाधीविषयीं आणि अन्य प्रसंगांविषयीं असे अभंग आढळतात या सर्वांच अभंगांची भाषा अर्वाचीन दिसते यावरून किती अभंग ज्ञानेश्वरकालीन नामदेवाचे आहेत हें निश्चित सांगता येत नाहीं आळंदीच्या अभंगांत तर नंतरच्या काळांतील बहिरंभटाचा उल्लेख आहे नामदेव नावाचे अनेक कवि होऊन गेले तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथसूचींत नामदेवनामा असाहि एक कवि आढळतो नामदेव व विष्णुदास नामा या दोघांच्यांत घोटाळा आहे सोळाव्या शतकांतला विष्णुदासनामा या कवीनें आपल्या बुधजनवर्णीत नामदेवाचा उल्लेख केलेला आहे. व तो ज्ञानेश्वरकालीन नामदेवाहून भिन्न आहे, हें उघड आहे पण इ. स. १२७६ मध्यें दामोदर पंडितांनीं विष्णुदास नामाला उपदेश केला, असा उल्लेख महानुभावीय मराठी वाङ्मय या ग्रंथांत आहे तसेंच वृद्धाचारांतील ( वृद्धाचार २७ ) उल्लेखहि तसाच दिसतो इ. स. १२७५ हा काल जरी जुळणारा नाहीं तरी हे उल्लेख ज्ञानेश्वरकालीन नामदेवालाच लागू पडतात त्याचबरोबर विष्णुदास नाम्याच्या महाभारताच्या प्रतीहि महानुभावांच्या मठांत आढळतात म्हणून नामदेवांनीं महाभारत लिहिलें असावें आणि महानुभावांनीं तें आपलें म्हणून ठेवलें असावें, असें दिसतें कृष्णदास शामा हा कवि तर नामदेवांना महाभारत लिहिलें असल्याचें स्पष्ट सांगतो म्हणून नामदेवांनीं लिहिलेलें महाभारत कोणतें हें ठरविण्यासाठीं विष्णुदास नामा आणि नामा पाठक यांच्या महाभारतांची कसोशीनें छाननी झाली पाहिजे एकनाथांनीं ' जयाचा ग्रंथ पाहतां । ज्ञान होय श्रोतां ॥ ' ( भागवत ११।२२ ) असा नामदेवाविषयीं उल्लेख केला आहे यावरून नामदेवांनीं कांहीतरी स्वतंत्र ग्रंथरचना केली असावी आणि तीपैकीं महाभारत हा एक असावें, असें दिसतें हें महाभारत प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न फारसा झालेला नाहीं.

ज्ञानेश्वर व नामदेव यांनीं दोघांनी मिळून तीर्थयात्रा केली आणि एका ठिकाणीं नामदेवांनी प्रार्थना केल्याबरोबर कूपांतून पाणी वाहू लागलें, असें वर्णन तीर्थावळीच्या अभंगामध्ये आहे हाच तो बिकानेरेपासून १०-१२ मैलावर कोलादजी या गावीं असलेला प्रसिद्ध 'नामदेवकूप'. 'नामदेव झाला तृपाक्रान्त । ते स्थळीं अद्यापि कूप वाहात । याना मारवाडदेशात । मार्गशीर्षांत भरतसे ॥' ( भक्तविजय १२-५३ ) असें महीपतींनींहि म्हटलें आहे शीखांच्या ग्रंथसाहेबांत नामदेवाचीं ६१ पदं आहेत त्यांतील काहीं खुद्द नामदेवाचीं असतीलहि. पंजाबात घोमान येथें नामदेवमंदिर असून नामदेवपंथाचे लोकहि पंजाबात आहेत नामदेव काहीं काळ पंजाबात राहिले असावेत. उत्तर हिंदुस्थानातहि नामदेव प्रसिद्ध आहेत. कबीरपुत्र कमाल म्हणतो—

दरल्सन याने नामा दरजी विठ्ठल उनका बदा है ।
और सेवा कछू न जाने अदरभीतर केशव है ॥

[सदर्भ [१] प्रा म स [२] नामदेवाचीं गाथा ( इ स १८९४ ), तुकाराम तात्या, श्रीनामदेवांची सार्थ गाथा पहिला भाग (इ स १९४९), प्र सी गुप्ते, नामदेवांचा गाथा ( इ स १९३१ ), वि न जोग, इत्यादि गाथा. [३] ज्ञा प्र [४] नवनीत. [५] महानुभावीय मराठी वाङ्मय (म म वा) ( इ स १९२६ ), डॉ य खु. देशपांडे. [६] मुद्राचार, म सा. प अंक ३६ (ऑक्टोबर इ स १९३६), वा ना देशपांडे. [७] विष्णुदास नामा, नामा पाठक, कृष्णदास दामा पाहा ]

नुझा दरबार' हें जनाबाईचें पद दिंडीच्या चालीवर आहे भानुदास व विष्णुदासनामा यांच्या दिंडीच्या चालीवरील कविता पाहता ज्ञानेश्वरकाळीं दिंडी इतकी परिणत झाली असल्याबद्दल शंका वाटते.

[ संदर्भ: [ १ ] प्रा. म. स [ २ ] नामदेव, भानुदास पाहा. ]

**जोगा परमानंद** - हे बार्शीचे शूद्र असून यांची कविता विठोबा तेलीचर उतरून घेत असत, असें म्हणतात.

[ संदर्भ: प्रा. म. स. ]

**परिसा भागवत** — हे नामदेवशिष्य होते.

[ संदर्भ: महाराष्ट्र कविचरित्र भाग तिसरा ( इ. स. १९१४ ), ज. र. आजगांवकर ]

**म्हाइंभट** नगर जिल्ह्यातील सारोळें येथील हे ब्राह्मण. महानुभाव पंथाच्या चक्रधर स्वामींचे हे शिष्य. नागदेवाचार्यांच्या प्रेरणेनें महाराष्ट्रभर हिंडून चक्रधरस्वामींच्या संबंधित व्यक्तींकडून माहिती जमवून यांनी 'लीळा चरित्र' हा मराठींतील आद्य गद्यग्रंथ व आद्य चरित्रग्रंथ लिहिला. या ग्रंथाची रचना ज्ञानेश्वरीच्या आधीं १०–१२ वर्षें झाली. म्हाइंभटाचा उल्लेख महिन्द्रव्यास, माहिमभट्ट, इत्यादि नावांनींहि होतो. यांनी 'गोविंदप्रभुचरित्र' हा आणखी एक ग्रंथ लिहिला असून महदंबेच्या धवळ्यात उत्तरार्धाच्या कर्तृत्वात म्हाइंभटाचा भाग असावा. प्रस्तुत आरत्या अप्रकाशित आहेत. या आरत्या व प्रार्थना महंत गोपिराज महाराज महानुभाव यांच्या कृपेनें मिळाल्या. अन्वय स्थळांत या आरत्यांचा उल्लेख आहे २–११ या आरत्यांच्या पहिल्या ओळी त्यात उद्धृत केलेल्या आहेत. पहिली आरती मुळांत स्वतंत्र असून मागाहून तिचा 'दशकांत' समावेश केला असावा. महानुभावीय पंथाच्या साहित्यांत आरत्या व स्तोत्रें विपुल आहेत.

[ संदर्भ [ १ ] म म वा [ २ ] लीळाचरित्र [ इ स १९३८ ], दुसरी आवृत्ति [ इ. स. १९५१ ], ह. ना. नेने. [ ३ ] महानुभाव मासि

स्वयंवर ही तिचीं दोन प्रकाशित काव्यें. तिनें 'गर्भवास' ओव्याहि रचलेल्या आहेत. तिचा चक्रधरस्तुतिपर अभंग लीळाचरित्रांत आहे. (लीळा २७१)

धवळे हें महदंबेचें प्रमुख व महत्त्वाचें काव्य. धवळे म्हणजे धवल यशोगानाच्या कविता. कृष्णरुक्मिणी-विवाह हा त्याचा विषय. गोविंदप्रभूंच्या एका काल्पनिक विवाहप्रसंगीं या काव्याचें गायन झालें. 'महदाइसीं गोविंद राजों धवळीं आइकवीले' असा उल्लेख या धवळ्याच्या शेवटीं आढळतो. या काव्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध हे दोन्ही भाग अगदीं स्वतंत्र आहेत. उत्तरार्धाला म्हाइंभट व लक्ष्मीधरभट यांचाहि हातभार लागलेला असावा.

मुक्ताबाई, जनाबाई, व महदंबा या तिघींमध्यें आद्य कोण, धवळे ज्ञानेश्वर पूर्वकालीन का नंतरचे, याविषयीं वाद आहे. धवळ्याची रचना कदाचित ज्ञानेश्वरांनंतर १०।१२ वर्षांनीं झाली असावी. परंतु या तिघी कवयित्रींच्या काव्यरचनेपैकीं महदंबेचीच रचना बरीचशी मूळ जुन्या स्वरूपात असल्यानें विशेष महत्त्वाची ठरते. तत्कालीन समाजस्थिति, चालीरीति, इत्यादींचें वर्णन धवळ्यामध्यें आढळतें. धवळे हे ठराविक रागाच्या गाणीं असावीत. महदंबे नंतरहि धवळ्याची रचना होत असावी. 'सभा बैसली निजगेहीं। धवळे गातीं स्वानंदें ॥' (एकनाथी रुक्मिणी स्वयंवर १६।४८), तसेंच 'लग्नाचियें दिसीं उखणें मांडिलें। धवळ आरंभिले सप्रेमेसीं ॥ धवळामाजीं गातां गाइलें रामनामा। एकोनिया प्रेम वर्णिलें आलें' (धवलचंद्री गाथा २७०९) असे धवळ्याचे उल्लेख एकनाथाच्या ग्रंथात आहेत. मातृकीरुक्मिणीस्वयंवर धवळ्याच्याच धर्तीवर आहे. हें काव्य आहे अभंग वृत्तांत, पण महदंबा त्याला वोवी म्हणते. चक्रधरस्मृतींच्या अभंगाचें वर्णनहि 'वोवि गातांनां अंग करें' आहे. अभंगाचा उगम ओवीतूनच झाला असून त्या काळीं त्याला ओवीचाच एक प्रकार समजत असावेत.

धवळ्याच्या पोथींमध्यें पाठभेद फार आहेत. धवळ्याच्या प्रकाशित पुस्तकांतून उतारे घेण्याच्या मार्गांत एक विलक्षण अडचण आली. परंतु महंत गोपीराज महाराज यांच्या कृपेनें पोथ्या मिळाल्यामुळें त्यांतून प्रस्तुत उतारे देतां आले.

[संदर्भ [१] महदंबा, आद्य मराठा कवयित्री (द्वितीय आवृत्ति १ सु.

१९५६; प्रथम आवृत्ती इ. स. १९३- ), वा ना देशपांडे. [२] म्हाइमटकृत *लीळाचरित्र ( इ स. १९३८ ), ह ना. नेने. [३] आद्य मराठी कवयित्री* महदंबा नव्हे, प्रसाद ( मे इ. स १९५८ ), न शि चोधरी ]

**भास्करभट्ट :** हे मराठवाड्यातील बोरी गावचे. शिशुपालवध व उद्धव गीता हीं यांचीं दोन काव्यें महानुभावीय सप्तग्रंथांपैकीं होत पदलालित्य व भाषासौंदर्य हें याच्या काव्याचें वैशिष्ट्य आहे, म्हणूनच याना कवीश्वर व्यास ही यथार्थ पदवी मिळाली शिशुपालवधात भक्ति व शृंगार हे प्रमुख रस असून सृष्टिवर्णनावरहि त्यात विशेष भर दिलेला आढळतो. उद्धवगीता ही भागवताच्या दशम स्कधावरील टीका असून तिची शैली थेट ज्ञानेश्वरीसारखी दिसते. या दोन ग्रंथाच्या जोडीला मराठी पूजावसर हे प्रकरण कवीश्वरानीं रचिलें. प्रस्तुत कविकृत 'पाच आणि सात' अथवा मूर्तिवर्णनस्तोत्र, विरहाष्टक, जयाष्टक व श्रीयाष्टक यांचा उल्लेख अन्वयस्थळात असला तरी वृद्धाचारात नाहीं. यातले श्लोक प्रासरहित आहेत. ते आल्हादक सरस उतरलेले नाहींत. तरी जुन्या मराठी श्लोकाचा नमुना म्हणून ते महत्त्वाचे ठरतात. मराठींतली सुरुवातीची श्लोक-रचना प्रासरहित होती पण हा प्रकार मराठींत टिकू शकला नाहीं व प्रासयुक्त श्लोक आले. गोपिराजमहाराजाच्या कृपेनें मूर्तिवर्णनस्तोत्राचे श्लोक मिळाले.

शिशुपालवधाचा काळ इ. स १२७३ असल्याचे दर्शविणारी ओवी या काव्याच्या छापील प्रतींत असली तरी दुसऱ्या प्रतींत नाहीं. नरेंद्राचें रुक्मिणी स्वयंवर व केशवराजसूरी याचा मूर्तिप्रकाश ( अप्रकाशित ) यांतील रचनेशीं भास्करभट्टाच्या रचनेचें साम्य दिसतें ज्ञानेश्वरीनतर १८।२० वर्षांनी त्यांनी ही काव्यरचना केली असावी असे डॉ. कोल्ते यांचे मत आहे.

इतर महानुभाव कवींप्रमाणे कवीश्वरानीं संस्कृतमध्येंहि काव्यरचना केलेली आहे.

[ संदर्भ : [१] शिशुपालवध, महाराष्ट्र काव्यग्रंथ ( इ. स. १९२६ ), वि. ल. भावे. [२] उद्धवगीता, शारदाश्रम ग्रंथमाला ( इ. स. १९३८ ), वा. वि. भि. कोल्ते. [३] ल्हादार येथे छापलेले मूर्तिवर्णनस्तोत्र व वत्सहरण ( मुंबई )

येथील गोविंदराज महाराज महानुभाव यांजकडून मिळालेली पोथी. [४] म. च. स. [५] अन्वयस्थळ व वृद्धाचार. [६] भास्करभट बोरीकर, चरित्र व काव्यविवेचन (इ. स. १०३५) वि. भि. कोलते. [७] भास्करभट बोरीकर, याचा मराठी पूजावसर, म. सा. प. (जून इ. स. १९३७) वि. भि. कोलते.]

**दामोदर पंडित** : महानुभावीय सात ग्रंथांपैकी वछाहरण या काव्याचे हे कर्ते. या काव्याचा काळ डॉ. य. खु. देशपांडे यांच्या मते इ.स. १२७८, तर डॉ. वि. भि कोलते यांच्या मतें इ. स. १३१२ असा अदाजलेला आहे. याची जुनी प्रत इ. स. १५३५ ची आहे. या काव्याची वच्छहरण व वत्सा हरण अशींहि नावें आढळतात. भागवताच्या दशमस्कंधावर हें काव्य आधार लेलें असून पंडिताचे परम मित्र केशवराजसूरी यांचा उल्लेख त्यात ६, ६२, १२३, १९७, ३७५, व ५०२ एवढ्या ओव्यांत येतो व पंडितांचें नाव फक्त शेवटच्या ५०३ या ओवींत येत. त्यामुळे ग्रंथ खरोखरी कोणाचा ही शंका उपस्थित होते. केशवराज व पंडित यांच्या काव्यांची या दृष्टीनें तुलना होणे अवश्य आहे.

दामोदर पंडिताच्या मराठी व हिंदी चौपद्या आहेत. त्यांनीं रचिलेल्या धुवा काव्यप्रकाराचे नमुने स्मृतिस्थळात व वृद्धाचारात आढळतात. (स्मृति २६१ व वृद्धाचार शेवट). नागदेवाचार्यांनी गाण्याची बंदी केली असता विजनात त्याचे तोंडून प्रस्तुत धुवा बाहेर पडला (स्मृति ८९). त्याची आरती महानुभावीय मराठी वाङमय या ग्रंथात असून 'मगळमूर्ति भक्त दृष्टि निगाळी ती' या आरतीचा उल्लेख अन्वयस्थळात आहे.

[संदर्भ : [१] वच्छाहरण (इ स. १९५३), डॉ. वि. भि. कोलते. [२] म. म. बा. [३] स्मृतिस्थळ. [४] अन्वयस्थळ. [५] वृद्धाचार]

**हयग्रीवाचार्य** : पंडित हिरण्यगर्भ ऊर्फ हयग्रीव व्यास हे महानुभाव कवि गोदातीरीं पांचालेश्वराजवळील राक्षसभुवनचे राहणारे. याचा काळ डॉ. य. खु. देशपांडे यांच्या मतें इ. स. १२६५ १३२४, तर वि. ल. भावे यांच्या मते इ. स १२७५--१३२४ हा आहे. इ. स. १३०९ मध्यें ते गोपाळ पंडितांचे शिष्य होऊन पैठणास आले व निर्येन्त आमरण राहिले

'गद्यराजस्तोत्र' त्यांनी शेवटी शेवटीं पैठण-मुक्कामीं लिहिलें असावें. हें महानुभावीय प्रमुख स्तोत्र प्रासरहित आहे व त्यांत जुने मराठी शब्द पुष्कळ येतात. उताऱ्यातील श्लोक जरा सोपे आहेत. इ. स. १९०४ सालीं मोलापूरच्या बा. दा. कानडे यांनीं सच्चिदानंद छापखान्यांत तें छापलें, असें ह. ना. नेने लिहितात. परन्तु छापील पुस्तक हल्लीं उपलब्ध नाहीं. प्रस्तुत उताऱ्यांतील श्लोक वडाळा ( मुंबई ) येथील गोविंदराज महाराजाच्याकडून मिळालेल्या पोथींतून घेतले. स्तोत्राचे एकूण श्लोक २७९ असून २८० वा श्लोक उपलब्ध नाहीं असा पोथींत उल्लेख आहे. या स्तोत्राचा उल्लेख वृद्धाचार, स्मृतिस्थळ, अन्वयस्थळ व पारमांडल्य आम्नायाचें अन्वयस्थळ या सर्वांमध्यें आढळतो. भीष्माचार्य लासुरकरकृत याच नांवाचें दुसरें एक स्तोत्र ग्रंथमालेच्या ११५ अंकात असल्याचा निर्देश ह. ना. नेने यांनीं केला आहे. या दुसऱ्या स्तोत्राचे काही श्लोक पांगारकरकृत मराठी वाङ्मयाच्या इतिहासात उद्धृत केलेले आहेत.

या स्तोत्रातील ' प्रातःकाळीं यशोदा ' या श्लोकाशी साम्य असलेला जनपंडितकृत लीलाभागवतांतील पुढील श्लोक पाहावा :

> अंकीं घेउनिया पयोधर मुखीं घाली यशोदा बळा ।
> वेगें दुग्ध उतें म्हणोनि उठली टाकूनिया सांवळा ॥
> कृष्णें चावुनि ओष्ट तेथ मथिता डेरा वरें फोडिला ।
> माता जाउनिया हरीस धरिता तो अंतरें राहिला ॥

( लीळा भागवत, पूर्वार्ध, ६–७ )

[ संदर्भ : हयग्रीवाचार्यकृत गद्यराजस्तोत्र भा. इ. सं. मं. त्रैमासिक १८–३ (जानेवारी, १९३८), ह. ना. नेने. [ २ ] म. म. वा. [ ३ ] स्मृतिस्थळ. [ ४ ] वृद्धाचार [ ५ ] म. वा. इ. खंड दुसरा ( इ. स. १९३० ). [ ६ ] महानुभावीय मराठी वाङ्मय, भा. इ. स. मं. क्र. ८८ ( इ. स. १९३६ ) ( अन्वयस्थळ, वृद्धाचार व लक्षणरत्नाकर, ह. ना. नेने ). [ ७ ] जनपंडितकृत लीळा भागवत पूर्वार्ध, मराठवाडा साहित्यपरिषद ( इ. स. १९५८ ). ]

**पंडित विश्वनाथ बाळापूरकर :** हे विदर्भाच्या राजाने सोरा

धिकारी होते. शेवटीं शेवटीं ते वऱ्हाडात अकोला जिल्ह्यातील बाळापूर येथे राहिले म्हणून ते बाळापूरकर झाले. प्रस्तुत ज्ञानप्रबोध त्यांनी इ. स. १३३१ मार्गी लिहिला, असे ग्रंथात शेवटीं नमूद केले आहे. ज्ञानचंद्रिका या त्याच्या गद्यग्रंथाचा उल्लेख महाराष्ट्र सारस्वतात आहे. त्याच्या ओव्या ज्ञानेश्वरी थाटाच्या वाटतात.

[ संदर्भ : [ १ ] ज्ञानप्रबोध ( इ. स. १९०७ ), चित्रशाळा. [ २ ] म. सा. [ ३ ] प्रा. म. स. ]

**पंडित नारायण व्यास बहाळिये** : हे खानदेशांतील बहाळिये गावचे. महानुभावीय सप्तग्रंथापैकीं ऋद्धिपुरवर्णन हे यांचें काव्य इ. स. १३६३ मध्ये यांनी रचिले असा उल्लेख काहीं प्रतींमध्ये आहे. या काव्याच्या ओव्या ६४५ आहेत. याच्या एक या गद्यकाव्याची व स्फुट पदांची पोथी वऱ्हाडात चांदूर बाजार येथे नागराजबुवा महानुभाव यांच्या संग्रहात आहे. 'मरल्हैंडाचिण वाडींडी' ( १६२ ) इत्यादि मुसलमानांचे उल्लेख ऋद्धिपुरवर्णनात आढळतात. पंडितांची भाषा व्युत्पन्न व थोडीशी क्लिष्ट आहे.

[ संदर्भ : श्रीऋद्धिपुरवर्णन, शारदाश्रम ग्रंथमाला ( इ. स. १९२० ), य. खु. देशपांडे. ]

**बहिरंभट** : उद्धव चिद्घनकृत 'गावीं संतचरित्रें हो' या पदांत बहिरंभटाचा उल्लेख आहे. याच्या आईचें नाव अंबिका. 'वरदनागेश' कर्ते अज्ञानसिद्ध हे याचे गुरुबंधु. हा मुसलमान झाला. नंतर याचें शुद्धीकरण झालें. तथापि याला वेड लागलें. म्हणून याला बहिरा पिसा म्हणत. असाच वेडाच्या भरांत भटकत असता हा नागनाथाच्याकडे आला व त्यांनीं याला मुसळानें कांडून अग्नींत घालून शुद्ध करून घेतलें, अशी आख्यायिका आहे. याला कांडण्यासाठीं वापरलेलें मुसळ सोलापूर जिल्ह्यातील मोहोळजवळच्या वडवाळ गांवीं अजून दाखवितात. वाटून शुद्धीकरण केलेल्या ब्राम्हणाचा उल्लेख विद्यारण्यांनीं केलेला आहे, तो याचाच असावा. हा इ. स. चौदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला असावा असें या सर्व गोष्टींवरून दिसतें.

याचा मुख्य ग्रंथ म्हणजे भागवताच्या दशमस्कंधावरील भैरवी टीका. ही ज्ञानेश्वरीच्या तिप्पट मोठी आहे व हिची भाषा सोपी आणि रसाळ आहे. यानें स्फुट काव्यरचना केली असें महिपतीच्या भक्तविजयांतील उल्लेखांवरून दिसतें ( भक्तविजय ४४।९७ ).

प्रस्तुत उतारे अहमदनगर येथील प्राध्यापक डॉ. द. ग. कोपरकर यांजकडून मिळाले. ते हा ग्रंथ प्रसिद्ध करणार आहेत.

[संदर्भ: [१] बहिरा जातवेद याची भैरवी टीका (पुस्तिका) डा. द. ग. कोपरकर, [२] भैरवी, *बहिरा जातवेदविरचित श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधावर मराठी टीका, मराठी संशोधन पत्रिका* (जानेवारी इ. स. १९५५) २१२. [३] म. वा. इ. खंड दुसरा, [४] बहिरा जातवेदकृत भागवत दशम स्कंधावर प्राकृत ओवीबद्ध टीका, भा. इ. सं. मं. त्रै. (इ. स. १९१३), म. म. द. वा. पोतदार. [६] युगवाणी ( ऑक्टोबर व नोव्हेंबर १९५६ ), प्रा. श्री. मा. कुलकर्णी.]

•

**अज्ञानसिद्ध** : हे वडवाळ येथील नागनाथांचे शिष्य व बहिरंभटाचे गुरुबंधु. यांचे वरदनागेश आदि अनेक ग्रंथ व स्फुट पदें असें वाङ्मय सोलापूर येथें शंकर नानाबुवा मोहोळकर यांच्या संग्रहीं आहे. त्यांजकडून प्रस्तुत उतारा मिळाला. 'संकटहरणी' हें प्रकरण मोहोळकरांनीं प्रसिद्ध केलें आहे. त्यांत

तें इ. स. १३९१ मध्यें लिहिल्याचा उल्लेख आहे. परंतु अज्ञानसिद्धांच्या उपलब्ध ग्रंथांची भाषा चवदाव्या शतकांतली दिसत नाहीं. त्यांच्या ग्रंथांची छाया रामदासाच्या दासबोधावर पडलेली आहे, असें मत इतिहाससंशोधक आता चांदोरकर यांनीं नमूद केलेलें आहे.

[ संदर्भ : [१] म. वा इ. खंड दुसरा. [२] अज्ञानसिद्धकृत संकटहरणी (इ. स. १९४९), शं. ना. मोडोळकर. [३] वरदनागेश, मा. इ. स. मं. षष्ठ संमेलनवृत (इ. स. १९१८) पां. मा. चांदोरकर. ]

**नामा पाठक** : ज्ञानेश्वरकालीन कान्हो पाठक यांचा हा पणतू. इ. स. चौदावें किंवा पंधरावें शतक हा त्याचा काळ असावा. याचा मुख्य ग्रंथ अश्वमेध. या ग्रंथाच्या अर्धवट स्वल्पांतल्या प्रती ठिकठिकाणीं आढळतात. प्रस्तुत उतारे धुळें येथील राजवाडे संशोधनमंडळाच्या संग्रहांतील हस्तलिखितांतून घेतलेले आहेत व ते अश्वमेधांतले असावेत. औंध येथील सरकारी ग्रंथालयांत अश्वमेधाचीं प्रकरणें आहेत. तंजावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथालयसूचींत नामा पाठकाच्या नावावर द्रौपदीवस्त्रहरण, भरतभेट, हनुमंतगरुडोपाख्यान, चंद्रहासकथा, सुदामचरित्र व नामरत्नमाला या प्रकरणांचा उल्लेख आहे. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहांतहि यांपैकीं कांहीं प्रकरणांचीं हस्तलिखितें आहेत. एकनाथ व उद्धवचिद्घन यांनीं याचा निर्देश केलेला असून भाषेवरून हा एकनाथपूर्वकालीन वाटतो. शिबि राजाची कथा हेंहि याचें एक लहान प्रकरण आहे.

नामा पाठक व विष्णुदासनामा या दोन नांवांमध्यें कांहींतरी घोंटाळा दिसतो. विष्णुदास नामाच्या भारतांत कांहीं प्रतींमध्यें नामा पाठकाचें नांव आढळतें असें ज. र. आजगांवकरांनीं नमूद केलें आहे. औंध येथील यादींत नामा पाठकाच्या नावावर महाभारताचीं पर्वें आहेत. या सर्व गोंधळांत आणखी भर म्हणजे पाठक नामा व नामा विष्णुदास असा दुहेरी उल्लेख महाभारताच्या कांहीं प्रतींत आढळतो, आणि हें भारत विष्णुदास नामाच्या भारतापेक्षां निराळें दिसतें व त्यांत ' इति श्री भीष्मपर्व काव्य नामदेवी ' असा उल्लेख आहे. चंद्रहासआख्यान या धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहांतील हस्तलिखितांत

नामा पाठक व नामा विष्णुदास या दोन्ही नावांचा निर्देश या आख्यानाचा कवि म्हणून या संस्थेच्या रामदासीसंशोधन ग्रंथसूचीत केलेला आहे.

[संदर्भ : म. वा. इ. खंड दुसरा. [२] एका मराठी अश्वमेधाची कांहीं आणि पानें, भा. इ. सं. मं. त्रै. (डिसेंबर इ. स. १९३७) १७-३, महामहोपाध्याय द. वा. पोतदार. [३] प्रा. म. स. [४] विष्णुदासनामा पाहा [५] विष्णुदासनामा पाठकाकृत महाभारतांतील भीष्म व द्रोणपर्वे, भा. इ. सं. मं. इ. (इ. स. १९१६), रा. चिं. मेहेंदळे. [६] रामदासी संशोधन ग्रंथ, प्रथमखंड (इ. स. १९३३).]

**सेना न्हावी** सेना अथवा सेना न्हावी हा चवदाव्या अगर पंधराव्या शतकांतील संत नामानंदाचा समकालीन. हा उत्तरप्रांतांतील बांधवगडच्या राजाच्या पदरीं होता अशी कथा महिपतीच्या भक्तविजयांत आहे. नामदेवाच्या गाथेंत सेनाचे अभंग असतात. पण हा महाराष्ट्रीय होता काय हा प्रश्नच आहे.

[संदर्भ [१] प्रा. म. स. [२] भगवद्भक्त सेनाजी कवितासंग्रह (इ. स. १९२३), भ. ह. मोरे.]

**कान्होपात्रा** पंढरपूरजवळील मंगळवेढ येथील एका वेश्येची ही सुंदर मुलगी. बिदरच्या बादशहानें हिला पळवून नेण्यासाठीं शिपाई पाठविले, तेव्हां हिनें 'नको देवराया' इत्यादि अभंग म्हटले व नंतर हिचें देहावसान झालें अशी आख्यायिका आहे. हिचे अभंग नामदेवाच्या अभंगाबरोबर असतात. हिचा काळ इ. स. पंधरावें शतक हा असावा.

[संदर्भ : प्रा. म. स.]

**भानुदास :** हे एकनाथाचे पणजोबा. याचा उल्लेख एकनाथी भागवतांत (२।३४) आहे. याचे अभंग एकनाथाच्या गाथेंत असतात. याचा काळ पांगारकरांच्या मतें इ. स. १४४८-१५१३ असा आहे. याचें 'गुडगुडीं वेणु' हें पद हिंदी व शुद्ध मराठी यांचें मिश्रित स्वरूप दर्शवितें. पंधराव्या शतकांत हे वृत्त तयार होत होतें.

गुणाच्या दृष्टीनें या वाङ्मयाचा दर्जा विशेष नसला तरी भाषेच्या व पद्याच्या दृष्टीनें त्याला महत्त्व आहे. जैन वाङ्मयाची विस्तृत माहिती प्रा. जोहरापूरकराच्या 'मराठींतील जैन वाङ्मय' या लेखात आहे.

[ संदर्भ : [१] मराठींतील जैन वाङ्मय, म. सा. प. २०।१६ (जानेवारी मार्च इ. स १९५६), प्रा. विद्याधर जोहरापूरकर. [२] श्रेणिक चरित्र, सन्मति (जून इ. स १९५६ ), प्रा. विद्याधर जोहरापूरकर. ]

**श्री गोविंदराज गुरुबल्लाळ :** श्री गोविंदराजाच्या भक्तिप्रबोध या ३२५ ओव्यांच्या प्रकरणाची प्रत ऋद्धिपूर येथील महानुभावीय मठात आहे. हें काव्य पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धातलें असावें. या काळातलें फार थोडें काव्य उपलब्ध आहे प्रस्तुत उतारा पांगारकराच्या ग्रंथातून घेतलेला आहे.

[ संदर्भ : म वा. इ. खंड दुसरा. ]

**कृष्णमुनीश्वर आम्नाय :** कृष्णमुनीश्वरकृत 'ब्रह्माड्गोलक' या २४५ ओव्यांच्या प्रकरणात गीता व भागवत यांचें विवरण आहे. इ.स. १५१० साली याची रचना झाली, असें 'मनुशतकाधिक द्विज प्रमोदे निजु' या उल्लेखा वरून कळतें. प्रस्तुत उतारा पांगारकराच्या ग्रंथातून घेतलेला आहे.

[ संदर्भ : म. वा. इ. खंड दुसरा. ]

**कामराज :** हा जैन कवि इ. स. पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धांत किंवा सोळाव्या शतकाच्या आरंभीं झाला असावा. याच्या सुदर्शन चरित्रात १५ अध्याय व ९८७ ओव्या आहेत. जैन वाङ्मयातील वीरदास नामक आणखी एका कवीनें सुदर्शनचरित्र लिहिलेलें आहे, तें इ. स. १६२७ मधील आहे. कामराजानें आपले गुरु म्हणून उल्लेखिलेले शांतिदास व ब्रह्मचारी जिनदास यांपैकीं जिनदासानें इ. स. १४५१ मध्यें गुजरातेंत रामायणरास हें काव्य रचिलें.

कामराजाच्या सुदर्शनचरित्रात ब्रह्मचर्याची महती सांगितली आहे.

सुदर्शन हा ऋषभदासाचा मुलगा व मनोरमा सागरदत्तश्रेष्ठीची कन्या. सुदर्शनानें मनोरमेस पाहिलें व त्याला मदनबाधा झाली. तेव्हा ऋषभदासानें सागरदत्ताकडे जाऊन कन्येची मागणी केली, ही गोष्ट प्रस्तुत उताऱ्यात आहे. हा उतारा प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे यानीं पाठविला. माहितीहि त्यानींच दिली.

**पंडित मेघा :** हा कवीहि कामराजाचा समकालीन असावा, असे त्यानें केलेल्या ब्रह्मचारी शांतिदासाच्या उल्लेखावरून वाटतें. याचें 'जसोधररास' हें काव्य कोल्हापूर जिल्ह्यातील बाहुबली येथील सन्मति कार्यालयातर्फे छापून प्रसिद्ध होण्याच्या मार्गावर आहे. यशोधर व अमृतादेवी याची कथा जैन वाङ्मयात फार प्रसिद्ध आहे. गुणनंदि गुणसागर याची इ. स. १६७५ मधील, नागो आया याची इ. स. सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धातील, अशा आणखी यशोधर-कथा उपलब्ध आहेत पंडित मेघा गुजराती असावा असे दिसतें.

[संदर्भ — पंडित मेघाकृत यशोधर चरित्र, नवभारत (ऑगस्ट इ. स.१९५७). • प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे.]

**आचार्य गुणकीर्ति :** आचार्यांच्या पद्मपुराणातील प्रस्तुत उतारा प्रा. विद्याधर जोहरापूरकर याजकडून मिळाला. हा ग्रंथ इ. स. सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धातील असून याची इ. स. सोळाव्या शतकाच्या अखेरीस लिहिलेली प्रत नागपूर येथें आहे. या पुराणात द्वादशानुप्रेक्षा असून त्यातली अंतिम धर्मानुप्रेक्षा प्रस्तुत उताऱ्यात आहे. आचार्यांनी 'धर्मामृत' हा गद्य ग्रंथहि लिहिलेला आहे. ही माहितीहि प्रा. जोहरापूरकर यानींच पाठविली.

**कृष्णदास :** या कवीचा निर्देश पांगारकरानी 'संतोषमुनि कृष्णदास' असा केलेला आहे. या महानुभावीय कर्त्यानें प्रस्तुत रुक्मिणी स्वयंवर इ. स. १५५६ मध्यें लिहिलें असावें. काहीं प्रतींवर इ. स १६०७ हाहि त्याचा काळ आढळला आहे. नरेंद्रानंतर चाल्हणशिष्य नृसिंह यानेंहि इ. स. १४०३ मध्यें रुक्मिणी स्वयंवरावर काव्य लिहिलेलें आहे. नृसिंहाचें काव्य अप्रकाशित असून कृष्णदासाचें काव्य फार पूर्वी छापल्याचें समजतें, पण तें उपलब्ध नाहीं. कृष्ण-

दासाचें काव्य पंचवीस अध्यायांचें व सुमारें ३२०० ओव्यांचें आहे. एका प्रतींत ५०० ओव्या अधिक आहेत. प्रस्तुत अध्याय मीं माझ्या संग्रहांतील पोथींतून व गोपिराज महाराजांनीं पाठविलेल्या टिपणांतून घेतला. या काव्याची एक अर्धवट पोथी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या मराठी संशोधन मंडळाच्या संग्रहीं आहे.

[ संदर्भ : [१] म. सा. [२] म. वा. इ. खंड दुसरा. [३] मानभावी कृष्णदास, भा. इ. सं. मं. इ. ( इ. स. १९१६ ), गो. का. चांदोरकर. ]

**नागराज :** हे इ. स. सोळाव्या शतकांतील होत अशी माहिती गोपिराज महाराजांनीं दिली. गुरुपरंपरेप्रमाणें भास्कराचार्यापासून नागराज नववे येतात.

[ संदर्भ : प्रतिष्ठानवर्णन ( इ. स. १९५८ ), मराठवाडा साहित्यपरिषद. ]

**सरस्वती गंगाधर :** हे गुलबर्गा जिल्ह्यांतील कडंचीं गांवचे असून मूळचे कानडी. म्हणून त्यांनीं 'भाषा न ये महाराष्ट्र' असें म्हटलेलें दिसतें. यांचा गुरुचरित्र हा दत्तसांप्रदायांतील पूज्य ग्रंथ असून इ. स. पंधराव्या शतकांतील नृसिंह सरस्वतींचें चरित्र त्यांत आहे. गुरुचरित्राची भाषा अलीकडची वाटते. तथापि या ग्रंथाची सर्वांत जुनी प्रत इ. स. १५८२ मधील असून हा ग्रंथ इ. स. १५५८ च्या सुमारास लिहिलेला आहे असें श्री. रा. कृ. कामत यांचें मत आहे. 'ज्यासी नाहीं मृत्यूचें भय। त्यासी यवन तो करी काय' (१४।२५) व 'जरी आम्हांपासी राहसी। तरी ना वंदिजे म्लेंछासी' (४२।१५१) या वचनावरून त्यांची स्वातंत्र्यप्रियता व्यक्त होते. गुरुचरित्रात महानुभावांचा उल्लेख आहे. 'महानुभावदर्शन होत। कवणाचा रोग गेला असे'। (५०।४६) असें ते विचारतात.

[संदर्भ : [१] म. वा. इ. खंड दुसरा. [२] गुरुचरित्राच्या अनेक पोथ्या. [३] श्रीगुरुचरित्राची प्रस्तावना व परिशिष्टें ( इ. स. १९५४ ), रा. कृ. कामत. ]

**श्यंबकराय :** आख्यायिकेनुसार हे नाशिककडील मुल्हेरीचे. यांच्या

विषयीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं. आपल्या वडिलांचें नांव भैरव असल्याचें यांनीच नमूद केलें आहे. यांचा बालबोध हा काव्यग्रंथ इ. स. १५७२ मध्यें सुरू होऊन इ. स. १५७८ मध्यें समाप्त झाला हें यांनीच या ग्रंथांत सांगितलें आहे. पोथीचा प्रथमखंड इ. स. १५९९ मध्यें नागपूर येथें नकललेला आहे. तत्कालीन भाषेचा अधिकृत नमुना म्हणून या ग्रंथाचें महत्त्व विशेष आहे. एका संन्याशानें हा चोरून नेल्यामुळें पुन्हां लिहावा लागला, अशी माहिती ग्रंथाच्या शेवटीं कवीनें दिलेली आहे. गो. का. चांदोरकर यांनीं संपादिलेल्या प्रतींत शंभराव्या आकड्यानंतर दोनशें हा आंकडा येण्याऐवजीं पुन्हा शंभर हाच आंकडा येतो. प्रस्तुत उतारे आरंभींचे व शेवटचे आहेत.

[ संदर्भ : बालबोध ( इ. स. १९१३ ), स. स. ग्रु., गो. का. चांदोरकर. ]

**विष्णुदासनामा :** नामदेव व विष्णुदासनामा हे निरनिराळे कवि आहेत, याचा पुरावा या विष्णुदासनाम्यानें आपल्या बुधभावर्णीत नामदेवाचा वेगळा उल्लेख केल्यावरून मिळतो. हा विष्णुदासनामा ब्राह्मण होता, हें 'विप्र विष्णुदास लागे अंबेच्या चरणा' (आरती) व 'ऐसी पुण्यपावन कथा। चक्रव्यूहीं सांगेन आतां। जनमेजया परिसतां। तें सांगे विष्णुदासें पंडितें' (चक्रव्यूह कथा) इत्यादि उल्लेखांवरून उघड होतें. 'विष्णुदासनामा म्हणे' असा उल्लेख असलेलीं काव्यें याचींच आहेत, असें स्थूल मानानें म्हणण्यास हरकत नसावी. शुकाख्यान,तुलसीआख्यान, एकादशीमाहात्म्य,उपमन्यु चरित्र, हरिश्चंद्रपुराण, म्हाळसेनकथा, नक्रउद्धार, अनेक अभंग व आरत्या, इत्यादि कृति याची असावी. महाभारताबद्दल चर्चा नामदेव परिचयांत केलेली आहे. या भारताच्या कर्तृत्वासंबंधांत नामा पाठक या कवीच्या नावाचाहि आणखी एक घोटाळा आहे भारताचें फक्त स्वर्गारोहणपर्व इ. स. १८८९ मध्यें रत्नागिरी येथें छापलेलें होतें. या सर्व भारतांचा विशेष अभ्यास झाला पाहिजे.

विष्णुदास नाम्याच्या शुकाख्यानांतील 'मन्मथसंवत्सर पौषमासीं। सोमवार अमावस्येच्या दिवशीं। पूर्णता आली ग्रंथासी।' या उल्लेखावरून त्यानें हें आख्यान इ. स. १५९५ सालीं पूर्ण केलें असें आपल्याला कळतें. त्याची

बुधबावणी हें एक मजेदार प्रकरण आहे. ही एक ओवीबद्ध अकलिपीच आहे. या बुधबावणीच्या निरनिराळ्या प्रतीमध्ये फार फरक आहे. तंजावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथालयाच्या सूचीमध्ये महालिंगदासाच्या बुधबावणीचा उल्लेख आहे. नक्रउद्धार हें दिंडीच्या चालीवरचें पद आहे. भानुदासापासून एकनाथा पर्यंत दिंडीवृत्त तयार होत होतें हें भानुदास व विष्णुदासनामा याच्या दिंडीच्या धर्तीवर केलेल्या काव्यरचनेवरून दिसतें

तंजावर येथील हरिचंद्र पुराणाचें पोर्तुगीज भाषांतर रोममधील ग्रंथालयात आहे. हें इ. स. १५६० पूर्वीचें असावें. नामदेवाच्या गाथेतील हरिश्चंद्र राजाचें चरित्र ही कथा याहून वेगळी आहे.

विष्णुदासनाम्याच्या काव्यग्रंथांचीं हस्तलिखितें तंजावरचें सरस्वतीमहाल ग्रंथालय, औंधचें सरकारी ग्रंथालय आणि धुळ्याचें समर्थवाग्देवतामंदिर या ठिकाणीं आहेत.

[ संदर्भ : [१] प्रा म. स. [२] महाभारताच्या पर्वांचें अहमदनगर येथील हस्तलिखित. [३] हरिश्चंद्रपुराण, नवभारत ( मे जून इ. स. १९५७ ), मा. सरोजिनीबाई शेंडे. [४] विष्णुदासनामाकृत बावन अक्षरी, भा इ स. म. इ ( इ स. १९१५ ), वि. का राजवाडे [५] विष्णुदासनामा भा. इ. स. म इ. ( इ. स १९१५ ), ग ना. मुजुमदार. [६] विष्णुदासनाम्याचें द्रौपदी स्वयंवर म सा. प. २७।१०९ ( एप्रिल जून इ. स १९५४ ), इ. ना. नेने. [७] विष्णुदासनामा भा. इ स. म. इ. ( इ स. १९११ ) वि. का. राजवाडे. [८] विष्णुदासनामा याचें साग्र महाभारत भा. इ. स म. १३।४ त्रै. ( इ. स. १९३२ ), पां मा. चांदोरकर [९] नामदेवराय व विष्णुदास नामा, भा. इ. स. म षाण्मासिक ( इ स १९१२ ), गो. का चांदोरकर. [१०] विष्णुदास नामाकृत साग्र प्राकृत महाभारत, भा. इ. स. म. इ. ( इ. स. १९१० ), वा. ना. साने. [ ११ ] नामदेव, नामा पाठक, कृष्णदास दामा पाहा. ]

**कृष्णदास दामा** : हा कवि साधारणत पंधराव्या शतकातला असावा असे त्याच्या भाषेवरून वाटतें. त्याची भाषा प्राकृतप्रचुर असून तींत फारशी

वगैरे परकीय शब्द क्वचितच आढळतात. मुंबईसरकारच्या शिक्षणखात्यातले श्री. ना. ध. पाटील यांच्या संग्रहीं या कवीनें रचलेल्या महाभारताच्या आदि पर्वाचें (५८ अध्याय, ६७६५ ओव्या) हस्तलिखित आहे त्याच्याकडून प्रस्तुत उतारे मिळाले. हें हस्तलिखित इ. स. १७०६ मध्य लिहिलेलें आहे. 'ताकापुरत रामायग' (१।३६) 'भिकेचे डोहाळे'(अगा जयाचें दैव जाये। तयाची बुद्धी करंटी होय। तयासि पाहे। डोहाळे होति भीकेचे- अ. १०) 'आकाश फाटल' (अगा फाटले आकाश। तेथें ठीगल द्यावें कासयास। तैसें पाडव सैन्यास। काये संग्राम करितील (५४।१३) इत्यादि रूढ म्हणी काव्यरूपात या ग्रंथात आढळतात हा कवि महत्त्वाचा असून तो अप्रकाशित आहे याचें काव्य उशीरा हातीं आलें व त्याच्याबद्दल निश्चित माहिती नसल्या मुळें त्याचें काव्य सध्या विष्णुदासनाम्याच्या काव्याजवळ ठेविलें आहे. नामदेवानीं भारताची रचना केल्याचा स्पष्ट उल्लेख या कवीच्या काव्यात आढळतो (१।१४).

मुक्तेश्वरानीं भारताच्या आदिपर्वात 'प्राकृत कवींचा वाग्जल्प। तेल कर्दईत पाहुनी रूप। फिरता मत्स्य सकप। वामनेत्रीं विंधिला॥' (आदिपर्व ४१।७२) असा टोला विष्णुदास नाम्याला दिला असे मानण्यात येतें. परंतु हा कवि कृष्णदास दामा असावा. विष्णुदासनामा व कृष्णदास दामा यांच्या यासंबंधीं ओव्या खालीलप्रमाणें आहेत : 'यावरी बोले ब्राह्मण। सैंवरी केला असे पण। कढईमाजीं तेल घाउन। वरील लक्ष मांडिलसे॥ वेळुवि बांधिलासे मासा। तयाचा वेग फिरे कैसा। दृष्टिसि न दिसे सहसा। अवघड असे॥' (विष्णुदास नामा, आदिपर्व). 'तव द्रुपदु म्हणे अवीता। हे यत्र फीरता देखता। वऱ्हील मासा तळपता। या लक्षीं पाडिजे॥ पाहोणीया कढींत। वरी फीनित गा हात। डावीया डोळींयात। बाहुली असे मीनासी॥ ते तीं बाणीं करून। जो लक्ष पाडील भेदुण। तयास द्रुपदि देईन। आणि अर्ध्य राज्ये तयाला॥' (कृष्णदास दामा, आदिपर्व २९।६-८) यावरूनहि हा कवि मुक्तेश्वर पूर्वकालीन वाटतो.

कृष्णदास नावाचे अनेक कवि दिसतात महाराष्ट्रसारस्वतात कृष्णदासाच्या भारताचा उल्लेख आहे. औंधच्या ग्रंथालयातील हस्तलिखिताच्या यादींत कृष्ण

दास नामा आहे. महानुभावीय कृष्णदास आहेच. कृष्णदास नामा यानें इ. स. १५२६ मध्यें लिहिलेली भागवताच्या दशम स्कंधावरील टीका पोर्तुगालमध्यें असल्याची नोंद मराठी संशोधनपत्रिकेत आहे.

[संदर्भ : [१] मराठा महाभारतकार कृष्णदास दामा, नवभारत ( जुलै १९५८ ), ना. ध. पाटील. [२] म. सं. प. २।२ (जानेवारी इ. स. १९५५ ). [३] म. सा. ]

**कृष्णदास मुद्गल**. हे पैठणचे एकनाथकालीन कवि याच्या रामायणाचें युद्धकांड मराठेशाहींत फार प्रसिद्ध होतें. याचें बाळक्रीडा नावाचें स्फुट प्रकरणहि प्रकाशित झालें आहे. कृष्णदासाचे उपमादृष्टान्त ठसठशीत असतात. साहित्यसूर्याचा केव्हा नाश होतो याबद्दलचें त्याचें म्हणणें लक्षात घेण्याजोगें आहे ( १।६६. )

[संदर्भ : [१] कृष्णदास मुद्गलकृत रामायण, महाराष्ट्र वाङ्मय १२ ( इ. स. १९०७), वि. ल. भावे, [२] बाळक्रीडा, प्रतिष्ठान ( फेब्रुवारी इ. स. १९५८) [३] म. सा. ]

**एकनाथ**. एकनाथ, जनी जनार्दन, दासोपंत, विठा रेणुकानंदन व रामा जनार्दन हे पांच कवि एकनाथ-पंचक म्हणून प्रख्यात आहेत. त्यातले प्रमुख एकनाथ हे ज्ञानेश्वर-नामदेवानंतरचे विशेष मोठे संतकवि होत. याचा वाडा अजून पैठण येथ आहे नाथाचा काळ इ. स. १५३८-१५९९ असा साधारण असावा. त्याचे गुरु जनार्दन स्वामी व भानुदास त्याचे प्रपितामह. मुक्तेश्वर हे त्याचे मुलीकडून नातू नाथाची वाङ्मयसंपत्ति मोठी आहे. तीपैकीं 'रुक्मिणीस्वयंवर' काशीक्षेत्रीं इ स. १५७१ मध्यें पूर्ण झालें. भागवत इ. स. १५७३ सालातलें. भावार्थ रामायणाचे चव्वेचाळीस अध्याय नाथाचे व पचे चाळिसाव्यापासून पुढे गावबानें तें पूर्ण केलें. जयरामसुत कवीनेंहि त्याला हातभार लावला असें दिसतें ( भावार्थ रामायण ५४।३३२-३४०). या प्रमुख ग्रंथाच्या जोडीला नाथाची भारुडें, पदें, अभंग, गौळणी इत्यादि विपुल काव्यरचना आहे ' संतसंगें अंतर रंग ', ' सगुणचरित्रें परमपवित्र '

यासारखीं त्यांचीं पदें व सुरस गौळणी विशेष लोकप्रिय झाल्या. नाथाचीं हिंदीं पदेंहि आहेत.

नाथांच्या नानाविध काव्यात भारुडें, जोहार इत्यादि प्रकारांत रूपकांच्या स्वरूपांत तत्कालीन स्थितीचें चित्र दिसतें. खेडेगांवांतला कारभार, लांचलुचपती, गांव वारंवार ओस पडणें, परचक्रें, अनिश्चित वातावरण, इत्यादि चित्रें भारुडात व 'लोभी ब्राह्मणाची दशा' (भागवत अध्याय तेवीस) या सारख्या उताऱ्यांत आढळतात. रुक्मिणीस्वयंवरांतील प्रस्तुत उतारा तेव्हांच्या मुसलमानांपासून पळणाऱ्या लोकांवरील टीका वाटते. त्याचा हिंदी तुर्क संवाद मोठा मजेदार आहे. त्यात एक ब्राह्मण व एक तुर्क धर्मांच्या श्रेष्ठतेबद्दल कडाक्याचा वाद करून शेवटीं एकमेकांना मिठी मारतात. एकनाथांनीं धर्माच्या नांवाखालीं चालणाऱ्या भोंदुगिरीवर व वेडेपणावर किती कडक प्रहार केले आहेत, हें त्यांच्या अभंगावरून दिसतें. भागवताच्या तिसऱ्या अध्यायातील प्रलयकाळ वर्णनावरून त्यांचें वर्णनशैलीचें नैपुण्य दिसतें. असेच थोडेसे वर्णन चोविसाव्या अध्यायांत आहे (५२९–५३५).

इ. स. १५८४ मध्यें एकनाथांनीं केलेलें ज्ञानेश्वरीचें शुद्धीकरण हें हें त्यांचें महत्त्वाचें संशोधनकार्य होय. मग ज्ञानेश्वरीचा ठसा त्यांच्या कवितेवर उमटला असल्यास नवल नाहीं. याचें उदाहरण म्हणजे 'देवकीनें वाहिला' ही गौळणीची ओळ थेट ज्ञानेश्वरींतील ६।१० या ओवीची प्रतिमा झाली आहे.

'माझा कृष्ण देखिला काय' या गौळणींतील शेवटली ओळ 'ऐशी पान्हुलती माय। घरोघरीं पुसो जाय। आनंदतनय कविराय त्याचे पाय वंदितो ॥' अशीहि एका गाथेंत आहे.

[संदर्भ : [१] प्रा. म. सं. [२] एकनाथी भागवत (इ. स. १९२७) त्र्यं. ह. आवटे. [३] श्री एकनाथकृत रुक्मिणीस्वयंवर (इ. स. १९३३), न. ग. जोशी. [४] भावार्थ रामायण (इ. स. १९१७), भा. शं. देवस्थळी. [५] एकनाथ महाराजाच्या अभंगांची गाथा (इ. स. १९०३) तुकाराम तात्या, व एकनाथाची गाथा (इ. स. १८९३) रा. श्री. गोंधळेकर. [६] एकनाथकृत भावार्थ-रामायणातील चंद्रसेनाख्यानाचा अप्रसिद्ध अध्याय, म. सा. प. ३१।१२३ (आक्टोबर डिसेंबर इ. स. १९५७), वसंत जोशी. [७] गीतासार (इ. स.

१९२६), बेळगाव, इ भि सामत. गीतासाराचा समावेश भा. इ. स. मडळा
च्या महाराष्ट्र सारस्वत ग्रथ ३ ( इ स १९१४ ) यात कलेला आहे ]

**जनीजनार्दन** हे एकनाथांचे गुरुबधु याच आडनाव गोसावी हे विजापूरच्या पादशाहींत कमाविसदार होते याची समाधि मागलाईत आहे. इ. स. १६०१ मध्यें याच निधन झालें याचा उद्धवबोध अथवा निर्विकल्प हा ग्रथ भा. इ. स. मडळानें इ. स. १९१४ साली प्रसिद्ध केला. याच्या 'रामकथामृताचे' हस्तलिखित इ स. १६३४ मधील आहे. प्रस्तुत उतारा धुळें येथील राजवाडे सशोधन मदिराचे श्री द रा. भट यानीं पाठविला

[ सदर्भ [१] प्रा. म. स. [२ ] म. वा. इ खड दुसरा [३] भा. इ. स. म. महाराष्ट्र सारस्वत ग्रथ–३ ( इ स. १९१४ ) ]

**दासोपत** एकनाथपचकापैकीं या कवींचा वाङ्मयसभार महाप्रचड आहे. त्याचा एकच गीतार्णवच १। लक्ष ओव्याचा आहे. याचें जन्मगाव मराठवाड्यातील नारायणपेठ व वास्तव्य आंबेजोगाई येथें होतें याच्या अफाट वाङ्मयापैकीं फारच थोडें प्रकाशित झालेलं आहे याच्या 'ग्रथराज' या छोट्या ग्रथाची छाप रामदासाच्या दासबोधावर पडलेली दिसते. याचीं स्फुट पदेंहि पुष्कळ आहेत. प्रस्तुत संग्रहात घेतलेलें पद दिंडी वृत्तात आहे.

दासोपत तत्कालीन स्थितीबद्दल म्हणतात–' करावी सेवा व्याघ्राची। येसीया उग्र म्लेंछाची। मग तो मानी तें मानु ताचि। येर ते वाय ॥ इतुका वयसा गर्ला। परि दर्भे पवित्रें नाहीं घातली। बहुगाल सिरं घेतलीं। चोरा पुढाचीं '॥ (गीतार्थबोध चद्रिका)

[ सदर्भ . [१] प्रा. म. स [२] श्री दासोपतकृत गीतार्णव अध्याय पहिला व दुसरा, श्रीमहाराष्ट्र वाङ्मय–१० ( इ स. १९०६ ), द्वितीय अध्याय बारावा व तेरावा, [३] श्रीदासोपतकृत ग्रथराज, भा. इ स म ( इ स. १९१४ ), महाराष्ट्र सारस्वत ग्रथ दुसरा. [४] दासोपतांची पासोडी मराठवाडा साहित्य परिषद. [५] दासोपताचीं, पदें. या. वा ढेरे, वाइ [६] म. वा. इ. खड दुसरा. ]

**रामा जनार्दन :** एकनाथ पचकातील या कवीची कसलीच माहिती उपलब्ध नाहीं. ज्ञानेश्वरांच्या आरतीमुळें हे सर्वतोमुखी झालेले आहेत. याची अनंतभुजाचीहि आरती आहे.

[संदर्भ : [१] म. वा. इ. खंड दुसरा. [२] रामा जनार्दनकृत आरती अनंतभुजाची, भा. इ. स. म. इ. ( इ. स. १९१५ ), वि. वा. राजवाडे. ]

**जिनदास :** या जैन कवीच्या हरिवंश पुराणाच्या माहितीसह त्यातील प्रस्तुत उतारा प्रा. विद्याधर जोहरापूरकर यानीं पाठविला. हें महाभारताच्या कथेचें जैन रूपांतर असून याच्या पूर्वार्धाचे चाळीस अध्याय व उत्तरार्धाचे काहीं अध्याय जिनदासाचे आहेत व बाकीचा भाग पुण्यसागरानें पुरा केला. ही रचना सोळाव्या शतकाचा उत्तरार्ध व सतराव्या शतकाचा पूर्वार्ध या कालखंडात झाली. हा ग्रंथ पूर्वी एकदा वर्धा येथें प्रकाशित झालेला आहे. वसुदेवाची राणी, रोहिणी हिला बलरामाच्या वेळीं डोहाळे होऊ लागले त्याचें वर्णन प्रस्तुत उताऱ्यात आहे.

[संदर्भ : हरिवंशकथा, सुषमा(ऑगस्ट इ.स.१९५७), प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे]

**पंडित दिवाकर :** हा मुरारिमल्लाचा शिष्य. यानें भिवंडी येथें इ. स. १५९७ मध्यें 'मति रत्नाकर' हा ग्रंथ लिहिला. गोपाळदासानें या ग्रंथात आणखी भर घातली. या ग्रंथात आठशेंहून अधिक ओव्या असून यात गीता व भागवत यातील श्लोकाचें विवेचन केलेलें आहे.

[संदर्भ : [१] म. सा. ( पुरवणी ). [२ ] मतिरत्नाकर ग्रंथ व दर्शन प्रकाश ग्रंथ, चित्रशाळा. ]

**मन्मथ स्वामी :** हे वीरशैव अथवा लिंगायत कवींपैकी एक महत्त्वाचे कवि होत. शांतलिंग व एकनाथ यांचे हे समकालीन. याचा 'परमरहस्यसारामृत' हा सतरा अध्यायाचा ग्रंथ मराठवाड्यात कपिलाधार येथें इ. स. १६१० मध्यें लिहून झाला. प्रस्तुत उतारा प्रा. पंडित आवळीकर याजकडून मिळाला व त्यात ४४ ते ५४, ५७, ५९, ६१, ६३, या ओव्या आहेत.

लातूर येथें प्रसिद्ध झालेला हा ग्रंथ आतां दुर्मिळ आहे. मन्मथस्वामींची 'अनुभवानंद' व 'स्वयंप्रकाश' हीं हस्तलिखित प्रकरणें सोलापूर येथें आढळलीं.

[ संदर्भ : [१] श्री मन्मथ बोधामृत ( इ. स. १९५४, सोलापूर ). [२] परमरहस्य, देशिकेंद्र छापखाना, लातूर ( इ. स. १९३१ ). ]

**शांतलिंग :** हे लिंगायत कवि एकनाथकालीन असून हे जनार्दनस्वामींना भेटल्याची आख्यायिका आहे. नीलकंठ–शांतलिंग–कृष्णाप्पा–जयरामस्वामी या गुरुपरंपरेंत जयरामस्वामी हे लिंगायत नसलेले असे परिचित संत आहेत. शांतलिंग यांचे दोन ज्ञात ग्रंथ म्हणजे ' विवेकचिंतामणि' आणि 'कर्णहस्तकी' अथवा 'कर्णहंस.' यांपैकीं पहिला निजगुणशिवयोगींच्या कानडी ग्रंथाचा व दुसरा बसवेश्वरांच्या कानडी ग्रंथाचा अनुवाद आहे. यांतल्या विवेकचिंतामणीचे दहा परिच्छेद व ४९२८ ओव्या आहेत. या अप्रकाशित ग्रंथांतील प्रस्तुत उतारा प्रा. पंडित आवळीकर यांजकडून मिळाला.

[ संदर्भ : [१] शांतलिंगकृत विवेकचिंतामणि, नवभारत ( सप्टेंबर–नोव्हेंबर इ. स. १९५५ ), प्रा. पंडित आवळीकर. [२] शांतलिंगकृत कर्णहस्तकी, भा. इ. स. मं. वा. इ., गो. का. चांदोरकर. [३] संत शांतलिंगकृत कर्णहंस ( इ. स. १९४६ ), न. स. जोशी खरशीकर शास्त्री. [४] विवेकचिंतामणी ( दोन परिच्छेद ), सोलापूर ( इ. स. १९०९ ). ]

**फादर स्टीफन्स :** हा इंग्लिश धर्मोपदेशक इ. स. १५७९ मध्यें गोवा येथें आला, तो कायमचा तिथेंच राहिला. याच्या खिस्तपुराणाचें वाचन एका काळीं प्रत्येक मराठी खिश्चन घरीं होत असे. हें पुराण इ. स. १६१६, १६४९ व १६०४ असे तीनदां छापून निघालें, पण यांपैकीं एकहि प्रत आतां उपलब्ध नाहीं. १९०७ मध्यें छापलेली याची आवृत्ती रोमन लिपींत आहे. यामुळें मूळ ग्रंथाची मराठी धाटणी नक्की कशी होती, हें कळण्यास मार्ग नाहीं. फादर स्टीफन्सनें योगवासिष्ठादि ग्रंथांचा चांगला अभ्यास केलेला होता व त्यानें मराठी भाषा आत्मसात केलेली होती, हें या पुराणावरून स्पष्ट दिसून येतें. या पुराणाच्या जोडीला पूर्वी युरोपियन लेखकांनीं मराठींतून लिहिलेले ग्रंथ म्हणजे

एतिएन द ला क्रुवा याचें पुराण, तसेंच खिरस्ताचें वधस्तंभारोहण आणि १६५९ मध्यें छापलेली सालदाञची संत आंतुनिओची जीवित्वकथा हे होत.

[संदर्भ : [१] ख्रिस्तपुराण (इ. स १९५६), एम्. पा. वडेलू, [२] म. सा. (पुरवणी). [३] एतिएन द ला क्रुवा पाहा. [४] ख्रिस्ताचें वधस्तंभारोहण (इ. स. १९४०), अ. का. प्रियोळकर. [५] संत (आंतुनिओची जीवित्वकथा (इ. स. १९५४), अ. का. प्रियोळकर. ]

**लोलिंबराज :** या कवीचें आडनाव जोशी. याचा काळ इ. स. १५७८–१६५० च्या दरम्यानचा असावा. यानें इ. स. १६३३ मध्यें वैद्यजीवन हा संस्कृत ग्रंथ लिहिला. वि. ल. भावे यांच्या महाराष्ट्र सारस्वतांत मराठी वैद्यजीवनाचाहि उल्लेख आहे. 'रत्नकळाचरित्र' हें याचें स्फुट प्रकरण. रत्नकळा ही जुन्नरच्या यवन सुभेदाराची कन्या. तिच्यावर हा कवि अनुरक्त झाला परंतु ती मरण पावल्यामुळें याला विरक्ति झाली. देवदास व उद्धवचिद्घन या दोघांच्याहि संतमालिकेंत अनुक्रमें ८१ व ४४ व्या ओवींत या कवीचा उल्लेख आढळतो.

[संदर्भ : [१] लोलिंबराज व रत्नकला चरित्र, भा इ. स. म. इ. (इ. स. १९१५), द. वा. पोतदार. [२] म. वा. इ. खंड दुसरा. [३] लोलिंबराज, वागीश्वरी (वर्ष पाचवें), दु. आ. तिवारी. [४] देवदासकृत संतमालिका (इ. स, १९१३), द. वा. पोतदार. [५] म. सा. [६] उद्धवचिद्घनकृत संतमालिका, महाराष्ट्र काव्यग्रंथ–९ (इ. स. १९०५), वि. ल. भावे. ]

**विठ्ठल कळपूरकर :** हा वऱ्हाडी कवि होता आणि आपण व्यापारी असल्याचें यानें स्वतःच सांगितलें आहे. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनीं याच्या रासक्रीडा या काव्याचा आरंभींचा व शेवटचा भाग सरस्वती-मंदिर मासिकांतून प्रसिद्ध केला. या काव्याची मुद्रित प्रत धुळें येथील राजवाडे संशोधन मंदिराच्या संग्रहीं आहे. तींत शेवटचे व कांहीं मधले श्लोक नाहींत.

[संदर्भ : [१] प्रा. म. स. [२] विठ्ठल कवि, शके १०३६, सरस्वती मंदिर ८।८ (इ. स. १९०९), वि. का. राजवाडे.]

**अभयकीर्ति** हे जैनाच्या मूलसघ गच्छाचे एक आचार्य होते याचे गुरु अजितकीर्ति अनत चतुर्दशीदिवशी जैनाच्या बाराव्या तीर्थकराचे परिनिर्वाण झाले म्हणून हा त्याचाहि पवित्र सण मात्र जैन कवींच्या या अनतव्रत कथेत चवदावे तीर्थकर अनतनाथ याचीच पूजा आहे अजितकीर्तिशिष्य चिमन पडित व अठराव्या शतकातील जिनसागर याच्याहि अनतव्रतकथा आहेत

[सदर्भ अनतव्रतकथा, सन्मति (मे, इ स १९५८), प्रा विद्याधर जोहरापूरकर ]

**कृष्णयाज्ञवल्कि व मधुकर** या दोघा कवींचा कथाकल्पतरु इ स १६२३ मध्ये समाप्त झाला या ग्रथाचे स्तबक १४ ओवीसख्या २९००० नागुलप्रदेश म्हणजे हल्लींच्या नाशिक जिल्ह्यातील बागलाणचा (राजधानी साल्हेरगड) रजपुत राजा बहिरामशाह याच्या आश्रयाखाली हा ग्रथ तयार झाला. याचे पहिले सात स्तबक कृष्णयाज्ञवल्कीचे व पुढचे सात मधुकराचे कृष्णयाज्ञवल्कीने 'देवीमहात्म्य हा ग्रथहि लिहिल्याचा उल्लेख आढळतो कथा कल्पतरुच्या नेवर्गी मोरोबा पराव्कगचा (१४१२५) निर्देश आहे, तो नक्कल करणाऱ्याचा प्रमाद असावा शिवपूर्वकालीन ग्रथ म्हणून हा महत्त्वाचा आहे

[सदर्भ [१] म सा [२] कथाकल्पतरु पोथा (इ स १८९३), जगदीश्वर छापखाना [३] म. वा इ खड तिसरा (इ स १९२९), ल रा पांगारकर ]

**पाद्र पतीपन द ला क्रुया** हा फ्रेच मिशनरी इ स १६०२ मध्ये गाव्यात आला व आमरण तिथेच राहिला याच्या पुराणाची सपूर्ण प्रत लिस्बन येथील ग्रथागारात असून तिची मायक्रोफिल्म श्री अ का प्रियोळकर याच्या सग्रही आहे या पुराणाची ओवीसख्या सुमारे १५००० आहे यात हिंदु चालीरातींचे खडन आहे

[सदर्भ *अनुरगाचे मराठा वाङ्मयकार, यशवत (एप्रिल इ स १९३८), अ का प्रियोळकर* ]

प्रथम खड समाप्त

## द्वितीय खंड

**मुक्तेश्वर:** मुक्तेश्वर मराठी मार्गेतील एक अत्यंत प्रतिभावान कवि आहेत; व त्यांची प्रतिभा वर्षाकालवर्णन, दमयंतीविलाप इत्यादि कविताभागात खुलून दिसते. त्यांच्या ओव्यांची शैली अशी आहे की मुक्तेश्वरी ओव्या सहज ओळखता येतात. मुक्तेश्वराचें प्रमुख काव्य महाभारत होय. विष्णुदास नामा, माधव, चंद्रात्मज रुद्र, नरहरी, मोरेश्वर, शुभानंद, गोपाळ इत्यादि अनेक कवींनीं महाभारतावर रचना केली; परंतु मुक्तेश्वराच्या महाभारताची सर त्यांच्या काव्यांना आली नाहीं. ' उठि वा उघडी स्वरूप लोचना । सरली अविद्या राती । झाला उदयादि रविकिरणा ।। ' ही त्यांची भूपाळी व 'कापडी चालले तीर्थपथे' (आदिपर्व ३६।७९) हें वर्णन होनाजी बाळाच्या 'घन.श्याम सुंदरा' या अमर भूपाळीची आठवण करून देते व होनाजीनीं मुक्तेश्वरापासून स्फूर्ति घेतली असावी, असें वाटतें.

मुक्तेश्वराचें प्रमुख काव्य आदिपर्व ते विराटपर्व हीं भारताचीं चार पर्वें. याशिवाय, सौप्तिकपर्व, हरिश्चंद्राख्यान, शुकरंभासंवाद इत्यादि स्फुट काव्यें, व श्लोकबद्ध रामायणादि आहे. मुक्तेश्वराची श्लोकरचना ओव्यांइतकी सरस नाहीं. त्यांचें एक ओवीबद्ध उत्तरकांड रामायण प्रकाशात आलें आहे.

मुक्तेश्वर हे एकनाथासारख्या श्रेष्ठ संताचे नातु. या गोष्टीचा उल्लेख त्यांनीं ' मातृजनक जनार्दनी । एकनाथ नमियेला ' (आदिपर्व १।७७) या ओवींत केला आहे. मुक्तेश्वरानीं आजोबांचें काव्य अभ्यासिलें असणारच. एकनाथाचा 'रामविलाप', तर मुक्तेश्वराचा 'दमयंतीविलाप' आहे. अभिमन्युविवाहातील मेजवानी व पक्वान्नें यांच्या वर्णनासारखें थोडेसें वर्णन एकनाथी भागवतात (अध्याय २७-२९०-९६) व रुक्मिणीस्वयंवरात (चतुर्दशप्रसंग) आहे. एकनाथानी नातू पहिला होता व आजोबांच्या आशीर्वादानेंच मुका नातू बोलू लागला, अशी आख्यायिका आहे. ही आख्यायिका खरी मानल्यास मुक्तेश्वराचा जन्मकाल इ. स. १६०९ असल्याची एक नोंद आहे, तिच्या पुष्कळ मागे त्यांचा जन्मकाल मानावा लागेल. त्यांचें सभापर्व इ. १६३५ च्या

सुमारास झालें असण्याची शक्यता आहे व एकंदरींत तुकारामांची विशेष प्रसिद्धि होण्यापूर्वी त्यांची काव्यरचना झाली असावी.

मुक्तेश्वराना महाराष्ट्राचा व मराठीचा मोठा अभिमान होता व तो 'महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रासि राजे' ( युद्धकांड ४६९ ) हा श्लोक, महाराष्ट्र झुंझीचें वर्णन ( आदिपर्व ३१–३४ ), व मराठी प्रशंसापर आदिपर्व ( १–८६-८८ व ९३ ) व सभापर्व ( १–१८-२२ ) यांनील ओव्या, इत्यादि स्थळांत व्यक्त झाला आहे.

[ संदर्भ : [ १ ] प्राचीन मराठी संतकवि ( प्रा.म. सं. ) ( इ. स. १९५७ ), ज. र. आजगावकर [ २ ] महाराष्ट्र सारस्वत, चवथी आवृत्ति ( म. सा. ) ( इ.स. १०५१) वि. ल. भावे, पुरवणी डॉ. श. गो. तुळपुळे [३] मुक्तेश्वरकृत महाभारत खंड १, २, ३ ( इ. स. १९५१, १९५३, व १९५६ ), मराठी संशोधन मंडळ. [४] मुक्तेश्वरकृत सभापर्व ( इ. स.१९४९ ), वि. म. कुलकर्णी [५] मुक्तेश्वरकृत महाभारत वनपर्व, द्वितीय आवृत्ति ( इ. स. १९४६ ), द. सी. पंगु. [६] मुक्तेश्वरकृत महाभारत, विराटपर्व ( इ. स. १९५१ ), द. सी. पंगु. [७] निर्णयसागर ग्रंथ — आदिपर्व ( इ. स. १८९१ ) वा. दा. ओक, सभापर्व ( इ. स १८९४ ), वा दा. ओक, वनपर्व ( इ. स. १८९८, काव्यसंग्रह ११ ), वा. दा ओक, व विराटपर्व ( इ स. १८९९, काव्यसंग्रह ३२ ). [ ८ ] महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत रामायण, निर्णयसागर ( इ. स १८९१ ), मोडक व ओक. [९] महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यें, निर्णयसागर ( इ. स. १९०६, काव्यसंग्रह ५४ ). [१०] कवि मुक्तेश्वरकृत ओवी रामायण ( इ. स. १९५६ ) मा. पं. बहिरट. [ ११ ] मुक्तेश्वरांचा अप्रकाशित ग्रंथ, लोकसत्ता ( ता. २७–८–५८ ), वसंत स. जोशी. ]

**तुकाराम :** *अनन्यसाधारण लोकप्रियता लाभून लोकांच्या नेहमींच्या* बोलण्यातहि तुकारामाचें काव्य उद्धृत केलें जातें अशा त्याची विशेष महती आहे. 'अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची' ज्याला ठाऊक नाहीं असा मराठी *माणूस विरळा. अभंग हें वृत्त तुकारामानीं भरपूर वापरलें व तें असा रीतीनें,* कीं त्यांच्या अभंगापुढें दुसऱ्या कवीचे अभंग कमी दर्जाचे वाटतात. तुका-

रामाची भाषा सोपी व जिव्हाळ्याची असल्यामुळें ती समाजाच्या खालच्या थरातहि स्थान धरून बसली. त्याच्या कवितेंत परमार्थ, उपदेश, व्यवहार इत्यादि सर्व विषय येतात. उपदेश करताना समाजामधील दोगावर व दोषावर ते कडक टीका करण्यास मागेंपुढें पाहत नाहींत.

तुकारामाचा जन्म इ. स. १५७८–१६०८ च्या दरम्यानचा असावा. त्याच्या पित्याचें नाव बोल्होबा व आईचें नाव कनकाई त्याच्या घराण्याचें उपनाव अंबिले होतें, व नंतर मोरे हें नावहि लावलेलें आढळतें पुण्याजवळ देहू येथें तुकारामाचें दुकान होत. पण तुकारामासारखा माणूस दुकान कसा चालवणार ? तुकारामानी स्वत:ची बरीच हकीकत आत्मनिवेदनपर अभंगात दिली आहे. त्याना प्रथम जरी समाजात छळ सोसावा लागला तरी शेवटीं मान्यता मिळाली, असें दिसतें इ स १६४९ हा त्याचा प्रयाणकाल असावा. विठ्ठल कवीच्या ‘ रामश्रीकृष्णनामें जनपद मिरवी मुक्ति जीवत ज्याणें ’ ( सीतास्वयंवर ३–२४ ) हा श्लोकभाग व रामेश्वरभट्टाच्या ‘ मागं कवेश्वर झाले थोरथोर । नेलं कलेवर कोण सांगा ॥ म्हणे रामेश्वर सकळा पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनिया ॥ ’ या ओळी पाहता तुकाराम सदेह वैकुंठाला गेले, ही कल्पना त्या काळींहि प्रचलित होती, असें दिसतें

तुकारामाच्या अभंगाची संख्या तीन हजारापेक्षा अधिक आहे परंतु अभंगाच्या अनेक गाथा आहेत व त्यातील अमुक अभंग निश्चित तुकारामाचे असें सांगणें कठीण आहे तुकारामाच्या शिष्यवृंदात बहिणाबाई, निळोबा व संताजी तेली व जगनाडे विशेष प्रख्यात आहेत. संताजींनी तुकारामाचे अभंग लिहून ठेवले तुकारामाच्या वंशात असलेली ‘ भिजलेली वही ’ तुकारामाच्या स्वत:च्या हातची आहे, अशी समजूत आहे

प्रस्तुत संग्रहातील अभंग सांप्रदायिक गाथेतून घेतले आहेत व तींत नसलेले परंतु दुसऱ्या गाथेतून घेतलेले अभंग प्रत्येक भागात शेवटीं दिले आहेत गाथेमधील अनेक अभंग तुकारामाचे नसावेत ‘ आम्ही जातों अमुच्या गावा ’ यासारखे अभंग तुकारामाचे नसणार, हें उघड आहे. तसेंच ‘ निंदकाचें घर असावें शेजारीं ’ यासारख्या ओळी असलेले अनेक अभंग तुकारामाचे

समजले जातात, परंतु ते बहुतेक वारकऱ्यांनीं केलेले असून तुकारामांच्या नांवावर ठेवून दिलेले असावेत.

तुकारामांनीं केलेला भगवद्गीतेचा एक अभंगात्मक अनुवाद उपलब्ध आहे.
[संदर्भ: [१] म. सा. [२] तुकाराम महाराजांच्या अभंगांची सांप्रदायिक ओवीची गाथा ( इ. स. १९५० ) व इतर गाथा. [३] तुकारामांचा अस्सल गाथा ( इ. स. १९१९ ), वि. ल. भावे. [४] भिजलेल्या वहीचे अभंग ( इ. स. १९५० ), ध. रा. गाडगीळ. [५] श्रीसंतश्रेष्ठ तुकाराम महाराजकृत श्रीमद्भगवद्गीतेचा अभंगात्मक अनुवाद अथवा मंत्रगीता ( इ. स. १९५० ), वा. सी. बेंद्रे. ]

**कान्होबा**: हे तुकारामांचे धाकटे बंधू. यांचे अभंग तुकारामांच्या अभंगांच्या गाथेंत असतात.
[संदर्भ – म. सा. ]

**बहिणाबाई**: ही तुकारामांची प्रसिद्ध शिष्या. तिच्या अभंगांत तिचें थोडेसें चरित्र आढळतें. वेरूळजवळील देवगांव हें तिचें माहेर व सिऊर येथील पाठक नांवाच्या तीस वर्षांच्या गृहस्थाशीं ती तीन वर्षांची असतांना तिचें लग्न झालें. ती मोठी झाल्यावर हें दंपत्य तुकारामाच्या सान्निध्यांत कांहीं काळ राहिलें होतें. बहिणाबाईचा काळ सुमारें इ. स. १६२८–१६९०।१७०० असावा.
[संदर्भ: [१] म. सा. [२] ( Poet saints of Maharashtra, Justin Abott ), संत बहिणाबाई, महाराष्ट्रकविसंतमाला नं. ५ ( इ. स. १९२९ ). [३] तुकारामांचे संतसांगाती ( इ. स. १९५८ ), वा. सी. बेंद्रे. ]

**शेख महंमद**: 'हर्षे शेख महंमद भगवज्जन मुसलमान वानावा।' असें ज्यांचें मोरोपंतांनीं वर्णन केलें, ते शेख महंमद महाराष्ट्रांतील प्रमुख मुसलमान संतकवि होत. शेख महंमदांसारखे पूर्वी व नंतर दुसरे अनेक मुसलमान संत व कवि झाले. 'हुसेन अंबरी' ( इ. स. १६५३ ) कार हुसेन

अंबर, 'सिद्धांतबोध'कार शहामुनी (अठरावें शतक), आलमखान पठाण, सगन शाहीर, हे सर्व मुसलमान होते. महीपतींच्या भक्तविजयाच्या ४१ व ४७ व्या अध्यायांत व उद्धवचिद्घनांच्या संतमालिकेंत अनेक मुसलमान संतांचीं नांवें आहेत.

शेख महंमदाचें मूळ गांव नगर जिल्ह्यांत रुइआहिरें असून त्यांचा मठ श्रीगोंदें येथें आहे. त्यांच्या वडिलांचें नांव महंमद व आईचें नांव फुलाई. चांगबोधला नांवाचे ब्राह्मण त्याचे गुरु व जयरामस्वामी वडगांवकर त्यांचे मित्र होते. शेख महंमदांनीं इ. स. १६४५ मध्यें 'योगसंग्राम' हा ग्रंथ लिहिला. त्याशिवाय 'पवनविजय,' निष्कलंकप्रबोध' व 'ज्ञानसागर' या ग्रंथाचा उल्लेख महाराष्ट्रसारस्वतांत आहे. त्यांच्या अभंगांचा संग्रह श्री. वा. सी. बेंद्रे यांच्याजवळ आहे व त्या संग्रहांतून कांहीं अभंग व 'गायका' हें प्रकरण घेतलें. शेख महमदांचें इ. स. १६५०–६२ च्या दरम्यान निर्याण झालें असावें.

[संदर्भ : [१] म. सा. व पुरवणी [२] तुकारामांचे संतसांगाती (इ. स. १९५८), वा. सी. बेंद्रे. [३] अंबरहुसेनी, मराठी संशोधनपत्रिका (म. सं. प.) ऑक्टोबर १९५४) वर्ष २. [४] योगसंग्राम (इ. स. १८८९] शि. सी. वागळे. [५] मुसल्मानांचें मराठींतील जातीय साहित्य, भारत इतिहास संशोधक मंडळ (भा. इ. सं. मं.) वर्ष २३।४ (इ. स. १९४३), शि. ल. आतार. [६] आलमखान गुरु नागेश्वर, भा. इ. सं. मं. इतिवृत्त (इ.स. १९१५), गं. ना. मुजुमदार. [७] कवि इमाहिम अदिलशहा—भा. इ.सं. मं. वर्ष ६ (इ. स. १९२५), बावा चांदोरकर.]

**विप्रनारायण:** अश्वमेधावरील अनेक कवींच्या काव्यांपैकीं विप्रनारायणकृत अश्वमेध हें एक अप्रकाशित काव्य आहे. श्री. वसंत जोशी यांनीं स्वतःजवळील प्रतीमधील कालदर्शक ओवीवरून इ. स. १४२० हा या ग्रंथाचा काळ ठरवून घेतला आहे. परंतु आवळीकराच्या जवळील प्रतींत कालदर्शक ओवी निराळी आहे व सुमारें इ. स. १६७५ हा या काव्याचा काळ तीवरुन वाटतो. महामहोपाध्याय द. वा. पोतदारानीं इ. स. १६६० हा या काव्याचा काळ दिला आहे. विप्रनारायणाचें काव्य चांगलें वाटतें. त्याची

भापा मार फारशी पुनी दिसत नाहीं. प्रस्तुत उताऱ्यातील आल्या ग्रेपन्नाच्या प्रसंगातील असून त्या १०९ पासून पुढच्या आहेत

[ सन्दर्भ [१] म सा [२] विप्रनारायणकृत ओवाबद्ध अश्वमध, भा इ स म त्रै १४।२ ( इ स १९३३ ), द वा पातदार [३] विप्रनारायणकृत अश्वमध, लाकमत्ता ( ता ०-२-५८ ), वसत स नोर्शी [४] पुन्हा एकदा विप्रनारायण, लाकसत्ता (ता ९-३--८), पन्ति आवळीकर [५] विप्रनारायण कृत अश्वमध समारोप, लोकमत्ता (ता ३०-९--१८), वसत नोशा ]

**अज्ञानदास** अज्ञानदास अथवा अग्निदास हा मराठा भार्पेतील पहिला ज्ञात शाहीर इ स १६५९ मध्यें घडलेल्या अफझुलखानवधाच्या घटनेवर त्यानें प्रस्तुत पोवाडा केला मातोश्री जिजाबाईंना नालाणण पाठवून पाचाग्र करविला, असे पोवाड्यातच सांगितलं आहे मूळ पोवाडा ११ चौकात असून, त्याचाच पुढें प्रचलित ३७ चौकाचा पोवाडा शाहीरानेंच नेला असावा ११ चौकाचा पोवाडा विविधज्ञानविस्तार मासिकात छापला आहे परतु त्यात ३-११ हे चौक पाडलेले नाहींत एका जुन्या पुस्तिकेंत हे चौक पाडलेले मिळाले

[ सदर्भ [१] ऐतिहासिक पोवाडे किंवा मराठ्याचा काव्यमय इतिहास ( ए पो ) ( इ स १९२८ ), य न केळकर [२] विविधज्ञानविस्तार ६।१० ( इ स १८७३ ) [३] पोवाडे मराठ आणि पेशवे याच, क पतरे छापखाना [४] इतिहासप्रसिद्ध पुरुषाच व स्त्रियाचे पोवाडे ( इ स १८९१ ), अक्वथ व शालिग्राम ]

**तुळशीदास** या शाहीरानें रचलेला ५५ चौकाचा तानाजीचा 'शूर मर्दाचा पोवाडा' इ स १६७० मध्य सिंहगड घेतला गेला तेव्हा केलेला दिसतो आपण मर्दाच्या राहत असल्याचें शाहीर पोवाड्यात सांगतो

**कृष्णमुनि** कृष्णमुनि विराटदेश (वाईदेशकर) अथवा कवि कृष्णडिंभ याचें रुक्मिणीस्वयवर इ स १६६२ मध्यें पूर्ण झाल्याचें या ग्रथाच्या शेवटीं एका संस्कृत श्लोकात सांगितलें आहे त्यांनीं फल्गुणमाहात्म्य,

ऋद्धिपुरमाहात्म्य इत्यादि ग्रंथ लिहिले. सामान्यत. अन्यत्र न आढळणारी अनेक वृत्ते या रुक्मिणीस्वयंवरात आहेत व त्यांपैकीं बहुतेक प्रस्तुत उताऱ्यात उद्धृत केली आहेत. असा एक दुसरा ग्रंथ म्हणजे ओंकारमुनींचे इ. स. १७०८ मधील लक्ष्मणास्वयंवर. याच नावाचा एक ओवीबद्ध ग्रंथहि आहे व तो कृष्ण मुनींचा दिसतो. या दोन्ही ग्रंथांचीं हस्तलिखितें हैद्राबाद येथील प्राध्यापक रा. श्री. माडेकर यांच्या संग्रहीं आहेत. श्लोकबद्ध लक्ष्मणास्वयंवरात दक्षा, उद्धता, फणींद्र, नटतोटक, राग, दंडक, नाटक, मालती, मदलेखा इत्यादि अपरिचित वृत्तें आहेत.

[संदर्भ : [१] कृष्णमुनि विराटदेशेकृत रुक्मिणीस्वयंवर ( इ. स. १९५८ ), मराठवाडा साहित्य परिषद्, रा. श्री. माडेकर [२] मराठी वाङ्मयाचा इतिहास (म. वा. इ.) खंड दुसरा ( इ. स. १९३५ ), ल. रा. पांगारकर. [३] महानु भावीय काव्यांतील कांहीं छंद, महाराष्ट्र साहित्य पत्रिका ( म. सा. प. ) ( इ. स. १९३६ ), वि. भि. कोलते. [४] महानुभाव काव्यातील कांहीं नवीन छंद, सधिकाल ( ऑगस्ट–डिसेंबर इ. स. १९३५ ), वि. भि. कोलते. ]

**भट्टारक महीचंद्र:** यांनी इ. स. १६९६ मध्यें आदिपुराणाची रचना केली. आदिपुराणात चालू युगाच्या आरंभीचे पहिले तीर्थंकर ऋषभदेव यांची कथा आहे. ऋषभदेवाच्या पूर्वी भारतवर्षांत कल्पवृक्षापासून सर्व भोग प्राप्त होत असत. परंतु हे कल्पवृक्ष या युगाच्या आरंभीं लुप्त झाले व त्यामुळें लोक भयाकुल झाले. अशा समयीं ऋषभदेवाचे जनक नाभिमहाराज प्रजेला कसे मार्गदर्शन करतात, याचें या परिच्छेदात वर्णन आहे.

महीचंद्रांनीं आणखी गरुडपंचमीकथा व अष्टाह्निकव्रतकथा लिहिल्या आहेत. प्रस्तुत उतारा व माहिती प्रा. विद्याधर जोहरापूरकर यांजकडून मिळाली.

[संदर्भ. मराठींतील जैन वाङ्मय, म. सा. प २०।११६ ( जानेवारी–मार्च इ. स १९५६ ), प्रा. विद्याधर जोहरापूरकर ]

**रामदास:** रामदास अथवा समर्थ हे ज्ञानेश्वर–नामदेव–एकनाथ तुकाराम रामदास या संतकविपंचकातले शेवटले. महाराष्ट्रात अनेक संतकवी होऊन गेले, परंतु त्यात हें पंचक विशेष मोठ्या संतांचें झालें. या पांचांनहि

रामदासांचें स्थान विशेष आहे. त्यांच्या 'सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची,' 'लवथवती विक्राळा,' 'सत्राणें उड्डाणें' इत्यादि आरत्या घरोघरीं ऐकूं येतात. 'रामराम' म्हणण्याची पद्धत त्यांनींच पाडली, असें म्हणतात. तुकारामांच्याप्रमाणें त्यांचीहि मराठी भाषेवर कायमची छाप पडली आहे व 'मरावें परी कीर्तिरूपें उरावें' हें त्यांचेंच वचन त्यांना पूर्ण लागू पडतें.

रामदासांचा जन्म मराठवाड्यांत राक्षसभुवनाजवळ जांब गांवीं इ. स. १६०८ मध्यें झाला. त्यांचें नांव नारायण, पित्याचें नांव सूर्याजीपंत, आईचें नांव राणूबाई व उपनाव ठोसर. वडील बंधूंचें नांव गंगाधर. स्वतःच्या विवाह-प्रसंगीं 'सावधान' शब्द ऐकतांच रामदास खरोखरीच सावध होऊन पळून गेले. त्यानंतर अनेक वर्षें भ्रमण करून त्यांनीं लोकस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केलें. त्याचें प्रतिबिंब त्यांच्या काव्यात दिसतें. 'अस्मानी सुलतानी' ('सांप्रदायिक विविध विषय' हा ग्रंथ पाहा.), शिक्षांचे क्रूर प्रकार, मतामतांचा गलबला, कर्जांत बुडणारे लोक, इत्यादि तत्कालीन स्थितीचें हृदय त्यांच्या काव्यांत पाहावयास मिळतें. लुच्चांचा सुळसुळाट झाला व एक भला माणूस काय करणार ? (करील काय तो भला । बहु चकीत येकला ॥) अशी अवस्था तेव्हां आली. 'तंव तो गलबला जाला । परचक्र आलें' असें केव्हांहि अवचित होई व 'अकस्मात धाडी आली । कांता बंदीं धरूनि नेली ॥' (दासबोध – ३–५–२७–२८) ही स्थिति नेहमीं ओढवत असे. 'तयारंभ भूमंडळीं धुंदि झाली । नसे न्याय व नीति सर्वे बुडाली ॥' असें रामदास तत्कालीन वातावरणाबद्दल सांगतात. या अंदाधुंदीला व अस्थिर वातावरणाला कोणी तरी आळा घालो, असें लोकांना वाटूं लागलें. तळमळीची इच्छा बहुतेक वेळां सफल होते. म्हणूनच छत्रपति शिवाजीमहाराजांचा उदय होऊन महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन झालें, व रामदासांनीं संतकवीशिवाय राजगुरु होऊन महाराष्ट्राच्या सेवेंत आपलें आयुष्य खर्चिलें.

शिवाजीमहाराज व रामदास यांचे संबंध रामदासांच्या साहित्यावरून स्पष्ट दिसतात. मोरोपंतांनींहि याबद्दल म्हटलें आहे :

'शिवरायास ज्ञानद जो जैसा याज्ञवल्क्य जनकास ।
तरले भवार्णवीं बहु दृढतर ज्याची धरूनि जन कास ॥'

रामदासांनी वेळोवेळीं महाराजांस बहुमोल उपदेश केला व 'मराठा तितुका मेळवावा' हें सुप्रसिद्ध वचन छत्रपतींना उपदेशिलें. भवानीची प्रार्थना करतांना देखील 'तुझा तूं वाढवी राजा' ही त्यांची मुख्य मागणी असे. त्यांनीं शिवाजी महाराजांना दिलेली छाटी स्वातंत्र्ययुद्धाचे पुढारी नानासाहेब पेशवे यांनीं इ. स. १८५७ मध्यें गंगार्पण केली असे गोडसे भटजी 'माझ्या प्रवासांत' सांगतात. महाराष्ट्रांत नुसतें स्वराज्य नव्हे तर सुराज्य निर्माण व्हावें, अशी रामदासांची इच्छा होती, व 'आनंदवनभुवन' हें सुराज्याचें स्वप्न आहे. छत्रपतींचें निधन झाल्यावर रामदास फार व्यथित झाले. त्याना व त्यांच्या शिष्यवर्गाला तेव्हां काय वाटलें याची कल्पना 'गेला भोक्ता गडांचा' (म. वा. इ. खंड ३ पृ. ६४६) या उद्धवगोसावींच्या श्लोकावरून येते. महाराजांच्या निधनोत्तर संभाजी राजानाहि समर्थांनीं चार शब्द सांगून पाहिले, हें त्यांच्या पत्रावरून दिसतें.

रामदासांना जगांत अफाट वाङ्मय आहे, याची चांगली जाणीव होती. 'जगीं पाहतां ग्रंथ कोट्यानुकोटी' असें तें सांगतात. त्यांनीं स्वतःहि दासबोध, रामायण, अभंग, पदें, अनेक प्रकरणें, असें विपुल काव्य लिहिलें. त्यांच्या भाषेंत असामान्य जोर आहे.

हवाया नळे बाण भांडी अनंतें । नळें सोडितां जाति आकाशपंथें ॥
वनी लागतां वेळ नाहीं उठाया । तयाचे परी स्फूर्ति दे देवराया ॥

अशी त्यांना स्फूर्ति येत असावी. त्यामुळेंच शब्द अपुरे पडून कांहीं वेळां त्यांची काव्यरचना गद्यासारखी व रुक्ष भासते. समर्थांच्या काव्यांत कुठला विषय नाहीं असे नाहीं. निसर्गवर्णन, कारखानेप्रकरण, बागप्रकरण, उपदेश, परमार्थ, व्यवहार इत्यादि सर्व विषय त्यांत आहेत. दासबोध तर व्यवहारज्ञानाचें भांडारच आहे. त्याचा सहावा दशक इ. स. १६५९ मध्यें झाला व समग्र दासबोध शेवटीं शेवटीं त्यांनीं पूर्ण केला असावा.

रामदासांनीं दुबळेपणाचा पुरस्कार कधींच केला नाहीं. 'वन्ही तो चेतवावा रे' असें ते सांगतात. लोकांच्या वेडगळ कल्पनावर त्यांनीं चांगलेच कोरडे ओढले आहेत. भुतेखेतें, दगडाचे देव, यांबद्दल ते काय म्हणतात तें पाहण्याजोगें आहे. कवितादि त्यांच्या तडाख्यातून सुटली नाहीं. 'कविता

गवताऐसी। उदड वाढली असे ॥' असे ते वर्णन करतात. त्याचें तेव्हाच्या काळाचें वर्णन आताच्या स्थितीबरोबर ताडून पाहाण्याजोगें आहे. 'जैसा साहेब नमस्कारिजे। ओळखिल्या उपरां॥' (दासबोध ११।९।७) हें आजच्या काळालाहि लागू पडत नाहीं काय? रामदासाची भूमिका समर्थ प्रतापात गिरिधरस्वामींनी थोडक्यात सांगितली आहे —

श्रीगुरु समर्थ एकांतीं बैसती। प्रांतीचे लोक दर्शना येती।
सकळ प्रांतीचा स्वामी परामृश घेती। चिंता करिती विश्वाची॥
(समर्थ प्रताप २०।९८)

अशी सर्वांची चिंता करणारा पुरुष क्वचितच निर्माण होत असतो व म्हणूनच समाजात लोकांच्याबरोबर वावरून त्यांची प्रत्यक्ष सेवा करणाऱ्या समर्थांचें स्थान इतर संत कवींपेक्षा फार निराळें आहे.

रामदासाची समाधि सज्जनगडावर आहे. त्यांचें हस्ताक्षर उपलब्ध असून त्यांचे शिष्य कल्याणस्वामी यांच्या हातचा दासबोध आहे. धुळ्याचे समर्थभक्त कै. श. श्री. देव यांनीं रामदासी वाङ्मयाच्या संशोधनात आयुष्य वेचिलें. या वाङ्मयाचा मोठा संग्रह त्यांनीं तेथील समर्थ-वाग्देवतामंदिरात करून ठेविला आहे व इ.स. १९१५ पासून चालविलेल्या 'रामदास व रामदासी' मासिकात व ग्रंथरूपानें तो प्रसिद्ध केला.

रामदासाचे कल्याणस्वामी, वेणाबाई इत्यादि शिष्य होते व त्यांचीहि ग्रंथरचना आहे.

[संदर्भ: [१] श्रीसमर्थ ग्रंथ भांडार (इ स १९२७), ल रा पांगारकर. [२] दासबोध तिसरी आवृत्ति (इ स १९४९), ल. रा. पांगारकर. [३] श्री समर्थांचा गाथा (इ. स १९२८), अनंतदास रामदासी. [४] समर्थसंजीवनी दुसरी आवृत्ति (इ स. १९५५), ल रा. पांगारकर. [५] श्रीसमर्थ प्रताप (इ स १९१२), सत्कार्योत्तेजक सभा, धुळें. [६] म वा इ. खंड ३, ल रा पांगारकर. [७] श्रीसमर्थचरित्र (इ स १९४९), श. श्री देव ]

**वामनपंडित:** वामनपंडित सातान्याकडील कोरेगाव कुमठें येथील जोशी. त्यांचें गोत्र वासिष्ठ, पत्नीचें नाव गिरीबाई, व उपनाव शेपे. मराठी

कवितेंत पांडित्य हा गुण ज्या कवींनीं आणला, त्यात वामनपंडित प्रमुख आहेत. या पंडित कवींनीं मराठींत चांगली श्लोकरचनाहि केली व त्यांत 'सुश्लोक वामनाचा' असा मोठेपणा वामनपंडितांना दिला गेला. रासक्रीडेसारखे श्लोक 'सुश्लोकाचीं' उदाहरणें आहेत. मात्र या पांडित्यामुळें मधूनमधून त्याच्या काव्यांत दुर्बोधता येते. रामदास त्याना यमक्या वामन म्हणत, अशी आख्यायिका आहे.

वामनपंडितांचे यथार्थदीपिका व निगमसार हे ग्रंथ आहेत. त्याशिवाय वेणुसुधा, वनसुधा, नामसुधा, मनाचे श्लोक, गंगालहरी, भर्तृहरीच्या तीन शतकाचे अनुवाद इत्यादि अनेक स्फुट काव्यें आहेत. भागवतातील दशमस्कंधाच्या एकतिसाव्या अध्यायावर आधारलेलें गोपींगीत पूर्वी फार लोकप्रिय होतें. 'जयति तेऽधिक जन्मना व्रजः । श्रयत इंदिरा शश्वदत्र हि ॥' इत्यादि भागवतांतील मूळ श्लोक पाहता पंडितांचें रूपांतर किती सुरस झालें, तें लक्षात येतें. वामनपंडितांबद्दल मोरोपंत म्हणतात :

'वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला ।
प्रभुनें मुखवाया मन वामन हा वेणु साचि बोलविला' ॥

पंडिताच्या काळाबद्दल निश्चित माहिती नाहीं. त्याचा निगमसार हा ग्रंथ इ. स. १६७३ मधील आहे व त्यांचा स्वतःचा काळ साधारण इ. स. १६०८–९५ असावा. सर्वसंग्रह (माधव चंद्रोबा), काव्यसंग्रह (निर्णयसागर) व काव्येतिहाससंग्रह यांत वामनपंडिताचीं काव्यें प्रसिद्ध झालीं, परतु हे वामन अनेक असावेत, असेंहि एक मत आहे.

[संदर्भ : [१] म. सा. [२] वामनी ग्रंथ भाग १, २, ३, काव्यप्रकरणें (इ. स. १८९१), बाळाजी आणि कंपनी. [३] महाराष्ट्र कविवर्य वामनपंडितकृत कवितासंग्रह ग्रंथ १, २ (इ. १८९६, वा. दा. ओक, काव्यसंग्रह १९), ३ (इ. स. १९०१ वा. दा. ओक, काव्यसंग्रह ३३), निर्णयसागर. [४] वामनपंडित (इ. स. १८८४), वा. म. हंस.]

**हरिपंडित :** 'भीष्मप्रतिज्ञा' हे स्फुट काव्य वामनपंडिताचें मानिलें जात होतें, परतु त्यातील शेवटल्या ओळीचा 'दासानुदास निज वामन हो

भजाचा ' या ओळीऐवजी ' दासानुदास हरि तो सकळा द्विजांचा ' असाहि पाठ आहे वामनपंडिताचें गोत्र वासिष्ठ असल्यामुळें भीष्मप्रतिज्ञेतील वर्णन त्यांना लागू करणें कठीण हरिपंडित या कवीचा भागवताच्या एकादश स्कंधातील पहिल्या व पाचव्या अध्यायावर टीकात्मक 'भावबोधिनी' हा ग्रंथ माहीत आहे त्याच्या सुरुवातील

जनक नरहरीतें माय लक्ष्मी तयेतें। नमन करुनि भावें बंधु गंगाधरातें ॥
पटुमति हरिशर्मा श्रीनृसिंहप्रसादें। करि विशद उपान्त्यस्कंदभाषाप्रबंधें ॥

हा श्लोक आहे व यावरून पित्याचें नाव नरहरी व आईचे नाव लक्ष्मी असणारा हा कवि वामनपंडित नसून हरिपंडित होय हें स्पष्ट होतें हरिपंडित वामनपंडिताचे शिष्य होते

[ संदर्भ [१] म सा [२] हरिपंडितकृत भावबोधिनी, म सा प ६९ ( इ स १९४३ ), चिं नी जोशी [३] हरिपंडित आणि त्यांचा कविता, मुमुक्षु ( ऑक्टोबर इ स १९२९ ), भाई कल्याण ]

**आनंदतनय** ' त्या कृष्णाचेच पायीं नमन करितसे आरणीचा शिपाई ' ( पूतनावध ४३ ) या ओळीवरून आनंदतनयाचा विजापूरकडील अरणी गावाशीं संबंध दिसतो आनंदतनय शहाजीराजाचे गुरु व रघुनाथ पंडिताचे व्याही असून ते तंजावरला जाऊन राहिले, अशी आख्यायिका आहे आनंदतनयाच्या तारकावधातील ' केव्हा कोठुन घेतला शर करीं केव्हा गुणीं योजिला ( १८ ) ही ओळ रघुनाथपंडिताच्या नलदमयंती स्वयंवराख्यानातील ' कदा नेणो ओढी शरधितुनि काढी शर कदा ' ( ९ ) या ओळीसारखी वाटते आनंदतनयाचीं सीतास्वयंवर, तारकाख्यान, पूतनावध, मुरली ( देवनाथाची मुरली पहा ) इत्यादि स्फुट कार्ये आहेत, पूतनावधातील पदं दिंडी वृत्तात आहेत विष्णुदासनाम्याच्या नक्रउद्धारापासून आनंदतनयाच्या काळापर्यंत दिंडी वृत्त चांगलें तयार झालें असावें आनंदतनय आणि रघुनाथ पंडित यांनीं त्याला वैभव प्राप्त करून दिलें

[ संदर्भ [१] प्रा म स [२] आनंदतनयकृत कवितासंग्रह ( इ स १८९१ ), निर्णयसागर ]

**रघुनाथपंडितः** रघुनाथपंडितांचें नलदमयंती–स्वयंवराख्यान हें मराठीमध्यें विश्रुत काव्य आहे. तथापि रघुनाथपंडिताची निश्चित माहिती नाहीं. ते बहुतेक तंजावरकडील असावेत. त्याचें हें काव्य श्रीहर्षांच्या संस्कृत नैषधकाव्यावर आधारिलें आहे. नैषधकाव्य संस्कृतांत प्रसिद्ध आहे. एखाद्या पंडिताला मद चढला तर हें काव्य त्याचा उतार करतें ( नैषधं विद्वदौषधम् । ) अशी संस्कृत म्हण आहे. इ. स. १५९४–९५ मध्यें फैजीलाहि फारशींत या काव्याचें रूपांतर करावेंसे वाटलें. या नैषधकाव्याला रघुनाथ पंडितांनीं मराठी वेष देऊन मुळापेक्षाहि जागोजागीं सरस असें काव्य निर्माण केलें. पंडिताची गजेंद्रमोक्ष व रामदासवर्णन हीं आणखी दोन काव्यें आहेत.

शिवाजीच्या अष्टप्रधानांत एक रघुनाथपंडित होते हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे

[ **संदर्भ :** [१] म्रा म. स, [२] नवनीत. [३] रघुनाथपंडितांचे काव्यग्रंथ ( इ. स. १९०९ ), ह. त्रिं. बापट. [४] कवि रघुनाथपंडित प्रधान, गो. रा. राजोपाध्ये. [५] रघुनाथपंडित विरचित दमयंती स्वयंवर ( इ स १९३५ ), अ का प्रियोळकर [६] फारशी नलदमयंती आख्यान व त्याचा निर्माता, लोकसत्ता ( ता. १८–५–५८ ), सेतुमाधवराव पगडी. ]

**सामराजः** सामराज, नागेश हे शिवकालीन कवि होते. इ. स. १६७४ मधील छत्रपतींच्या राज्याभिषेककालीन एका कागदपत्रावर शामभट या नांवानें त्याची साक्ष आहे. त्याचीं रुक्मिणीहरण व मुद्गलाख्यान हीं दोन काव्यें आहेत. मुद्गलाख्यानाच्या शेवटल्या (२६०) श्लोकावरून त्याच्या पित्याचें नांव लक्ष्मण व आईचें नांव काशी असल्याचें कळतें सामराजाच्या श्लोक रचनेचा उत्कर्ष रुक्मिणीविरहव्यथेच्या श्लोकांत चांगला दिसतो.

[ **संदर्भ :** [१] सामराजकविविरचित रुक्मिणीहरण ( इ. स १९२४ ), गो. वि. कुल्फुळे [२] मुद्गलाख्यान ( इ. स. १९३० ), गो. रा. राजोपाध्ये. [३] शिवकालीन कवि सामराज, द्वितीय आवृत्ति ( इ. स. १९४१ ), द. सी. पगु. ]

**विठ्ठल**: याचें नाव विठ्ठल अनंत क्षीरसागर व हा मराठवाड्यातील बीडजवळील गौरीपूरचा रहिवासी. इ. स. १६३०–९० हा त्याचा साधारण काळ असावा. त्याचीं रुक्मिणीस्वयंवर ( इ. स. १६७४ ), सीतास्वयंवर ( इ. स. १६७७ ), रसमंजिरी ( इ. स. १६७९ ), द्रौपदीस्वयंवर ( इ. स. १६८० ), बिल्हणचरित्र, विद्वज्जीवन इत्यादि स्फुट काव्यें आहेत. 'जो जो जो जो रे' हा पाळणा व वृत्तश्लोक यांच्यामुळे विठ्ठल कवि सर्वांना माहित झाला. विठ्ठलाच्या काव्यांत व विशेषत रुक्मिणीस्वयंवरांत वृत्तवैचित्र्य व चित्रबंधात्मक रचना पुष्कळ आहे. त्यांत चंपकमाला, मणिमाला इत्यादि वृत्तांचीं नावें श्लोकांतच आणिलीं आहेत.

विठ्ठल कवि विठ्ठल कळपूरकरप्रमाणेंच व्यापारी होता, असें दिसतें.

[ **संदर्भ**: [ १ ] प्रा. म. सा. [ २ ] महाराष्ट्र कवि विठ्ठलकृत कवितासंग्रह ( इ. स. १८९६ ), निर्णयसागर, ( काव्यसंग्रह २५ ), वा. दा. ओक. ]

**उद्धवचिद्घन** : मोगलाईमधील धारूर हें उद्धवचिद्घनाचें गाव व त्याचें आडनाव कोकीळ. 'नवरी संतचरित्रें हो,' 'कृष्णा धाव रे लवकरी' इत्यादि त्याचीं पदें प्रसिद्ध होतीं. हे इ. स. १६८० च्या सुमारास हयात असावेत. प्रस्तुत ध्रुवाख्यान नवनीतांत इ. स. १८७८ मध्यें चिंतामणी कवीच्या नावें प्रथम आलें, परंतु त्याच वेळीं उद्धवचिद्घनाच्या नावेंहि तें क्रमिक पुस्तकांत असल्याचें वृद्ध लोक सांगतात. उपयुक्त कथासारसंग्रहांत हें आख्यान उद्धवचिद्घनाच्याच नावानें आहे. उद्धवचिद्घनाच्या श्रियाळचरित्र व शुक रंभासंवाद या दोन कवितांशीं या आख्यानाचें फार साम्य आहे व ध्रुवाख्यान कुणाचें आहे, हा संशय वाटण्याचें कारण दिसत नाहीं. 'कृष्णा धाव रे लवकरी' या पदांतहि एका ठिकाणीं चिंतामणीचें नाव कुणीतरी घातलेलें आजगाव करांना आढळलें. ध्रुवाख्यानाच्या शेवटीं आढळणारा श्लोक रामदासशिष्य अनंताचा दिसतो व तो केवळ वंदनपर असावा. ध्रुवाख्यान भक्तिरसाच्या आत्यंतिक जिव्हाळ्यानें लोकमान्यता पावलें.

[ **संदर्भ**: [ १ ] उद्धवचिद्घनकृत कवितासंग्रह ( इ. स. १९०२ ), निर्णयसागर. [ २ ] उद्धवचिद्घनाचें ध्रुवाख्यान, मुमुक्षु ( एप्रिल इ. स. १९२९ ), कल्याण

भीराम, [३] ध्रुवाख्यानाचा खरा कर्ता उद्धवचिद्घन [इ. स. १९३२], अ. का. प्रियोळकर [४] महाराष्ट्र कविचरित्र भाग ३ (इ. स. १९१४), ज. र. आजगावकर.]

**नरहरी:** नरहरी नावाचे अनेक कवि झाले. त्यांपैकीं 'गंगारत्नमाला' हें काव्य कुणाचें आहे, तें माहीत नाहीं. दानव्रत व ब्रह्मबोध (लघुकाव्यमाला, काव्यसंग्रह ३८), कात्यायनीव्रत, नौकानयन इत्यादि श्लोकबद्ध काव्यांचा कर्ता एक नरहरी आहे. इ. स. १६९५ मध्यें एका नरहरीनें 'शकुनवंती' ग्रंथ लिहिला (चरित्रकोश). गंगारत्नमाला हें काव्य बहुतेक वामनपंडितांच्या वेळच्या श्लोकरचनेच्या काळामधील असावें.

[**संदर्भ:** [१] नवनीत, [२] काव्येतिहाससंग्रह (इ. स. १८८९) व अनेक कविकृत कविता भाग ४ (इ. स. १८८९), ज. बा. मोडक.]

**देवदास:** देवदास अथवा देवीदास याचें भक्तिभावपूर्ण व्यंकटेशस्तोत्र घरोघरीं वाचलें जातें. हा एक चांगला कवि आहे, हें त्याच्या भामावर्णन या lyrical (भावगीतात्मक) काव्यावरून दिसून येईल. त्यानें इ. स. १६८६ मध्यें 'संतमालिका' लिहिली. याशिवाय त्याचें गजेंद्रमोक्ष हें काव्य आहे व करुणामृतस्तोत्राची हस्तलिखित प्रत हैद्राबाद येथील उस्मानिया विद्यापीठांत आहे. भारतइतिहास संशोधक मंडळाच्या इ. स. १९१२ च्या अहवालात त्याचें एक पद दिलें आहे.

[**संदर्भ:** [१] व्यंकटेशस्तोत्र पोथी, [२] देवदासकृत भामावर्णन, भा. इ. सं. मं. अहवाल (इ. स. १९११), वि. का. राजवाडे. [३] देवदासकृत संतमालिका (इ. स. १९१३), महामहोपाध्याय द. वा. पोतदार. [४] दोन देवदास, भा. इ. सं. मं. (इ. स. १९१२), द. वा. पोतदार.]

**अनंत:** हा रामदासशिष्य असून तो इ. स. १७२५ च्या सुमारास हयात असावा. त्याचीं सीतास्वयंवर, कुशलवाख्यान इत्यादि स्फुट काव्यें आहेत. गोपीगीत हें काव्य पूर्वी लोकप्रिय होतें. जनपंडितानें लीलाभागवतांत

निशा लोटिली ऊठिली पक्षिजाती । दही मथिती गोपिका गीत गाती ॥
व्रजी गोवळे धेनुवा दूहितातीं । उठी रे गडी तूजला वाहताती ॥ (१६–३)

या श्लोकात गोपीगीताची नक्कल केलेली वाटते.

[ संदर्भ: [१] म. सा [२] अनंत कविकृत कवितासंग्रह (इ स. १८९९), निर्णयसागर (काव्यसंग्रह १०), वा.दा.ओक. [३] जनपंडितकृत लीलाभागवत पूर्वार्ध ( इ. स. १९५८), मराठवाडा साहित्यपरिषद. ]

**मध्वमुनीश्वर**: मध्वमुनीश्वर नाशिककडचे असून त्याचें नाव त्रिंबक, पित्याचें नाव नारायणाचार्य व आईचें नाव द्वारावती होतें. त्याची 'मनमोहन वाजवि वेणू', 'कधि भेटेल मजला देव हरि' इत्यादि अनेक पदें प्रसिद्ध होतीं, परतु 'उद्धवा शातवन कर जा' हें पद विशेष लोकप्रिय झालें. तत्कालीन थोड्याशा स्वतंत्र धर्तीच्या काव्यापैकीं याचें 'धनेश्वर चरित्र' हें एक कथानक आहे.

मध्वमुनीश्वराचा समाधिकाल इ. स. १७३१ असावा.

[ संदर्भ: मध्वमुनीश्वराची कविता ( इ. स १९३३ ), प्र. व्य. गुब्बी.]

**श्रीधर**: पंढरपूरजवळील नाझरें हें श्रीधराचें गाव. त्याच्या पित्याचें नाव ब्रह्मानंद व आईचें नाव सावित्रीबाई. त्याचे ओवीबद्ध ग्रथ रसाळ व सोपे असल्यामुळें अजूनहि घरोघरीं वाचले जातात. हरिविजय ( इ. स. १७०२ ), रामविजय ( इ. स १७०३ ), पांडवप्रताप ( इ. स. १७१२ ), जैमिनी अश्वमेध ( इ. स. १७१५ ), शिवलीलामृत ( इ. स. १७१८ ) इत्यादि त्याचे अनेक ग्रथ आहेत. ध्रुवचरित्र हें त्याचें एक श्लोकमय आख्यान आहे. महाभारतातील अभिमन्युवधाच्या करुणाजनक प्रसगावर अनेकांनीं मराठींत काव्यें केलीं विष्णुदास नाम्याच्या महाभारतात हं प्रकरण आहे. 'गेला अभिमन्यु' हें स्त्रीगीत विख्यातच आहे. या सर्व काव्यात श्रीधराचें वर्णन सर्वोत्कृष्ट वाटतें.

श्रीधराच्या हरिविजयातील 'प्रातःकाळीं एके दिनीं ( १२–८–१० ) या ओव्या जुन्या काळात सकाळीं लोक म्हणत असे कळतें, व होनाजींच्या

भूपाळींत त्याची छाया दिसते. जनपंडिताच्या 'प्रातःकाळीं ऊठवी कृष्णमाता' (१६-१-२) इत्यादि श्लोकांतहि त्याचाच अनुवाद दिसतो.

[ संदर्भ: [१] म. सा [२] श्रीधर, चरित्र आणि काव्यविवेचन (इ. स. १९५१), चिं नी. जोशी. [३] हरिविजय (इ स. १९११), आर्यभूषण [४] पांडवप्रताप (इ स. १८८७), स. र जयकर. [५] शिवलीलामृत (इ. स. १०१५), बा. ल. पाठक. [६] रामविजय (इ. स. १८८६), पुराणप्रकाशक मंडळी. ]

**ब्रह्मदास**: नृसिंहसरस्वती-माधवेंद्रसरस्वती-श्रीकृष्णस्वामी-ब्रह्मदास या परंपरेंतील ब्रह्मदासानें इ. स. १७०८ मध्यें 'ज्ञानाब्धितरंग' हा ग्रंथ लिहिला. 'लीलाविश्वंभर' हा त्याचा आणखी एक ग्रंथ बाराव्या शतकातील बसवेश्वराचे गुरु अल्लमप्रभू यांच्या चरित्रावर असून त्यात ३८५१ ओव्या आहेत. हा ग्रंथ पूर्वी छापला होता असें कळतें, परंतु त्याची छापील प्रत पाहण्यास मिळाली नाहीं प्रस्तुत उतारे हस्तलिखिताच्या नकलेवरून घेतले व ही नक्कल प्रा. ह. पां. कुलकर्णी यांच्या संग्रहीं आहे. हा ग्रंथ इ. १७२२ मध्यें समाप्त झाल्याचें पोथीवरील शेवटच्या भागातील वाक्यावरून दिसते. परंतु ओव्यांत काळाचा निर्देश नाहीं व हा काळ ग्रंथसमाप्तीचा का नक्कल संपली त्या वर्षाचा हें स्पष्ट नाहीं. पधराव्या शतकात कानडींत चामरस कवीनें 'प्रभुलिंगलीला' हा ग्रंथ लिहिला, त्यावरून मराठींत 'लीलाविश्वंभर' ग्रंथ केला गेला. या ग्रंथात गोरक्षनाथ व अल्लमप्रभू यांच्या भेटीचें वर्णन आहे. राजकुमारी मायेचें ब्रह्मदासाचें वर्णन काव्यमय आहे व काव्य या दृष्टीनें हा ग्रंथ चांगला वाटतो. या ग्रंथातली कांहीं सुभाषितें पहा :

'योगी विनयी निरपेक्ष ज्ञानी। गायक शुचि पंडित निरभिमानी।
धनीक दाता मंजुळवाणी। हें त्रिभुवनीं दुर्लभ ॥ (१९।५६)

तसेंच, 'संग असावा सज्जनाचा। लोभ असावा सद्गुरूचा।
काम नसावा परस्त्रियेचा। वास काशीचा उत्तम ॥ (५।८९)

[संदर्भ: [१] म. सा. [२] लीलाविश्वंभर, म. सं. प. (जुलै इ. स. १९५४).]

**कृष्णदयार्णव :** कृष्णदयार्णवांचें गांव वन्हाडांतील कोपर्डे असून त्यांचें नांव नरहरि, व पित्याचें नांव नारायण. त्याचे वंशज कोपर्डेकर नांव लावतात. महारोग झाला तरीहि भागवताच्या दशमस्कंधावरील टीकात्मक 'हरिवरदा' हा प्रचंड ग्रंथ त्यांनीं हातीं घेतला. पूर्वार्धाचे ४९ अध्याय व उत्तरार्धाचे ३७ म्हणजे ८६ अध्याय त्यांनीं पूर्ण केले. ८७ व्या अध्यायाच्या २४ व्या ओवीपासून पुढें त्यांचा शिष्य 'उत्तमश्लोक' यानें हा ग्रंथ पूर्ण केला. या चोवीसाव्या ओवींत तो म्हणतो–

'ऐशी करूनिया विनवणी । माथा ठेवूनि संतचरणीं । शास्त्रपरिभाषा पर्यायकथनीं । दयार्णववाणी प्रवर्तली ॥ (८७–२४). कृष्णदयार्णव वर्णन सुरस करतात. प्रस्तुत उताऱ्यांत अशा वर्णनात्मक ओव्या तेवढ्या घेतल्या आहेत. तिसऱ्या अध्यायांतहि या ओव्यासारखें 'दिशा सुप्रसन्न निर्मळ' इत्यादि वर्णन आहे.

[ संदर्भ : [१] म. सा. [२] हरिवरदा ( इ. स. १८९८ ), बाबाजी हरी तेंडुलकर. [३] हरिवरदा भाग १, २, ३ (इ. स. १९५५–५६, १–२९ अध्याय), प्रकाशक द. र. कोपर्डेकर. ]

**अमृतराय :** हे मध्वमुनीश्वरांचे शिष्य बुलढाणा जिल्ह्यांतील फत्तरखेडा गांवचे असून, औरंगाबादेस राहात. आईचें नांव उमा व वडिलांचें नांव शंकर असल्याचें ध्रुवचरित्रांत त्यांनीं नमूद केलें आहे. ते शीघ्रकवी होते व त्यांनीं कटाव हें वृत्त बरेंच वापरलें आहे. नानासाहेब पेशव्यांना त्यांनीं आपलें काव्य म्हणून दाखविलें असें म्हणतात.

'भक्तांचिया काजासाठीं' या पदाचें एकनाथी भागवताशीं साम्य पाहा :

मी न लागतां कोणाची कवडी । अर्जुनाची धूतसे घोडीं ।
धर्माघरीं उच्छिष्टें काढी । मज अति आवडी प्रेमाची ॥
( २४–३८५ )

[ संदर्भ : [१] नवनीत. [२] अमृतरायकृत कवितासंग्रह ( इ. स. १८९६ ), निर्णयसागर. ]

**ब्रह्मगिरी**: ७७ कडव्यांचें दामाजीचरित्र एका काळीं महाराष्ट्रांत विश्रुत होतें. याचा कर्ता ब्रह्मगिरी अमृतरायांचा शिष्य होता.

[ संदर्भ : म. सा. पृ. ६११. ]

**जीवनतनय**: यांच्याबद्दल निश्चित माहिती नाहीं.

**माधव**: माधव नांवाचे अनेक कवि आहेत. प्रस्तुत पदें रचणारे माधव कोण हें ठाऊक नाहीं.

**सोहिरोबा आंबिये**: हे सावंतवाडीजवळील बांदें या गांवचे असून याचा जन्म इ. स. १७१४ च्या सुमाराचा. यांच्या महदनुभवेश्वरी, सिद्धांतसंहिता, पूर्णाक्षरी, अद्वयानंद, इत्यादि कृती व पदें आहेत. महादजी शिंद्यांची व सोहिरोबांची भेट झाली होती. इ. स. १७९९ च्या सुमारास उज्जनींत राहत असतांना ते बाहेर पडले व परत आले नाहींत.

[ संदर्भ : [१] सोहिरोबा आंबियेकृत पदसंग्रह ( इ. स. १८८४ ), भ. बा. पै रायकर. [२] सोहिरोबानाथकृत पारमार्थिक पद्यप्रकाश ( इ. स. १८८४ ). [३] सोहिरोबानाथकृत कवितासंग्रह भाग १ ( सिद्धांतसंहिता, काव्यसंग्रह २२, वा. दा. ओक, इ. स. १८९६ ), निर्णयसागर. [४] योगिराज सोहिरोबानाथकृत ओवीबद्ध किरकोळ ग्रंथ ( इ. स. १९०७ ), भ. बा. पै रायकर. [५] योगिराज सोहिरोबानाथकृत पारमार्थिक पद्यसंग्रह ( इ. स. १९०७ ), भ. बा. पै रायकर. ]

**जिनसागर**: *अठराव्या शतकांतील या जैन कवीच्या रविवारकथा* ( इ. स. १७२४ ), जिनकथा ( इ. स. १७२७ ), जीवधरपुराण ( इ. स. १७४४ ) इत्यादि अनेक कृति आहेत. त्यांपैकीं भक्तामरस्तोत्र श्रीमान तुंगाचार्यांच्या पवित्र जैन संस्कृत स्तोत्राचें रूपांतर आहे.

जिनसागर कारंजा येथील पट्टाधीश देवेंद्रकीर्ति यांचे शिष्य होते.

[ संदर्भ : [१] मराठींतील जैन वाङ्मय, म. सा. प. ( जानेवारी–मार्च इ.

स. १९५६ ), प्रा. विद्याधर जोहरापुरकर. [ २ ] सन्मति ( जानेवारी इ स. १९५६ ). [ ३ ] श्रीमहाकवि मानतुंगाचार्य विरचित भक्तामरस्तोत्र ( इ स. १९५७ ), सन्मतिप्रकाशन पुष्प ६. ]

**जगन्नाथ :** या कवीचें ५८१ श्लोकांचें शशिसेना हें काव्य स्वतंत्र धर्तीची काव्यरचना या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. स्वतंत्र काव्य रचणारे अनाथ ( सावकार आख्यान ), जीवन ( अनुभवलहरी ), शिवराम, दत्त या कवींचा महाराष्ट्र सारस्वतात उल्लेख आहे. शशिसेना ही राजकन्या असून अहिमाणिक हा प्रधानाच्या घरीं वाढलेला एक मुलगा होता. त्याच्या बाळपणाचें प्रस्तुत उताऱ्यात वर्णन आहे. या काव्यात वऱ्हाडी व उत्तर हिंदुस्तानी शब्दप्रयोग आहेत, त्यावरून हा कवि वऱ्हाडाकडील असावा, असें वाटतें. या काव्याची जुनी प्रत इ. स. १७९३ मधील असून हा कवि अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात झाला असावा.

इ. स. १७४७ मध्यें बोधवैभव, गीतेवर समश्लोकी ( इ. स. १७५१ ), इत्यादि लिहिणारे जगन्नाथ ते हेच कीं काय तें सांगता येत नाहीं.

[ **संदर्भ :** [ १ ] म. सा. [ २ ] शशिसेना, वागीश्वरी वर्ष ३ (इ. स. १९३१ ), या. मा काळे. [ ३ ] रामदासी संशोधन खंड १ ( इ. स. १९३३ ) पृष्ठ २२९ ( बोधवैभव उल्लेख ) ]

**मीनाक्षी अम्मा :** एकनाथाचे नातू माधवस्वामी, याच्या नातवाची ही नातसून. वासुदेवपंडिताची ही पत्नी. तामिळनाडमध्यें कुंभकोणम्‌जवळ निम्मगुडी या गावीं ही राहत असे. हिला भक्तिपर कविता करण्याचा नाद होता. हिचीं ' हळदी उटण ' नावाचीं सौभाग्यगीतेंहि आहेत.

[ **संदर्भ :** म. सा. पुरवणी–डॉ. श. गो. तुळपुळे ]

**लहरी मुकुंद :** याचा नारायणराव पेशव्याच्या वधाबद्दलचा प्रसिद्ध पोवाडा इ. स. १७७३ मध्यें तो प्रसंग घडल्यावर लिहिला असावा. याचा १३ चौकाचा दुसरा पोवाडा आहे, परंतु हा ७ चौकाचा पोवाडा मूळचा दिसतो.

[ **संदर्भ :** पे. पो. ]

**महीपति :** महीपति राहुरीजवळील ताहराबाद गावचे. त्यांच्या पित्याचें नांव दादोपंत व आईचें नांव गंगाबाई. कवि व चरित्रकार या दोन्ही नात्यांनीं त्यांनीं विशेष कामगिरी बजावली. पुष्कळ संतांची व कवींची त्यांनीं दिलेली माहितीच तेवढी आपल्याला उपलब्ध आहे. भक्तविजय (इ. स. १७६९), संतलीलामृत (इ. स. १७६७), संतविजय (इ. स. १७७४), भक्तलीलामृत (इ. स. १७७४) इत्यादि ग्रंथ त्यांनीं लिहिले. प्रेमाबाई कृष्णलीलावर्णन ऐकत असतांनाच तल्लीन होऊन निजमाधाला गेली, तें कृष्णलीलावर्णन महिपतींनीं प्रस्तुत उताऱ्यात प्रेमळ व रसाळ भाषेत सांगितलें आहे. 'गडे हो कृष्ण गडी अपुला' इत्यादि पदें करणारी प्रेमाबाई हीच असावी.

[संदर्भ : [१] भक्तलीलामृत पोथी (इ. स. १८७५) गणपत कृष्णाजी. [२] मराठी कविचरित्र भाग २ (इ. स. १९१३), ज. र. आजगांवकर.]

**मोरोपंत :** आर्यावृत्त मराठींत विशेष वापरल्यामुळें 'किंवा आर्या मयूरपंतांची' असें ज्यांच्या आर्येबद्दल म्हणतात, ते मोरोपंत बारामतीचे. त्याचें काव्य विपुल असून तें सर्वसंग्रह व काव्यसंग्रह यांतून प्रकाशित झालें. समग्र भारत, रामायणें, भागवत, कृष्णविजय इत्यादि काव्यें व केकावली, 'संशयरत्नमाला इत्यादि अनेक स्फुट काव्यें, पदें त्यांनीं केलीं.

[संदर्भ : [१] मोरोपंताचे समग्र ग्रंथ, रा. द. पराडकर (कर्णपर्व इ. स. १९१२). [२] निर्णयसागर ग्रंथ (कर्णपर्व इ. स. १९०३, काव्यसंग्रह ४९). [३] महाराष्ट्र कविवर्य मोरोपंतकृत स्फुट काव्यें भाग १ (इ. स. १८९६, काव्यसंग्रह २९, वा. दा. ओक), २, ३ (इ. स. १९०४, काव्यसंग्रह, ४४, न. चिं. केळकर), ३, ४ (इ. स. १९०७, काव्यसंग्रह ५९, वा. अ. भिडे). [४] मोरोपंती वेंचे (इ. स. १९२१), ल. रा. पांगारकर.]

**देवनाथ महाराज :** वऱ्हाडांतील सुरजी अंजनगांव हें या संतकवींचें गांव. त्यांची गुरुपरंपरा एकनाथापासून असून शेख सुलतान हे त्यांचे एक गुरुबंधू होते. मराठींत आनंदतनय, वामनपंडित ('अंग वक्र अधरीं धरि पावा')

इत्यादि अनेक कवींनीं मुरलीवर कविता केल्या, त्यांमध्यें देवनाथाची मुरली विशेष सरस झाली आहे. तिच्यावर आनंदतनयांच्या मुरलीची छाया आहे. तसेंच एकनाथी भागवतांतील 'ऐकोनि माझें वेणुगीत' ( भागवत १२।१०८–११३) इत्यादि ओव्या या मुरलीशीं ताडून पाहण्याजोग्या आहेत.

[ संदर्भ : [ १ ] श्री देवनाथमहाराजांची कविता ( इ. स. १९१५ ). [ २ ] म. सा. [ ३ ] देवनाथमहाराज कवितासंग्रह ( इ.स. १८९६ ), निर्णयसागर ( काव्यसंग्रह २१, बा. दा. ओक ). ]

**रामजोशी :** सोलापूरच्या रामजोश्यांची 'दो दिवसांची तनु ही साची', 'सुंदरा मनामधिं भरली', 'बा किती घालसी संसृतिच्या पिंगा', 'नरजन्मामधि नरा करुनि घे' इत्यादि पदें व लावण्या प्रख्यात आहेत. त्यांचा शीघ्रकवित्व हा एक गुण होता. सरदार घोरपडे त्याच्या बिदागीबद्दल विचार करीत बसले तेव्हा

मोजासम कविताप्रिय कर्णासम दानशूर घोरपडे ।
ऐसें असता माझ्या बिदागिचा का तुम्हासि घोर पडे ॥

ही कविता त्यानीं जागच्या जागीं रचली. काशीयात्रेला जाण्याकरिता मदत मागतांना 'वर्षें तीन पुण्यात जो मिरविला तो रामजोशी पहा' असें श्लोकबद्ध पत्रकच त्यांनीं काढलें. मोरोपंताचा व त्याचा दाट परिचय होता. रामजोशी व अनंतफंदी या दोघांनीं त्या वेळच्या दुष्काळाचें विदारक चित्र दाखविलें आहे. रामजोशींनीं दुष्काळातले वस्तूंचे भावहि सांगून टाकले आहेत.

रामजोशींचा जन्मकाल इ. स. १७६२ च्या मागें ४–५ वर्षें असावा.

[ संदर्भ : [ १ ] पे. पो. [ २ ] रामजोशीकृत लावण्या, तिसरी आवृत्ति ( इ. स. १९०८ ) चित्रशाळा, शं. तु. शालिग्राम. ]

**होनाजी बाळ :** 'घनःशाम सुंदरा श्रीधरा' या भूपाळीनें अमर झालेले होनाजी शिलारखाने व त्यांचे साथीदार बाळा करंजकर ही जोडी दुसऱ्या बाजीरावांच्या वेळची. होनाजी तमाशगीर होते तरी ते थोडेफार बहुश्रुत असा·

वेत त्याच्या भूपाळीवर श्रीधराची व मुक्तेश्वराची छाप पडलेली आहे, असें वाटतें. कंगणीदार पगडी डोक्यावर घालणाऱ्या ऐटबाज मराठी शिपाईगड्याचें वर्णन ( लावणी ८४ ), जंगलाचें वर्णन, खडर्यासारखे लढाईचें वर्णन इत्यादि अनेक विषय त्याच्या लावण्यांतून येतात. होनाजींचा दोरटीं खून झाला.

बाळा हा होनाजींचा चुलता व त्यांचा साथी बहिरू रंगारी. या जोडीला बाळा बहिरु म्हणत.

[ संदर्भ : [ १ ] पे. पो. [ २ ] होनाजी बाळा यांच्या लावण्या, तिसरी आवृत्ति ( इ. स. १९२७ ) चित्रशाळा, श. तु. शालिग्राम. ]

**कृष्णकेशव** : याची भूपाळी गोड आहे. परंतु याच्याबद्दल काहीं माहिती नाहीं.

**अनंतफंदी** : 'बिकट वाट वहिवाट नसावी' या फटक्याचे कर्ते अनंतफंदी संगमनेर गावचे व त्यांचे आडनाव घोलप. फंदी त्यांच्या काळातहि मान्यता पावले होते हें होनाजींच्या 'फंदी अनंत कवनाचा सागर अजिंक्य ज्याचा हातखंडा' या कवनावरून दिसतें. त्यांनीं रावबाजींचें कोणालाहि हसू येईल असें केलेलें वर्णन व दुष्काळाचें केलेलें वर्णन वाचल्यावर पेशवाई का बुडाली हें सहज कळतें.

फंदींची व अहिल्याबाईंची गाठ पडली व त्यांच्या उपदेशामुळें फंदींनीं तमाशे करणें सोडून दिलें.

[ संदर्भ : [ १ ] पे. पो. [ २ ] अनंत फंदीकृत कविता अथवा लावण्या, तिसरी आवृत्ति ( इ स. १९०८ ) चित्रशाळा, श. तु. शालिग्राम. ]

**सगनभाऊ** हा मुसलमान शाहीर जेजुरीचा व त्याचें वास्तव्य कोल्हापूरला असे. त्याचा काळ इ. स. १७७८–१८४० असावा. 'भाऊनाना तलवार धरून' या ध्रुवपदाच्या त्याच्या पानिपतच्या पोवाड्यात इतिहास सोडला तर युद्धवर्णन उत्कृष्ट वठलें आहे. हें ध्रुवपद आप्पा यशवंताच्या 'तलवार पुण्यावर धरून । आला मोंगल चढाई करून ॥' या खर्ड्याच्या लढाईवरील

पोवाड्यातील ध्रुवपदासारखें आहे. पानिपतच्या लढाईवर रामा सख्या याचे दोन पोवाडे आहेत. सगनभाऊचा खडकीच्या लढाईवरहि पोवाडा आहे.

[ संदर्भ : [ १ ] सगनभाऊकृत लावण्या व पोवाडे ( इ. स. १९२४ ), जहागिरदार व अधिकारी [ २ ] पे. पो [ ३ ] इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे ( इ. स. १८९१ ), ॲक्वर्थ व शाळिग्राम. ]

**प्रभाकर** प्रभाकर जनार्दन दातार हा कोंकणातील हर्णे मुरूडकडचा. गंगु हैबती हा त्याचा व महादेवाचा गुरु. प्रभाकरानें पेशवाईच्या उत्कर्षाचे शिखर व अस्त दोन्ही पाहिलीं व तीं काव्यात रेखाटलीं. प्रभाकर एक उच्च दर्जाचा कवि आहे. त्याचें खर्ड्याच्या लढाईचें वर्णन लढाईच चित्र डोळ्यासमोर उभें करतें. होनाजींचा रंगाचा पोवाडा आहे व खर्ड्याच्या लढाईवर फर्दाच्यासकट दहा जणाचे पोवाडे आहेत. या सर्वात प्रभाकराची रचना उठून दिसते. रंगाच्या पोवाड्यात तो पेशवाईचें कळसाला पोचलेलें वैभव दाखवितो तर सवाई माधवरावांचा मृत्यू व रावबाजींची शरणागती यात पेशवाईच्या अस्ताचें करुणाजनक दृश्य दिसतें. प्रभाकरानें शृंगारमय लावण्या केल्या पण त्याची नायिका नुसत्या शृंगा रात मग्न होत नाहीं. ती प्रियकराला स्वारीवर कूच करण्यासाठीं उठविते.

[ संदर्भ : [ १ ] प्रभाकरकृत पदें, पोवाडे व लावण्या ( इ. स. १९२० ) चित्रशाळा. [ २ ] पे. पो ]

**परशराम** हा नाशिकजवळील वाणीचे शिंपी. त्या वेळच्या बदलत्या अमदानीचें व इंग्रजाचें चित्र त्याना रेखाटलें आहे. नव्हाइपोर शिपायाची त्यांची लावणी वाचल्यावर आधुनिक काळातील, आपण ऑफिसर आहोत अशा थापा मारणाऱ्या लोकांची आठवण होते.

परशुरामाची ' ऊठ श्याम प्रात काल तुझे गोपाळ आले घननीळा ! अशी भूपाळी आहे, परंतु होनाजींची भूपाळी अधिक सर्वात श्रेष्ठ ठरली.

[ संदर्भ : [ १ ] परशरामकृत लावण्या ( इ. स. १९२४ ), चित्रशाळा. [ २ ] म. सा. ]

**राव यर्वे :** याच्याबद्दल काहीं माहिती नाहीं. प्रस्तुत पोवाडा ता. १४–४–१८५६ च्या ज्ञानप्रकाशात छापला गेला. हा सामान्य प्रतीचा असला तरी तत्कालीन वातावरण दाखविणारा म्हणून तो जरा महत्त्वाचा आहे. नंतर स्वातन्त्र्ययुद्धाची ठिणगी पडलीच. त्या वेळीं साहेबाविरुद्ध लिहिता येत होतें, हें मान विशेष.

द्वितीय खंड समाप्त

## तृतीय खंड

**परशुरामपंत तात्या गोडबोले :** हे रसिक व पंडित इ. स. १८५४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या नवनीत या विख्यात आद्य मराठी काव्यसंग्रहाचे कर्ते. यांचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यातील पावसगोळप व जन्मस्थान वाई. इ. स. १८२९।३१ मध्यें प्रसिद्धीस आलेल्या महाराष्ट्र कोशकारांपैकीं ते एक होते. इ स. १८३१ मधील मोल्सवर्थ कोशालाहि त्यांनीं मदत केली. इ.स. १८४७ पासून मेजर कँडींच्या हाताखालीं ते पुणें पाठशाळेंत होते. वेणीसंहार (इ. स. १८५७), उत्तररामचरित (इ. स. १८५९), शाकुंतल (इ. स. १८६१), मृच्छकटिक (इ. स. १८६२), इत्यादि नाटकें, वृत्तदर्पण (इ. स. १८६०), बालबोधामृत (इ. स. १८७४) व गंगामाहात्म्य (अप्रकाशित) हे काव्यग्रंथ, व अनेक *गद्यग्रंथ त्यांनीं लिहिले.*

नवनीताच्या आरंभीं पहिल्या आवृत्तींत

सच्चेतःकैरवातें विकच करि जगत्ताप संपूर्ण टाळी ।
अज्ञानध्वांत सारें हरि रसिकचकोरासि अत्यंत पाळी ॥
नानावस्तुप्रकाशी कविहृदयपयोराशिसंतोषहेतू ।
काव्येंदू स्वप्रभेनें खळजनहृदया होतसे धूमकेतू ॥

हा श्लोक होता व शेवटीं

काव्यामृताचा नवनीत मेला । हा गोड लागो तुमच्या जिभेला ॥
याची तुम्ही चाखुनि घ्याल गोडी । तरी सुखाची मिळवाल जोडी ॥

आणि

नाना काव्यतरुव्रजीं हुडकिता जीं जीं बरीं भावलीं ।
तीं तीं वेंचुनि घेतलीं सुकुसुमें पात्रांत जीं मावलीं ॥
त्यांची गुंफुनि रम्य माळ विबुधां अत्यादरें अर्पिली ।
ती कंठीं विलसो तिणें कविसभा होवो सदा तर्पिली ॥

हे श्लोक होते.

नवनीताची नुकतीच अठरावी आवृत्ती निघाली.

**यशवंत रामचंद्र प्रधान :** हे रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली या रम्य गावचे रहिवासी. त्यांची नोकरी शिक्षणखात्यात झाली. इंग्रजीचा परिणाम मराठी काव्यावर त्या काळीं होऊं लागला होता. प्रधानांचें दैवसेनी हें काव्य सर वॉल्टर स्कॉट या आंग्ल कवीच्या 'लेडी ऑफ दि लेक' या कवितेवर आधारिलें आहे. दैवसेनी इ. स. १८६७ मध्यें छापून प्रसिद्ध झालें व त्याची द्वितीय व तृतीय आवृत्ति इ. स. १८७७ व इ. स. १९३४ मध्यें निघाली.

**महादेव मोरेश्वर कुंटे :** यांचा जन्म कृष्णाकाठीं माहुली येथे झाला. बी. ए. होऊन ते शिक्षणखात्यांत गेले व कोल्हापूर येथील राजाराम हायस्कूलचे हेडमास्तर, एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें संस्कृतचे प्रोफेसर, अहमदाबाद कॉलेजचे हंगामी प्रिन्सिपॉल इत्यादि जागांवर त्यांनीं काम केलें. कुंटे विद्वान व भाषा कोविद होते. त्यांचें 'राजा शिवाजी' (भाग १–६) हें काव्य इ. स. १८७१ मध्यें छापलें व त्याची द्वितीय आवृत्ति इ. स. १९२४ मध्यें (गो. गो. अधिकारी) निघाली. संस्कृत व इंग्रजी काव्यांचें वर्चस्व सोडणाऱ्या स्वतंत्र व देशभक्तिपर काव्याचें बीज त्यांच्या 'राजा शिवाजी' या काव्यांत दिसतें.

**पांडुरंग व्यंकटेश चिंतामणी-पेठकर :** बी. ए. झाल्यावर हे शिक्षणखात्यांत होते. यांच्या 'गंगावर्णना' या स्वतंत्र धर्तीच्या काव्याला दक्षिणा प्राइझ मिळालें. हें काव्य प्रथम इ. स. १८७४ मध्यें छापलें व त्याची द्वितीय आवृत्ति इ. स. १९२३ मध्यें (वि. ग. ताम्हनकर) निघाली.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर :** सुधारक, निबंधकार, पंडित अशा अनेक नात्यांनीं प्रसिद्ध असलेल्या कृष्णशास्त्रींचा जन्म पुणें येथचा. पुणें पाठशाळेंत व ट्रेनिंग कॉलेजमध्यें ते प्रिन्सिपॉल होते. यांच्या पद्यरत्नावली (इ. स. १८७८) या लहान काव्यग्रंथात मेघदूत, अन्योक्ति, 'विद्येनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजीं' या ओळीनें सुरुवात झालेली विद्याप्रशंसा इत्यादि कविता आहेत. यांचें काव्य संस्कृतप्रचुर पण सोपें असतें. अन्योक्तिमध्यें त्यांचें भाषाप्रभुत्वहि दिसून येतें. त्यांतील 'अत्युच्चीं पदिं थोरहि बिघडतो' ही ओळ

आता म्हण होऊन नसणी आहे 'पूर्वी पाळपणी' या गजान्योक्तीत लहान पणीं वाढविलेला हत्ती मोठा होऊन धुंद झाला व आपल्याला ओळखीत नाहीं, अशा स्थितींत मुनी भीत पण त्याना संतोषहि होई, ही गोष्ट सुरस रीतीनें सांगितली आहे.

कृष्णशास्त्रींच्या शुकान्योक्तिप्रमाणे लक्ष्मणशास्त्री लेले यांची पुढील शुकान्योक्ति पहा–

उडति अखिल पक्षी अंतरिक्षीं भरारा । मधुनि वसति वृक्षीं लक्षिती लोक सारा ॥
नवफलसुमनाचा लाभ होतो तयास । तुजसि मधुर वाणी दे शुका बंदिवास ॥
(पद्यमंजिरी, इ. स. १९०२)

**वासुदेव वामनशास्त्री खरे** : यांचें मूळ गाव गुहागर. हे लोकमान्य टिळकांचे स्नेही होते व केसरी हें नाव त्यानींच सुचविलें. साहित्य सम्राट न. चिं. केळकर त्याना गुरुस्थानीं मानीत. त्यानीं मिरज हायस्कूलमध्यें इ. स. १८८० मध्यें नोकरी धरिली. समुद्र (इ. स. १८८४), यशवंतराव महाकाव्य (इ. स. १८८८), फुटकळ चुटके (इ. स. १८९०), हीं काव्यें, तारामंडळ, कृष्णकांचन, उग्रमंगल, शिवसंभव इत्यादि नाटकें त्यानीं लिहिलीं व मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनांत आयुष्य खर्च केलें. ऐतिहासिक लेखसंग्रहाचे बारा खंड हें त्यांच्या या कार्याचें स्मारक आहे. खरेशास्त्री यांच्या एवढा अवाढव्य माहितीचा माणूस एखाद्या राष्ट्रांत वारंवार उपजत नसतो, असे उद्गार त्यांच्याविषयीं इतिहासाचार्य राजवाडे यानीं काढले. उज्जनीमध्यें मराठी जाणणाऱ्या कांहीं हिंदी लोकांना खरेशास्त्र्यांची उज्जयिनी ही कविता पाठ होती व ती त्यांना आवडे हें पाहून मला फार कौतुक वाटलें. 'साम्राज्य भूजलनिधीवर चालवून', 'या वेळिं कुंकुम ति चर्चुनि भालदेशीं' (यशवंतराव महाकाव्य, सर्ग २ व १६) या कविता व फुटकळ चुटक्यांतील उद्धृत केलेल्या कविता पूर्वी मराठी क्रमिक पुस्तकांत असत.

**विष्णु मोरेश्वर महाजनी** हे विदर्भांतील अकोल्याचे रहिवासी हे शिक्षणखात्यांत अधिकारी होते. यांच्या कुसुमांजली (इ. स. १८९२)

मधील कालमहिमा या कवितेचें उज्जयिनीमधील काहीं श्लोकांशीं साम्य आहे.

**कृष्णाजी केशव दामले (केशवसुत)** आधुनिक मराठी कवितेचे अध्वर्यू केशवसुत. याचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यात मालगुड येथे झाला. वरींच वर्षे पूर्व खानदेशातील भडगाव येथें व नंतर शेवटीं धारवाडच्या सरकारी हायस्कूलमध्यें ते शिक्षक होते. त्या काळीं मराठी कवितेवरील संस्कृत व इंग्रजीचा पगडा कमी झाला, मात्रावृत्तें येऊं लागलीं व देशाभिमान स्पष्टपणें व्यक्त होऊं लागला 'इथें न्यायस्थानीं अनय उघडा स्वैर फिरतो। नरालागीं येथ नरच चरणाहीं तुडवितो॥' अशा प्रकारच्या आजुबाजुच्या सामाजिक विषमतेकडे कवींचें लक्ष जाऊं लागलें. केशवसुतांच्या शपूशां, हरपलें श्रेय, दवाचें येंब, नवा शिपाई, प्रीति, स्फूर्ति, इत्यादि अनेक कविता प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कवितांची तिसरी आवृत्ति इ. स. १९४९ मध्यें (सी. के. दामले) प्रसिद्ध झाली.

'गावीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून' ही कविता 'जलधरमाला' वृत्ताच्या चालीवर आहे.

**दत्तात्रय कोंडो घाटे** यांचें मूळ गाव श्रीगोंदि. रेव्हरंड टिळक व चंद्रशेखर यांच्याशीं दत्ताचा विशेष परिचय होता. अल्प आयुष्यात देखील त्यानीं 'आ नीज गडे' यासारखी कविता करून आपलें नाव चिरस्मरणीय केलें. पारतंत्र्याची जाणीव त्याना बोंचक वाटे, हें 'मित्र विहगा' व 'दिवाळी' इत्यादि कवितांवरून दिसतें. दत्ताची कविता इ. स. १९२२ मध्यें त्याचे चिरंजीव वि. द. घाटे यांनीं प्रसिद्ध केली.

**हरि नारायण आपटे** हे महाराष्ट्राचे आद्य व श्रेष्ठ कादंबरीकार. ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्यांच्या जोडीला यांच्या बहुविध साहित्यात 'सतसखु' हें नाटक, मोलियरच्या प्रहसनाचीं भाषांतरें, अनेक स्फुट गोष्टी व काहीं कविता यांचा समावेश होतो. पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे ते दीर्घकाल

सभासद व काहीं वर्षे अध्यक्ष होते. करमणूक साप्ताहिक त्यानीं जवळ जवळ २८ वर्षे चालविलें व त्यात त्याचें बरेंच साहित्य प्रसिद्ध झालें. 'जीवित-महिमा' ही कविता 'लॉगफेलो' या कवीच्या Psalm of Life या कवितेचें भाषातर आहे, परतु तें भाषातर आहे असें वाटत नाहीं. ही कविता इ. स. १९०६ मधील पाचव्या क्रमिक पुस्तकात आढळते. नतर प्रसिद्ध झालेल्या 'मुलास थोडा उपदेश' (इ. स. १९११) या पुस्तकात ही कविता थोडी निराळी आहे.

**विठ्ठल भगवंत लेंभे**: याचा जन्म तळेगाव दमडेरे येथचा व याची नोकरी रेल्वेंत स्टेशनमास्तरची. त्याचा व रेंदाळकराचा स्नेह होता. लेंभ्याच्या अनेक कविता करमणुकींत आढळतात. याची कविता जुन्या वळणाची आहे. या कवितात सुरतरगिणी, आनदकद, इत्यादि खडकाव्यें आहेत प्रस्तुत उताऱ्यात 'आनदकद' मधील काहीं श्लोक घेतले आहेत. बिल्हणाच्या 'अद्यापि ता कनकचपकदामगौरीम्' या काव्याचें या श्लोकानीं स्मरण होतें. चद्रशेखरानीं 'वाटे आज शरत्प्रभात नटुनी ही येतसे राज्सा' असें लेंभ्याच्या कवितेचें वर्णन केलें आहे. लेंभ्याची कविता श्री. गो. गो. अधिकारी यानीं प्रकाशित केली (इ. स. १९२४).

**विनायक जनार्दन करदीकर**: याचा जन्म धुळे येथचा व याचें मूळ गाव अलिबागजवळील नागाव. त्याची काहीं काळ पोलिसखात्यात नोकरी झाली. विनायकाना राष्ट्रीय कवि म्हणून महत्त्व आहे 'कोण देश कार्यासाठीं। सोडील स्वहितीं पाणी। यापुढें॥' अशी त्याना तळमळ वाटे व राष्ट्राच्या नष्टदशेचें चित्र त्यानीं 'हतभागिनी' कवितत रगविलें. इ. स. १९०८ सालीं प्रो. शिवराम महादेव परांजपे कैदेंतच वारल्याची अफवा उठली, तेव्हा त्यानीं खालील ओळी लिहिल्या—

देवरारास्तम पूज्य मानिती देशभक्त बधनस्थलें।
देशभक्त ज्या चढे सुळावर जयस्तम ते उभारले॥

अंगारा लाविती चितेचा देशभक्त जीवरी जळे ।
देशभक्तयश गाऊन कवी धन्य जाहले भले भले ॥

त्या वेळच्या स्थितींतहि राष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्याबद्दल त्यांना आशा होती व ती त्यांनीं 'महाराष्ट्र लक्ष्मी' या कवितेंत 'रात्र सरे तेव्हा उगवे दिनहि पूर्वेकडे' असे सांगून व्यक्त केली आहे.

विनायकाच्या कवितांची तिसरी आवृत्ति (संपादक द. स. आपटे) इ. स. १९४७ मध्यें चित्रशाळेनें काढली.

**विनायक दामोदर सावरकर:** नाशिकजवळील भगूर येथें जन्मलेल्या भारतातील क्रांतिकारकप्रमुख स्वातंत्र्यवीर सावरकरांचें मराठी कवीं मध्यें स्थान अनन्यसाधारण आहे. 'धन्य शिवाजी तो रणगाजी' यासारखे पोवाडे, कविता व १८५७ चें स्वातंत्र्यसमर, 'मॅझिनी चरित्र' इत्यादि ग्रंथानीं महाराष्ट्राला व देशाला त्यांनीं स्फुरण दिलें. त्याचें इ. स. १९१० च्या सुमाराचें काव्य व इतर वाङ्मय म्हणजे त्यांच्या क्रांतिकारक जीवनाचा भागच होय. त्यांना इ. स. १९१० सालीं काळ्यापाण्याची जी शिक्षा झाली, तिच्यामुळें महाराष्ट्राचें नाव जगभर झालें व रशियन लेखक मॅक्सिम गोर्की यानें या शिक्षेचा निषेध केला (फॉरिन क्रॉनिकल इ. स १९१२). रानफुलें (इ. स. १९२४), गोमांतक (इ. स १९२२ महाराष्ट्रभाट), सप्तर्षी (इ. स १९२४), व सावरकरांची कविता (इ स. १९४३, संपादक वा. गो मायदेव) या पुस्तकात त्यांच्या कविता आहेत त्यांच्या क्रांतिकारक काव्यनिर्मितीचा भर इ स. १९१० च्या आसपास होता व अर्थात् काहीं कवितांवर राज्यसत्तेची वक्रदृष्टीहि वळली 'सागरास' ही कविता त्यांनीं इंग्लंडमध्यें 'ब्राइटन' येथे समुद्रकाठीं रचली. 'माझें मृत्युपत्र' हा लन्डनमधील निवसन जेलमधून भावजयीस पाठविलेला निरोप आहे

'*सावरकर काव्य समालोचन*' (इ स. १९४३) *या ग्रंथात* वा गो मायदेव यांनीं सावरकरांच्या काव्याबद्दल विस्तृत चर्चा केली आहे

**गोविंद त्र्यंबक दरेकर** स्वातंत्र्यशाहीर गोविंद हे सावरकरांचे

सहकारी. हे लहानपणापासून लुळे होते, परंतु त्याचे काव्य मात्र वीररसयुक्त झालें. त्याच्या कांहीं कवितांना जप्तीचा मान मिळाला 'स्वातंत्र्य कोणा मिळालें,' 'कारागृहाचें भय काय त्याला' इत्यादि ओळी, व 'नमनें वाहुनि स्तवनें उधळा' ही सरस्वतीची भूपाळी, 'हें घन स्याम श्रीराम' हें पद, इत्यादि कवनें महाराष्ट्रभर गाजलीं. लोकमान्य टिळकांच्या भूपाळींत

मुक्या मनानें किति उधळावे शब्दांचे बुडबुडे ।
तुझ्यावर शब्दांचे बुडबुडे ॥
तुझे पवाडे गातिल पुढतीं तोफांचे चौघडे ॥

हें त्यांचे भविष्य किती खरें झालें! गोविंदाचें काव्य सामान्य भाषेंत असून 'सुंदर मी होणार' यासारख्या कवितेंत तत्त्वज्ञानदृष्टि आहे.

गोविंदाच्याबरोबर अविनाशचंद्र व कोपरगावकर यांच्या कविता आहेत. गोविंदाच्या कवितांची चवथी आवृत्ति इ. स. १९४७ मध्यें निघाली.

**दत्तात्रय भिमाजी रणदिवे.** या जैन कवीचा जन्म नगर जिल्ह्यात मिरजगावचा. यांनी अनेक कादंबऱ्या, चरित्रें व स्फुटकाव्यें लिहिलीं. त्यांची बरीच कविता 'रणदिवे यांची कविता, भाग १ व २' यांत संग्रहीत आहे ( भाग २ इ. स. १९४९ ).

जैनांचे बाविसावे तीर्थंकर नेमिनाथ ऐन लग्नाचे वेळीं वैराग्य येऊन निघून गेले, तेव्हा त्यांची भावी पत्नी राजीमती हिचे उद्गार प्रस्तुत उताऱ्यांत दिले आहेत.

**नारायण वामन टिळक.** खिस्तजयंती आणि वर्षप्रतिपदा यावर गीतें (इ. स. १९०३), खिस्तायन (इ. स. १९३८), टिळकांची कविता भाग १ व २ (इ. स. १९४०, भाग २ अभंगांजली) या पुस्तकांत टिळकांच्या कविता प्रकाशित झाल्या आहेत इ. स. १८९५ मध्यें ते खिश्चन झाले त्यांच्या कवितेत सोपेपणा, प्रेमळता व करुणरस आढळतो. बालकवींचा व त्यांचा दाट स्नेह होता व 'पाखरा येशिल कां परतून' ही कविता त्यांनीं इ. स. १९१४च्या सुमारास बालकवींना उद्देशून लिहिली असावी. लक्ष्मीबाई या

त्याच्या पत्नी व त्याच्या जीवनाचें चित्रण 'स्मृतिचित्रें' या आत्मचरित्रात आढळतें.

**लक्ष्मीबाई टिळक.** 'स्मृतिचित्रें' हें आत्मचरित्र लिहून लक्ष्मीबाईंनीं मराठी साहित्यात अढळ स्थान मिळविलें. 'भरली घागर' (इ. स. १९५१) हा याच्या कवितांचा संग्रह. लक्ष्मीबाईंची कविता सोपी असून 'वसत' व 'मी तुझी मावशी तुला न्यावया आलें' यासारख्या त्याच्या कविता कोणालाहि गोड वाटतील. 'वसत'सारख्या दुसऱ्या काहीं कविता म्हणजे टेकाडे याची 'बालमूर्ति' व कुमार सजीव याची 'हास हास बाळे आता' या होत.

**एकनाथ पांडुरंग रेंदाळकर:** 'उघडि नयन रम्य उषा' या प्रबोधनकवितेमुळें रेंदाळकर लोकांना माहीत झाले. रेंदाळकराचें काव्य स्वतंत्र धर्तीचे असून त्यानीं निर्यमक काव्यरचनेचेहि प्रयोग केले. 'अजुनि चाल तोचि वाट' या कवितेत त्याच्या मनातील निष्फलतेची भावना दिसते.

रेंदाळकराची कविता वा. ब. कुटे यानीं प्रसिद्ध केली (प्रथम खंड इ. स. १९२४ व द्वितीय खंड इ. स. १९२८).

**चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे.** याचा जन्म नाशिक येथे झाला त्यानीं बडोद्यास नोकरी केली व तिथेच ते राजकवि होते. धाऱ्याचा व त्याचा स्नेह होता. आपल्या जन्मस्थानच्या स्मृतीचें चित्र त्यानीं 'गोदागौरव' या कवितेत रेखाटलें आहे. चंद्रशेखराच्या कवितांचा काळ इ. स. १८९४ पासून इ. स. १९३१ पर्यंत आहे, पण त्याची कविता जुन्या वळणाची असून प्रौढ व गंभीर आहे. प्रस्तुत दोन उताऱ्यांपैकीं पहिल्या उताऱ्यात मूळ कवितेंतील काहीं श्लोक घेतले आहेत. या दोन कविता इ. स. १९०८ व १९२८ च्या सुमाराच्या दिसतात. त्याच्या कवितांचा 'चंद्रिका' हा संग्रह इ. स. १९३२ मध्यें प्रसिद्ध झाला.

**राम गणेश गडकरी (गोविंदाग्रज)** : हे महाराष्ट्रातील विख्यात नाटककार व कवि. याचा जन्म नवसरी येथचा वेड्याचा बाजार, प्रेमसन्यास, पुण्यप्रभाव, एकच प्याला, भावबंधन, राजसन्यास हीं नाटकें, कविता (वाग्वैजयंती तिसरी, आवृत्ति इ. स. १९२९), विनोदी लेख (संपूर्ण बाळकराम) लिहून त्यांनीं मराठींत मोठें मानाचें स्थान मिळविलें. त्याच्या साहित्यावर पुष्कळसें टीकात्मक वाङ्मय निर्माण झालें. त्याचीं नाटकें आताहि लोकप्रिय आहेत.

'राजहंस माझा निजला' ही कविता महाराष्ट्रभर गाजली. त्यांचें 'महाराष्ट्र गीत' हेंहि एक सरस काव्य आहे असेच कोल्हटकरांचें 'बहु असोत सुंदर संपन्न' हें महाराष्ट्रगीत आहे 'पानपतचा फटका' याबरोबरी शाहिरी कविता अगाई गीतें, इत्यादि अनेक कविता वाग्वैजयंतींत आहेत.

**त्र्यंबक बापूजी ठोमरे (बालकवि)** याचा जन्म खानदेशात धरणगाव येथें झाला. इ. स. १९०७ मध्यें जळगावच्या कविसंमेलनात त्याचा बालकवि म्हणून सन्मान झाला. ना. वा. टिळकाचा दीर्घ सहवास त्याना लाभला. बालकवींच्या कवितेंत सृष्टिवर्णन विशेष आढळून येतें व त्याची रचना सहज सुंदर आहे मादली स्टेशनावर आगगाडीखालीं सापडून त्याना अपमृत्यू आला.

**श्रीधर बाळकृष्ण रानडे :** हे मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यात प्राध्यापक होते. रविकिरणमंडळापैकी हे एक असून काळाच्या दाढेंतून (इ. स. १९१४) व श्री मनोरमा (इ. स. १९३९) हे याचे दोन काव्यग्रंथ आहेत. 'माधुकरी' ही कविता 'श्री मनोरमा' या संग्रहात आहे.

**कृष्णाजी रामचंद्र परांजपे** : हे सध्या बेळगाव येथें प्राध्यापक आहेत थोड्या कविता लिहिणारा कवि एखादी चांगली कविता लिहू शकतो, याचें उदाहरण म्हणून प्रस्तुत कवितेचा निर्देश करता येईल या शिवाई गीता सारख्या 'पाच देवींचा पाळणा' व 'वीरमरणाला शोभण्याजोगें गाणें' या दोन गोविंदाग्रजाच्या कविता आहेत

**दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी :** हे मूळचे कान्यकुब्ज हिंदी ब्राह्मण. हे खानदेशात स्थायिक झाले. काव्यकुसुमांजली (इ स. १९१६), काव्यरत्नमाला (इ. स. १९२०), मनोहरलीला (इ स. १९२०), प्रसन्नराधा (इ. स. १९२०), मराठ्याचें संग्रामगीत (प्रथम आवृत्ति इ स १९२२, आठवी आवृत्ति इ स. १९५४), काव्यतुषार (इ. स. १९२३), अभंग माला (इ. स. १९२५), झाशीची संग्रामदेवता (इ. स. १९२५, पाचवी आवृत्ति इ. स. १९५७), राधामाधव (इ. स. १९२८), मान्याची यमुना (इ. स. १९२६), महाराणा प्रतापसिंह (इ. स. १९२६), चंडीशतक (इ. स. १९२७), कुमुद्वती (इ. स. १९२७), कवितावनिता (इ. स. १९२७), इत्यादि त्याच्या अनेक काव्यग्रंथात मराठ्याचीं संग्रामगीतें व झाशीची संग्रामदेवता हे विशेष प्रसिद्ध आहेत. या काव्यात त्याचा महाराष्ट्राबद्दलचा अभिमान दिसून येतो इब्राहिमखान गारदीबद्दलची त्याची कविता मराठींतील एक उत्कृष्ट कविता आहे

तिवारींच्या कांहीं अप्रकाशित कविता प्रकाशकाभावीं पडून असल्याचें समजतें. मग इतराची काय कथा!

**श्रीनिवास रामचंद्र बोबडे** : या विदर्भातील कवींचा जन्म धारा

येथचा. त्याचा व्यवसाय वकिलीचा. 'वागीश्वरी' या उच्च दर्जाच्या मासिकाच्या संपादकवर्गात हे होते. याची कविता सोपी, अर्थपूर्ण व प्रासादिक आहे व ऋतुवर्णनासारख्या कवितेंत संस्कृतप्रचुर भारदस्तपणाहि आहे. त्याच्या प्रबोधन कवितेसारख्या रेंदाळकर, तावे (अजुनि लागलेंचि दार) याच्याहि कविता आहेत बोवडे हे खरोखरी मराठीमधील उच्च दर्जाच्या कवींपैकीं एक आहेत. परतु त्याचें स्थान त्याना दिलें गेलें नाहीं व याला त्याची प्रसिद्धिपराङ्मुखता बहुधा कारणीभूत झाली असावी बोवडयाच्या कविता साधारण इ स. १९१५ २० या काळातील आहेत, व त्या 'बोवडे याची कविता' (इ. स. १९३७) या सग्रहात प्रकाशित झाल्या.

**नारायण केशव बेहेरे.** हे नागपूरकडचे कवि. त्याच्या कविता साधारण इ. स. १९१०–३० या काळातील असून त्या 'मोत्याची माळ' (इ स. १९३०) या संग्रहात आहेत. हे विदर्भात शिक्षणखात्यात नोकरींत होते, परतु सोलापूरचे मल्लाप्पा धनशेटी, सारडा, शिंदे व कुर्बान हुसेन, आणि लाहोरचे भगतसिंह, सुखदेव व राजगुरु या हुतात्म्यावर त्यानीं 'जगीं कुबेर कीं धनशेट' ही 'सप्तर्षि' नावाची कविता लिहिली त्यामुळें व त्याच्या स्वातंत्र्ययुद्धावरील पुस्तकामुळें सरकारची त्यावर अवकृपा होऊन त्याना नोकरींतून काढून टाकण्यात आलें.

**आनंद कृष्णाजी टेकाडे** हे नागपूरचे कवि. त्याची 'हा हिंद देश माझा' ही कविता स्वातत्र्यपूर्वकाळात सर्वतोमुखीं होती त्यानीं स्वतत्र भारताचें स्वप्न डोळ्यानीं प्रत्यक्ष पाहिलें याच्या कविता 'आनदगीत' (भाग १ इ. स १९२०, भाग २ इ. स. १९२४, भाग ३, इ स. १९२८ व भाग ४ अप्रकाशित) या सग्रहात आहेत.

'हा हिंद देश माझा' या कवितेला उद्देशून मायदेवानीं एक कविता लिहिली आहे.

**माधव केशव काटदरे** माधव कोंकणचे रहिवासी व त्याची

नोकरी मुनर्दित कस्टम खात्यात झाली. माधवाची कविता (इ. स. १९३५) व गीतमाधव (इ. स. १९४२) या ग्रथात त्याच्या कविता सग्रहीत झाल्या आहेत. 'जिवनादादा नक्षी', 'पानपतचा सूड', 'तारापूरचा रणसग्राम' यासारख्या शाहिरी कविता, 'हिरवें तळकोंकण' यासारखी निसर्गवर्णनपर कविता, 'सत तुकाराम' ग्रोट वुडाल्याच्या प्रसगावरील कविता, अशा अनेकविध कविता त्यानीं सफाईनें लिहिल्या. शाहिरी व ऐतिहासिक कवितात ते जुन्या व अन्य भाषेतील शब्दाचा कौशल्यानें उपयोग करतात हें 'मस्तानी' सारख्या कविते वरून दिसतें. 'नको जाऊ बाहेर आज बाळा' हं टागोराच्या 'The Rainy Day' या कवितेचें रुपातर आहे 'मस्तानी' व 'घेरिया' या दोन्ही कवितातील उतारे या सग्रहात घेतले असून 'घेरिया'तील उतारा त्या कवितेच्या सुरुवातीचा आहे. माधव मराठीमधील एक श्रेष्ठ कवि, परतु ते अत्यत मितस्त व प्रसिद्धिपराङ्मुख होते.

**जयकृष्ण केशव उपाध्ये :** याचा जन्म नागपूरचा. हे जुन्या पिढीतील कवि, परतु याच्या कविता साधारण इ. स. १९२५ ३५ या काळा तील आहेत. पची (इ. स. १९२९) या सग्रहात त्याच्या काहीं कविता असून 'रुबाया' वागीश्वरीमध्यें (वर्ष ३) आली आहे. राजा बढे यानीं त्याच्या काहीं कविता सग्रहीत करून ठेवल्या आहेत. उपाध्ये वागीश्वरीच्या सपादक मडळात होते.

**गुणवंत हणमंत देशपांडे.** 'सुखद सभ्रम' व 'नवल' या कवितातील 'कोमना मानू चद्रमा' 'नवल काय जाहलें' या ओळींनीं परि चित झालेले हे कवि यवतमाळ जिल्ह्यात वारखेड येथें राहतात. त्याच्या कवि ताचा 'निवेदन' (इ. स १९३५) हा सग्रह असून कविता साधारण इ स. १९२०–३५ या काळातील आहेत.

***यशवंत हणमंत पळशीकर :*** *हे खानदेशातील कवि व याचें* हल्लीं वास्तव्य जळगाव येथें आहे. कादंबिनी (इ. स. १९३६) या त्याच्या

कवितासंग्रहातून प्रस्तुत कविता घेतली असून ती प्रथम मनोरंजनात (इ. स. १९२४ ) आली व मुळात ती थोडी निराळी आहे.

**आत्माराम रावजी देशपांडे :** हे नागपूरकडील कवि मध्यप्रदेशात अधिकारी होते व सध्या दिल्ली येथें भारतसरकारकडे आहेत. 'फुल्वात' (इ. स. १९३२ ), भग्नमूर्ति (इ. स. १९४० ) निर्वासित चिनी मुलास (इ. स १९४३ ), पेर्तेव्हा (इ. स. १९४७ ), हे त्याचे काव्यग्रंथ 'साय तारा' व 'घरी' या कवितेंतील 'गगनि उगवला सायतारा' व 'जाहल्या तिन्ही साजा' या ओळी ध्वनिमुद्रणींने प्रसिद्धि पावल्या. मुक्तछंद वापरणारा पैकीं हे एक होते. 'पहिला पाऊस' ही कविता इ स. १९३८ च्या सुमा राची आहे

•

**वामन मंगेश दुभाषी (ऋग्वेदी)** : आर्यांच्या सणाचा इतिहास या ग्रंथाचे लेखक. टागोरांची गीतांजली यानीं 'अभंग गीतांजली' (इ. स. १९२८ ) या रूपांतरित स्वरूपात सादर केली आहे. तुकारामाच्या नंतर अभंग या वृत्तावर प्रभुत्व फार थोड्यांना साध्य झालें. तें प्रभुत्व ऋग्वेदींनीं साध्य केलेलें या काव्यावरून दिसेल.

**गोविंद रामचंद्र हिंगणेकर** : याचा जन्म कऱ्हाड येथचा. पुणें येथील दैनिक ज्ञानप्रकाशाच्या संपादकमंडळात हे होते त्याची 'दख्खनचा वीर' (इ. स. १९२१ ), पावनखिंड (इ. स. १९२७ ) इत्यादि काव्यें आहेत.

**हरिहर गुरुनाथ सलगरकर (कुंजविहारी)**–हे सोलापूरचे राष्ट्रीय कवि. राष्ट्रीय चळवळींत तुरुंगवासहि भोगला. त्याच्या कवितांचा 'गीतगुंजारव' (इ. स. १९२६ ) हा संग्रह आहे. चौरीचुरा प्रकरणांतील एका आरोपीचे उद्गार प्रस्तुत कवितेंत घातले आहेत. कुंजविहारींची राष्ट्रीय भावना पुढील ओळींत दिसते. :

जेथें रानफुलासमान फुलती स्वातंत्र्यवीराग्रणी ।
जेथें प्राण तृणासमान गणिती सद्धर्मसंरक्षणीं ॥
सत्याचा अभिमान वागवि सदा पाषाणही जेथला ।
माते मी लववून मान मुजरा प्रेमें तुला वाहिला ॥
('वंदे मातरम्' कविता)

**गोपाळ गंगाधर पोतदार (मनोहर)** : मनोहरांनीं 'काव्य-कौमुदी' या अनेक कवितांच्या संग्रहाचें (इ. स. १९२४) संपादन केलें व त्यांचा 'भाव भेट' हा संग्रह (इ. स. १९३२) आहे. याशिवाय खंडकाव्यें, कादंबऱ्या, नाटकें त्यांनीं लिहिलीं असून त्यांनीं लिहिलेलें १ लक्ष ओळींचें अभंग-रामायण सध्यां पुणें येथील ज्योतिषप्रभा या साप्ताहिकांत प्रसिद्ध होत आहे. काशीला त्यांनीं बरींच वर्षे वास केला व सध्यां त्यांचें वास्तव्य पुणें येथें आहे.

**विष्णु सदाशिव खांडेकर** : हे मराठींतील प्रसिद्ध कथालेखक, कादंबरीकार व टीकालेखक आहेत. शिरोडें येथें त्यांनीं शाळा चालविली व सध्यां त्यांचें वास्तव्य कोल्हापूर येथें आहे. खाडेकरांच्या कविता अगदीं थोड्या असून त्या बहुतेक 'वनभोजन'मध्यें आहेत. 'काळरात्र' या कवितेंतील वर्णनाचें तांब्यांच्या 'सत्प्रीतिमार्ग' या कवितेंतील (' कडकड कडकड तडित् कडकडे जळतें नभ कां तरी') वर्णनाशीं साम्य आहे.

**खंडेराव भीमराव कुलकर्णी** : यांच्या मोगराच्या या खंडकाव्यांत (इ. स. १९२९) श्रावणींच्या वर्णनांची आठवण करून देणारे भाग आहेत. प्रस्तुत उताऱ्यासारखें श्रावण महिन्याचें वर्णन बाल्कवि, बोरकर (श्रावण-दर्शन) यांनीं केलें आहे. यांचा जन्म खानदेशांतील चोपडे तालुक्यांत चहार्डी येथचा. सध्या ते इंदूर येथें पाणीपुरवठा व ड्रेनेज खात्यात आहेत.

**वासुदेव गोविंद मायदेव** : हे हिंगणें येथील कर्वे विद्यापीठाचे

आजीव सभासद व प्राध्यापक सध्या याचें वास्तव्य मुबईंत आहे. काव्यमकरद (इ. स. १९२३), भावतरग (इ. स. १९२९), भावनिर्झर (इ. स. १९३८), सुधा (इ. स. १९४०, खडकाव्य), भावविहार (इ. स. १९४९) गरिबाची गोष्ट, हे त्याचे काव्यग्रथ प्रकाशित आहेत. ताबे व सावरकर याच्या कवितार्चे संपादन त्यानीं केलें.

**गजानन लक्ष्मण ठोकळ** : ठोकळानीं 'सुगी' (इ. स. १९३३) हा अनेक कवींचा कवितासग्रह तयार केला व त्याचा स्वतःचा काव्यसग्रह मीठभाकर (इ. स. १९३८) हा आहे. या दोन्ही पुस्तकात ग्रामीण जीवनावर भर आहे. हे सध्या पुण्यात असतात.

**माधव त्र्यंबक पटवर्धन (माधव जुलियन्)** : याचा जन्म बडोदें येथचा. हे पुण्याच्या रविकिरण मडळात होते. त्यानीं निरनिराळ्या कॉलेजात प्राध्यापकाचें काम केलें. 'छदोरचना' या ग्रथाबद्दल त्याना मुबई विश्व विद्यालयाची D Litt. ही पदवी मिळाली. विरहतरग (इ. स. १९२६), सुधारक (इ. स. १९२८), गजलाजली (इ. स. १९३३), स्वप्नरजन (इ. स. १९३४), नकुलालकार व इतर कविता (इ. स. १९३९), मधुलहरी (इ. स. १९४०), हे त्याचे काव्यग्रथ आहेत. त्यानीं फारसी भाषेवर प्रभुत्व मिळविलें व अनेक फारशी वृत्ते मराठींत आणलीं. कवितेला विशिष्ट साच्यात बसविण्याच्या यत्नामुळें कवितेंत थोडासा कृत्रिमपणा निर्माण होणें मात्र अटळ असतें. 'सगमोत्सुक डोह' व 'प्रेम कीं हेम' या कविता (एकत्र 'गुफुनी जीवित धागे' व 'प्रेम कोणीहि करीना' इत्यादि) ध्वनिमुद्रणानें प्रसिद्ध झाल्या.

**यशवंत दिनकर पेंढारकर (यशवंत)** : 'आई' या कवितेनें यशवत विख्यात झाले. या कवितेनें लोकाना रडू येत असे. माझा प्रिय मित्र (इ. १९१९), यशवती (इ. स. १९२१), वीणाझकार (इ स १९२२), यशोधन (इ. स. १९२९), भावमथन (इ. स १९३०), जयमगल (इ. स. १९३०), बदिशाळा (इ. १९३२), काव्यकिरीट, यशो

गध, यशोनिधी (इ. स. १९४१), यशोगिरी (इ. स. १९४४), ओजस्विनी (इ. स. १९४६), पाणपोई (इ. स. १९५१), वाकळ (इ स. १९५६) इत्यादि त्याचे काव्यग्रंथ आहेत. 'आई' ही कविता 'पाणपोई' मधून घेतली असून 'वीणाझंकार' मध्यें ती जरा निराळी आहे. 'ताम्हनाचे निनाद' ही कविता लोकमान्य टिळकाच्या जन्मशताब्दिनिमित्त केलेली असून ती तारीख २१ ७ ५६ च्या केसरींत आली आहे.

**प्रल्हाद केशव अत्रे (केशवकुमार):** हे मूळचे शिक्षक. 'झेंडूचीं फुलें' या विडंबनात्मक कविता लिहून यानीं सर्व महाराष्ट्राला हसविलें. विनोदी लेखक व नाटककार, पत्रकार, चित्रपटनिर्माते, कवि, इत्यादि बहुरंगी कर्तृत्वानें हे सर्व महाराष्ट्राला माहीत आहेत. त्याच्या कविताहि सामान्य दर्जाच्या नाहींत. 'कावरखा' कवितेंत पठाणाचें चित्र हुबेहुब रंगविलें आहे. 'प्रेमाचें ऐक्य' (गीतगंगा इ. स. १९३५) या कवितेची शैली गोविंदाग्रजाच्या 'एखाद्याचें नशीब' या कवितेसारखी आहे.

**सोपानदेव चौधरी:** यानें वास्तव्य नाशिक येथें आहे. काव्यगाय-नामुळें हे व याच्या कविता लोकाना विशेष माहीत झाल्या. काव्यकेतकी (इ. स. १९३२) व अनुपमा (इ. स. १९५०) ही त्याच्या कवितांचीं दोन पुस्तकें प्रकाशित आहेत.

**गोपिनाथ गणेश तळवलकर:** आनंद मासिकाचे अनेक वर्षे हे संपादक होते. त्याच्या काहीं कवितांचा दूर्वांकुर (इ. स. १९२७) हा संग्रह असून 'रानपाखरास', 'भय्याजी' इत्यादि स्फुट कविता आहेत. भय्याजींची मूर्ति डोळ्यांसमोर उभी राहील असें चित्र त्यानीं या कवितेंत रेखाटलें आहे. सध्या हे पुणें येथें रेडिओ केंद्रात आहेत.

**दामोदर अच्युत कारे:** हे गोमंतकीय कवि 'हिंदु' या वृत्तपत्राचे सहसंपादक होते. सध्या त्याचें वास्तव्य मडगाव येथें. त्याच्या कविता 'नंदादीप' (इ. स. १९३४) या संग्रहात आहेत.

प्रस्तुत वर्णनाप्रमाणें ब. ह. पळशीकरांचें प्रातःकलचें वर्णन आहे–

हातीं झेलित सूर्यबिंब गगनीं येतां उषासुंदरी।
तेजस्वी हिममौक्तिकें विखुरलीं पानाफुलांच्यावरी॥
(कादंबिनी--हृद्गत कविता)

**के. ना. काळे :** हे एक प्रसिद्ध साहित्यसमीक्षक, नाट्यदिग्दर्शक व चित्रपटदिग्दर्शक असून याचा 'सहकारमंजिरी' (इ. स. १९३२) हा काव्यसंग्रहहि आहे. याची 'निर्हेतुक प्रेम' ही कविता टागोराच्या कवितेचा अनुवाद असून 'अमरपंथाचा यात्रेकरु' ही गुर्जर कवि न्हाणालाल दलपतराम यांच्या कवितेचा अनुवाद आहे.

**विनायक लक्ष्मण बर्वे (आनंद) :** याचा जन्म सोनगांवचा व हे चिपळूण येथें वकील होते. नाटकें, लघुनिबंध, कविता, इत्यादि अनेक तऱ्हेनें त्यांनीं वाङ्मयसेवा केली. त्यांच्या कविता अजून संग्रहरूपानें प्रकाशित झाल्या नाहींत. त्यांनीं Gray's Elegy चें भाषांतर केलें आहे (पारिजात इ. स. १९३४). आनंदाच्या कवितांत कोकणातलें चित्र उमटलें आहे.

**गणेश हरी पाटील :** हे इल्लीं पुणें येथें ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल आहेत. याचा कवितासंग्रह रानजाई (इ. स. १९३४) हा आहे. 'पाटील' ही कविता त्यांनीं इ. स. १९२५ च्या सुमारास लिहिली. ही कविता लिहिताना आपल्या चुलत्याचेंच चित्र त्याच्या डोळ्यांसमोर होतें. पुणें जिल्ह्यातील खेडजवळील घाटांत महादेवाचें देऊळ आहे व जवळच्या गांवात खंडोबाची जत्रा चैत्र पौर्णिमेला भरते. पूर्वी या घाटांत, विशेषतः जत्रेच्या वेळीं, रामोशांकडून लूटमार होई. तें वातावरण लहानपणीं त्यांनीं पाहिलें होतें व त्यावरून त्यांनीं लुटारूंचें गाणें ही कविता लिहिली.

**बाळकृष्ण मार्तंड दाभाडे :** यांचा जन्म औंधचा व ते सध्यां ग्वाल्हेर येथें प्राध्यापक आहेत. त्यांनीं अनेक प्रबंध लिहिले व गद्य आणि

आणि पत्रसंग्रहांचें काम केलें. त्यांच्या कविता 'मालती' (इ. स. १९३३) या पुस्तकांत प्रकाशित झाल्या.

**दत्तप्रसन्न कारखानीस :** हे मुंबईत शिक्षक आहेत. यांच्या कविता 'क्षितिजावर' (इ. स. १९३५) या पुस्तकांत आहेत. या पुस्तकांतील 'बंदिवान पोपट' ही कविता नेहमीं आढळणाऱ्या कवितांपेक्षा निराळी आहे. तींत

गिरिगव्हरिं हिंडतां व्याधशर अवचित बसतां उरीं ।
स्वातंत्र्याच्या तरल कल्पना विरतिल वाऱ्यावरी ।।

हें कटु सत्य त्यांनीं सांगून टाकलें आहे.

**रामचंद्र अनंत काळेले :** हे इंदूरकडील कवि पोलिसखात्यांत अधिकारी आहेत. वाग्वसंत (इ. स. १९३४), ओळखीचे सूर (इ. स. १९४१), भावपूर्णा (इ. स. १९४३) व हिमअंगार हे त्यांचे काव्यग्रंथ आहेत.

**व्यंकटेश शंकर वकील :** यांचें गाव वर्ध्याजवळ भिवापूर. यांच्या कविता वागीश्वरी मासिकांत प्रकाशित झाल्या. अजून त्यांचा संग्रह प्रसिद्ध केलेला नाहीं. 'संजीवन' व 'वरदान' या दोन्हीं कविता इ. स. १९३०–३१ मधील राष्ट्रीय आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर आहेत. त्या राष्ट्रीय चळवळींत भाग घेतल्याबद्दल शिक्षा होऊन वकील खांडवा जेलमध्यें असतांना त्यांना भिंतीवर 'दोस्तो हमें भूल न जाना' हें वाक्य लिहिलेलें आढळलें. चौकशीनंतर जसवंतसिंग नांवाच्या (खुनाच्या खटल्यांतील) राजबंदीला फांशीं दिल्याची हकीकत तुरुंगातील लोकांनीं सांगितली व त्यानें तें वाक्य लिहिल्याचें सांगितलें. तेव्हां तुरुंगांतच वकिलांनीं 'संजीवन' कविता लिहिली व ती बाहेर जाऊन 'वागीश्वरी'मध्यें प्रसिद्ध झाली. तुरुंगांतून सुटल्यावर या कवितेबद्दल त्यांचेवर फिरून खटला झाला व त्यांना परत तुरुंगवास भोगावा लागला. या खटल्याच्या वेळीं 'वरदान' ही कविता बचावातर्फे मांडण्यांत आली. छिंदवाडा विभागांतील एका भिल्लावर वाघानें जंगलांत हल्ला केला, तेव्हां एका शिकारी युरोपियन

कलेक्टरनें वेडरपणानें मध्यें उडी घातली. त्या झुंजींत वाघ व शिकारी दोघेहि मरण पावले व भिल्ल मात्र बचावला. ही हकीकत 'वरदान' या कवितेंत आहे. या दोन्ही कविता महत्त्वाच्या व उच्च दर्जाच्या आहेत.

मुक्तछंद हा ग्परोखरी वक्लिनीं सुरू केला. 'यक्षकन्या' ही कविता वागीश्वरीमध्यें येण्यापूर्वी मॉरिस कॉलेजच्या मासिकांत आली होती. 'मेघाचें आयुष्य' व यक्षकन्या' या कवितांतील कांहीं भाग प्रस्तुत उताऱ्यात घेतला आहे.

**दत्तात्रय दामोदर पेंडसे**: यांचा जन्म तळघर, तालुका चिपळूण, येथचा व घर जजिरा मुरुड येथें. हल्लीं ते अलिबाग येथें शिक्षक आहेत. यांच्या कविता साधारण इ. स. १९२६–३८ या काळातील असून 'जीवनप्रभा' (इ. स. १९३९) हा त्यांचा काव्यसंग्रह प्रकाशित आहे.

**द.कृ.पेठे**: हे हल्लीं लष्करी हिशोबाच्या खात्यात आहेत. यांचे 'गवत आणि कुसळें' (इ. स. १९४३) व 'अणुरेणु' हे दोन काव्य संग्रह प्रकाशित झाले. पेठ्यांचें अंगाईगीत, व 'विजयश्रीचें स्वयंवर', 'लोहाराचा पोर' यासारख्या कवितांतील वर्णन यावरून पेठे हे एक चांगल्यापैकीं कवि आहेत हें दिसून येईल.

**राजाराम नीलकंठ बढे**: चित्रपटांतील व रेडिओवरील गाणीं, कविता करणारे राजा बढे हल्लीं रेडिओच्या मुंबई केंद्रांत आहेत. राजा भाऊंच्या कवितेंत प्रसाद व देशाभिमान प्रामुख्यानें दिसतात. त्यांनी मेघदूताचें सुरस भाषांतर केलें आहे (लोकमित्र, दिवाळी अंक, इ. स. १९५६). मारवाडवासिनी ही कविता इ. स. १९३२ च्या सुमाराची असून ती उप हासिनी (इ. स. १९३६) या विडंबन कवितासंग्रहांत आली आहे. 'रहर' ही राजरदींच्याबद्दलची कविता इ. स. १९३५ च्या सुमाराची असून ती त्यांच्या क्रांतिमाला (इ. स. १९५३) या संग्रहांत आली. 'मुचकुंदाची झोंप' ही कविता त्याच सुमाराची आहे. करवदीमार्गें (माझिया माहेरा जा इ. स.

१९५१ ) ही कविता साधारण इ. स. १९४० च्या काळातली आहे व 'साज वेळ ' ही कविता इ. स. १९४०-४१ च्या आसपासची आहे. साजवेळ या कवितेंत प्राचीन काळचें चित्र आहे

**वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)** : हे इ. स. १९३०-४७ या काळातील अग्रेसर कवि आहेत. त्यांनीं ' पाचोळा ' या कवितेंत दलितवर्गाचें भेदक चित्र दाखविलें आहे. शिवाजीमहाराजाचे सेनापति प्रतापराव गुजर यांनी माघार घेतल्यामुळ महाराजांनीं त्यांची निर्भर्त्सना केली. तेव्हा चिडून त्यांनीं रक्त ची आहुती दिली, त्या प्रसगावर 'सात' ही कविता आहे. ' गर्जा ज्यजयकार ' ही विख्यात कविता इ स. १९४२ पूर्वीच्या वातावरणाच्या पार्श्वभूमीवर आहे. अनामिकास ही कविता स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रसगावर असून निरोप ही त्याच वेळच्या देश दुभगताना ज्या घडामोडी झाल्या त्याबद्दल आहे. एका निर्वासित स्त्रीनें आपलें मूल कसे तरी जगावें म्हणून विमानातच टाकून दिलें या करुणाजनक प्रसगावर निरोप ही कविता आहे कुसुमाग्रजाचीं विशाखा ( इ. स. १९४२), जीवन-लहरी (इ. स. १८४८), समिधा, व किनारा (इ. स. १९५२ ) हीं काव्याचीं पुस्तकें प्रकाशित आहेत. त्यांनीं मेघदूताचें रसपूर्ण भाषातर केलें आहे, ( मौज, दिवाळी अक, इ स. १९४९).

कुसुमाग्रज हल्लीं नाशिक येथें असतात.

**डॉ. शंकरलाल जानकीलाल पुरवार (कृष्णमित्र)** : हे मूळचे हिंदी गृहस्थ औरगाबाद येथें डॉक्टर आहेत. त्यांची विराग्मानव (इ स. १९४३ ), भावपुष्पाजली व अश्रुयज्ञ (इ स. १९५५) हीं पुस्तकें प्रकाशित आहेत.

**श्रीकृष्ण पोवळे** : हे मुबईत 'अलका' हें नियतकालिक चालवतात. त्याचे अग्निपराग (इ. स. १९४६ ) व सुगधमार्ती (इ. स. १९४९ ) हे काव्यग्रथ प्रकाशित आहेत.

**श्री ना. शिंदगी** हे सांगली येथें शिक्षक आहेत. यांची 'हमाल' कविता इ. स. १९४७ च्या काळातली असून ती प्रथम 'लुकलुक' (इ. स. १९५२) या अनेक कवींच्या कवितासंग्रहात आली

**मधुकर केशव नाईक** डॉ नाईक सध्या धारवाड येथें कॉलेज मध्यें प्राध्यापक आहेत. इ. स. १९४७ मधील उत्पातात पंजाबात एका ठिकाणीं ७३ स्त्रियांनीं बलात्कार टाळण्यासाठीं सामुदायिक आत्महत्या केली त्या प्रसंगावर प्रस्तुत कविता आहे. नाईकांचा जीवनवेणु (इ. स. १९५४) हा कवितासंग्रह आहे.

**वसंत दामोदर सबनीस** यांचा जन्म सोलापूर येथचा हे हल्लीं मुंबई राज्यात प्रसिद्धीखात्यात आहेत. 'भारत माझा स्वतंत्र झाला' (लोकशक्ति ता १५-८-१९४७) ही कविता इ. स १९४७ मध्यें विशेष प्रसिद्धी पावली.

**गो म कुलकर्णी** हे विजापूर येथें प्राध्यापक आहेत प्रस्तुत कविता विजयनगरच्या गतवैभवावर असून ती त्यांच्या 'प्राची' (इ. स १९५४) या संग्रहात आहे

**द. वि. तेंडुलकर (प्रफुल्लदत्त)**. प्रफुल्लदत्त मुंबईत शिक्षक आहेत व 'सिद्धार्थ' मासिक चालवितात सप्तपदी (इ. स १९४३), सुभाषिणी (इ. स. १९४६), ताज, लागलहरी (१९५०) हे त्यांचे काव्यग्रंथ आहेत प्रस्तुत उताऱ्यातील शेवटल्या दोन कविता अप्रकाशित कवितापैकीं आहेत

शततारका (इ स १९३८, म आ तेंडोलकर) या दुसऱ्या एका कवीच्या कवितासंग्रहात यांच्या ५ ओळींच्या कणिका आहेत

***अनंत जयवंत जगताप (जयवंतकुमार)*** यांचा जन्म हातनूर येथचा व हे मराठवाड्यात शिक्षणखात्यात आहेत. त्यांची प्रस्तुत कविता

तापीतीर ( इ स. १९५४ ) या खानदेशी कवींच्या कवितासंग्रहात आहे अशीच एक कविता ( माझ्या घरीं देवता तू ) अर्घ्यदान (इ स. १९५५, स. ना दिक्षित ) या एका संग्रहात आहे.

**प्रभाकर गुमास्ते** हे सध्या मुंबईत शिक्षक आहेत. पुण्याला दारिद्र्यानें पीडित अशा एका सबंध कुटुंबानें नदींत आत्महत्या केली. त्याच्या नदीकाठीं पडलेल्या देहाचे भयानक दृश्य पाहून कवीनें प्रस्तुत कविता लिहिली. समाजातील दलित वर्गाची स्थिति प्रभावी रीतीनें मांडणाऱ्या सबनीसाची ' पाटीवाली, ' शिंदगी याची 'हमाल', व गुमास्त्याची प्रस्तुत कविता यांच्यासारख्या कविता अजून फार थोड्या आहेत.

तृतीय खंड समाप्त

# शब्दकोश

## प्रथम खंड

अजाजाणि — एक यज्ञप्रतीक असावें (जैन शब्द)
अडणी — संकट
*अढाल — निशाण*
अढाळ — मोठें स्थान
अणी — टोंक
अनाहत — योगसाधनानें ऐकू येणारा एक ध्वनि
अनुसंधान — मांडणी
अनुक्षेत्र — मोठ्या क्षेत्रासारखें क्षेत्र
अनेग — अनेक
अपाडु, अपाडें — अप्रतीम, अतिशय, अशक्य
अरव — आरव पाहा
अराधा, अरात्रा — डौल, सरबत्ती
अलक — केस
अलुकी — आवड, ध्यास, भूक
अलर्क — एका राजाचें नाव
अवतंस — कुंडल, कर्णभूषण
अवलीला — लीलेनें, सहज
अवसर पूसे — वेळ पाहून बोलला
अवस्वर — अवसर, वेळ
अविसाळें — घरटें
अविसाळें टाकिती — घरट्याकडे परततात
असळगें — सलगी
असासित — एकदम, अकस्मात्
असिकें — संपूर्ण
असुआर — अश्वस्वार
असोयिता — न ऐकणारा, अश्रोता
अस्ति — अस्थि (क्रिस्तपुराण पाहा)
*अस्त्री — स्त्री*
अह्मोर्णा — आम्हाला
अलुमाळ — ओतप्रोत, अल्प (संस्कृत – अणुमात्र)
अक्षान — आख्यान
आइत — तयारी
आखर — अक्षर, गांवठण
आगम — वेद, श्रुति
आघवें — सर्व
आघाओ — वाटाड्या
आगळा — अधिक
आटी — आढी
आड घाली — आडवा झाला
आडा — रेघ, टिळा
आडी — गायनप्रकार
आतळणें — पावणें, भेटणें
आतुडणें — सापडणें
आथि — आहे (सं. – अस्ति)
आदाव — ॲडम (बायबलमधील पहिला पुरुष)
आदिल — प्रथम
आदिवाचा — संस्कृत भाषा
आन — अन्य
आनारिसे — भिन्न (सं. – अन्यादृश)

आनि आनि परी — नाना तन्हांनीं
आपसया — आपोआप
आपु — स्वाधीन, प्राप्त
आपैतेंपण — आपलेंपण, अनुकूलता
आपैसे — आपोआप
आफावणें — आदरानें बोलावणें
आमोला — चोहींकडून मार
आरतापासि — आर्त लोकाजवळ
आरव — वृक्ष, राई
आरुत — अलिकडचें (सं–आरात)
आरुप — वेडेंवांकडें (सं–आर्य)
आरोगण — मेजवानी
आरौ — आरव पहा
आल — आळें
आवडता — कोणीहि, भलता
आवा — बाई
आहाच — सहज, वरवर, व्यर्थ
आहाळवहाळ — पुरेपूर
आह्मा — ज्वाळा (सं.–आभा)
आक्षवाणी — मंगलप्रसंगीं दीप ओवाळण्याचा विधी (सं.–आयुष्यवान्)
आंकना — अंकित
आंग — मदत
आंगवण — सामर्थ्य, पराक्रम
आंगरळा — सोबती, शरीररक्षक
आंगमिक — आंगवस्त्र
आंगाथणें — अंगिकार करणें
आंडोरी — मुलगी
आंसील — अशील, खानदानीचा

इव — ईव्ह (बायबलमधील पहिली स्त्री)
इव्ही — व्याही

उखर — रेताड
उगम — आदितत्त्व
उगला — उगी राहा, चूप बैस
उगावा — नागवण, झाडा (सं.–उद्ग्रहण)
उचका — तीक्ष्ण कानाचा
उचितचंद्रिका — रुक्मिणीची एक दासी
उजरणें — आकळणें
उजरी — उज्वलता, सामर्थ्य
उणु — हून (पंचमी प्रत्यय)
उतळू — उथळ
उथळी, उथाळी — खानाची बैठक
उदेमु — उद्यम, उद्योग
उधाणें — बहरणें, दरवळणें
उपर्जाय्या — जन्मून
उपनला — उपजला
उपरवाळा — वर, उंच
उपसाहणें — सहन करणें
उपहुडु — उदय, जागृति
उपास्ति — उपासना, सेवा
उपरेपणें — ओहोटणें, उपेक्षणें
उपेणें — विश्रांतिस्थान, जवळ येणें
उभारा उष्मा
उभणें उभारणें
उपम — पुष्कळ
उमाणें — तुलना, माप
उलूक — घुबड

# शब्दकोश

## प्रथम खंड

अजाजाणि — एक यज्ञप्रतीक असावें ( जैन शब्द )
अडणी — संकट
अढाल — निशाण
अढाळ — मोठें स्थान
अणी — टोंक
अनाहत — योगसाधनानें ऐकूं येणारा एक ध्वनि
अनुसंधान — मांडणी
अनुक्षेत्र — मोठ्या क्षेत्रासारखें क्षेत्र
अनेग — अनेक
अपाडु, अपाडें — अप्रतीम, अतिशय, अशक्य
अरव — आरव पाहा
अरावा, अरावा — डौल, सरबत्ती
अलक — केस
अलुकी — आवड, ध्यास, भूक
अलर्क — एका राजाचें नाव
अवतंस — कुंडल, कर्णभूषण
अवलीला — लीलेनें, सहज
अवसर पूसे — वेळ पाहून बोलला
अवस्वर — अवसर, वेळ
अविसाळ — घरटें
अविसाळें टाकिती — घरट्याकडे परततात
असळगें — सलगी
असासित — एकदम, अकस्मात्
असिकें — संपूर्ण
असूआर — अश्वस्वार
असोयिता — न ऐकणारा, अश्रोता
अस्थि — अस्थि (खिस्तपुराण पाहा)
अस्त्री — स्त्री
अह्मोर्णां — आम्हांला
अलुमाळ — ओतप्रोत, अल्प ( संस्कृत - अणुमात्र )
अक्षान — आख्यान
आइत — तयारी
आखर — अक्षर, गांवठण
आगम — वेद, श्रुति
आघवें — सर्व
आघाओ — वाटाड्या
आगळा — अधिक
आटी — आढी
आड घाली — आडवा झाला
आडा — रेघ, टिळा
आडी — गायनप्रकार
आतळणें — पावणें, भेटणें
आतुडणें — सापडणें
आथि — आहे ( सं. - अस्ति )
आदाव — ॲडॅम ( बायबलमधील पहिला पुरुष )
आदिल — प्रथम
आदिवाचा — संस्कृत भाषा
आन — अन्य
आनारिसे — भिन्न (सं.—अन्यादृश)

आनि आनि परी — नाना तऱ्हांनीं
आपसया — आपोआप
आपु — स्वाधीन, प्राप्त
आपैतेंपण — आपलेंपण, अनुकूलता
आपैसे — आपोआप
आफावणें — आवगनें बोलावणें
आमोला — चोहींकडून माग
आरतापासि — आर्त लोकांजवळ
आरव — वृक्ष, राई
आरुत — अलिकडचें (सं-आरात)
आरुप — वेडेंवाकडें (सं-आर्ष)
आरोगण — मेजवानी
आरौ — आरव पहा
आल — आळें
आवडता — कोणीहि, भलता
आवा — बाई
आहाच — सहज, वरवर, व्यर्थ
आहाळवहाळ — पुरेपूर
आह्मा — ज्वाला (सं.-आभा)
आक्षवाणी — मंगलप्रसंगीं दीप ओवाळण्याचा विधी (सं.-आयुष्यवान्)
आंक्ना — अंकित
आंग — मदत
आंगवण — सामर्थ्य, पराक्रम
आंगवळा — सोवनी, शरीररक्षक
आंगसिक — आंगवस्त्र
आंगाथणें — अंगिकार करणें
आंडोरी — मुलगी
आंसील — अशील, खानदानीचा

इव — ईव्ह (बायबलमधील पहिली स्त्री)
इव्ही — व्याही

उखर — रेताड
उगम — आदितत्त्व
उगला — उगी राहा, चूप बैस
उगावा — नागवण, झाडा (सं.-उद्ग्रहण)
उचका — तीक्ष्ण कानाचा
उचितचंद्रिका — रुक्मिणीची एक दासी
उजरणें — आकळणें
उजरी — उज्वलता, सामर्थ्य
उणु — हून (पंचमी प्रत्यय)
उतळ — उथळ
उथळी, उथाळी — लिंगाची बैठक
उदेमु — उद्यम, उद्योग
उधाणें — वहरणें, दरवळणें
उपजीय्या — जन्मून
उपनला — उपजला
उपरवाळा — वर, उंच
उपसाहणें — सहन करणें
उपहुडु — उदय, जागृति
उपास्ति — उपासना, सेवा
उपरेपणें — ओहोटणें, उपेक्षणें
उपेणें — विश्रांतिस्थान, जवळ येणें
उबारा उष्मा
उभणें उभारणें
उपम — पुष्कळ
उमाणें — तुलना, माप
उलूक — घुबड

उल्हाटणें — उलटणें, संपणें
उल्वण — क्षोभ, संकट
उसणणें — शोषेंत भरळणें
उळ — फूल

ऋषभ — सप्तस्वरांतील दुसरा स्वर

एकांगगुष्टितपिए— एका पायाच्या अंगठ्यावर तप करणारे
एकावद— एकत्र
एवांका— मतलब

ऐतारे— उच

ओगरणें— वाढणें
ओडवणें— पुढें करणें, प्राप्त होणें, ओढणें
ओळग— सेवा, आश्रय
ओटा— ओटा, उंचवटा
ओंडयो— ओढ, आकर्षण
ओहटु— विराम (सं.-अवघट)

अंकणा— जेत्याचें चिन्ह
अंतुरनायक— अंतःपुरनायक, बलिष्ठ पुरुष
अंतुरी, अंतोर— स्त्री, पत्नी
अंदु— सांखळी, बेडी

कचोळें— पूजापात्र
कटक— सैन्य
कडसिणें— कडविणें, कसास लावणें
कणवा—दया
कन्हु— कान्हा, कृष्ण
कबर— वेणी
करउ— करो
कलम— कलह
कवीश्वरव्यास— कवीश्वर व्यास, भास्करभट्ट
काइसेन— कोणत्या प्रकारें, कशानें
काखाटणें— काखेंत मारणें
कांडाळ—धनुष्य
कापडी— यात्रेकरू
काबरें—कावरें, भ्रमात्मक
कामारें— काम्यकर्मसमूह
कामावणें— तयार करणें
काले—पुर्टे
कासिमरी— सरस्वती
काळवल— अंधकारयुक्त
काळी— कलिका
किर— खचित
किरवले— लहान जंतू
कीर्तिमुख— दंडावरचा दागिना
कीला— प्रकाश, प्रभा
कीत्याक— कित्येक
कुचिटाळे— किल्ली
कुल्लाळ— कुंभार
कुवासा— आश्रय
कुशरी— कलाकुसर (सं.-कुशल)
कुंकुम — केशर
कुंटा — लंगडा
कुडा — क्रीडा
कोकडी — वांकडी
कोथळोबास — गोविंदप्रभूंच्या जवळ असलेला एक ब्राह्मण [स्मृतिस्थळ]

कोडी — कोटी, खंडी

खरडा — खडबडीत मोती
खरस — खरखस, तोंडांत येणारा फेंस
खरस तोंडी येणें — दम लागणें
खागे — गुप्त स्थळ, अंतिम स्थळ
खांचणें — कमी होणें
खाजें — खाऊ
खीरोदक — शुभ्र वस्त्र
खेचर — आकाशगामी, योगी, भूत इत्यादि
खेंव — कच, आलिंगन, संकट
खेडकुळी — पाट, ओढा, नदी

गच्छ — सात पिढ्यांची थोर ऋषींची परंपरा, समूह
गजकेसरी — हत्तींना सिंह तसा शत्रुपक्षाला भासणारा
गडदेचिआ — गडद अंधाराच्या
गणेर — कण्हेर
गरुड — तालिमखाना
गवसणें — आच्छादणें, व्यापणें
गाढें — मोठें
गाणीव — गायनचातुर्य
गादणें — मलीन होणें
गांधार — सप्तस्वरातील तिसरा स्वर
गाभेवन — सूक्ष्म अंकुर
गिवसू — शोध
गीतसाल — गीतशाळा
गुदरु — डेरा, राहुटी
गुण — वात
गुंडा — गोटा
गोकुलम् — गोकुळांत [ हिंदी–गोकुलमें ]
गोठी — गोष्ट
गोदरी, गोद्री — गांवाजवळची जागा
गोवा — भडयला, बंधन
गोवार — शेणखळा
गौल्यता — गोडी
गंडूप — चूळ, गुळणा

घट — समूह
घरुंबी — गृहस्तंभी [ ? ]
घाटोली — फळी
घापणे — घातलें जाणें
घिउदे — एक पक्वान्न

चतुरदेशी — बहुभाषाचातुर्य
चला — चालाया
चहुबुडी—चार प्रकारचें ( हत्यारांच्या शिक्षणासाठीं केलेली )
चांपोली—चांफेकळी
चिपुळी—पिचकारी
चिर—वस्त्र
चीकभरी — रसयुक्त
चेइलें — जागें
चुलुक — शिखर
चुमळणें — चुचकळणें
चेपणी — आढी
चेष्टणें — हालचाल करणें
चौपाळ — खाट

जती — यती, पवित्र स्तोत्रपाठ
जाकळणें—मोह पावणें, कळवळणें

जाणीव—ज्ञान
जानाची—जाणत्याची
जिणी—जन्मसाफल्य
जिर्णे—जिंकणें, जाणणें
जिताजि—जिताचि
जिवती—लहान मुलाच्या गळ्यांत घालण्याची प्रतिमा, एक देवता
जीवनस्तंभ—आपस्तंभ
जुग—युग
जुदेअ—ज्यू
जोविया—पाहिला ( गुजराती रूप पहा )
जौळ—समूह, अभ्र

झकवाद—वितंडवाद
झळेंबुका—गुच्छ
झांका—धाड
झांसा—ममकावणी
झेंतिय—जंटाइल ( इंग्रजी शब्द ), ज्यू नसलेला

टपकर—लवकर
टाग, टांग—तंगडी
टाचा—लहान, तोकडें, टेंगणें

टसे—फांद्या ( ठेसे, ढेसे – भैरवी टीका )
ठाणदिवी—स्थान दाखविणारा दिवा
ठाणवई—लाकडाची समई, वर पणती ठेवण्याची घडवंची
ठाव—स्थान, पत्ता
ठीकलग—अलंकार

ठौळ—समूह

डगळ — उदार, सदळ
डाह — दाह
डिंभ — लेंकरू
डेंबा — अवडंबर
डंब — दंभ

ढाळ — डौल, तऱ्हा, तेज

तमाल — ताड
तराय — मांडणी, तऱ्हा
तलग — पिलू, बालक
तवका — जोर, आवेश
तवनी — पेज
ताठी — मूर्च्छा
तातणें — भाजणें
तानवडा — स्त्रियांचें कर्णभूषण
तांथु — तंतु
तिर्यक — वांकडें, वांकडें जाणारा प्राणी
तुरंबी — मंजिरी
तेजी — घोडा
तेतुलें — तितके
तेसणा — तेवढा
तोल — भार
तोवर — तुरा, अंकुर, बहर
त्रिदश — देव
त्रीवेनाचारतरी — त्रैवर्णिकाचारी (एक जैन शब्द )

थाक — थांग, खोली
थिल्लर — डबकें

थोटपण — आडदाडपणा

दमघोष — शिशुपालपिता
दल — पुट
दळवटी — गर्दी
दळवय—मुख्य
दळवाड—समूह
दादुला—धनी
दारवठा—उंबरठा
दारुयन—लाकडाची कळसूत्री बाहुली
दाशत्व—दास्यत्व
दांडी—पालखी
दांत—इंद्रियें दमन केलेला
दिठी—दृष्टी
दृति—सुगंध
दृष्टयुतें—नीट पाहून
देउ—देव, देवो
देशी—मराठी
देहुडा, देव्हडा—वाकडा
दोसें—साठीं ( उद्देशें )
द्विज—दांत
द्विरद—गणपति

घडेयावरी—घड्यावरून, पाट्यावरून
घणि—तृप्ति
घपाटा—थालीपीठ
घवघनी—परम तृप्ति
घाडी—हल्ला
घाणें—तृप्त होणें
घादा—घडामोडी
धिंवसा—धैर्य
धुनीत—धारण करतो
धुपाडी—मोठा धूर
धुमकुस—धुमाकूळ, गर्दी
धुरा—मंत्री, सेनापति, आघाडी, मर्यादा
धुवा—धावा
धुधुरु—काजवा

नइ—नदी
नडमाच—उत्कर्ष
नफर—नोकर
नव्हाळी—नवलाई, शोभा
नसुदी—नुसती
नागरपण—सौंदर्य
नागारी—भाट
नाथणें—नसणें ( न + अस् )
नाद—ध्वनि, सत्सुर
नावनिका—नामवंत
नावेक—क्षणभर, थोडेसें
नाळी—घटिका
निकें—नीट, चांगलें
निरसळ—निर्मळ
निगम—वेद
निडारणें—डवडरणें, पक्व होणें
निदेलें—निजलें
निमुरवत—टणक
निम्होळ—निमुळती
निराळ—आकाश
निरुतें—पूर्णपणें, निश्चयानें
निर्वचेना—सांगता येत नाहीं.
निऱ्हा—केवळ, अगदीं, आत्यंतिक
निवाडा—निर्णय, भेद
निसवग—निघणें, धैर्यानें पुढें येणें

निषाद--सप्तस्वरातील सातवा स्वर
नीच--नित्य
नीलकठ--शातलिंगाचे गुरु
नेटेवोटें--यथातथ्य
नेणिव — अज्ञान
नेपाळें — शात, सुदर
नेवाण — पराजय
नेहटणें — न्याहळणें, भिडणें
नोजनय्या — थकल्या ( मूर्तिवर्णन स्तोत्र पहा )
पघळ--विस्तृत
पडसर--खणखणीत
पडप -प्रतिष्ठा, कौतुक, आच्छादन, भूषणवस्त्र
पडिभर--बडेजाव, प्रतिष्ठा
पडिमठ--प्रतिमठ, प्रत्येक स्थान
पढियता--आवडता
पढियासणें--भासणें, आवडणे
पढियो--प्रीति
पत्रवेली-विड्याचीं पानें, विड्याच्या पानाची वेल.
पन्हरें--सोनें ( पधरा कसाचें )
परणणें--लग्न करणें
परवडी--सार्वजनिक भोजन, पक्वान्न, आवड, उजळणी, गांधळ, तऱ्हा
परिकर--मनोहर
परिणामक--परिणामवादी
परियल -परळ, थाळी
परिया--झोंका
परियेसणें--ऐकणें
परिवर--घर, गुप्त स्थान
पलित--केस पिकणें
पल्लव--पदर
पवाडु--विस्तार
पव्हे--पाणपोई
पसाय--प्रसाद
पाउड--नजराणा, दक्षिणा
पाखधुनि--पख धुणें
पाखाळणें--शुद्ध करण ( सं प्रक्षाल)
पाग--इच्छा, ताबेदारी, हाल
पाखर--झूल
पाटसरी--भित छपराला लागते ता भाग
पाटा--वस्त्र, चिंधी
पाटा फुटणें--पटल नाहीसे होणें
पाटोळें--रेशमी वस्त्र
पाड--संगत, बरोबरी, योग्यता
पाथाळु--पाताळ
पातिकर--भागिदार
पात्रिआर्क--पॅट्रिआर्क (इंग्रजी शब्द)
पापरा--लाथा
पायवणी — चरणोदक
पायाळ — पायाकडून जन्मलेला. त्याचे जवळ कांहीं दैविक शक्ति असतात अशी समजूत
पारखा--परका
पारठी--स्तनपान सुटलेली, शुष्क
पालखी-- पालखी, पाळणा
पालाणणें — घोड्यावर खोगीर चढवून सज्ज हाण
पालेखाइर — पाला खाणारे (वानर)
पास — जवळ ( पार्श्व )
पासाउ- प्रसाद
पासाव--पासुन ( पार्श्वात् )

पाळा — वेढा
पांता—रक्षण करिता, पाहतां
(पा=रक्षण करणें, पाहणें)
पांति—पंगत, पंक्ति
पांतु—रक्षण करो
पुरती — पूर्ति, पूर्तता
पुडरा — पुरवठा
पुसा पक्षी, पोपट
पूरिता — ( उपचार ) पूर्ण करिता
पेखणें — नृत्य
पेखनेकार — नृत्यकार, गणिका
पेण — मुक्काम
पेद्रु — सेंट पिटर
पेहे — पय, दूध
पोखणे — चोळणें, पोसणे
पोखरणी — पुष्करिणी, लहान तळें
पोतास — कापूर
पोलरा — एक नाणें असावें
पोल्हार — पायांतलें भूषण
पंचम—सप्तस्वरांतील पांचवा स्वर
पंचवगत्र—महादेव
प्रकाळणें—लावणें
प्रतिपत्ति—मेजवानी, ग्रंथरचना
प्रतेष्टा — स्थापना
प्रवर्त — व्यापार
प्रव्हाण — वाहन ( नौका )
प्रोफेता — प्रॉफेट ( इंग्रजी शब्द)

फड — अड्डा
फड पडणें — कडाक्याचा वाद होणें
फावणें — आठवणें, लाभणें
फुजे — फुरकटे ( सं.--स्फुंद )
फुन पुन्हां
फुली — एक झाड

बगाड — नवस फेडण्याचा विधि
बरव — शोभा
बरवट — चांगलें
बलुता — वतनदार गांवकामगार इत्यादिकांचा वांटा
बहल — बहर, विपुलता
बाइला — बाईनें
बाजवा — बाज, चौरंग
बाणलिंग — लहान लिंग, खड्कावरील पिंड
बापैये — चातक
बाबरझोटी — झिपऱ्या
बालव — पंचांगाच्या करण या अंगाचें दुसरें करण
बांदीडि — बंदिखाना
बांबळ — समूह, बहर
बांबळणें — बहरणें
बिजस्तां — वनस्पतींना
बिर्जे — आगमन, गमन ( सं.--व्रज् )
बिदार — बिऱ्हाड
बिदीं — रस्त्यांत
बिंदुली — कंकणे
बिंयाळ — भलतें, वाटेल ते
बिहालेपण — भीति
बीक — सामर्थ्य
बुझावणें — बोध करणें, समजावणें
बुंधी — बुरखा, आच्छादन, आश्रयस्थान
बोणें — नैवेद्य, प्रसाद

बोलगड — बोलवेवडा
बौल — बोहला
बौहे — बहुत
ब्रीद — चिन्ह, पदक
ब्रीदावळी — बिरुदावली, पोवाडे

भउसें — इच्छा, आवड
भलता — कोणीहि, वाटेल तो
भाजन — भाजण, मिश्रण, पात्र
भाटिव — स्तुति, भाषण
भारती — वाणी
भावरीय — भ्रमरासारखे, परीक्षावत
भीतरि — आत
भेडे — भीति
भोडुवे — देवदूत
भोरी — उटी

मढ — मठ, देऊळ
मद्दल — मगज
मधूक — मधुकर, भुगा
मध्यम — सप्तस्वरातील चवथा स्वर
मनणें — मानणें
मनाचीरु — मनासारखी
मपित — मोजणी
मयंक — चंद्र
मलपणें — डुल्त चालणें
मशक — चिल्ट
महाल्सा — म्हाळसा देवी
मा — अरे, अहो
माझारि — मध्यें
माझि — माझ्यावर
माजिट — तांबडें वस्त्र (सं.—माजिष्ठ)

माताइत — उन्मत्त
मातापूर — आताचें माहूर गाव
मातावळ — उन्मत्त
माधुला — स्त्री
मादन — मर्दनयुक्त स्नान
मानाठी — मानेच्या अस्थी
माधवी — वसंतकाल
मारुदत्त — एक राजा
माल्गाठी — विशिष्ट गाठ असलेला
मालीमर्दन — तैलादि द्रव्याचें मर्दन (मल्लमर्दन)
मावा — माया
मादि, मादियाळी — मंडळी, समूह
मादूस — पेटी, तिजोरी (सं. मंजूषा)
मिराशी — वतनदार
मुडा — साठा
मुन्हारी — बोलावणें
मूळ — लग्नामधील आमंत्रण
मेलिकार — छावणी, वस्ती
मेहल्नी — रान
मोकारा — मोकळीक
मोवाशी — वसुली करणारा गावकामगार
मोप — भाडार
मोहम् — मला (सं. महाम्, हिं.—मोहे, मुझे)
म्हणियारा — दास

यीक्षण — ईक्षण, कृपादृष्टि

रसोये — रसोई, पाकनिष्पत्ति
रहवर — श्रेष्ठ रथ (रथवर)

राई — राधा
राउळ — देऊळ, मंदिर, राजवाडा
राणीवसा — अंतःपुर
रावग — रंगबिलेपन
रापो — राखो (जुन्या मराठींत ख ऐवजीं पुष्कळदां प येतो)
राहाटणें — वावरणें
रांवगें — रंगविणें
रींगवणें — प्रवेश करणें
रूख — वृक्ष
रूखराए — वृक्षराज
रूढपण — श्रेष्ठता
रूपस — प्रकाशमान
रेखा — कवित्वरचना
रोळु — क्रम, खटाटोप
रंभा — केळ

लगडौनिया — लगट करून
लवणारसमुद्र — जैन वाङ्मयांत भारताच्या तीन बाजूंच्या समुद्राला लवणसमुद्र म्हणतात
लावेवे — दिवे
लाहा — हव्यास (लाभ)
लिंगाड — सकट
लुंठणें — लोळणें
लो — नाद, छंद
लंकार — लत्राडी

वचणें — जाणें
वडप — वर्षाव
वनकर — वनरक्षक
वरिखा — वरचढपणा, वर्षाव
वर्त्त — वाद, बंधन, पाट
वाउर — निरर्थक
वाएकोळे — वृथा
वाखाणी — व्याख्यान, विवरण, स्तुति
वाटोगर — वटमोगरा
वाड — मोठें, वाद
वाणियले — स्तवन केलें
वाल्भ — प्रीति, आवड
वालीफ — आच्छादन
वालुमर — वाळुकण
वावणें — वाइवणें
वावि — खिडकी, झरोका
वाहाणी — पद्धत
वाहार — पीडा
वाही — प्रवाही, सरोवर
वांजेलिस्त — इव्हंजेलिस्त (इंग्रजी शब्द) खिस्ती धर्मोपदेशक
विचुकें — वांकडेतिकडें
विजू — वीज
विटक — लहान विडा
विधुर — असंबद्ध
विदग्ध — परिपक्व
विंदानी — कुशल
विन्यास — रचना, विस्तार, निरूपण
विपार्यें — कदाचित्, क्वचित
विभाडणें — फोडणें
विरूढणें — स्पष्ट करणें, भाष्य करणे
विवशी — हडळ
विसाळ — ईर्ष्या, स्पर्धा, द्वेष
विस्मो — विस्मय
वीजण — पंखा

वीजन — बैठक, आसन
वीट — एक देश
वीणी — निर्मिति
वेंगाटणें — वेंगाडणे ( स. — व्यंकट )
वेठी — तुरा, झूल
वेणा — वेदना
वेलाटी — वेताची छडी
वेथा — व्यथा
वेन्ही — पर्यंत
वेल्हावणें — विस्तारणें, आनदणे
वेहकळी — लहान झाड
वैरागर — हिऱ्याची, रत्नाची खाण
वोजावणें — मार्ग दाखविणें, व्यवस्थित करणें
वोडवन — मांडणी
वोता — अधिकाधिक
वोथिजणें — पातळ करणे
वोदपाळी — उन्हाची सौम्य तिरीप
वोपणें — अर्पण, तेज
वोंबणें — ओथबणें
वोरस — प्रेम, पान्हा
वोवरी — ओवरी, ग्वोली, कोठी, पडवी
वोसग -- उत्सग, माडी
वोल्हावन लेप
वकसे — वाकला, नम्र झाला

शलाका — सळई
शेरा — टोंक, शिर
शुक्तिक — मोती
शेशनले — शेपमस्तकावर ( नल्लाट, ललाट )
शेपिचा — शेवटचा

षड्ज — सप्तस्वरातील पहिला स्वर

सगर्भु — खराखुरा
सतरावी — जीवनकला, चंद्रबिंब
सदैव — भाग्यवान
सन्नद्ध — सज्ज
सन्नाधान्नध — शस्त्रसज्ज
सफर — लहान मासा
समतुक — बरोबरी
समचन — चागलें ( स. — समीचीन)
समवशरण — जैन तीर्थंकराची सभा
सम्मेदगिरी — तेविसावे तीर्थंकर पार्श्वनाथ यांचें विश्रांतिस्थान
सरळ — कडें
सराउ — अभ्यास, सराव
सरागू — रंगित
सरिसेपण — सारखेंपण
सरोभरी — बरोबरी
सर्ग — समूह
सळ — शल्य, आग्रह
सा — सहा
साइसडे — कळसूत्री बाहुलें
साउमा — समोर
साकडें — संकट
साकिक — साक्षीदार, पहारेकरी
साकुबें — अर्डे
साखाळा — शाळा
साडबरु — शृंगारलेला
सानीव — नम्रता
साबडे — साधेभोळे

सामयय — भोंक पाडण्याचें हत्यार
सामायणें — सामावणें, व्यापणें
सायर — सागर
सारस्वत — सरस्वतीपुत्र, विद्या
साला — मेहुणा
सावाय — मदत, साहाय्य
सावायिली — सयोग पावली, आलिंगिली
सावेव — मूर्तिमत
सासिन्नले — भरास आले
साहानुकेसी — समाधानासह
सात — बाजार
सावाइक — संकट
सिंयणें — शिंपडणें
सीरण — बरोबरी
सीराणी — आवड
सुती — उत्पत्तिस्थान
सुपरि — चागल्या तऱ्हेनें
सुपैति — गादी
सुभास — चागले बोलणारे, प्रकाशमान
सुमरिला — सारला
सुरवाडणें — सुखावणें, सुकाळ पावणें
सुरिज — सूर्य
सुहाया — आवडता, श्रीमत
सूदणें — ठेवणें, मारणें
से — स्मृति, आठवण
सेरीं — शेवटीं
सेदणी — पोहऱ्यासारखें भांडे
सेन — शयन, सेज
सेल — उत्तम वाद्य, खाण्याचा पदार्थ
सेल्द्री — सैरंध्री, दासी
सेवो — शेवट
सेश,सेस — मळवट
सैग — सहज
सेंघ — पुष्कळ, केवळ ( स.-सत्र )
सैह्याचल — सह्याद्री
सोंकरणें — उडवणें
सोनवें — सोन्याची वात
सोनेसळा — पीतांबर
सोपारें — सोपें
सोळाके — सोळा कलाचें
सौ — तो ( स.- सः )
सौरस — गोडी, इच्छा, सामर्थ्य ( सं -सुरस )
सकर्षण — बळिराम
संघारणें — मारणें
सवसाटी — बरोबरी
संवादणें — चर्चा करणें
सविति — पूर्ण ज्ञान
ससारणें — सरसावणें
स्वागी — स्वत.
स्वेत — सेतु
स्यामा — श्यामा, सुदर स्त्री

हक्कारिया — हाक मारली
हटीं — रणभूमींत
हन — आणखी, पादपूरक शब्द
हरळ — गारगोटी, वाळू
हरासु — विक्री, लिलाव
हरिद्रा — हळद
हल्लरु — गाणें
हळुवें — हलकें
हातधरणें — हातीं धरण्याचें, फडकें इ.

हातवटी — हातोटी
हाथियेर — हत्यार
हाथिय — काडवात
हिरेल्ग — हिऱ्यांनीं युक्त
हेळा — लीला
होड — पैज

## द्वितीय खंड

अक्रा — अकरा मारुती
अखर — गावाजवळची जागा
अघमर्षण — पापनाशन
अडती — अडथळा
अतसीपुष्प — जवसाचें फूल
अतुट — सतत
अनवट — पायाच्या आगठ्यांत घालावयाचा दागिना
अनुपत्ति — विपत्ति
अनुहात — योगसाधनानें ऐकूं येणारा एक ध्वनि
अपसद — अधम
अपेट — रंग न मोडलेला
अफतरी — दुर्दशा, दुष्कीर्ति
अबद्द — अशुद्ध, अभद्र
अमृतफळ — मोदक (एकनाथ, रुक्मिणीस्वयंवर ६।८६ मध्येंहि हा शब्द येतो)
अम्रसिंचण — वधूनें आंबा शिंपा वयाचा विधी 'आंबा शिंपावया गोरटी' — (एकनाथ, भागवत ११।१४२)
अयणी — मालिका, इच्छा, अभिमान
अयनांश — दक्षिणायनाची सहामाही
अरन — या लोकींचा
अराटी — एक झाड
अरुवार — हल्कें, खुसखुशीत
अलाईबलाई — इडापिडा, दुष्ट
अवगमे — भासतो, वाटतो
अविधा — अविद्या
अविंध — यवन
अव्हाट — आडवाट
असन — आसन
असि — तरवार
अस्त्री — स्त्री
अहिक्य — आहिक्य पहा
अहिमाणिक — प्रधानाच्या घरच्या मुलाचें नाव
आउख — आयुष्य
आटाटी — आटापीट
आखिल — अंकित
आगडी — आगठी
आगळण — सामर्थ्य, पराक्रम
आडुमाडु — आडदांड
आदान — अडण, गाई म्हशी इत्यादिकांची कास
आण — शपथ
आधि — व्यथा

आधुक — आधाशी
आन — अन्य
आनकदुंदुभि — वसुदेव
आपंगिता — आश्रयदाता
आपैता — स्वाधीन
आप्यायन — पोषण
आयतन — स्थान
आरज — श्रेष्ठ (आर्य)
आर्जव — सरळपणा, ऋजुता
आवंदाची — चालू सालची
आहळॉण — पोळणें
आह्निक्य — ऐहिकता
आळण — कालवण
आक्षै — अक्षय

इजारा — खंड, ठेका
इंद्रगोप — पावसाळी किडा

उखर — रेताड जमीन
उगवणें — ओळखणें
उच्छिलींग — अळवें
उजू — ऋजु, सरळ
उडु — नक्षत्र
उधवणें — वर येणें
उन्मेष — बुद्धि, ज्ञान
उपानह् — जोडा
उबार — जास्त, शिल्लक
उमती — उमेद, ज्वानी
उमरदराज — चिरंजीव
उरग — सर्प
ऊर्णा — लोंकर

ओप — उजाळा

अतुरी — स्त्री

कटक — सैन्य
कट्ट — जूट, वेढा
कडाबिन — एक बंदुक ( इंग्रजी--कॅर्‌बिन)
कणिका — सूक्ष्म कण
कथिका — कढी
कंनप्पा — एक कानडी संत
कमचा — वेताची छडी
करबला — लेझिमीचा खेळ, मोहरमांतील मेळा
करवल — बंदुकवाला घोडेस्वार
करंडी — करंडा
करेणु — गजबालक, हत्तीण
कर्क — खेकडा
कलत्र — पत्नी
कलवड — शेणमाती वगैरेंनीं झाकलेला वाळलेल्या गोवाऱ्यांचा ढीग
कलाल — किलबिल, आवाज
कल्हार — पांढरें कमल
कवाड — दरवाजा ( कपाट )
कळकट — भांडखोर
कळंब — कदंब
कक्षा — बाजू
कापडी — यात्रेकरू
कारलें — स्त्रियांचा गळ्यांतील दागिना
कासार — तळें, सरोवर
कुकरी — कुत्री ( ! )

कुंजशाह — कुजनिवासी
कुडकी — कानामधील दागिना
कुडी — वाईट, दुष्ट
कुमेद — विशिष्ट तांबूस रंगाचे
कुल — सर्व
कुहिरी — कैरी, कोवळा फणस
कृच्छ्र — तप
कृत्रिम — कपट
केणें — बाजारात आलेली वस्तू
केली — क्रीडा
कैपक्ष — क्रीडा
कैवाड — कारस्थान, कैवार
कोकनद — तांबडें कमळ
कोडी — कोटी, खडी
कोतल — कोतवाली घोडा, शृंगारलेला घोडा
कोरवडे — उडदाचे वडे
कोळव — अदपाव (स. कुडव)
कौळिक — चेटकी, मांत्रिक
कचनी — नर्तकी
कधर — मस्तक, मान

खडकुती — धान्य मळल्यावर उरलेला भाग
खतल — कत्तल
खनाळ — गुहा, एकांतस्थळ
खर — गाढव, बोचणारें, कडक
खवाशी — हौद्याच्या मागे बसण्याची जागा
खाकरणें — शुष्क होणें
खाणोरी — दरोडेखोर
खिजवणें — त्रास देणें
खुलास — मोकळे
खेंव — अडचण, आलिंगन
खोडका — शुष्क
खौळणें — खवळणें
खंजनाक्षी — खंजन पक्ष्यासारखे डोळे असलेली, सुंदर स्त्री

गचगच — दिरंगाई
गद — आजार, रोग
गदारोळ — गोंगाट
गरती — गृहवती, कुलीन
गरशी — गांठ
गलाठा — गोळा, गोंधळ
गलोला — गोळा
गहीन — गरीब, थड
गळाळा — घोट
गारपगारी — मनानें गारांचा पाऊस पाडणारे
गुदार — हौदा
गुडा — गोटा
गुमान — ताठा
गुल्म — सैन्यविभाग
गुळगुळ — मऊमऊ
गुळवरी — गुरोळ्या
गंगम — सुतांडे
गोधूम — गहू
गोफाटणें — पकडणें
गोंबी — घोण
गोमुखी — गाईच्या तोंडासारखी जपमाळेची पिशवी
गोल्हाट — प्राणवायूचें स्थान
गोवा — संकट, अडथळा

गोवार — शेणखळा
गोह्रो — तरणाताठा माणूस
गौल्य — मधुरता
ग्रंथिचें — गांठचें

घरवात — संसार, प्रपंच
घोलवणें — भुलवणें

चणकपिष्ट — चण्याच्या पिठाचें
चरम — शेवटची
चऱ्हाट — दोर
चवाळी — घोंगडी
चवंढाळ—चव्हाट्ळ
चामकणें—उचलणें
चिपटें—पावशेर
चीर—वस्त्र
चेहरें—जागें
चोजवणें—शोधणें, कौतुक करणें
चोप लावणें — मन लावणें
चौखरून — चारी बाजूला ओढून
चंद्रघणी — मनाची तृप्ति

जतुगृह — लाक्षागृह
जनोबा — जनार्दन बाजीराव
जाकली — ग्रासते
जाजावणें — पस्तावणें
जापाणणें — भ्रष्टविणें
जावी — जावा बेटांतील
जांगळे — रानटी
जांबूनद—सोनें
जिलिब—लवाजमा, मिरवणूक
जिलेबंत—शोभिवंत

जुंबाड—समूह, झाडी
जेजाला—लांब नळीची बंदूक
जेन—जीन, रजई
जोग—संसारत्याग

झडती—हिशोब
*झाडा—क्षय, हिशोब करून बाकी शून्य करणें*

टाणवय—ठाणवई, समई
टिपरी—हाताचीं चोटें पिळण्यासाठीं काठी घालणें

ठाणमाण—शरीराची ठेवण

डला—ढेकूळ, लहान गोळा
डाजणें—डाचणें
डिमदारी—रणधाई, आवेशपूर्ण दृश्य
डोकीला रुमाल बांधणें—सुतकाचें चिन्ह
ढंगारणें—दडग्यानें मारणें

*ढाळ—डौल, तेज, तऱ्हा*

तकवा—ताकद, धीर
तक्तरावा—मिरवणुकींत गाड्यावरील नाचणाऱ्या कलावतिणींचे ताफे
तगड—चांदीचा पत्ता
तनावा — आक्रमणशक्ति
तरणी — सूर्य
तऱ्हे — तऱ्हेवाईक
तल्लब — तगादा समन्स

तवश — संताप, आवेश
तवर — तोरा
तसलीम — सलाम
तस्कर — चोर
तळवेमार — तापलेल्या तव्यावर उभें करणें, तळपायावर मारणें.
तानवडे — स्त्रियाचें कर्णभूषण
तादळ — तादुळाच्या दाण्याच्या आकाराचा शेंदूर लाविलेला दगड
तालीम — सलाम
ताम्रबर्दी — यवनाच्या बदींत
तुड — तोंडाळ
तुरु — बधारा
ततवितत — तालबद्ध

थिल्लर — डबकें

दळवाडें — सैन्य
दरेमार — दरींत लोटणें
दापणें — जरब देणें, नाश करणें
दाग — अरण्य
दिवटा — कुडबुड्या जोशी
दुल्लड — दोनसरी दागिना
देवमदार — कल्पवृक्ष
देवाईल — देऊळ
देहुडी — चौकी, देवडी (स. — देहली)
दड — क्रमानें निमुळता होणारा भाग
दंदशूक — सर्प
द्वय — दोन्ही बाजूचे

धट — धर्टिंगण
धाणें — तृप्त होणे
धाम — प्रकाश, तेज, गृह
धारण — दुष्काळ, महागाई
धुनि — क्षालन, नदी
धुमकूस — धुमाकूळ
धुरा — सेनापति, मर्यादारक्षक, सीमा
धैवत — सप्तस्वरांतील सहावा स्वर

नग — वृक्ष, पर्वत
नफर — नोकर
नरवरी — एका गावीं तयार केलेले
नाइते — अस्त्र
नाकवणी — नाकात घालण्याचें तीक्ष्ण द्रव्य
नाबद — साखर
नाभलगाव — बीडजवळील लिंब गाव असावें
नालकी — बारा भोयाची मोठी पालखी
नासकवणी — नासकें पाणी
निका — चांगल्या
निकुर — राग
निगड — शृंखला
निघोट — दाट
निघटु — शब्दकोश
निब्र — जून व चिकट
निमचा — लहान तरवार
निरनिमित्त — विनाकारण
निरपणें — उपसणें
निरुतें — निश्चयानें
निरंजन — अरण्य, एकांत स्थळ
निर्वुजणें — अडखळणें, कटाळणें

निर्भर — भरपूर
निर्वाळणें — चकचकीत करणें
निसुग — निर्लज्ज, आळशी
निवटणें — निर्मूलन करणें
निळांबर — नीलाकाश
नीलंड — धर्मलंड
नेहटणें — भिडणें, न्याहळणें
न्याहाली — चटई, लहान गादी
पचल्या — तळल्या
पडिभर — श्रेष्ठ अधिकारी
पढणें — शिकणें
परत्र — परलोक
परावा — परका
परी — प्रकार
परिकर — सुंदर, तन्हा
परौता — पलिकडे
पवाडा — विस्तार
पर्णाळी — पानावरील आळी
पस्तावणें — कातावणें
पाडेवार — वतनदार महार
पारड्यांत घालणें — रोज वजन करून तें कमी करण्यासाठीं हाल करणें
पालवी — पदर
पालाग — झूल, खोगीर
पांजणी — खळ
पादरी — गावठाण
पांदरी पडली — गाव ओस पडलें
पाळे — समूह
पिछोडे — हात मागें बांधून शिक्षा करण्याचा एक प्रकार
पुरहर — शिव
पूत — पद्धत
पैशून्य — चहाडी, व्यंग
पोमाळणे — चोळणें
पोल्हारें — पायाच्या आंगठ्यांतलें भूषण
पंकज — कमळ
प्रक्रिया — पद्धत, मार्ग
प्रतोद — चाबूक
प्रभंजन — वादळ

फडतर — तुकडा
फरदा — शालजोडींतील एक वस्त्र
फरमासी — उत्कृष्ट
फारतरी — नाना तऱ्हेच्या
फाळा — सारा
फिरंग — तलवार
फुंदा — गर्व
फोक — ओली खादी, छडी ( इत्यादींनीं मारणें )

बगन्या — भुसकट
बरबडे — एक जंगली झाड, तृणधान्य
बराडिया — आशाळभूत
बरेग — दुष्काळ
बर्हि — मोर
बल्लम — आखूड भाला
बल्लव — गवळी
बळद — भुयार
बादल — मेघ, पटल
बाग्गळ — उनाड
बारबार — पुन्हा पुन्हां
बास — बाबू
बाहुवट — दंडावर बांधण्याचा दागिना

